# मध्ययुगीन भारत

अथवा

## हिंदु राज्यांचा उद्भव, उत्कर्ष आणि उच्छेद.

भाग पहिला

( सुमारें इ. स. ६०० पासून ८०० पर्यंत. )

हा ग्रंथ

चिंतामण विनायक वैद्य एम. ए. एलएल्. बी.

आनररी फेलो मुंबई, युनिव्हर्सिटी

आणि

महाभारत ए क्रिटिसिझम, रिडल आफ धि रामायण, एपिक इंडिया
या इंग्रेजी पुस्तकांचे, व संक्षिप्त रामायण, संक्षिप्त महाभारत
या संस्कृत व महाभारत उपसंहार, श्रीरामचरित्र,
श्रीकृष्णचरित्र, या मराठी पुस्तकांचे कर्ते
यांनीं लिहिला.



सन १९२०

किंमत ४ रुपये.

प्रकाशक-
चिंतामण विनायक वैद्य,
४०१, ठाकुरद्वार मुंबई नं. २.

प्रिंटर-
अनंत आत्माराम मोरमकर,
श्रीलक्ष्मी-नारायण छापखाना,
४०२, ठाकुरद्वार मुंबई नं. २.

हें पुस्तक

ग्रंथकर्त्यानें

# लोकमान्य बाळगंगाधर टिळक

यांच्या

पूज्य व प्रिय स्मृतीस

त्यांच्या अनेक गुणांबद्दल व हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाच्या

गहन अभ्यासाविषयीं तसेंच भारतवर्षाचा प्राचीन

वैभवाच्या अभिमानाबद्दल आणि शेवटीं

या ग्रंथाच्या लेखनांत ग्रंथकारास

वारंवार दिलेल्या प्रोत्साहनाबद्दल

सादर व आभारपूर्वक

अर्पण केलें

आहे.

# प्रस्तावना.



या पुस्तकास प्रस्तावना लोकमान्य टिळक लिहिणार होते. परंतु विधीची इच्छा निराळी व प्रबळ असल्याने मी ही अल्प प्रस्तावना लिहित आहें

हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास मुसलमानी अमदानीपर्यंत साधारणपणे मानला जातो. या प्राचीन इतिहासाचे ठोकळ रीतीनें तीन भाग पडतात. इतिहासाचें मुख्य साधन म्हणजे समकालीन लेख. हे लेख जितके भरपूर व विश्वसनीय असतील तितका इतिहास अधिक सुसंगत आणि पायाशुद्ध होतो. भरतखण्डाच्या प्राचीन .इतिहासाचा पहिला भाग म्हणजे अतिप्राचीनकाळापासून अलेक्झांडरची स्वारी होईपावेतोंचा होय. याचीं साधनें थोडी असून हा इतिहासही अंधुक आहे. यास आर्यकाल म्हणतां येईल. दुसरा भाग शिकंदराच्या स्वारीपासून हर्षापर्यंतचा म्हणजे सरासरीने इ. स. पू. ३०० पासून इ. स. ६०० पर्यंतचा. याकाळांत ग्रीक इतिहासकारांचे लेख तसेच अनेक शिलालेख व ताम्रलेख, नाणीं व इतर देशांतील इतिहास, यांच्या साधनाने बऱ्याच विश्वसनीय रीतीनें इतिहास लिहितां येतो. व्हिन्सेटस्मिथ-प्रभृति इतिहासकारांनीं तो लिहिला आहे. यानंतरचा तिसरा भाग म्हणजे हर्षापासून पृथ्वीराजापर्यंतचा काळ इ. स. ६०० पासून इ. स. १२०० पर्यंतचा असून या काळाचा इतिहास व्हिन्सेटस्मिथनें फारच त्रोटक लिहिला आहे. या इतिहासाची साधनें बरींच उपलब्ध झालीं आहेत; तथापि या काळाचा समग्र हिंदुस्थानचा एकवटलेल्या दृष्टीनें अद्याप कोणीहि इतिहास लिहिला नाहीं. असा इतिहास लिहिण्याचा माझ्या अल्पशक्तीप्रमाणें मी या पुस्तकांत प्रयत्न केला आहे.

या पूर्वीच्या म्हणजे दुसऱ्या कालविभागास आपण आर्यबौद्धकाल असें म्हणूं. कारण या कालांत आर्यधर्माचा आणि बौद्धधर्माचा सारखा झगडा सुरू असून कधीं आर्यधर्माचा विजय तर कधीं बौद्धधर्माचा

विजय होत गेला. मी घेतलेल्या या तिसऱ्या कालांत आर्यधर्माचा विजय होऊन बौद्धधर्माचा कायमचा पाडाव झाला. परंतु आर्यधर्मास या काळांत पूर्वीचें स्वरूप जाऊन नवीन स्वरूप आलें. त्यास हिंदुधर्म असें म्हणणें योग्य होईल. म्हणून या तिसऱ्या काळास हिंदुकाळ अशी मी संज्ञा देतों. हा काळ मुख्यतः इ. स. ६०० पासून १२०० पर्यंतचा असल्यानें याला मध्ययुग असेंही म्हणतां येईल. म्हणूनच मी आपल्या या ग्रंथास 'मध्ययुगीन भारत' हें नांव दिलें आहे.

या काळाचे माझ्या दृष्टीनें तीन विभाग पुन्हां पडतात. इ. स. ६०० पासून ८०० पर्यंत पहिलीं हिंदु राज्यें ( आर्य-राज्यें नव्हत. ) उदयास येऊन लयास गेलीं. यानंतर मुसलमानी धर्माचा व लोकांचा पहिला झगडा होऊन नवीन अधिक जोरकस हिंदु राज्यें उदयास आलीं व तीं इ. स. ८०० सुमारपासून १००० पर्यंत उत्कर्षास पोंचलीं. या राज्यांस महमद गझनवी यानें ठोकर मारल्यानें हीं लयास गेलीं. परंतु महंमद पंजाबाच्या अलीकडे हिंदुस्थानांत स्थायि झाला नाहीं म्हणून पुन्हां तिसरी हिंदुराज्यमालिका स्थापन होऊन हिंदुस्थानांत नांदली. ती शेवटीं इ. स. १२०० च्या सुमारास शेवटचा जोरकस हिंदुराजा पृथ्वीराज परास्त झाल्यानें लयास गेलीं आणि हिंदुस्थानांत मुसलमानाची सत्ता कायम झाली. अशा रीतीनें या हिंदुकाळाचे तीन पोटविभाग पडतात. त्याचे द्योतक म्हणून मी पुस्तकास दुसरें नांव हिंदु राज्यांचा उद्भव, उत्कर्ष आणि उच्छेद असें दिलें आहे. या तीन पोटभागांबद्दल मी निराळे तीन भाग लिहिणार आहें. महाराष्ट्रांत हिंदुराज्य, १३०० इ. स. पर्यंत नांदलें आणि दक्षिण हिंदुस्थानांत म्हणजे कृष्णेच्या दक्षिणेस विजयानगरचें राज्य १५६१ इ. स. पर्यंत नांदलें. कदाचित् या महाराष्ट्र व दक्षिण हिंदुस्थानाचा मी एक चौथा भाग लिहूं शकेन, परंतु सध्यां पहिला भाग-हिंदुकाळाच्या पहिल्या विभागाचा-वाचकांस मराठींत सादर करीत आहे. तो त्यांस नवीन व मनोरंजक असा वाटेल अशी मला आशा आहे.

हा इतिहास मुळांत मी इंग्रजींत लिहिला असून तो History of Mediæval Hindu India या नांवानें याबरोबरच प्रसिद्ध करीत आहे. या पुस्तकाचा अनुवाद करवून कोठें कोठें इंग्रजी ग्रंथाहून कांहीं यांत फेरफारही केला आहे. यामुळें हा ग्रंथ वाचकांस स्वतंत्र असाच वाटेल. या ग्रंथांत दोन पुस्तकें आहेत. पहिल्या पुस्तकांत हर्ष आणि तत्कालीन स्थिति याविषयीं विस्तृत रीतीने माहिती दिली आहे. ती मुख्यतः ह्युएनत्संग या चिनी प्रवाशाच्या लेखाच्या वर्णनाधारें व बाणाच्या हर्षचरित्राधारें दिली आहे. दुसऱ्या पुस्तकांत सर्व हिंदुस्थानांत असलेलीं त्या वेळचीं राज्यें यांचा इतिहास इ. स. ८०० पर्यंतचा दिला आहे. त्या वेळीं तीं बहुतेक लयास जाऊन जी दुसरीं राज्यें कायम झालीं त्यांचा इतिहास पुढील भागांत येईल.

या हिंदुकाळांत हिंदुस्थान जरी एकछत्री अमलाखालीं नव्हतें तरी हर्षाच्या विस्तृत साम्राज्यामुळें कनोजला जें एकदां साम्राज्यधानाचें वैभव आलें तें शेवटपर्यंत टिकलें हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे येथेंच पुढच्या कालविभागांत परिहार सम्राट झाले व शेवटच्या काळांत गहडवाड राठोड सम्राट झाले. यांच्याच बरोबरीला दक्षिणेंत प्रथम चालुक्य बादामीचे, नंतर राष्ट्रकूट मालखेडचे व शेवटीं चालुक्य कल्याणचे समकालीन राजे होते.

असो, याप्रमाणें या माझ्या इतिहाससंबंधाची रूपरेखा असून त्याचा पहिला भाग वाचकांस सादर करीत आहें. यास जोडून एक धार्मिक परिस्थिति दाखविणारा हिंदुस्थानचा नकाशा दिला आहे व शेवटीं एक सूचीही जोडली आहे. या ग्रंथाच्या छापण्यांत नेहमीप्रमाणें घाई झाल्यानें चुका राहिल्या आहेत त्या वाचक क्षमा करतीलच.

मुंबई,<br>दिसेंबर १९२०. } **चिं. वि. वैद्य.**

———

# अनुक्रमणिका.

## पुस्तक पहिलें. ( हर्ष व तत्कालीन स्थिति )
## सुमारें इ. स. ६०० पासून ६५० पर्यंत.

## पुस्तक दुसरें ( पहिलीं हिंदुराज्यें )
### सुमारें इ. स. ६५० पासुन ८०० पर्यंत.

# पुस्तक पहिलें.



## हर्ष व तत्कालिन स्थिति

( सुमारें इ० स० ६००–६५० )

# हर्ष व तत्कालीन स्थिति.

## प्रकरण १.

### हर्षाचें राज्यारोहण

खिस्तीशकाच्या सातव्या शतकाच्या प्रारंभीं ठाणेश्वरचा राजा प्रभाकर-वर्धन हाच उत्तर हिंदुस्थानांतील राजमंडळांत प्रमुख होता. त्यानें हूण लोकांचा पराभव करून त्यांना हतवीर्य केलें होतें. मागील शतकांत माळव्याचा यशोवर्मा आणि मगधदेशाचा बालादित्य यांच्या संयुक्त निशाणाखालीं हिंदी सैन्यानें जरी या हुणांना जबर तडाखा दिला होता, तरी अजूनही पंजाब प्रांतांत त्यांचें प्राबल्य असून गांधार ऊर्फ पेशावर आणि शाकल ऊर्फ सियाल-कोट येथें त्यांचीं राज्यें चालू होतीं. हूणाशिवाय सिंधप्रांताचा तत्कालीन राजा आणि राजस्तानांतील गुर्जर या प्रमुख राज्याचा अधिपति यांचाही प्रभाकरवर्धनानें पराभव केला असून सहाव्या शतकाच्या अखेरीस त्यानें माळवा आणि गुजरात येथील राजां-नांहि आपले अंकित करून सोडलें होतें.[1] उत्तरहिंदुस्थानच्या पूर्वभागांत मौखरि घराण्याचा अंमल असून त्यांच्या राज्याचा विस्तार बहुधा पूर्वेकडे प्राचीनकाळीं लौहित्या नांवानें प्रसिद्ध अस-लेल्या ब्रह्मपुत्रा नदीपर्यंत आणि दक्षिणेकडे मध्यहिंदुस्थानांत पूर्वप-श्चिम पसरून माळव्यांत घुसणाऱ्या विंध्याद्रीपर्यंत असावा. या मौखरी घराण्यांतील ग्रहवर्म्याला प्रभाकरवर्धनाची कन्या राज्यश्री ही दिलेली असल्यामुळें त्या दोन घराण्यांत शरीरसंबंध घडून आला होता.

---

१ हूण-हरिण-केसरी सिन्धुराजज्वरो गुर्जर-प्रजागरो गांधाराधिपद्विपकूटपाकलो लाटपाटवपाटच्चरो मालवलक्ष्मीलतापरशुः । हर्षच०

एवंच इ० स. ६०५ च्या सुमारास ठाणेश्वराचा प्रभाकरवर्धन हा उत्तरहिंदुस्थानांतील सर्व राजांमध्यें प्रबळ असल्यामुळें 'महा-राजाधिराज परमभट्टारक' ही त्यानें धारण केलेली पदवी त्याला योग्यच होती. त्याचा बाप आणि आजोबा यांना मात्र महाराज एवढीच पदवी होती असें सोनपत येथें सांपडलेल्या हर्षाच्या ताम्र-मुद्रेवरून दिसून येतें.[1]

परंतु प्रभाकरवर्धनाच्या या भाग्याला इ. स. ६०५ नंतर एका-वर्षाच्या आंतच एकाएकीं ओहोटी लागली; मात्र त्यामुळें त्याची प्रजा आणि राज्य यांवर कांहीं प्रसंग गुदरला नाहीं. हूण लोकांनीं पूर्वीच्या अपमानाचा सूड घेण्यासाठीं एकाएकीं त्याच्या राज्यावर उत्तरेकडून स्वारी केली, व त्याचा प्रतिकार करून त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं तयारी करण्यालाही त्याला फुरसत मिळाली नाहीं. पण कसें तरी करून त्यानें आपला ज्येष्ठपुत्र जो राज्यवर्धन त्याची त्या कामावर रवानगी करून दिली. यापूर्वीं हूणाशीं झालेल्या संग्रामांत स्थानेश्वराधिपतीला कनोजच्या मौखरीचें साह्य[2]

---

१ "गुप्तांचे शिलालेख" नंबर. ५२:-परमादित्य-भक्तो **महाराज** श्रीराज्यवर्धनस्तस्य पुत्रो परमादित्य भक्तो-**महाराज** श्री आदित्यवर्धनस्तस्य पुत्रः श्री-महासेनागुप्तादेव्यामुत्पन्नः सर्व-वर्णाश्रमव्यवस्थापन-प्रवृत्तः श्री पर-मादित्य-भक्तो **परमभट्टारक महाराजाधिराज** श्री प्रभाकरवर्धनस्तस्य-पुत्रः श्रीमत्यां यशोमत्यामुत्पन्नः परमसौगतः ( परम भट्टारक ) महाराजाधिराज श्रीराज्यवर्धनस्तस्यानुजो महादेव्यां यशोमत्यामुत्पन्नः ( परमभट्टारक ) महा-राजाधिराज हर्षवर्धनः ।

२ आदित्यसेनाचा शिलालेख पहा-त्यांत म्हटलें आहेः-यो मौखरेःसमिति-षूद्धत-हूणसैन्या वल्गद्घटा विघटयन्नुरुवारणानाम् । 'हूणसैन्याला उध्वस्त करून टाकणाऱ्या मौखरींच्या मत्त गजसैन्याचा भेद करणारा जो,' । या वर्णावरून मौखरींचे व हूणांचे सामने झाले होते, व मौखरी ठाणेश्वराच्या बाजूनेंच

मिळत होतें. परंतु प्रस्तुत प्रसंगीं त्यांना ही वार्ता कळवायाला देखील प्रभाकरवर्धनाला वेळ मिळाला नाहीं. असो. राज्यवर्धनाचें वय यावेळीं अवघें एकोणीस, वीस वर्षांचें असून तारुण्यामुळें साहाजिकपणेंच आपल्या पित्याला जातीनें शत्रूला तोंड देण्याची पाळी येऊं नये अशी त्याची इच्छा होती. तदनुसार पित्याची अनुज्ञा घेऊन त्यानें शक्य तितक्या त्वरेनें सैन्याची तयारी करून पंजाबाकडे धांव घेतली. त्याचा कनिष्ट बंधु हर्षवर्धन हाही त्याच्या मागून निघाला, आणि हिमालयाच्या पायथ्याशीं असलेल्या अरण्यांत मृगया करूं लागला. राज्यवर्धनानें लवकरच हूणांचा पक्का पराभव केला आणि आपल्या सरहद्दीपलीकडे दूर त्यांना हांकून देऊन विजयी होत्साता तो ठाणेश्वराला परत आला. पण परत येतो तों काय ! आपल्या पित्याच्या निधनामुळें सर्व स्थानेश्वर नगरी शोकार्णवांत मग्न झालेली त्याच्या दृष्टीस पडली. राज्यवर्धन परत येण्यापूर्वी हर्ष हा पित्याच्या प्रकृतींत अकस्मात् पुरा बदल झालेला ऐकून आपली मृगया सोडून ठाणेश्वरास आलेला होता; व तो पित्याच्या अंतकाली त्याजवळ होता. प्रभाकरवर्धन मृत झाला तेव्हां त्याची पत्नी यशोमती रजपूत स्त्रियांच्या उच्च मनोभावनेला अनुसरून सती गेली; तिला तसें करण्यापासून परावृत्त करण्याचे हर्षाचे सर्व प्रयत्न विफल झाले. याप्रमाणें मातापितरांच्या आकस्मिक निधनामुळें उद्विग्न झालेल्या राज्यवर्धनाला दैवगतीच्या या अकल्पित फेऱ्यामुळें ठाणेश्वरच्या सिंहासनावर आरूढ होण्याची पाळी आली.त्याच्या मनाचा कल बौद्धधर्माकडे असल्यामुळें हें प्राप्त झालेलें राज्य कनिष्ठ बंधु हर्ष-

---

लढले असले पाहिजेत असें दिसतें; कारण ठाणेश्वराचें राज्य कनोज आणि पंजाब यांच्यादरम्यन आहे म्हणून मौखरीचा हूणांशीं प्रत्यक्ष संबंध नसून ठाणेश्वराच्या वतीनें असावा.

वर्धन याच्या स्वाधीन करून आपण भिक्षु व्हावें असें राज्यवर्धनाच्या मनांत आलें. पण इतक्यांत एक विलक्षण वार्ता त्याच्या कानीं आल्यामुळें त्याला तो विचार तेव्हां तरी सोडून द्यावा लागला.[1] माळव्यांतील गुप्त राजे कनोजेच्या मौखरीचे बहुधा पिढी·

---

१ वर उल्लेख केलेल्या गुप्तांच्या लेखांत मगध देशातील दुसऱ्या गुप्तराजांची वंशावळ दिली असून तो लेख या बाबतींत विशेष महत्वाचा आहे. हा लेख मगध देशांत सांपडलेला असल्यामुळें तो लिहिणारा आदित्यसेन मगधाधिपति किंवा जवळच्याच दुसऱ्या एकाद्या देशाचा अधिपति असला पाहिजे. तथापि या वंशावळीपैकीं कोणाही राजाचा देश या लेखांत नमूद केलेला नाहीं. तीः वंशावळ अशीः–१ कृष्ण गुप्त; २ हर्ष गुप्त; ३ ईश्वरवर्म्मांशीं ( हा बहुधा मौखरि असावा ) संग्राम करणारा कुमार गुप्त; ४ मौखरींशीं लढतांना मारला गेलेला दामोदर गुप्त ( मागील पानावरील टीप पहा ); ५ सुस्थितवर्म्यांशीं ( हाही मौखरी असावा ) युद्ध करणारा महासेन गुप्त, ( श्रीमत्सुस्थितवर्म युद्ध विजयश्लाघापदांकं मुहुर्यस्याद्यापि विबुद्धकुन्द कुमुद क्षुण्णाच्छ हासावताम्। लौहित्यस्य तटेषु शीतल तलेषूत्फुल्लनागद्रुमच्छाया सुप्त विबुद्ध सिद्धमिथुनैः स्फीतं यशोगीयते ); ६ माधव गुप्त ( हा हर्षाचा समकालीन असावा; कारण त्याच्या स्तुतिपर वर्णनांत ' श्री हर्षदेव निजसंगम वांछयाच ' अशी एक अर्धवट ओळ आहे, म्हणून त्या संबंधानें नक्की निर्णय करवत नाहीं ); आणि ७ वा आदित्यसेन गुप्त ( याची पत्नी कोणदेवी; याचाच हा लेख होय ). वरील यादीवरून असें दिसून येईल की, हर्षाचा समकालीन जो माधवगुप्त त्याच्या तीन वरच्या पिढ्यांनीं मौखरीच्या तीन पिढ्यांशीं झगडे केले होते म्हणजे गुप्त आणि मौखरी यांचे वैर पूर्वापर असल्यामुळें प्रस्तुत गुप्तानीं योग्य संधीचा फायदा घेऊन कानोजबर एकदम हल्ला चढविला हें साहजिकच झालें. आजपर्यंतच्या त्यांच्या युद्धांत मौखरींचा पक्ष प्रबळ ठरत होता असें हर्षचरित्रांतील ' तिमिरैस्तिरस्कारो रवेर्यो मौखरीणां मालवैः परिभवः ( उच्छास ६ ) या वाक्यावरून दिसून येतें, प्रस्तुत कनोजवर स्वारी करणारा देव गुप्त कोण असावा याचा खुलासा पुढें योग्य ठिकाणीं करूं.

जाद शत्रू होते. हूणांनीं ठाणेश्वरच्या राज्यावर स्वारी केली व इतक्यांत त्याचा राजा प्रभाकरवर्धनहि मृत्यु पावला, ही बातमी सर्व प्रांतांत हां हां म्हणतां पसरली. तेव्हां राज्यवर्धन तिकडे अडकला आहे अशी संधि पाहून माळव्याचा राजा देवगुप्त यानें कनोजवर हल्ला चढविला. कनोजचा तरुण राजा गृहवर्मा म्हणजे राज्यवर्धनाचा मेहुणा हा या हल्लयांत मारला गेला, आणि त्याची पत्नी-राज्यवर्धनाची बहीण राज्यश्री-देवगुप्ताच्या हातीं सांपडली असतां तिला त्यानें बंदिवान करून कारागृहांत ठेविलें. एवढें झाल्या-वर आतां आपल्याला खुद्द ठाणेश्वरावर ही स्वारी करण्यास हरकत नाहीं, असें वाटून देवगुप्तानें तिकडे आपला मोर्चा वळविला. कर्ण-सुवर्ण ऊर्फ बंगालचा राजा शशांकगुप्त हा देवगुप्ताचा सहकारी मित्र असून तो त्याच्या साहाय्यार्थ ससैन्य निघाला; पण त्याची येऊन पोंचण्याचीहि देवगुप्तानें वाट पाहिली नाहीं, इतका तो जयोन्मत्त झाला होता. कनोजच्या मौखरींच्या अधिराज्याखालीं असलेल्या या वंगीय गुप्तांच्या मनांत मालवीय गुप्तासारखाच मौखरीं-विषयीं मत्सराग्नि धुमसत होता. कारण या कनोजवाल्यांनीं गुप्ताचें अधिराज्य नष्ट करून लौहित्य म्हणजे ब्रह्मपुत्रा नदीच्या कांठच्या प्रदेशापर्यंत आपला अंमल सुरू केला होता; व त्यामुळें हे गुप्त त्यांचा सूड उगविण्याची वाटच पहात होते, यांत नवल नाहीं. शिवाय ठाणेश्वर आणि कनोज या दोन्ही प्रांताच्या अधि-पतींनीं बौद्धधर्माचा अवलंब केलेला असल्यामुळेंहि या दोन्ही गुप्त वराण्यांनीं त्यांच्याविरुद्ध संगतमत केलें असावें. हिंदुस्थानांत प्राचीनकाळीं निदान ७ व्या शतकांत तरी धार्मिक बाबतींतील मतभेदावरून रणें माजत नसत. तथापि पूर्वीच धुमसत असलेल्या द्वेषाग्नीला त्यामुळें इंधन मिळणें स्वाभाविक होतें व ह्मणूनच माळवा आणि बंगाल येथील गुप्त राजांनीं संगनमत करून कनो-

जचा गृहवर्मा आणि ठाणेश्वराचा राज्यवर्धन हे दोघेहि तरुण अननुभवी आहेतसें पाहून त्यांचा पाडाव करण्याच घाट घातला.

असो. राज्यवर्धन सिंहासनाधिष्ठित होतो आहे तोंच त्याच्या कानावर वर सांगितल्याप्रमाणें भगिनी–विषयक संकटाची वार्ता पडली. हूणांशीं झालेल्या झगड्यानंतर त्याला पुरी विश्रांतिहि मिळाली नव्हती. पण तो निधड्या छातीचा वीर असल्यामुळें सर्व दुःख बाजूला सारून, आणि आपला बरोबरीचा मामेभाऊ जो भंडी त्याच्या हाताखालीं दहा हजार घोडेस्वार घेऊन त्याच्या-सह एकदम शत्रूवर चाल करण्यासाठीं निघाला. हर्षवर्धनानेंही त्याबरोबर जाण्याचा आग्रह धरिला; परंतु त्याचें न ऐकतां राज्याच्या बंदोबस्तासाठीं त्याला ठाणेश्वरासच ठेऊन राज्यवर्धन जो तडक निघाला, तो शक्य तितकी त्वरा करून देवगुप्ताच्या सैन्याशीं जाऊन भिडला, व त्यावर एकदम हल्ला चढवून त्यानें त्याचा पूर्ण पराजय केला. या युद्धांत देवगुप्त मारला गेला असावा असें वाटतें. याप्रमाणें विजय मिळवून तो पुढें कनोजकडे त्या राज्याच्या रक्ष-णार्थ निघाला. वाटेंतच त्याची बंगालच्या शशांक गुप्ताशीं गांठ पडली. योगायोगाचा चमत्कार असा कीं, हर्षाचें जें दैवचक्र पहिल्या-पासूनच त्याला न कळत त्याला अनुकूल दिशेनें फिरत होतें, त्याचा तिसरा फेरा आतां सुरू होऊन त्यांत बिचारा राज्यवर्धन गडप झाला. शशांकगुप्ताला विजयी राज्यवर्धनाशीं उघड सामना करण्याची छाती झाली नाहीं. म्हणून त्यानें विश्वासघातानें त्याचा नाश करण्याचा दुष्ट बेत केला. त्यानें त्याच्याशीं गोडीगुलाबीचें बोलणें सुरू केलें, आणि कृतापराधाची क्षमा मागून प्रायश्चित्ता-दाखल आपली कन्याही राज्यवर्धनाला देण्याचें कबूल[१] केलें. पूर्व-

---

१ हर्षचरिताच्या टीकाकारानें असा प्रकार झाला असें सुचविलें आहे:- ‘ तथाहि तेन शशांकेन विश्वासार्थं कन्याप्रदानमुक्त्वा प्रलोभितो राज्यवर्धनः स्वगेहे सानुचरो भुञ्जान एव छद्मना व्यापादितः । ’

काळीं एकमेकांशीं भांडणाऱ्या क्षत्रियकुलांत आपसांत एकी घडवून आणण्याची ही रीतच होती. शशांकाच्या मानभावी बोलण्यावर सरळ आणि भाबड्या राज्यवर्धनानें विश्वास ठेविला आणि निःशस्त्र होत्साता तो कांहीं निवडक लव्याजम्यासह शशांकाच्या छावणींत गेला. पुढें सांगणें नकोच कीं भोजनाचे प्रसंगीं त्या घातकी शशांकानें त्याचा कपटानें वध करविला ! याप्रमाणें राज्यवर्धनाची व्यवस्था लाविल्यावर भंडीच्या सैनापत्याखालीं असलेल्या त्याच्या सैन्याला तोंड देण्याच्या भानगडींत न पडतां तो तसाच तडक कनोजहून आपल्या देशीं परत गेला. तो गेल्यावर कनोज येथें मागें राहिलेल्या गुप्त सरदारानें राज्यश्रीला गाजावाजा न करतां कारागृहांतून काढून भंडीला झुकालविण्याकरितां तिची दूर रवानगी करून दिली.[1]

अशी ही चमत्कारिक परिस्थिति उत्पन्न होऊन इ. स. ६०६ वर्ष सुरू होऊन फारसे महिने लोटले नाहींत तोंच अगदीं अल्पवयांत ह्मणजे सोळाव्या[2] वर्षाच्या सुमारास हर्षाला ठाणेश्वरच्या सिंहासनावर आरूढ होण्याचा प्रसंग आला. हा सर्व प्रसंग बाणभट्टानें आपल्या हर्षचरित ग्रंथामध्यें फार सरस रीतीनें वर्णिला आहे. बाणभट्ट हर्षाचा समकालीन असून आश्रित होता ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. या चरित्रकारानें केलेलें वर्णन त्या वेळीं हिंदुस्थानांत यात्रेसाठीं आलेला बौद्धधर्मीय चिनी प्रवाशी जो ह्युएनत्संग त्यानें दिलेल्या हकीकतीशीं फारच जुळतें असल्यानें

---

१ कान्यकुब्जाद्गौड–संभ्रमें गुप्तितो गुप्तनाम्ना कुलपुत्रेण निष्कासनं निर्गताया राज्यवर्धन मरणश्रवण सर्वमशृणोत्परिजनतः । ह० च. उच्छ्वास ८.

२ हर्षचरितांतील वर्णनावरून हर्षाच्या वयाचा बराच नक्की अंदाज करतां येण्यासारखा आहे. त्याचें सविस्तर विवेचनावरून पुढें येणारच आहे.

सें विश्वसनीय असलें पाहिजे हें उघड आहे. असो, राज्यारोहण काळीं हर्ष जरी अल्पवयी होता, तरी तो अतुल धैर्यवान, कुशाग्र बुद्धीचा आणि दैवशाली होता. या बाबतींत अकबराशीं त्याचें बरेंच साम्य आहे. अकबराला आपल्या चवदाव्याच वर्षी प्रथम युद्धप्रसंग येऊन पुढें थोडयाच महिन्यांत तक्तनशीन व्हावें लागलें आणि अठरा वर्षांच्या वयाला तर त्यानें सर्वांची रग जिरवून राज्यांतील सर्व सूत्रांचें चालकत्व आपल्या हातीं घेतलें. अस्तु, हर्षानें आलेल्या स्थितीला तोंड देऊन लगेच विश्वासघातकी देवगुप्ताचें पारिपत्य करून आपल्या दुर्दैवी बहिणीची म्हणजे कनोजच्या महाराणीची सुटका करण्याचा निश्चय केला. आपण लहान, अननुभवी असून आपल्याला कोणाचें साह्य नाहीं हें पाहून आपल्या विरुद्ध सर्वच देशांतील राजे उठण्याचा संभव आहे हें जाणून त्यानें आपलें हत्ती, घोडेस्वार आणि पायदळ सैन्य जय्यत तयार केलें आणि एकट्या देवगुप्ताचा बंगालच नव्हे तर सर्व राजे जिंकून भरतखंडभर दिग्विजय करण्याच्या इराद्यानें त्यानें प्रस्थान ठेविलें. बाणभट्टानें वर्णिल्याप्रमाणें दिग्विजयाला निघण्यापूर्वी त्यानें आपल्या आमात्याकडून भरतखंडांतील सर्व राजांना ' शरण या, नाहीं तर युद्धास सिद्ध व्हा ' अशा अर्थाचीं पत्रें धाडिलीं. याप्रमाणें तयारी करून दिग्विजयास निघाल्यावर त्यानें पहिला तळ आपल्या नगरीपासून थोड्याच कोसांवर सरस्वतीचे कांठीं दिला; आणि या पहिल्याच मुक्कामावर तेथील गांवच्या पाटलानें मुद्दाम या प्रसंगासाठीं नवी पाडिलेली वृषभ-छापाची मोहोर आपल्या तळहातावरून नजर केली. पाटलाच्या हातावरून हर्षराजा ती घेत असतां ती निसटून जमिनीवर पडली आणि सरस्वतीच्या कांठच्या त्या चिखलांत पडून तिनें त्यावर आपला ठसा उमटविला. हा झालेला प्रकार म्हणजे दिग्विजयाच्या

आरंभींचा मक्षिकापातच समजून हर्षाबरोबरची मंडळी अगदीं घाबरून गेली. पण निधड्या छातीच्या आणि प्रत्युत्पन्नमति अशा त्या हर्षराजानें त्यांची समजूत करून त्यांना सांगितलें कीं, झालेला प्रकार अशुभ नसून उत्तम शकुन आहे; कारण आतां लवकरच सर्व भूमीवर माझ्या अधिराज्याचा छाप बसणार असें तो सुचवीत आहे. अशा प्रकारचें मनःस्थैर्य आणि प्रसंगावधान असलेल्या पुरुषाला उपदेश करण्याची जरूरी नसतेच, तथापि त्याच्या मंत्र्यानें त्याला नानाप्रकारचीं उदाहरणें देऊन पाताळयंत्री स्त्रीपुरुषांकडून अनेक राजांना आजपावेतों कशी विपत्ति प्राप्त झाली व प्राणासही मुकावें लागलें हें सांगून, 'कोणी विश्वासघात करील, यासाठीं महाराजांनीं फार जपून असावें' अशी मोठ्या कळकळीनें विनंति केली. हा उपदेश मान्य करून आणि राज्याची सर्व जोखीम योग्य माणसांवर सोपवून हर्षराजा दिग्विजयाच्या स्वारीवर निघाला आणि प्रथम त्यानें कनोजचा रस्ता धरिला. तेथें वाटेंत त्याची व भंडीची भेट झाली व त्यापासून पुन्हा एकवार राज्यवर्धनाच्या वधाची दुःखदायक कहाणी त्याला विश्रुत झाली. भंडीनें मालव राजाचा पराभव करून त्याच्या हत्तींचें पथक आणि कोश स्वाधीन करून घेतले होते व त्या राजाच्या बायकामुलांना नोकरचाकरांसह बंदिवान करून राज्यश्रीच्या छळाबद्दल चांगला सूड उगविला होता. भंडीनें ह्या सर्व वस्तु व माणसें हर्षराजाला दाखविलीं. नंतर भंडीपासून त्याला असेंही कळलें कीं राज्यश्री कारागृहांतून सुटून विंध्याद्रीच्या अरण्यांत कोठें तरी आश्रयास पळाली आहे व प्रयत्नांन्तींहि तिचा अद्यापि तपास लागलेला नाहीं. हें वर्तमान ऐकून

१. ११ व्या शतकांत इंग्लंडावर स्वारी करणाऱ्या नार्मन सरदार विल्यमची अशीच गोष्ट वाचकांच्या लक्षांत असेलच.

भगिनी–प्रेमाच्या वेडांत हर्षराजा आपल्या सैन्याला तेथेंच गंगेच्या कांठीं मुक्काम करण्याची आज्ञा करून कांहीं निवडक अनुचरांसह तिच्या शोधार्थ स्वतःच धांवला. शोध करतां करतां तो अकस्मात दिवाकरमित्र नांवाच्या एका बौद्ध भिक्षूच्या आश्रमांत आला. हा दिवाकर–मित्र त्याचा मेहुण्याचा ह्मणजे ग्रहवर्माचा प्रिय मित्र होता. त्याच्या आश्रमांत आल्यावर त्याच्या एका शिष्याकडून हर्षाला अशी बातमी कळली कीं, तेथून जवळच एके ठिकाणीं कोणी दुःखार्त स्त्री चिता रचून तीवर आपल्याला जाळून घेण्याच्या विचारांत आहे. हें ऐकतांच तो त्या शिष्यासह तेथून तडक निघाला तो चितेजवळ आला आणि पहातो तों कनोजची महाराणी आपली बहीण राज्यश्री हीच दुःख अनावर झाल्यामुळें आपल्या जिवाचा अंत करून घेण्याच्या बेतांत आहे. असो, बहिण भावंडांची भेट झाल्याबरोबर दोघांचेंही दुःख हलकें झालें व तीं दोघेंहि तेथून निघून जाण्यापूर्वीं दिवाकरमित्राची अनुज्ञा घेण्यासाठीं त्याच्या आश्रमांत आलीं. तेथें आल्यावर त्या बौद्धभिक्षूच्या स्थानाचें पावित्र्य व शांतता पाहून राज्यश्रीच्या मनावर कांहीं निराळाच परिणाम झाला, व आश्रमाधिपति हा आपल्या पतीचा प्रिय मित्र आहे असें समजल्यावर आपणहि सर्व-संग–परित्याग करून बौद्ध भिक्षुणी व्हावें असें तिच्या मनानें घेतलें. लगेच तिनें तो बेत आपल्या भावाला कळविला व कळकळीनें ती त्याची आज्ञा मागूं लागली. परंतु हर्ष आणि दिवाकर–मित्र या दोघांनींही तसें न करण्याविषयीं तिचें मन वळविलें आणि हर्षानें तर तिला सांगितलें कीं आपल्या जन्माची इतिकर्तव्यता होऊन गेल्यावर आपण दोघेंहि बरोबरच ही पवित्र दीक्षा घेऊं. असो, याप्रमाणें राज्यश्रीचा शोध लावून तिच्यासह हर्षराजा गंगातटाकीं पुनः आपल्या सैन्याला येऊन मिळाला.

बाणभट्टानें हर्षचरितांत दिलेली हर्षवर्धन आणि राज्यश्रीची अशी ही अद्भुत वाटणारी पण खरी विश्वसनीय कथा येथें संपली. पुढील कथा त्यानें लिहिली नाहीं हें इतिहास-जिज्ञासूंचें व वाचकांचें दुर्दैव होय. तथापि जेवढी म्हणून ही कथा बाणानें दिली आहे तेवढीवरूनहि ह्युएनत्संगनें दिलेल्या हकीगतीचा उलगडा होण्याला मदत होणार आहे. ह्युएनत्संगच्या वर्णनाविषयीं पुष्कळांचा गैरसमज झालेला आहे अशी आमची समजूत आहे. त्यानें जो कनोजचा वृत्तान्त दिला आहे तो या कथेनंतर कनोजला काय झालें त्याविषयीं असून तिच्यापूर्वी ठाणेश्वरास काय झालें याविषयींचा नव्हे हें थोड्या विचाराअंतीं स्पष्ट दिसेल. राज्यवर्धन तरुणपणींच मारला गेल्यामुळें त्याला संतति नव्हती. म्हणून एकंदरींत त्याच्यामागें ठाणेश्वरच्या घराण्याचा हर्ष हाच काय तो तंतु उरला होता. राज्यवर्धनाचा बहुधा विवाहही झालेला नसावा[1]. तात्पर्य त्याच्यामागें हर्ष हाच निःसंशय ठाणेश्वरच्या सिंहासनाचा मालक झाला. म्हणून आपण राज्यपद स्वीकारावें कीं नाहीं असा हर्षाला विचार पडल्याचें जें ह्युएनत्संगनें सांगितलें आहे तें ठाणेश्वरच्या राज्यपदासंबंधानें नसून कनोजसंबंधानें होय असेंच मानलें पाहिजे. असें मानिल्यानेंच या गोष्टीचा चांगला उलगडा होणार आहे. हर्ष राज्यश्रीला घेऊन जेव्हां कनोजला गेला तेव्हां कनोजच्या गादीची व्यवस्था कशी करावी याविषयीं वाटाघाट चालू झाली. प्रश्न असा होता कीं अवन्तिवर्म्याचा ग्रहवर्मा हा ज्येष्ठ[2] पुत्र असल्यामुळें त्याची पत्नी राज्यश्री हिचा हक्क दूर करून अवन्तिवर्म्याच्या कोणा अन्य अपरिचित वारसाला राज्यावर बस-

---

१ कलत्रं रक्षात्विति श्रीस्ते निस्त्रिंशेऽधिवसति । ह. च. उ. ६ २ अवन्तिवर्मणः सूनुरग्रजो ग्रहवर्मा । ह. च. उ. ४

चावें कीं काय ? हर्षानें आपल्या उद्विग्न बहिणीला नुकतेंच चित्ते-पासून तसेंच भिक्षुणी होण्याच्या विचारापासून परावृत्त करून आणिलें असल्यामुळें तिचा हक्क दूर करावा असें त्याच्या मनांत कसें येणार ? त्याला स्वतःलाहि त्या राज्याची अपेक्षा नव्हती. ग्रहवर्मा बहुधा बौद्ध झालेला होता; तशीच राज्यश्रीहि होती. हर्ष हा मूळचा जरी कट्टा शिवोपासक[१] होता, तरी अगदीं अल्प वयांत आलेल्या या अनेक अकल्पित संकटांमुळें त्याचें मन बौद्ध धर्माकडे प्रवृत्त होऊं लागलें होतें. अशा परिस्थितींत वर सांगितलेल्या प्रश्नाचा उलगडा कनोज नगराबाहेर असलेल्या बोधिसत्व अव-लोकितेश्वर देवाच्या कौलाप्रमाणें करावा असें मुत्सद्यांनीं धूर्तपणानें ठरविलें व त्याप्रमाणें अवलोकितेश्वराकडे तो प्रश्न नेला असतां देवानें सर्वांना मानवेल अशाच रीतीनें तो प्रश्न सोडविला. त्यानें असें ठरविलें कीं, राज्यश्रीच्या नांवानें हर्षानें राज्याचा कारभार चालवावा, आणि स्वतः सिंहासनारूढ न होतां किंवा कनोजाधिपति अशी पदवीहि न घेतां राजपुत्र शिलादित्य हें नांव धारण करून रहावें. याप्रमाणें राज्यश्री कनोजच्या मौखरींच्या गादीवर बसली आणि हर्ष युवराज नात्यानें कनोजचा कारभार चालवूं लागला. "फांगचि" या चिनी ग्रंथांत म्हटलें आहे कीं, 'हर्षानें नंतर आपल्या विधवा बहिणीच्या बरोबर तिच्या संमतीनें राज्यकारभार केला." ह्युएनसंगच्या वर्णनांत हर्षाच्या ठायीं दिसून येण्याऱ्या पुढें काय करावें या विष-यींच्या संशय–वृत्तीचा उलगडा आमच्या मतें वर सांगितल्या प्रमाणें सरळ होतो, व त्यावरून हर्षाच्या पश्चात् कनोजच्या राज्यांत जी

---

१ बांसखेडाच्या ताम्रपट लेखांत ( हर्षाच्या कारकीर्दीच्या नवव्या वर्षी हा लिहिला गेला ) हर्षाला परम–माहेश्वर असें म्हटलें आहे. तसेंच दिग्विजयाला निघण्यपूर्वी त्यानें महेश्वराची पूजा केल्याचेंहि बाणानें वर्णिलें आहे:–" विरचय्य परमभक्तया भगवतो नीललोहितस्यार्चाम् उ. ७.

बेबंदशाही माजली तिचेंहि कारण समजतें. या ठिकाणच्या हकी- कतींत ठाणेश्वर[१] आणि कनोज या दोन राज्यांचा घोटाळा इतिहास- कारांनीं कसा केला आणि ठाणेश्वरचे सरदार हर्षाला आपला स्वामी म्हणून मानण्याला नाखुष होते असें चुकीचें विधान त्यांनीं कां केलें हें समजण्याला मार्ग मिळतो. बाणानें सांगितलें आहे कीं राज्यवर्धनाच्या वधानंतर ठाणेश्वर येथें सर्व सरदारांनीं हर्षाला आपला राजा म्हणून तात्काळ जाहीर केलें. पण पुढें दिग्वि- जयाला निघाल्यानंतर राज्यश्रीची गांठ पडून तिच्यासह जेव्हां तो कनोजला आला तेव्हां त्याला कनोजचें राज्य द्यावें कीं काय असा प्रश्न उपस्थित होऊन त्याचा वर सांगितल्याप्रमाणें उल- गडा करण्यांत आला. असो, या पुढें हर्षानें आपलें ठाणेश्वरचें

---

१ ठाणेश्वर आणि कनोज यांचा घोंटाळा आमच्या मतें पुढे लिहिल्याप्रमाणें झाला:-

चिनी वर्णनांत मजकूर आहे तो असा:-'कनोज येथील प्रमुखांच्या सूचनेवरून तेथील मुत्सद्यांनीं मारल्या गेलेल्या माजी राज्याचा धाकटा बंधु ( मेहुणा ? ) जो हर्षवर्धन त्याला बोलावून राज्यपद देण्याचें योजिलें. पण हर्ष तसें करण्याला नाखुष होता, व ह्मणून तो कांहीं सबबी सांगू लागला. पण शेवटीं त्यानें अव- लोकितेश्वराचा या बाबतीत सल्ला घेण्याचें ठरविलें.' इ०" आमच्या मतें ह्या मजकुरांत 'मारला गेलेल्या राजाचा धाकटा बंधु' या शब्दावरून घोटाळा उडाला असावा. हर्षाचा थोरला बंधु मारला गेला होता, तसा ग्रहवर्माही लढाईत पडला होता. परंतु कनोज शब्दानें थोडासा संशय दूर होणारा आहे. व्हिन्सेंट स्मिथ या इतिहासकारानें मौखरी ग्रहवर्म्याची राजधानी कनोज नव्हती असें मानि- ल्यामुळें वर लिहिलेला घोटाळा आणखी वाढला. परंतु मौखरींचा कनोजशी असलेला संबंध तोडणें शक्य नाहीं हें पुढें टिपणींत आम्हीं दाखविणारच आहों, इंपिरिअल गॅझेटियरकारांनींहि कनोज या "शहरा" खालीं लिहितांना तेथें हर्षापूर्वी मौखरींचेंच राज्य होतें हें बिन तक्रार मान्य केलेलें आहे,

ठाणें सोडून कनोज येथेंच मुख्य ठिकाण केलें आणि बहिणीच्या साहाय्यानें तेथून तो दोन्ही देशांचा राज्यकारभार पाहूं लागला. या दोन्ही भावंडाचें अकृत्रिम प्रेम आजन्म तसेंच राहिलें. शिवाय त्या दोघांचाही बौद्धधर्माकडे कल असल्यामुळें धार्मिक गोष्टींतहि त्यांचें मत जुळे आणि एकंदरींत त्यांच्या दीर्घ कारकीर्दींत त्यांच्या परस्पर–प्रेमांत बिघाड करणारी कोणतीहि गोष्ट घडल्याचें दिसून येत नाहीं.

# टिपण्णी.

## १ कनोजच्या मौखरीं विषयीं

" कॉर्पस इन्स्किप्शनेरम् व्हॉ. ३, " अशिरगड मुद्रा. नं. ४७, यांत शर्ववर्मा याचा मुद्रालेख दिला असून त्यांत आमच्या मतें कनोजच्या मौखरी राजांची वंशावळ दिलेली आहे. एक दुर्दैवाची गोष्ट या सर्व लेखांत अशी आहे कीं, त्यांत लेखकानें अमुक राजा अमक्या ठिकाणीं राज्य करीत होता असे कोठेंच सांगितलेलें नाहीं. कदाचित् लेखकाच्या वेळीं त्या राजाचें नांव फारच प्रसिद्ध असल्यामुळें त्यानें तें गाळलें असेल. पण हजार बाराशें वर्षांनंतर आम्हांला त्यांचा मागमुसही नसल्यामुळें ती माहिती गाळल्यानें मोठी अडचण उत्पन्न होऊन एखादें विधान ठांसून करतां येत नाहींसें होतें. मौखरी राजे कनोज येथें राज्य करीत होते हें तरी आम्हांला हर्षचरित्रा-वरूनच समजलें आहे; प्राचीन कोरीव लेखांवरून नव्हे. गृहवर्मा कनोजचा होता, तेथेंच तो मारला गेला व राज्यश्रीला तेथेंच कारागृहांत ठेविलें होतें हें सर्व हर्षचरित्रांत सांगितलें आहे. असो, वर उल्लेखिलेल्या लेखांतील वंशावळ अशी:--

१ महाराज हरिवर्मा; २ महाराज आदित्यवर्मा; ३ महाराज ईश्वरवर्मा (हा हर्ष-गुप्तेचा पुत्र); ४ महाराजाधिराज ईशानवर्मा ( उपगुप्तेचा पुत्र ) ५ परममाहेश्वर महाराजाधिराज शर्ववर्मा मौखरी. या वंशावळीची पुढील मालिका गुप्तराजांच्या 'अफसड' शिलालेखांवरून आणखी जोडतां येतें ती अशी:--६ सुस्थितवर्मा ( देव-बर्नाक लेखावरून हें नांव समजून आलें आहे ); व ७ अवन्तिवर्मा. हा देव बर्नाक लेख कोणा जीवित गुप्ताचा असून त्यांत वारुणिक हल्लींचा देव बर्नाक हा गांव एका सूर्योपासकाला अग्रहार म्हणून कायम केल्याचें नमूद केलें आहे. हा गांव बंगाल्यांतील शहाबाद जिल्ह्याचें मुख्य ठिकाण जें आरा त्याच्या नैर्ऋत्येस २५ मैलांवर असून प्रथम तो बालादित्यानें इनाम करून दिला, व मागाहून शर्ववर्म्यानें आणि त्यानंतर पुनः अवंतिवर्म्यानें तें दान कायम केलें, असें वर्णन आहे.

हे शेवटचे दोनी राजे परमेश्वर उपपदधारी असून दोघेही कनोजचे मौखरी होते यांत संशय नाहीं. या दोन्ही लेखांच्या आधारानें मौखरी आणि गुप्त यांच्या वंशावळी कालसाम्यानुसार अशा लावितां येतातः--

| मौखरिराजे | गुप्तराजे |
| --- | --- |
| १ हरिवर्मा | १ कृष्ण गुप्त |
| २ आदित्यवर्मा ( पत्नी हर्ष-गुप्ता ) | २ हर्ष गुप्त |
| ३ ईश्वरवर्मा ( पत्नी उपगुप्ता ) | ३ जीवित गुप्त |
| ४ ईशानवर्मा | ४ कुमार गुप्त ( याचें ईशान वर्म्याशीं युद्ध झालें होतें ) |
| ५ शर्ववर्मा मौखरि | ५ दामोदर गुप्त ( मौखरींशी लढतांना मारला गेला ) |
| ६ सुस्थितवर्मा | ६ महासेन गुप्त ( यांचें सुस्थित वर्म्याशीं युद्ध झालें ) |
| ७ अवन्तिवर्मा | ७ माधव गुप्त. |
| ८ गृहवर्मा | |

अफसड लेखांत गुप्तांच्या तीन पिढ्यांचे-कुमार, दामोदर आणि महासेन यांचें-मौखरींच्या तीन पिढ्यांशीं--ईशान, शर्व आणि सुस्थित यांशीं युद्ध झाल्याचें स्पष्टच सांगितलें आहे. यांतील पहिलीं दोन नांवें शर्ववर्म्याच्या अशिरगड येथील मुद्रा लेखांत आहेत. शिवाय आदित्यसेनाचा हर्षगुप्तेशीं विवाह झाल्याचें सांगितलें असून ती त्याच्याशीं समकालीन असलेल्या हर्ष गुप्ताची बहीण असावी असें दिसतें. गुप्तांपैकीं महासेनगुप्ताची कारकीर्द बरीच लांब असली पाहिजे, अथवा मौखरींपैकीं सुस्थिताची कारकीर्द फार लहान असली पाहिजे. म्हणजे महासेनाची कारकीर्द सुस्थित आणि अवन्तिवर्मा यांच्या कारकीर्दीबरोबर होते. शेवटच्या पिढ्या गृहवर्मा आणि महासेन गुप्ताचा पुत्र माधवगुप्त, या हर्षाच्या समकालीन असून ते दोघेही बहुधा वयानेंहि हर्षाच्या बरोबरीचे असावेत.

वर उल्लेख केलेल्या तीन लेखांवरून ( आदित्यसेनाचा अफसड शिलालेख, शर्ववर्म्याचा अशिरगडचा मुद्रालेख आणि देव बर्नाक लेख--कार्पस

इ. कॉ. ३ नं. ४२, ४६, ४७ ) मौखरीच्या इतिहासांतील कांहीं ठळक गोष्टींचा निर्णय करतां येतो. पहिली गोष्ट अशी कीं, त्याचें घराणें ईशानवर्म्याच्या कारकीर्दीत विशेष प्रबळ झालें, कारण अशिरगड लेखांत सांगितल्याप्रमाणें त्याच्या पूर्वीच्या तीन राजांना नुसतें महाराज उपपद असून याला महाराजाधिराज असें प्रथम म्हटलें आहे. या लेखांत मौखरि हें नांव ईशानाचा पुत्र शर्ववर्मा यालाच प्रथम दिलें आहे. अफसड लेखांतहि ईशानाचा स्पष्ट नामनिर्देश करून शर्वाला नुसतें मोघम मौखरि म्हटलें आहे. यावरून शर्ववर्मा हा आपल्या बापापेक्षांहि बलाढ्य असून त्या दोघांचेंही हूणाशीं युद्ध झालें होतें. त्याचें राज्य किंवा निदान अधिराज्य तरी दक्षिणेकडे जेथें त्याचा मुद्रालेख सांपडला त्या अशिरगडापर्यंत पसरलें असून, पूर्वेकडे बंगालपर्यंत पसरलें असावें. कारण देवबर्नाक लेखांत सांगितल्याप्रमाणें त्या गांवीं मगधाधिपति बालादित्यानें सूर्योपासकाला दिलेला अग्रहार शर्ववर्म्यानें पुनः कायम केला, यावरून असेंहि दिसतें कीं, या ठिकाणीं बालादित्याच्या वेळचें मगध राज्य जाऊन कनोजच्या शर्ववर्म्यानें आपली सत्ता प्रस्थापित केली होती. यानंतर देववर्नाकाची ही सनद शर्ववर्म्याचा नातू आणि गृहवर्म्याचा पिता अवन्तिवर्मा यानें पुनः कायम केली, असें लेखावरून दिसतें.

आतां अनंतवर्मा नांवाच्या मौखरि राजाच्या लेखांचा विचार करावयाचा राहिला. ( कॉ. इं. व्हॉ. ३ ) या लेखांतील वंशावळींत यज्ञवर्मा, शार्दूलवर्मा आणि अनंतवर्मा अशीं तीनच पिढयांची नावें सांगतलीं आहेत. हे पुरुष स्वतःला मौखरि म्हणवीत असल्यामुळें, कनोज घरण्याच्या एखाद्या उपशाखेंतीलच ते असले पाहिजेत. परंतु ते कनोजच्या मूळघराण्यांतून फुटलेल्या शाखेचे असून त्यांचें महत्वही विशेष नव्हतें. त्या सर्वांत श्रेष्ठ जो शार्दूल त्यालाहि महासामंत एवढेंच उपपद लाविलेलें आहे. ( कॉ. इ. व्हॉ. ३ नं. ४८ ). परंतु वर सांगितल्याप्रमाणें शर्ववर्मा आणि ईशानवर्मा याला महाराजाधिराज असें म्हटलें आहे. मौखरि घराण्याची ही शाखा मागाहून गया प्रांतांत स्थापन झालेली असून तेथें त्यांचे शिलालेख सांपडले आहेत. त्यांवरून ते हर्षानंतरचे असावेत असें दिसतें.

## २--माळव्याच्या देवगुप्ताविषयीं.

आतां ज्या देवगुप्त नामक मालव राजानें कनोजच्या गृहवर्म्यावर हल्ला केला आणि पुढे राज्यवर्धनाबरोबर झालेल्या युद्धांत जो मारला गेला तो कोण होता याचा निर्णय करूं. हा निर्णय करण्याच्या कामांत अनेक अडचणी व गुंतागुती आहेत. बाणभट्टाने हर्षचरित्रांत कनोजवर स्वारी करणारा राजा मालवराज होता असें स्पष्ट लिहिलें आहे: ' देवो गृहवर्मा दुरात्मना **मालव-राजेन** जीवलोकं त्याजितः ' तसेंच कालायसनिगडनिश्चलीकृतचरण-युगलं सकल-**मालवराज**-लोकम् " या वाक्यांवरून हेंच दिसून येते. यांतून एवढा निर्णय निघतो की, कोणा मालवराजाने गृहवर्म्यावर स्वारी केली आणि त्या राजाचा राज्यवर्धनाने पराभव केल्यावर त्याच्या कुटुंबांतील माणसांना बंदिवान करून भेंडीने हर्षापुढे उभें केलें. हर्षाच्या मधुवन येथील लेखांत राज्यवर्धनाने देवगुप्तासारख्या राजांनें पारिपत्य केल्याचें सांगितलें आहे. राज्यवर्धनाने आपल्या अल्प आयुष्यांत अवघें दोन वेळां युद्ध केलें. प्रथम पंजाबांतील हूणांशी व पुनः ग्रहवर्म्याचा वध करणाऱ्या मालव-राजाशीं. आतां या दोन्ही गोष्टीचा मेळ घातल्यास त्यांतील माळवराजा म्हणजे देवगुप्तच हें उघड होतें. आफसड लेखांत पूर्वी सांगितल्याप्रमाणे कनोजच्या वर्म घराण्याशीं पिढीजाद वैर धरणाऱ्या गुप्त राजांची जी नांवें दिलीं आहेत त्यांत हर्षाचा बालमित्र जो माधवगुप्त त्याचेंही नांव आहे. यावरून हें गुप्त घराणें माळव्यांतीलच असलें पाहिजे. आतां त्यांत या गुप्ताचें ठिकाण दिलेलें नाहीं व देवगुप्ताचाही नामनिर्देश केलेला नाहीं ही गोष्ट खरी. पण दुसरें अनुमान कांही जुळत नाहीं. या संबंधानें डॉ. होर्नेल यानें जो तर्क केला आहे कीं, देवगुप्त हा माधवाचा भाऊ असावा त्याचा थोड्या बहुत फरकानें स्वीकार करावा असें आम्हांला वाटतें. होर्नेलच्या म्हणण्यांत कोठें फरक केला पाहिजे तें पुढें येईल.

वर सांगितलेंच आहे कीं, प्रस्तुत विषयासंबंधानें दुसरें कांहीं अनुमान संभवत नाहीं. हर्षचरितांत बाणानें स्पष्ट सांगितलें आहे कीं, प्रभाकर-वर्धनानें आपल्या राज्य आणि हर्ष या पुत्रांना जे कुमार आणि माधव नांवाचे राजपुत्र बाल संवगडी म्हणून दिले ते दोघेही गुप्त आणि

मालवराजपुत्र होते. यांपैकीं हर्षाचा बालमित्र जो माधवगुप्त तोच अफ्सड लेखांतील माधवगुप्त असला पाहिजे. कारण त्यासंबंधानें ' हर्ष देवाच्या संगतीची इच्छा करणारा ' असे शब्द त्या लेखांत आले आहेत ( श्रीहर्षदेव निजसंगम वांछयाच ). शिवाय बाणानें हर्षचरितांत कुमारगुप्ताहून विशेष प्रकारें माधवगुप्ताचें सविस्तर वर्णन करून तो उंच, भारदस्त, तरुण होता असें जें म्हटलें आहे त्याचा विचार करतां असें दिसतें कीं, माधवगुप्त हा पुढें मोठेपणीं प्रसिद्ध राजा झाला ही गोष्ट बाणाला त्यावरून सुचावावयाची होती. आतां यांत प्रश्न असा उत्पन्न होत आहे कीं, ज्या मालवराजाचे बंधु राज्य आणि हर्ष यांचे संवगडी होते, त्या मालव राजानें राज्य आणि हर्ष यांचा मेहुणा कनोजचा ग्रहवर्मा याजवर शस्त्र कसें उपसलें ? या प्रश्नाचा उलगडा करण्याच्या कामी वरील डॉ. होर्नलच्या अनुमानाचा उपयोग होणार आहे. हे बंधु एकमेकांस पाण्यांत पाहात असावे असें होर्नल म्हणतो, व आम्ही एक पायरी पुढें जाऊन असें सुचवितों कीं, देवगुप्ताचेकुमार व माधव धाकटे सावत्र बंधु होते. बारीक सारीक कुटुंबांतदेखील सावत्र भावांमध्यें कसा बेबनाव असतो हे पाहिलें म्हणजे राजघराण्यांतील असल्या भावामध्यें हिंदुस्थानांत जो तीव्र वैरभाव असतो त्याची चांगली कल्पना होईल. असो. होर्नलच्या या सूचनेच्या अनुरोधानें कुमार आणि माधव हें महासेन गुप्ताच्या धाकट्या राणीचे पुत्र आणि देवगुप्त वडील राणीचा पुत्र असें मानिलें असतां हे दोन गुप्तघराण्यांतील राजपुत्र दुसऱ्या एका घराण्यांतील राजपुत्रांचे बालमित्र कां झाले याचाही खुलासा होण्यासारखा आहे. या छोट्या राजपुत्रांना अर्थात् गादीचा हक्क नव्हताच; तेव्हां अशा स्थितींत त्यांनीं माळव्यांत आपल्याजवळ रहावें ही गोष्ट तापट स्वभावाचा ज्येष्ठ राजपुत्र व युवराज जो देवगुप्त त्याला फारशी रुचण्यासारखी असणें शक्य नाहीं. मालवराजा आणि हर्ष यांच्या संबंधाची ही एकंदर कथा थोडक्यांत सांगावयाची तर अशी सांगतां येईल. कृष्णगुप्तापासून आरंभ झालेल्या गुप्तघराण्यांतील राजे माळव्यांत उज्जनीस म्हणा की दुसऱ्या कोठें म्हणा राज्य

१ यांत संग म्हणजे गांठ युद्ध प्रसंग असा अर्थ घेतला तरी माधवगुप्त हर्षाचा समकालीन ठरतोच.

करीत असून ते कनोजच्या मौखरि घराण्याचे पिढीजाद शत्रु होते. त्यांचा ठाणेश्वरच्या वर्धन घराण्याशीं शरीरसंबंध झालेला असून प्रभाकर वर्धनाची आई महासेनगुप्ताच्या (हर्षाच्या सोनपत येथील मुद्रालेखांत उल्लेखिलेली) ही माळवराज महासेनगुप्त याची बहीण होती. महासेन गुप्तानें फार वर्षे राज्य केलें. त्याला दोन राण्या होत्या, व त्यापैकीं वडील राणीपासून त्याला देव-गुप्त आणि धाकटीपासून कुमार आणि माधव असे पुत्र झाले. या लहान राणीच्या पुत्रांना त्यानें आपला भाचा जो प्रभाकरवर्धन त्याच्या दरबारांत नशीब काढण्यासाठीं पाठवून दिलें. प्रभाकरवर्धनाच्या अगोदर महासेनगुप्त मरण पावला; अर्थात् त्याच्या मागून त्याचा ज्येष्ठपुत्र देवगुप्त माळव्याचा राजा झाला. पुढें प्रभाकर जेव्हां एकाएकी मृत्यु पावला, आणि त्याच्या पश्चात् राज्य, हर्ष आणि इकडे कनोजास ग्रहवर्मा या अल्पवयी आणि अनु-भवी तरुणांवर सर्व भार पडला, तेव्हां संधि साधून पूर्ववैर उगविण्याकरितां देवगुप्तानें ग्रहवर्म्याच्या प्रान्तावर छापा घालून त्याचा वध केला. या गोष्टीचा सूड घेण्याकरितां राज्यवर्धनानें भंडी सेनापति आणि देवगुप्ताचा सावत्रभाऊ कुमार यांसह देवगुप्तावर चाल केली; आणि त्याचा पूर्ण पराजय करून आणि त्याचा कोश स्वाधीन करून घेऊन त्याच्या बायकामुलांना आणि नोकरचाकरांना बंदिवान केलें, आणि असा राजश्रीच्या छळाचा त्याला मोबदला दिला. पुढें देवगुप्ताच्या मदतीस आलेल्या शशांकानें जेव्हां विश्वासघात करून राज्य आणि कुमार यांचा वध केला, तेव्हां हर्षवर्धन ठाणेश्वरच्या राज्याचा अधिपति झाला; आणि त्यानें भंडीनें माळवराजाची लुटून आणलेली संपत्ति व गजसैन्य हीं आपल्या ताब्यांत घेतलीं. आतां यापुढें वास्तविक पहातां माधवगुप्त हा माळव्याचा राजा व्हावयाचा, परंतु हर्षानें त्याला गादीवर न बसवितां माळव्याचें राज्य कांहीं वेळ तरी आप-ल्याकडेच ठेऊन घेतलें. ही गोष्ट हर्षचरितावरून स्पष्ट होत आहे. त्यांत भंडीनें माळव्याहून आणिलेली लूट हर्षाला दाखविल्यावर हर्षानें आपल्या अधिकाऱ्यांना तिची व्यवस्था करण्यास सांगितलें, (ती माधवाच्या स्वाधीन केली नाहीं) असें म्हटलें आहे. (अथालोच्य तत्सर्वमवनिपतिःस्वीकर्तुं यथाधिकारमादिदेशाध्यक्षान् । उच्छ्वास ७.) माधवाला हर्षानें बहुधा

आपला दिग्विजय पुरा होईतों आपल्याजवळ ठेऊन घेतलें आणि साम्राज्य-स्थापनेनंतर सम्राट या नात्यानें गंगातीरींचा पूर्वेकडील एक प्रांत त्याच्या ताब्यांत दिला. कारण माधवाच्या वंशांतील पुढचा राजा जो आदित्यसेन त्याच्या अफसड लेखावरून व इतरही लेखांवरून त्याचा देश बंगालच्या बाजूकडे होता असें दिसतें. या लेखांतील वंशावळींत देवगुप्ताचें नांव नाहीं तेंहि ठीकच आहे. कारण देवगुप्ताचा आतां या बंगालच्या गुप्तांशीं कांहीं संबंधच उरला नाहीं. जर देवगुप्ताच्या राज्यावर माधव आला नाहीं, तर माधवाच्या वंशावळींतील देवगुप्ताचें नांव गाळणें योग्यच झालें. ह्युएनत्संग जेव्हां उज्जनीस गेला तेव्हां तेथें त्याला एक ब्राह्मण राजा राज्य करीत असलेला आढळला. उज्जनीचें सिंहासन देवगुप्ताच्या पश्चात् रिकामें पडलें असतां या ब्राह्मणानें तें आपलेकडे घेतलें असेल, अथवा स्वतः हर्षानेंच त्याला साम्राज्य-स्थापनेनंतर ती कामगिरी दिली असेल. मन्दसोर लेखांतील यशोधर्म विक्रमादित्यानें ज्याप्रमाणें काश्मीरचा कारभार कवि मातृगुप्ताकडे सोंपविला, तसा ह्याही प्रकार असेल. तात्पर्य उज्जनीस ब्राह्मण राजा होता या ह्युएनत्संगच्या विधानामुळें उत्पन्न होणारी अडचण या कल्पनेनें दूर होत असून शिवाय हर्षचरितांतील कथानकाशीं तिचा चांगला मेळही बसतो. याशिवाय दुसरीहि एक कल्पना आहे, ती अशी कीं, देवगुप्ताची राजधानी उज्जनी शहर नसून माळव्यांतील विदिशेसारखें दुसरें कांहीं शहर असेल. बाण आणि ह्युएनत्संग दोघेही हर्षाचे समकालीन व सारखेच विश्वसनीय असल्यामुळें दोघांच्या विधानाचा असाच मेळ घातला पाहिजे.

एकंदरींत माळव्यांतील गुप्त घराणें देवगुप्ताबरोबरच नष्ट होऊन मगधांतील गुप्त घराणें माधवापासून चालू झालें. गुप्तवंशाचा वृक्ष वर उल्लेखिलेल्या ताम्रलेखांवरून जसा दिसून येतो, तसा तो आतां देऊन त्यापैकीं कांहीं राजांचा साधारणपणें निश्चित कालही देतां येण्यासारखा आहे. त्याबरोबर तुलनेसाठीं ठाणेश्वर आणि कनोज येथील वंशवृक्षही देऊं:-ते असे.

वर सांगितलेल्या लेखांपैकीं एका लेखांत ( नं. ४२ ) आदित्यसेन गुप्ताच्या कारकीर्दीत ६६ या वर्षी ( हा हर्षशक असला पाहिजे ) नालन्द येथें एक मंदिर बांधल्याचें सांगितलें आहे. इ. स. प्रमाणें हें वर्ष ६७२ येतें व तें वर सांगितलेल्या कथानकाशीं मिळतेंच आहे. माधवाचें प्राबल्य मगध देशांत झालें तें हर्षाच्या मरणानंतर असेल अथवा पूर्वी सांगितल्या-प्रमाणें त्याच्या कारकीर्दीतही असेल.

देवगुप्ताविषयीं डॉ.होर्नेलनें वर जी कल्पना बसविली आहे कीं तो माधवाचा भाऊ असून त्याच्यांत शत्रुत्व होतें, तिच्यावर कै. पांडुरंग शास्त्री पारखी यांनीं आपल्या हर्षावरील निबंधांत आक्षेप घेतला आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, महासेनगुप्ताही महासेन गुप्त याची बहीण असणे शक्य नाहीं; कारण तसें असतेंच तर कुमार आणि माधव हे प्रभाकरवर्धनाचे मामे भाऊ अर्थात् राज्य आणि हर्ष यांचे चुलते झाल्यामुळें त्यांनीं प्रभाकरवर्धनाकडे आल्याबरोबर राज्य आणि हर्ष यांना प्रणाम केल्याचें जें बाणानें वर्णिलें आहे, तसा प्रकार झाला नसता. परंतु हें पारखींचे ह्मणणें बरोबर नाहीं. कारण वयाच्या किंवा पिढीच्या दृष्टीनें मोठीं असलेल्या राजघराण्यांतील माणसांनाही अल्पवयस्क परंतु सिंहासनारूढ अशा राजाला नमस्कार करावा लागतो. एका वृद्ध सरदारानें आपल्या मुलीच्या राज्यारूढ झालेल्या मुलाला प्रणाम केल्याचें आह्मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे. पारखींचा दुसरा आक्षेप असा आहे कीं, देवगुप्त हा महासेनगुप्ताचा पुत्र नव्हता. परंतु हर्षाच्या मधुवन लेखाचा विचार करितां ग्रहवर्म्यावर हल्ला करणारा जो माळवराज बाणानें सांगितला आहे तो दुसरा कोणी असणें शक्य नाहीं. हा मालव राजा शिला-दित्य ह्मणून कोणी असावा असें जें डॉ. होर्नेल यानें सुचविलें तेंही ग्राह्य करवत नाहीं. ह्युएनत्संगनें सांगितलेल्या माळव्याच्या शिलादित्याचा माळवा दुसरा कांहीं असूं शकेल; परंतु बाणानें कुमार माधवांना मालवराजपुत्रौ आणि ग्रहवर्म्याच्या शत्रूला मालवराज असें जें ह्मटलें त्या दोहोंतील मालव प्रांत मात्र एकच असला पाहिजे; होर्नेलच्या मताप्रमाणें निराळें असणें शक्य नाहीं. बाणाच्या लिहिण्यावरून कुमारमाधव देवगुप्ताचे भाऊ मानणेंच प्राप्त होतें, निदान ते एकाच राज्यांतील तरी होते असें मानावेंच लागतें. तात्पर्य

**ठाणेश्वर वंश**

( सोनपत मुद्रा लेख नं. ५ )

१ राज्यवर्धन

आदित्यवर्धन-याला महासेन गुप्ता दिली होती.

३ प्रभाकर वर्धन

- ४ राजवर्धन (इ.स. ६०६ त मारला गेला.)
- ५ हर्षवर्धन (इ.स. ६०६ त राज्यारूढ झाला.)

**मालव वंश**

( अफसड आणि देव बर्नाक लेख )

१ कृष्णगुप्त.

हर्षगुप्त

३ जीवितगुप्त—याचा शत्रु

४ कुमारगुप्त

५ दामोदरगुप्त

६ महासेनगुप्त

- ७ देवगुप्त (इ.स. ६०६ त हा मारला जाऊन माळ-व्यांतील गुप्त घराणें लयास गेलें )
- माधवगुप्त (मगधवंश)

आदित्यसेन इ.स. ६७२

देवगुप्त.

विष्णुगुप्त

जीवितगुप्त ( अफसड लेख लिहिणारा )

**कनोज वंश**

( अफसड लेख व अशिडगडचा मुद्रा लेख)

१ ईश्वर वर्मा

ईशान वर्मा

३ शर्व वर्मा

४ सुस्थित वर्मा

५ अवन्ति वर्मा

६ ग्रह वर्मा (इ.स. ६०६त मारला गेला.)

होर्नेल याचें जें म्हणणें कीं, ग्रहवर्म्याचा शत्रु मालवराज ह्मणजे शिलादित्य त्याज्य होय. तसेंच त्यानें आणखी ह्मटलें आहे कीं, प्रभाकरवर्धनाची राणी यशोमती ही शिलादित्याची बहीण व यशोधर्म्याची कन्या होती तेंही चुकीचेंच आहे. बहीण भावंडाच्या नांवाचे भाग समान असलेले आपल्याला आढळतात, परंतु बापलेकींच्या नांवांत तसे आढळत नाहींत हें एक आणि दुसरें असें कीं, यशोमतीच्या भावानें आपला पुत्र भंडी याला प्रभाकरवर्धनाकडे आणिलें तेव्हांच्या वर्णनांत बाणानें त्याला यशोमत्या भ्राता असें उपपदविरहित उल्लेखिलें आहे. तो जर राजा, इतकेंच नव्हे, तर शिलादित्यासारखा सुप्रसिद्ध राजा असता तर हर्षाचा समकालीन जो बाण त्यानें हर्षाच्या मामासंबंधानें असा एकेरी उल्लेख केला असता हें संभवत नाहीं; त्यानें राजाला उचित असें कांहीं तरी उपपद त्याच्या मागें लाविलेंच असतें. बाणाच्या तत्संबंधी एकेरी उल्लेखावरून तो फार तर एकादा मांडलिक संस्थानिक असावा असें उघड होतें. शिवाय प्रभाकरवर्धनाच्या मरण प्रसंगीं अग्निकाष्ठें भक्षण करतांना यशोमतीनें जो शोक केला त्यावरून तिचीं मातापितरें तेव्हां ( इ. स. ६०६ ) हयात होतीं असें दिसतें. या गोष्टीचा विचार करितांहि भंडी हा कोणा मोठ्या राजाचा मुलगा नसून फार तर एखाद्या सामन्ताचा असावा व त्याला मुख्य सेनापतीहून मोठा अधिकार मिळण्याची अपेक्षा नव्हती असें अनुमान होतें. होर्नेलचें ह्मणणें मान्य केल्यास आणखी किती तरी असंभवनीय गोष्टी संभवनीय मानाव्या लागतात. त्या ह्मणण्याप्रमाणें शिलादित्याची बहीण यशोमती ग्रहवर्म्याचा शत्रु शिलादित्य असें धरिल्यास पुढें शिलादित्याबरोबर ह्मणजे आपल्या बापाविरुद्ध लढून त्याची संपत्ति लुटून व त्याच्या इतर मंडळींना कैद करून

---

१ यशोमतीला ' महाभूत्कुलोत्पना' असें जें बाणानें ( ह च. उच्छ्वास म्हटलें आहे त्या शब्दार्थ घेतला तरी भंडीला घेऊन येणारा हा यशोमतीचा भाऊ राजपदाला न पोंचणारा असा एकादा कनिष्ठ राजपुत्र असेल. त्यानें आपल्या मुलाला नशीब काढण्यासाठी प्रभाकर वर्धनाकडे आणिलें यावरून हें सिद्ध होते.

हर्षापुढें आणून हजर करतो असें मानावे लागतें. असलें चमत्कारिक अनुमान करण्यापेक्षां होर्नेलचें ह्मणणेंच टाकाऊ समजणें योग्य आहे. पण त्यापैकीं देवगुप्ताचे कुमारगुप्त आणि माधवगुप्त हे भाऊ होते एवढा भाग मात्र बाणाच्या वर्णनाशीं जुळता असल्यामुळे ग्राह्य मानिला पाहिजे.

## ३ मौखरि आणि गुप्त यांविषयीं व्हिन्सेंट स्मिथचें मत.

व्हिन्सेंट स्मिथ यानें आपल्या भरतखंडाच्या प्राचीन इतिहासावरील ग्रंथांत ह्मटलें आहे: "प्राचीन वस्तुशास्त्रज्ञ ज्याला 'मगधांतील उत्तरकालीन गुप्त' घराणें ह्मणतात तें मगधांत एकटेच राज्य करीत नसून त्याच्या एका भागावर ज्यांच्या नांवाच्या शेवटीं 'वर्मन्' पद होतें आणि ज्यांना मौखरि अशी संज्ञा होती अशा राजांच्या वंशाचाहि अंमल होता. हे दोन भाग कसे व केवढे होते हें निश्चित ठरवितां येत नाहीं. त्यांचें कधी वैर तर कधी सख्य ही असे. याहून त्यांविषयीं अधिक उपलब्ध असलेली किरकोळ माहिती विशेष महत्वाची नाहीं." या लिहिण्यावरून वरील दोन टीपांत आह्मीं ज्या मौखरि आणि गुप्त घराण्याविषयीं चर्चा केली त्यांचाच व्हिन्सेन्ट स्मिथ उल्लेख करीत आहे हें स्पष्ट होतें. पण आमच्या मतें मौखरि घराणें मूळचें कनोजचें होते यांत संशय नाहीं. मालवराजाकडून ग्रहवर्मा मौखरि मारला गेला तो कनोज येथेंच ही गोष्ट बाणाच्या लिहिण्यावरून निश्चित होते, तसेंच तो अवन्तिवर्म्याचा पुत्र होता हेंही बाणानें सांगितलें आहे. देवबरनाक लेखावरून अवन्तिवर्मा शर्ववर्म्याचा नातू असावा असें दिसतें. अशिरगड येथील अवन्तिवर्म्याच्या मुद्रालेखावरून मौखरींची जी वंशावळ दिसून येते ती वर दिलीच आहे. 'धरणीधराणां भूभृन्मूर्ध्नि स्थितोपि सकलभुवननमस्कृतो मौखरो वंशः'। आणि 'तिमिरैरितरस्कारो रवे र्यो मौखराणां मालवैः परिभवः'। असें जें मौखरांविषयीं बाणानें म्हटलें आहे यावरून त्यांचें घराणें फार बलाढ्य असून वरील लेखांवरून त्यांच्या राज्याचा विस्तार दक्षिणेकडे विंध्याद्रीपर्यंत उत्तरेकडे जोनपूरपर्यंत आणि पूर्वेकडे ब्रह्मपुत्रेपर्यंत झालेला होता ही गोष्टहि उघड होते. सहाव्या शतकाच्या उत्तरार्धांतील हिंदुस्थानचा इतिहास जर जुळवून द्यावयाचा तर

आमच्यामतें तो असा देतां येईल:–इ. स. ५३८ या वर्षीं पाटलिपुत्रसम्राट् गुप्तवंशाचा दुसऱ्या कुमारगुप्ताच्या मरणानें जेव्हां अंत झाला, तेव्हां त्याच्या राज्याचा बराच भाग कनोजच्या मौखरींच्या ताब्यांत आला. पुढें जेव्हां यशोवर्मा आणि बालादित्य यांच्या नेतृत्वाखालीं बऱ्याच राजांनीं संघ करून हूणांना पाणी पाजलें तेव्हां गुप्त साम्राज्याच्या निरनिराळ्या भागांत नवीन राज्यें स्थापन झालीं व त्यांपैकीं कनोजचे मौखरि आणि ठाणेश्वरचे वर्धन यांचीं राज्यें प्रमुख होतीं. यांपैकीं कनोजच्या मौखरींनी आपला अंमल उत्तर, दक्षिण व पूर्व या दिशांकडे वाढविला आणि कांहीं काळ तर पूर्वेकडील प्रांत त्यांच्या प्रत्यक्ष अमलाखालींच होते. (देवबरनाक येथील अग्रहारविषयक मूळ बालादित्याचा दानलेख पुढें शर्ववर्मा आणि पुन: अवन्तिवर्मा यांनीं कायम केल्याच्या गोष्टीवरून हेंच सिद्ध होत आहे.) या पूर्व प्रांतावरील म्हणजे बंगाल्यावरील वगैरे मौखरींचा अंमल हर्षाच्या मृत्यूनंतर मगधांतील गुप्तांकडे आला. मौखरींविषयींचा एवढा इतिहास आमच्यामतें मजबूत विश्वसनीय पायावर रचिलेला आहे. हें नंतरचें मागधीय गुप्त घराणें मूळ माळव्यांतून आलें असावें असा जो तर्क पूर्वीं केला आहे, त्याविषयींमात्र तसें निश्चयानें विधान आम्ही करीत नाहीं. अफसड लेखांत आलेला माधवगुप्त जर देवगुप्ताचा मागें सांगितल्याप्रमाणें सावत्र बंधु असेल तर तो नि:संशय माळव्यांतीलच मूळचा होता. परंतु तसें नसेल तर त्याचें घराणें पूर्वींपासूनच मगधांत कोठें तरी राज्य करीत असलें पाहिजे. पण कांहीं असलें तरी ग्रहवर्म्याला मारणारा आणि त्याचें प्रायश्चित्त म्हणून पुढें राज्यवर्धनाकडून मारला गेलेला देवगुप्त माळव्याचा राजा होता हें मात्र खोटें ठरत नाहीं. यासंबंधानें असें म्हणतां येईल कीं, गुप्ताचें साम्राज्य मोडल्यावर त्यांपैकीं एका गुप्त घराण्यानें माळव्यांत आपलें राज्य स्थापून कनोजच्या मौखरींशीं वर्चस्वाचा झगडा सुरू केला. तसेंच देवगुप्त हा इ. स. ५८० या वर्षीं राज्य करीत असलेल्या भावगुप्ताच्या घराण्यांतीलच होता असेंहि म्हटल्यास वावगें होणार नाहीं. असें मानिल्यास हर्ष व राज्य यांचे बालमित्र जे माधवगुप्त आणि कुमारगुप्त ते याच माळव राजवंशांतील असले पाहिजेत; म्हणजे यांतील माधवगुप्त अफसड लेखांतील

माधवगुप्ताहून वेगळा असला पाहिजे. अफसड लेखांत सांगितलेले गुप्त मगधदेशांतील होते असें धरिलें तरी कनोजच्या मौखरींचें त्यांच्यावर अधिराज्य असल्यामुळें प्रसंगीं त्यांच्यांतही युद्धें झालीं असणं स्वाभाविक आहे.

आतां शेवटीं यासंबंधांत एका गोष्टीचा विचार केला पाहिजे. रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलांत ( १९०६, पा. ८४३ ) मौखरींच्या कांहीं नाण्यांची म्हणून बर्न यानें कांहीं माहिती दिली आहे. हीं नाणीं अयोध्या प्रांतांत फैजाबाद जिल्ह्यांतील भितूर या गांवीं सांपडलीं. तीं ईशानवर्मा, शर्ववर्मा आणि अवन्तिवर्मा तशींच हर्ष, प्रतापशील आणि शिलादित्य यांचीं आहेत असें त्यांच्या निरीक्षणावरून ठरले आहे. या नाण्यांवर वर्षांचेही आंकडे आहेत ते असेः–ईशानवर्मा ५४, ५५; शर्ववर्मा ५८ ( पूर्वी सांपडलेलें नाणें ), २३४, २३ ( नवीन सांपडलेल्यां वरील ); व ५७, ( शेवटचे दोन आंकडे ६७ आणि ७१ असेही वाटण्यासारखे आहेत ); आणि अवन्तिवर्मा २५० ( नवीन सांपडलेलें ). हर्ष, प्रतापशील आणि शिलादित्य यांच्या नाण्यावरील आंकडे त्यांच्या कारकीर्दीतील वर्षांचे असावे असें बर्न म्हणतो. यांपैकीं तीन अंकी आंकडे अर्थातच गुप्तशकाचे होत. प्रथम सांपडलेल्या नाण्यांवरील आंकड्यांचा नीट खुलासा होत नाहीं. त्यासंबंधानें बर्नचें मत असें आहे कीं, कलियुगाच्या आरंभापासून बरोबर ३६०० वर्षें झालीं तेव्हां म्हणजे इ. स. ४९९ यावर्षी ब्रह्मगुप्तानें सुरू केलेल्या शकांतील वर्षांचे ते आंकडे आहेत. परंतु हा शक केवळ काल्पनिक आहे. पण तो शक कोणताही असला तरी तीन अंकी आंकडे गुप्तशकदर्शक असल्यामुळें बर्नच्या मतें त्यावरून मौखरीवर गुप्तांचे कांहीं काळ तरी अधिक राज्य असावें निदान त्यांचें सख्य तरी असावें असें अनुमान केलें पाहिजे. परंतु असल्या अनुमानाची कांहीं गरज नाहीं असें आम्हांला वाटतें. स्वतंत्र राजेदेखील कधीं पूर्वी चालू असलेल्या शकाचा उपयोग करतांना दिसतात; कारण लोकांना त्या शकाची संवय असल्यामुळें एकंदरींत तें सोईचेंच होतें. उदाहरणार्थ, वलभी राजे गुप्तशकाचाच उपयोग करीत; पण याचें कारण ते गुप्तांचे सामन्त होते हें नसून गुप्तसाम्राज्य नुकतेंच ज्यांत नष्ट झालें, परंतु ज्यांतील लोकांना त्यांच्या शकाची संवय पडून गेली होती अशा प्रांतावर

त्यांनीं आपलें प्रभुत्व स्थापिलें हें होय. त्यांना नवीन शक सुरू करण्याची धमक नसल्यामुळें पूर्वीपासून प्रजेंत चालू असलेला गुप्तशकच स्वीकारला. अगदीं जवळचें अलीकडीलदेखील उदाहरण या बाबतींत देण्यासारखें आहे. मराठे लोक फसली शक, व त्याचेच महिने यांचा उपयोग करीत, व दिल्ली येथील मोंगलांची सत्ता नामशेष होऊन ते पूर्ण स्वतंत्र झाले तरी त्यांनीं पुढें तोच क्रम चालू ठेविला; कारण त्या शकाचा व महिन्याचा त्यांना परिपाठ पडून गेला होता. फार काय इंग्रजांनींदेखील कांहीं काळपर्यंत फसली शकाचा उपयोग केलेला आहे. जें शकाविषयीं तेंच नाण्याच्या आकाराविषयींहि समजावें. नवीन राजे झाले तरी ते नाण्यांचा जुना आकार कायम ठेवितात, इतकेंच नव्हे, तर त्यांचें वजन व त्यांवरील चिन्हेंही तशींच ठेवितात. उदाहरणार्थ. सध्या इंग्रजांनीं पाडिलेला रुपया विलायती नाण्यांच्या नमुन्यावर पाडिलेला नसून मोंगलांच्या नमुन्यावर पाडला आहे. आम्हीं हीं विधानें भीतभीतच करीत आहों. तरी एवढे निक्षून सांगणें अवश्य आहे कीं, कांहीं मौखरि राजांनी गुप्त शकाचा उपयोग केला यावरून त्यांच्यावर गुप्तांचा अंमल असलाच पाहिजे हें अनुमान अवश्य ठरत नाहीं. खरें पाहिल्यास गुप्तांच्या साम्राज्याच्या लयानंतरच मुळीं मौखरी प्रबळ झाले. तेव्हां आमच्या मतें असें दिसतें कीं, या नाण्यांच्या हकीकतीवरून पहातां गंगेच्या कांठावरील प्रांतांत गुप्तानंतर लगेच मौखरींचाच अंमल सुरू झाला; व ज्या ठिकाणीं तीं सांपडलीं त्या फैजाबाद जिल्ह्यापर्यंत तो पसरला होता--शर्ववर्म्याचा असिरगडच्यामुद्रालेखांत दिलेल्या वंशावळीलाही या नाण्यांवरून खरेपणा येतो व त्याप्रमाणें ईशानवर्मा शर्ववर्मा आणि अवन्तिवर्मा हे त्या घराण्यांतील बलाढ्य राजे होते असें सिद्ध होतें. या नाण्यांवरील वर्षांचे आंकडेहि आमच्या कल्पनेच्या आड येत नाहींत. अवन्तिवर्म्याच्या नाण्यावरून तो ठाणेश्वरच्या प्रभाकर बर्धनाचा समकालीन व त्याचा मुलगा ग्रहवर्मा हा प्रभाकराचा जांवई व्हावयास कांहींच हरकत येत नाहीं. कारण अवन्तिवर्म्याचा २५० हा आंकडा गुप्त शकाचा समजल्यास त्याच्या कारकीर्दीत इ. स. ५६९ ( ३१९+२५० ) हें वर्ष पडतें. ग्रहवर्मा इ. स. ६०६ या वर्षी गादीवर आला. म्हणजे ही गोष्ट ५६९ नंतर ३७ वर्षांनीं झाली; आणि बीस

असंभवनीय कांहींच नाहीं. आतां शर्ववर्म्याचा २३४ हा आंकडा घेतला तर तो इ. स. ५५३ ( ३१९+२३४ ) हा होतो. हेंही वर्ष वर्मघराण्याच्या वंशवृक्षाशीं जसें मिळतें आहे, तसें वर थोडक्यांत सांगितलेल्या उत्तर हिंदुस्थानच्या इतिहास क्रमांतही बसतें. या नाण्यांवरील दोन अंकीं आंकडे कोणत्या शकाचे आहेत हें जरी निश्चित झालें नाहीं, तरी इतर आंकड्यांवरून आम्हांला तर असें ठाम वाटतें कीं, मौखरींविषयीं जो खुलासा येथें आम्हीं केला आहे त्याला त्या नाण्यांचा चांगला आधार आहे, आणि बाणानें म्हटल्याप्रमाणें तो वंश कनोज येथें राज्य करीत होता या विधानाला त्यामुळें कोणताही बाध येण्यासारखा नाहीं.

## ४–हर्षाचा जन्मकाल.

बाणभट्टानें हर्षचरितांत केलेल्या वर्णनाच्या आधारावर हर्षाचा जन्मकाल अगदीं निश्चित करतां येतो. बाणभट्ट हा हर्षाच्या दरबारांतच कांहीं काळ असल्यामुळें त्यानें दिलेली माहिती विश्वसनीय असली पाहिजे. हर्षाच्या जन्मकाळाचें वर्णन करतांना तो लिहितो–'ततश्च प्राप्ते ज्येष्ठामूलीये मासि बहुलासु बहुलपक्षे द्वादश्यां व्यतीते प्रदोषसमये समारुरुक्षगति क्षपायौवने सहसैवान्तः पुरे समुदपादि कोलाहलःस्त्रीजनस्य'–याचा अर्थः–तेव्हां जेष्ठमास प्राप्त झाला असतां कृष्णपक्षाच्या द्वादशीला कृतिका नक्षत्र असतां प्रदोषकाळ निघून गेल्यावर व रात्रीचा ऐनतारुण्य वेळ येण्याच्या सुमारास एकाएकीं अन्तःपुरांत बायकामध्यें गलबला उत्पन्न झाला. या वर्णनाच्या आधारें लष्करचे प्रो. आपटे यानीं केलेल्या गणितावरून शके ५११ ( इ. स. ५८९ ) आणि शके ५१२ ( इ. स. ५९० ) या दोन्ही वर्षीं ज्येष्ठ वद्य द्वादशीला कृतिका नक्षत्र येतें. पण शके ५११ या वर्षीची द्वादशी सूर्योदयानंतर लागत असल्यामुळें शके ५१२ हेंच हर्षाचें जन्मवर्ष अधिक संभवनीय दिसतें. हेंच वर्ष खरें मानिल्यास तो इ. स. ६०६च्या आक्टोबर महिन्यांत जेव्हां खरा सिंहासनावरून झाला तेव्हां त्याचें वय १६ वर्षांचें होतें. बाणानें सांगितलेला ज्येष्ठ महिना वस्तुतः पूर्णिमान्त पाहिजे; कारण तो उत्तर हिंदुस्थानचा रहिवाशी असून तिकडे पूर्णिमान्त महिन्यांची पद्धत असल्यामुळें त्यानेंही

तीच स्वीकारिली पाहिजे. परंतु या पद्धतीच्या ज्येष्ठ महिन्याच्या कृष्ण द्वादशीला (म्ह० अमान्त पद्धतीच्या वैशाख वद्य द्वादशीला) यांपैकीं कोणत्याच वर्षी कृत्तिका नक्षत्र प्रो. आपट्यांच्या गणितांत येत नाहीं. म्हणून हा ज्येष्ठ महिना दाक्षिणात्य पद्धतीप्रमाणें अमान्त धरावा लागला आहे. या बाबतींत आणखीही एक संशयाची गोष्ट राहिली आहे. बाणानें असें सुचविलें आहे कीं, हर्षाच्या जन्मकाळीं सर्व ग्रह उच्चीचे[१] होते. पण शके ५११ व ५१२ यांपैकीं कोणत्याच वर्षाच्या ज्येष्ठ वद्य १२ ला सर्व ग्रह उच्चीचे नव्हते. पण या गोष्टीचा खुलासा असा करतां येईल कीं, ही त्या दरबारी ज्योतिष्याची अतिशयोक्ति असेल; किंवा हर्ष जन्मला तेव्हां कांहीं त्याचा पुढचा मोठेपणा कोणाला दिसला नव्हता. जेव्हां तो चक्रवर्ती झाला तेव्हां या योगाला जुळेशी जन्म-लग्न-पत्रिका पुढें दरबारी ज्योतिष्यानें केली असेल. वरील दोन्ही वर्षांच्या ज्येष्ठ वद्य द्वादशीच्या रात्रौ १० वाजतांच्या लग्न कुंडल्या प्रो. आपट्यांच्या गणिताप्रमाणें जशा होतात तशा खालीं दिल्या आहेत:—




| अं. क. वि. | स्पष्ट ग्रह | अं. क. वि. |
|---|---|---|
| २—२०—२४ | रवि | २—१०—५६ |
| १—५—४९ | चं | १—१—५४ |

१मान्धाता किलएवंविधे व्यतीपातादिसर्वदोषाभिषंग रहिते सर्वेषूच्चस्थान स्थितेष्वेवं ग्रहेष्वीदृशे लग्ने भेजे जन्म। ह. च. उच्छ्वास. हर्षाच्या जन्मकाळीं जसे निर्दोष योग व उच्चीचे ग्रह होते, तसे पूर्वी मान्धात्याच्या जन्मवेळीं मात्र होते.

मं........१---४--४१——— ———४--१८—३६
बु........२—१५—०३——— ———२--१३---६
गु........१--२१--२७——— ———२--१६—१५
शु........४——०--४६——— ———२--१६—५४
श........२—१०---७——— ———२--१९--३७
रा........१—१२—४८——— ———०--२३--२९
के........९--२३—५७——— ———९--१६--२०

या विवेचनावरून हर्ष जन्मकालीन ग्रहस्थितीसंबंधे[1] बाणाची माहिती जरी विश्वसनीय धरतां येत नाही, तरी खुद्द जन्मकालासंबंधाने मात्र तसें म्हणतां येत नाहीं. चक्रवर्ति राजाच्या वाढदिवशी सर्वत्र उत्सव करण्याची रीत आहे, तिला अनुसरून हर्षाचे वाढदिवसही दरसाल साजरे करीत असले पाहिजेत; अर्थात् त्यासंबंधान अशी चूक होणे संभवनीय नाहीं.

हर्ष जन्मकाल इंग्रजी शकाप्रमाणे काढून वरील अनुमानाशीं तो जुळतो कीं नाहीं हें पहाण्यासाठी आम्हीं स्वतः सेवेल आणि दीक्षित यांनी केलेल्या कोष्टकांवरून इ. स. ५८८, ५८९, ५९० आणि ५९१ या वर्षांचे गणित करून पाहिलें. तेव्हां आम्हांलाही आढळलें कीं पूर्णिमान्त पद्धतीचा ज्येष्ठ म्ह० अमान्त पद्धतीचा वैशाख मास या बाबतीत जुळत नाहीं. कारण तसा धरून कोणत्याच वर्षी वद्य द्वादशीला कृत्तिका नक्षत्र येत नाहीं. परंतु अमान्त पद्धतीचा ज्येष्ठ धरून मात्र ५८९ आणि ५९० या वर्षी द्वादशीला कृत्तिका येतात. पण त्यात ५९० या वर्षी द्वादशी सूर्योदयाला असून पुढें ५५ घटिकांहून अधिक रहाते आणि त्या दिवशीं कृत्तिका नक्षत्रही सूर्योदयानंतर सुमारें १० घटिकांनीं लागत असल्यामुळें त्याचा व द्वादशीचा योग अगदी दिवसभर होतो. या कारणास्तव इ. स. ५९० हेंच वर्ष बाणाच्या वर्णनाशीं सर्वस्वीं जुळतें, व त्याला जुळता इंग्रजी दिवस, रविवार तारीख ४ जून ५९० हा येतो.

---

१ ही ग्रहस्थिति बाणानें आपली म्हणून दिलेली नसून प्रभाकरवर्धनाच्या प्रश्नाला त्यावेळीं ज्योतिष्यांनीं उत्तर काय दिलें तेंच त्यानें सांगितलें आहे.

# प्रकरण २ रें.

## हर्षाचें साम्राज्य.

कनोज आणि ठाणेश्वर येथील संयुक्त सैन्याच्या जोरावर हर्षानें जाहीर केल्याप्रमाणें भरतखंड पादाक्रांत करण्याचा आपला निश्चय सिद्धीस नेला यांत आश्चर्य नाहीं. प्रथमच शकुन त्याला चांगला झाला. कामरूप देशाचा ( आसामचा ) राजा कुमारराज हा बहुधा बंगालच्या शशांकाचा शत्रु असल्यामुळें त्यानें हर्षाशीं सख्य करण्याच्या हेतूनें त्याच्याकडे भारतीयांच्या कल्पनेप्रमाणें साम्राट्चिन्ह म्हणून एक अति मोलाचें श्वेत छत्र पाठवून दिलें. कुमरानें आपखुषीनें सादर केलेल्या या नजराण्याचा व देऊं केलेल्या साह्याचा हर्षानें मनापासून स्वीकार केला. नंतर तेथून तो पूर्व व पश्चिम या दोन्ही दिशांकडे आपलें हत्ती, घोडेस्वार आणि पायदळ यांनीं युक्त असलेले सैन्य घेऊन क्रमाक्रमानें कूच करीत व वाटेंत येणारे प्रांत जिंकीत सहा वर्षे फिरला आणि एवढया अवधींत त्यानें उत्तरहिंदुस्थानांतील बहुतेक राजांवर आपलें अधिराज्य स्थापित केलें. या ठिकाणीं एवढें सांगणें जरूर आहे कीं, हर्षाच्या साम्राज्याचें स्वरूप पुढें मुसलमान बादशहांनीं स्थापिलेल्या साम्राज्याहून भिन्न होतें. भारतीयांची अद्यापिही साम्राज्यविषयक कल्पना अशी होती कीं सम्राटानें जिंकिलेल्या देशांच्या राजांना गादीवरून हुसकून लाविलेंच पाहिजे असें नाहीं. भरतखंडांतील आधुनिक साम्राज्यें व प्राचीन साम्राज्यें यांत भेद दिसतो तो याच बाबतींत. प्राचीन काळीं अशी कल्पना होती कीं जिंकलेल्या राजानें सम्राटाचें प्रभुत्व मान्य करून ठराविक

वार्षिक खंडणी त्याला दिली आणि ठराविक वेळीं सम्राटाचे दरबाराला तो हजर राहिला ह्मणजे पुरे. पिढयान्‌पिढया उपभोगिलेल्या राज्यावरून कोणा राजाला काढून टाकणें ही गोष्ट त्या काळीं खरोखर निंद्य समजत असत. या गोष्टीचा विचार केल्यास हर्षाचें साम्राज्य पुढच्या मुसलमानी साम्राज्याहून किंबहुना ब्रिटिश साम्राज्याहूनही भिन्न कसें होतें हें समजून येईल. दिग्विजय करतांना हर्षानें जित राजांकडून फक्त आपलें प्रभुत्व मान्य करविलें, आणि बाकीच्या बाबतींत त्यांना स्वातंत्र्य दिलें. राज्यें खालसा करण्याचा क्रम त्यानें अगदीं अपवादा दाखलच स्वीकारिला.

हर्षवर्धनाच्या दिग्विजयाचें सविस्तर वर्णन उपलब्ध नाहीं ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. त्यानें आपल्या बंधूचा वध करणाऱ्या बंगालच्या शशांकाचें पारिपत्य कसें केलें याचाहि पत्ता लागत नाहीं. बहुधा राज्यवर्धनापासून बचाव करण्याकरितां जशी शशांकानें त्यावेळीं युक्ति केली तशीच या वेळींहो कांहीं युक्ति करून हर्षाच्या तडाक्यांतून तो निसटला असावा* कारण इ. स ६१९ या वर्षी त्याच्या एका मांडलिक राजानें गंजम येथील एका ब्राह्मणाला गांव दान दिला, त्या विषयींचा जो लेख आहे ( एपिग्राफिका इंडिका व्हॉ ६ ). त्यावरून शशांक त्यावर्षी जीवंत असून राज्य करीत होता व त्याचें मांडलिक राजांसह संपूर्ण राज्य अविच्छिन्न होतें असें दिसून येतें. हा प्रकार वर वर्णिलेल्या भारतीय प्राचीन साम्राज्य-विषयक कल्पनांशीं जुळता होता हें सांगावयास नकोच. शिवाय हर्षाचा कल बौद्धधर्ममतांकडे वळल्यानें त्यानें

---

* राज्यवर्धनाला देऊं केलेली आपली मुलगी त्यानें हर्षाला दिली असावी असा आमचा तर्क आहे.

शशांकाला वधाचें ठरींव प्रायश्चित्त न देतां क्षमा करून सोडून दिलें असेल असेंहि म्हणतां येईल.

हर्षाच्या साम्राज्याचा विस्तार केवढा होता याचा बऱ्याच अंशीं निर्णय करतां येण्यासारखा आहे. त्यांत सिंध देश, पंजाब आणि काश्मीर हे भाग खेरोज करून सर्व उत्तरहिंदुस्थानाचा समावेश बहुत करून होत होता. हे तीन देशही त्याच्या प्रभुत्वांतून अजिबात न गळतां त्यांच्यापासूनहि त्यानें खंडणी वसूल केली होती.

हर्षाच्या वेळीं निरनिराळ्या प्रातांत कोण कोणते राजे होते याचा विचार पुढें ह्युएनत्संग हा प्रवासी येथील कोण कोणत्या प्रांतांत येऊन गेला याचें सविस्तर वर्णन करतांना करूं. सध्यां एवढें सांगितलें म्हणजे पुरे कीं हर्षानें उत्तर हिंदुस्थानचा बहुतेक सर्वभाग जिंकून तेथें आपलें प्रबळ आणि सुव्यवस्थित साम्राज्य-स्थापन केलें व तें त्याच्या मृत्यूपर्यंत टिकूनहि राहिलें.. आपल्या चक्रवर्तित्वाचें दर्शक ह्मणून त्यानें इ. स ६०६ पासून सुरू होणारा स्वतःचा शकहि सुरू केला. त्याच्या पूर्वींच्या सम्राटानीं विक्रम. शालिवाहन, गुप्त शक स्थापन करून जें उदाहरण घालून दिलें होतें तेंच त्यानेंहि गिरविलें. नवीन शक आपल्या नांवानें चालू करणें ही गोष्ट ह्मणजे त्यावेळीं चक्रवर्तित्वाचें लक्षणच बनून गेली होती, व त्या अन्वयें आपला दिग्विजय संपूर्ण केल्या-वर हर्षानेंहि इ. स ६१२ या वर्षीं वर सांगितलेला त्याच्या राज्यारंभ–वर्षापासून सुरू होणारा शक चालू केला.

या नंतर हर्षानें आपलें साम्राज्य नर्मदेच्या दक्षिणेकडे पसर-विण्याचा यत्न चालविला. त्याच्या पूर्वीं गुप्तवंशांतील समुद्रगुप्तानें याच उद्देशानें प्रेरित होऊन दक्षिण हिंदुस्थानावर स्वारी केली

होती. यावेळीं महाराष्ट्रांत चालुक्य घराण्यांतील दुसरा सत्याश्रय पुलकेशी हा हुशार व शूर राजा राज्य करीत होता. त्याच्या दक्षतेमुळें व पराक्रमामुळें हर्षाची गति तिकडे झाली नाहीं. सत्याश्रय पुलकेशी राजाची राजधानी वातापी ह्मणजे हल्लींची बदामी असावी असें कोरींव लेखांवरून दिसून येतें. परंतु ती नाशिकजवळ होती असें ह्युएनत्संग वर्णन करतो. हा दुसरा पुलकेशी राजा फार प्रबळ असून त्यानें सर्व दक्षिण हिंदुस्थान आपल्या कह्यांत आणिलें होतें. हा हर्षाच्या राज्यारोहणानंतर दोन वर्षांनींच ह्मणजे इ. स. ६०८ च्या सुमारास राज्यारूढ झाला आणि त्यानंतर लवकरच त्यानें आपल्या राज्याची सीमा दक्षिण समुद्राच्या किनाऱ्यास नेऊन भिडविली. ह्युएनत्संगनें त्याचें, त्याच्या सैन्याचें आणि त्याच्या प्रजेचें जें वर्णन दिलें आहे तें लक्षांत ठेवण्यासारखें असल्यामुळें त्याचा विस्तृत सारांश येथे देतों. तो म्हणतो–' महाराष्ट्रांतील लोक अभिमानी, जोमदार आणि लढवय्ये आहेत. ते उपकर्त्यांशीं कृतज्ञ, व अपकर्त्याचा सूड घेणारे असून शरणागताचें रक्षण करण्यासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करितात, आणि अपमान करणाराचें शासन करण्यांत प्राणांचीहि पर्वा करीत नाहींत युद्धाला जाण्यापूर्वी त्यांचे शिपाई मद्यपान करितात आणि झुंज होण्यापूर्वी हत्तींनाहि ते दारू पाजितात. आपल्या सैनिकांवर आणि गजघटांवर पूर्ण विश्वास असल्यामुळें त्यांचा राजा शेजाऱ्या राजांनां तुच्छ लेखीत आहे. या दयाशील राजाचा अंमल दूरवर पसरलेला असून त्याच्या सामन्तांची त्यावर पूर्ण निष्ठा आहे. त्याच्यावेळीं शिलादित्य राजा ( हर्ष ) उत्तर भागांत

मान वांकविला नाहीं. त्याच्या राजाच्या पदरीं नित्य हजारों शूर सैनिक आणि शेंकडों रानटी हत्ती असून, युद्धाच्या वेळीं हे हत्ती मस्त होऊन शत्रूवर तुटून पडतात आणि त्याला पळवून लावावयास कधीं चुकत नाहींत. शिलादित्य राजा इतका कुशल योद्धा, त्याच्या सरदारांना सारखे जय मिळत गेलेले, व सेनेचें आधिपत्य स्वतः त्याच्याकडे, पण अशा स्थितींतहि त्याला महाराष्ट्राच्या राजाला चीत करतां आलें नाहीं." याप्रमाणें एका चमत्कारिक योगायोगामुळें हिंदुस्थानांत यावेळीं दोन प्रबळ साम्राज्यें स्थापन होऊन त्यांचे अधिपति बलाढ्य सम्राट जवळ जवळ एकाचवेळीं राज्यारूढ झालेले असून दोघेही एकमेकांना पुरून उरले होते. या उत्तर दक्षिण साम्राज्यांची स्वाभाविक सरहद्द नर्मदा नदी असून तिच्यामुळें हिंदुस्थानाचे एकमेकांपासून अनेक बाबतींत भिन्न असलेले दोन भाग सहजच झालेले आहेत.

हर्षाच्या साम्राज्याची स्थापना आणि त्याचा विस्तार याविषयीं बाणानें फक्त एका ठिकाणीं मात्र उल्लेख केला आहे त्याचा विचार पुढें स्वतंत्र टीप्पणींत करणार आहों. याखेरीज त्याच्याकडून यासंबंधी दुसरी कांहींच माहिती मिळत नाहीं. त्या बाबतींत ह्युएनत्संगच्या पुराव्यावरच बहुतेक भिस्त ठेवावी लागत्री आहे. हर्षानें आपला दिग्विजय सहा वर्षांत पुरा केला व इतक्या वेळांत त्यानें आपल्या सैन्याला मुळींच विश्रांति दिली नाहीं, दिग्विजय संपविल्यावर ३५ वर्षें पर्यंत त्यानें अविच्छिन्न शांततेंत

१ या बाबतींत कांहीं ताम्रपटांचाहि आधार मिळण्यासारखा आहे. हर्षाचें साम्राज्य सर्व उत्तर हिंदुस्थानांत पसरलें होतें असा एका ताम्रपटांत उल्लेख आहेः—' समरसंसक्त–सकलोत्तरापथेश्वर–श्री–हर्षवर्धन–पराजयोपलब्ध–परमेश्वरापरनामधेयःसत्याश्रयःश्री वल्लभो महाराजाधिराजः; ' ( इं. ॲन्टिक्वरी पु. ८ पा. ८१८ )

राज्यकारभार केला, इत्यादि गोष्टी ह्युएनत्संगच्याच सांगण्यावर आपल्याला कळल्या आहेत. या अविच्छिन्न शांततेच्या काळांत अर्थातच व्हिन्सेन्ट स्मिथच्या मताप्रमाणें इ. स. ६२० सालीं झालेलें पुलकेशी बरोबरचें युद्ध आणि हर्षाच्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं गंजम प्रान्ताशीं झालेलें युद्ध यांचा समावेश करावयाचा आहे. यांतील गंजमचें युद्ध इ. स. ६४३ च्या सुमारास झालें असावें. कारण ह्युएनत्संगच्या चरित्रांत असें म्हटलें आहे कीं, त्या काळाच्या सुमारास गंजम प्रांत जिंकून हर्ष नुकताच परत येत होता.

हर्षानें आपल्या साम्राज्याचा बंदोबस्त कसा ठेविला होता याविषयीं ह्युएनत्संगचें वर्णन मनोवेधक असल्यामुळें तें येथें देण्यासारखें आहे. तो म्हणतो, 'आपल्या राज्याचा विस्तार केल्यावर हर्षानें आपलें सैन्य वाढवून हत्तींचीं संख्या ६०००० केली आणि पायदळ १,००,००० केलें आणि त्यांच्या जोरावर पुढें तीस वर्षें बहुतेक शांततेनें राज्य केलें. तो आपलीं कामें अगदीं दक्षतेनें करी आणि त्याचा सर्व कारभार चोख न्यायाचा असे. सत्कृत्यें करण्याची वेळ आली म्हणजे झोंप आणि अन्न यांचाहि त्यास विसर पडे. आणि हिंसा करणें हा त्यानें भयंकर अपराध ठरवून त्याबद्दल कडक शिक्षा ठेविली आणि पांची हिंदू प्रांतांत सर्वत्र मांसाहार वर्ज करण्याचे हुकूम सोडले. आपल्या राज्यांत त्यानें सर्वत्र पांथस्थासाठीं धर्मशाळा बांधिल्या. शेजारच्या राजांपैकीं ज्यांचा सत्कृत्यांकडेच ओढा असे त्यांच्याशींच तो सख्य करी. त्या विरुद्ध स्वभावाच्या लोकांशीं तो भाषणही करीत नसे. तो राज्याची पहाणी करण्याकरितां ठिकठिकाणीं दौरे करी, व फिरतीवर असतां कोठें ही एका ठिकाणीं फार दिवस मुक्काम करीत नसे. मुक्कामाच्या ठिकाणीं

राहण्याकरितां तात्पुरत्या झोंपड्या उभारीत असे. पावसाचे तीन महिने मात्र तो कोठें जात नसे. तो दिवसाचे तीन भाग करून एका भागांत राज्यकारभार आणि उरलेल्या दोहोंत धर्मकृत्यें करी. तो अविश्रांत श्रम करी आणि इतकें करूनही सर्व दिवस त्याच्या कामाला अपुरा पडे." ( ह्यु. त्सं. लेख. व्हा. १ ) अशा दक्षतेनें काम करण्याची संवय, अलौकिक नीतिबुद्धीचा विकास करण्याचा मनापासूनचा प्रयत्न, यांच्यामुळें हर्षांचें साम्राज्य त्याच्या सर्व कारकीर्दभर अविछिन्न राहिलें व त्याचा सर्वत्र उत्कर्ष झाला यांत नवल काय ? त्यानें आपले प्रतिनिधि निरनिराळ्या प्रान्तांत ठेविले असून त्यांच्या मार्फत तो राज्यांत न्याय वगैरे सर्व लोकांना नीट मिळतो आहे कीं नाहीं हें पहात असे. त्याचे हुकूम प्रजेच्या खऱ्या कल्याणार्थ केलेले असल्यामुळें जरी तो अनियंत्रित चक्रवर्ति होता तरी त्याची अवज्ञा लहानापासून थोरापर्यन्त कोणीहि केली नाहीं. एकंदरींत हर्षाचें साम्राज्य म्हणजे आजवर जगांत जीं कांहीं थोडीशीं रामराज्यें होऊन त्यांमुळें जगाच्या सामान्यतः भयंकर इतिहासाला शोभा आली आहे, त्यांपैकींच एक असून तत्कालीन अंदाधुंदीच्या परिस्थितींत मनाला समाधान देणाऱ्या गोष्टींत त्याला अग्रस्थान दिलें पाहिजे.

हर्ष इ. स. ६४७ त मृत्यु पावला असें चिनी लेखांच्या आधारानें इतिहासकारांनीं ठरविलें आहे; म्हणजे त्यानें एकंदर ४१ वर्षें राज्य केलें. त्याला बहुधा पुत्र संतति नव्हती. त्याची राणी व मुलें यासंबंधानें कोठेंच कांहीं सांगितलेलें नाहीं याचें मोठें

---

ह्युएनत्संगच्या विधानाला बाणाच्या लिहिण्यावरूनही पुष्टि मिळते. ठाणेश्वराहून निघाल्यावर हर्षाच्या पहिल्या मुक्कामाचें वर्णन त्यानें केलें आहे तें असें:—नातिदूरे नगरादुपसरस्वति निर्मिते महति तृणमये मन्दिरे प्रस्थानमकरोत् ।

आश्चर्य वाटतें. त्याला एक कन्या मात्र होती व ती वलभीच्या राजाला दिली होती. त्याला पुत्र असता तर त्याच्या मागें त्याच्या साम्राज्यांत गडबड उडाली नसती, व त्या पुत्राचे लेख कोठें तरी मिळते त्यांत नित्याप्रमाणें आपल्या मातोश्रीच्या नांवाचा त्यानें उल्लेख केला असता. तसा प्रकार कांहीं दिसत नाहीं. यावरून त्याला पुत्र नसावा असें म्हणावयास हरकत नाहीं. या निपुत्रिकत्वामुळेंहि त्याचा ओढा धर्माकडे अधिक वळला असेल. हा ओढा इतका होता कीं, या अद्वितीय सम्राटाला ऐहिक मोठेपणा व संपत्ति हीं अगदीं तुच्छ वाटत व त्यामुळें तो दर पांच वर्षांनीं मोठा जंगी समारंभ करून आपलें सर्व धन विद्वान व भक्तिमान बौद्ध, ब्राह्मण, व जैन भिक्षु इत्यादिकांना अर्पण करी. या समारंभाचें वर्णन ह्युएनत्संगनें सविस्तर केलें आहे; त्यांत तो ह्मणतो " हर्ष-राजा असल्या समारंभानंतर निर्धन झाल्यानें आपल्याकरितां वस्त्रासाठीं राज्यश्रीजवळ भिक्षा मागे." हा प्रकार जगांतील दुसऱ्या कोणत्याहि सम्राटासंबंधानें सांगतां येईल असें वाटत नाहीं. असा हा चक्रवर्ति हर्ष दातृत्व, तत्वज्ञान आणि शौर्य यांचा एकवटलेला अद्वितीय आश्रयस्थान होता ! ! !

# टिपण्णी.

बाणानें हर्षाच्या दिग्विजयाचें जरी वर्णन केलेलें नाहीं, तरी हर्षचरितांत जें एक वर्णन आलेलें आहे त्यावरून हर्षाविषयींच्या वर लिहिलेल्या गोष्टींना चांगला आधार मिळतो. बाणाच्या बंधूंनीं हर्षाचें चरित्र सांगण्याविषयीं जेव्हां त्याला विनंति केली, तेव्हां त्याचा मोठेपणा वर्णन करितांना त्यांनीं खालीं दिलेले उद्गार काढिले:—

" अत्रबलजिता निश्चलीकृताश्चलन्तः कृत्तपक्षाः क्षितिभृतः । अत्र-प्रजापतिनाशेष–भोगि–मंडलस्योपरि क्षमा कृता । अत्र पुरुषोत्तमेन सिंधुराजे प्रमथ्य लक्ष्मीरात्मीया कृता । अत्र बलिना मोचितभूभृद्वेष्टनो मुक्तो महानागः । अत्र देवेनाभिषिक्तः कुमारः । अत्र परमेश्वरण तुषारशैलभुवो दुर्गाया गृहीतः करः । अत्र लोकनाथेन दिशां मुखेषु परिकल्पिता लोकपालाः। ह. च. उच्छ्वास,

हीं सर्व वाक्यें श्लेषयुक्त काव्यात्मक असून असले श्लेष संस्कृताशिवाय इतरत्र साधणें कठीण आहे. परंतु त्यांतील हर्षाला लागू होणारा अर्थ प्रस्तुत प्रकरणीं फार महत्वाचा आहे. तो असाः—१ या विजयी राजानें आपल्या पराक्रमानें कित्येक राजाचे पक्षपाती तोडून टाकून अपापल्या राज्यांत त्यानां सुस्थिर केलें. या प्रजांच्या स्वामीनें सर्व राजामहाराजांना क्षमा करून आपला राज्याचा उपभोग घेऊं दिला. त्या उत्तम पुरुषानें सिंधुराजाला जिंकून त्याची संपत्ति आपलीशी केली. त्या बलाढय राजानें कुमाराला या ( नांवाच्या राजाला ) हत्तीच्या तडाक्यांतून वांचविलें; आणि हत्तीला सोडून दिलें. या राजाधिराजानें कुमाराला अभिषिक्त केलें. या महाप्रतापी राजानें हिमालयांतील दुर्गम प्रांतांतूनहि करभार वसूल केला. या लोकांच्या रक्षण कर्त्यानें निरनिराळ्या प्रदेशांत लोकरक्षणार्थ अधिकारी नेमिले." या वर्णनावरून आपल्याला असें दिसून येईल कीं, हर्षानें उत्तर हिंदुस्थानांतील सर्व राज्यें जिंकलीं इतकेंच नव्हे, तर जिंकिलेल्या राजांना आपल्या अधिराज्याखालीं आपापल्या मुलखांत पुनः राज्य करूं दिलें. सिंध

आणि हिमालयांतील दुर्गम प्रान्त ( हा नेपाळ अथवा काश्मीर असावा ) या जिंकलेल्या प्रान्ताचीं त्यानें नावेंही सांगितलीं आहेत. त्यानें अभिषिक्त केलेला राजा कुमार म्हणजे आसामचा कुमार राज असावा. आपखुषीनें त्याचें सख्य जोडणारा हा पहिलाच राजा असल्यामुळें हर्षानें त्याला अभिषेक करवून त्याचें महत्व वाढविलें असणें स्वाभाविक आहे; अथवा पुढें सांगितल्याप्रमाणें बंगालच्या शशांकाला जिंकून त्याच्या मरणोत्तर त्याचेंही राज्य कुमारराजाला दिलें असेल. हत्तीपासून कुमाराला सोडविल्याच्या संबंधानें हर्षचरिताच्या टीकाकारानें अशी गोष्ट सांगितली आहे कीं, कुमार राज हा एकदां हर्षाच्या हत्तीच्या तडाक्यांत सांपडला असतां हर्षानें मोठ्या धैर्यानें आपल्या तरवारीनें त्याची सोंड तोडून टाकिली; आणि मग त्या निरुपयोगी झालेल्या हत्तीला रानांत सोडून दिलें ही गोष्ट खरी असल्यास हर्षाचें शारीरिक सामर्थ्यहि अचाट असलें पाहिजे. सरतें शेवटीं सांगावयाची गोष्ट म्हणजे हर्षानें केवळ हत्ती आणि घोडेस्वार यांच्या जोरावर सर्व राज्यांत फिरून त्याची उत्तम व्यवस्था ठेविली होती, इतकेंच नव्हे तर हल्लीं ब्रिटिश सरकार जसें संस्थानांत पोलिटिकल एजंट नेमून तद्वारा तेथील व्यवस्थेवर नजर ठेवितें, त्याप्रमाणें हर्षानेंही आपले विश्वासू अधिकारी ठिकठिकाणीं ठेविले होते; व त्यांच्या मार्फत तो कर वसुली करीत असे. ही सर्व महत्वाची माहिती प्रत्यक्ष त्या काळीं हयात असलेल्या चौकस मनुष्याकडून आलेली असल्यामुळें फार मूल्यवान् व विश्वसनीय आहे हें सांगणें नकोच.

# प्रकरण तिसरें.

## भरत खंडांतील हर्षकालीन राज्यें आणि त्यांचे अधिपति.

चक्रवर्ती हर्षाच्या कारकीर्दीच्या उत्तरार्धांत सुप्रसिद्ध दीर्घोद्योगी चिनी प्रवासी ह्युएनत्संग हा हिंदुस्थानांत आला. तो येथें इ. स. ६३१ च्या आरंभापासून तों ६४३च्या अखेरीपर्यंत होता व तितक्या अवधींत त्यानें सर्व देशभर प्रवास करून आणि अविश्रांत श्रम करून जी या देशाविषयीं सविस्तर माहिती मिळवून लिहून ठेविली तिच्यावरून हर्षकालीन हिंदुस्थानच्या तत्कालीन परिस्थितीचा चांगलाच बोध होतो. ही माहिती तत्कालीन ताम्रपट, शिलालेख, नाणीं इत्यादिकांवरून मिळणाऱ्या माहितीशीं बरोबर मिळत असल्यामुळें ती अगदीं विश्वसनीयहि आहे. त्यानें कित्येक प्रांतांतील राजांचीं नांवें दिलेलीं असून सर्व प्रांतांतील लोकांचीं विशिष्ट लक्षणें, सामान्य स्वभाव, चाली रीति, धर्म, इतिहास इत्यादि प्राचीन इतिहासाच्या जिज्ञासूला अत्यन्त उपयुक्त अशी माहिती दिली आहे. त्याचे लेख, व त्यांवरून मूळ चिनी भाषेंत रचिलेलें त्याचें चरित्र यांचीं यूरोपीय पंडितांनीं भाषांतरें केलीं असून आज इंग्रजी भाषेंत तीं आपणांस वाचावयास मिळत आहेत. या लेखांस इतर साधनांनीं उपलब्ध झालेल्या महितीशीं ताडून त्यांच्या सत्यासत्यतेचा छडा लावण्याचाहि कनिंगहॅम प्रभृति पाश्चात्य पंडितांनी प्रयत्न केला असून ह्युएनत्संगनें वर्णिलेल्या स्थानांचा आणि राज्यांचा पत्ता त्यांनीं लाविला आहे. कनिंगहॅमच्या श्रमाचें फळ 'हिंदुस्थानचें प्राचीन भौगोलिक वर्णन' हा ग्रंथ असून त्यांतील

माहितीमध्यें नंतर झालेल्या पुष्कळ पंडितांनीं भर टाकिली आहे. या सर्व पंडितांनीं या बाबतींत आजवर जी कामगिरी केली व जिच्या आधारावर अलीकडील शोधकांना हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाची थोडी तरी जुळणी करतां येऊं लागली आहे, तिजबद्दल भारतीय इतिहास जिज्ञासू त्यांचे खरोखरच फार ऋणी आहेत. त्यांनीं श्रम करून गोळा केलेल्या माहितीचें सार आम्हीं साधारण वाचकांकरितां कोष्टक रूपानें मुद्दाम काढिलें असून त्यांत ह्युएनत्संगनें जे प्रांत पाहिले त्यांचीं नांवें, शक्य तेथें त्यांच्या अधिपतींचीं नांवें, आणि शेवटीं तेथील लोक वगैरेची जी उपयुक्त व मनोरंजक माहिती वाटली ती क्रमानें दिली आहे. हें कोष्टकरूपी सार टिप्पणी म्हणून पुढें जोडण्यांत आलें आहे. या माहितीच्या आणि नाणीं, ताम्रलेख इत्यादिकांच्या आधारानें प्रस्तुत प्रकारणांत आम्हीं चक्रवर्ति हर्षाच्या काळीं या देशांत जीं महत्त्वाचीं राज्यें होतीं त्यांचें व त्यांच्या अधिपतींचें वर्णन करीत आहों.

असो, थेट वायव्यसरहद्दीपासून सुरुवात करतां प्रथम कपिश म्हणजे हल्लींचा काबूल प्रांत लगतो. येथील राजा क्षत्रिय असून त्याचा धर्म बौद्ध होता. त्याचें नांव वगैरे काय हें कांहीं समजत नाहीं; तथापि त्याचा लंपाक, नगर, व गांधार या सिंधुनदापलीकडील एकमेकांना लागून असलेल्या छोटया प्रान्तांवर अंमल होता एवढें खास. गांधार प्रांतांतील जुनें राजघराणें नुकतेंच नष्ट झालें असून तो एकंदर प्रदेश व त्याची राजधानी हीं अगदीं ओडक्या स्थितींत होतीं असें ह्युएनत्संगनें लिहिलें आहे. गांधारदेशावर यापूर्वीं बहुधा हूणांचा तावा असावा व प्रभाकर-वर्धनानें त्यांचा मोड केल्यावर त्या दुर्बल स्थितींत कपिशाच्या राजानें त्यांचा नायनाट केला असावा. सिंधुनदापलीकडील

दुसरें महत्वाचें राज्य म्हणजे उद्यान ऊर्फ हल्लींचें स्वात हें होय. हें सुवस्तु ऊर्फ स्वात नदीच्या कांठीं असून ह्युएनत्संगच्या वेळीं तें बौद्ध धर्माचें एक महत्वाचें केंद्र होतें. उत्तरेकडे सिंधूच्या पलीकडील नजरेस येणारें तिसरें काश्मीरचें राज्य होय. काश्मीरच्या अधि-राज्याखालीं, तक्षशिला, सिंहपूर आणि उरश अशीं तीन लहान राज्यें होतीं. काश्मीरचा राजा त्या काळीं दुर्लभवर्धन म्हणून कोणी असून त्यानें कर्कोट घराण्याची काश्मीरांत स्थापना केली असें राजतरंगिणींतही म्हटलें आहे. कर्कोट नांवाचा नाग या घरा-ण्याचें रक्षण करीत होता असें ह्युएनत्संगनेंहि वर्णन केलें आहे. राज-तरंगिणीकार कल्हणानें दुर्लभवर्धन हा गोनर्दीय घराण्यांतील शेव-टचा राजा जो बालदित्य त्याचा जांवई होता असें म्हटलें आहे. त्याच्या मतें तो लौकिक शक ३६७७ ह्मणजे इ. स. ६०१ वर्षी गादीवर बसला आणि ३६ वर्षें राज्य करिता झाला. म्हणजे बहुतेक अथपासून इति पर्यंत तो हर्षाचा समकालीन होता. कर्कोट नागाच्या कृपेनें तो उच्चपदास पोंचल्यामुळें त्याच्या वंशाला कर्कोटवंश असें नांव पडलें, अशी कथा आहे. त्यानें आपला अंमल पंजाबचा उत्तर भाग तसाच काश्मीरला लागून असलेलीं कांहीं डोंगराळ संस्थानें यांवर बसविल्यामुळें तो बराच प्रबळ झालेला होता. ज्या डोंगराळ राज्याचा अधिपतीला हर्षानें आपलें आधिराज्य कबूल करावयास लावून त्यापासून करभार वसूल केला म्हणून बाणानें म्हटलें तो राजा बहुधा हाच असावा. ह्युएनत्संगनें काश्मीरच्या लोकांचें जसें वर्णन तेव्हां केलें तसेंच म्हणजे सुस्वरूप व विद्येचे व्यासंगी ते आजही आहेत; पण त्यानें त्यांना लबाड म्हटलें आहे तें बरेंच चमत्कारिक दिसतें.

ह्युएनत्संगनें वर्णिलेला पुढचा महत्वाचा प्रांत म्हणजे टेक्का होय. त्याची पूर्वीची राजधानी शाकल असून एक माजी राजा

मिहिरकुल नांवाचा होता, असें त्यानें म्हटलें आहे. हीं दोन्ही नांवें प्राचीन हिंदुस्थानच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत. मात्र यावेळीं शाकल नगर अगदीं मोडक्या स्थितींत होतें. ह्युएन-त्संग–कालीन त्याची राजधानी आणि टेक्का हें नांव हीं दोन्ही आज कोणच्या नांवानें प्रसिद्ध आहेत हें अद्याप समजलेलें नाहीं. तरी टेक्का म्हणजे चच–नामा नामक अरबी ग्रंथांत ज्या लोकांचे टाक हें नांव आलें असून, पृथ्विराजाच्या वेळचो जी ३६ राजघराण्यांची यादी दिली आहे त्या तक्षक किंवा टाक घराणें म्हणून जें आलें आहे तेंच होय असें कित्येक म्हणतात. राजस्थानचा इतिहारकार टॉड म्हणतो कीं, खिस्ती शकाचा १३ व्या शतकांत टाक घराणें मुसलमान बनून त्याचें ऐतिहासिक अस्तित्व नष्ट झालें. हें टेक्काचें राज्य बरेंच विस्तृत होतें. मूलस्थानपुर म्हणजे हल्लींचें मुलतान आणि पर्वत हीं लहान राज्यें टेक्काचीं अंकित होतीं असें ह्युएनत्संगनें लिहिलें आहे. हे सर्व प्रांत बौद्धधर्माचे फारसे पुरस्कर्ते नसल्यामुळें साहजिकच हिंदुधर्माचें त्यांत वर्चस्व होतें. मिहिरकुल राजा तर बौद्धधर्मी यांचा छळ करा, व मुलतान येथें फार प्रसिद्ध असें सूर्याचें देऊळ असून तेथें हिंदुस्थानच्या सर्व भागांतून दर्शनार्थ लोक येत असत. या वेळचा टेक्काचा राजा कोण होता हें समजतें तर बरें. पंजाबकडील राज्यांत हेंच राज्य विशेष महत्वाचें असून तें काश्मीर आणि ठाणेश्वर यांच्या दरम्यान असल्यामुळें त्याला हर्षाचें वर्चस्व मान्य करावें लागलें असावें असें अनुमान होतें.

आतां ह्युएनत्संगचा क्रम सोडून जरा नैऋत्येकडे वळल्यास पुढें फार महत्वाचें राज्य लागतें तें सिंधचें होय. त्याची राजधानी सिंधुनदाच्या उजवीकडे कोठें तरी असून त्याच्या अंमलाखालीं

पश्चिमेकडे व दक्षिणेकडे समुद्रापर्यंत दोन तीन लहान राज्यें होतीं. थोडक्यांत सांगावयाचें तर आजच्या सिंधप्रान्ता एवढा त्या राज्याचा विस्तार होता. त्याचा राजा प्रबळ होता, तथापि प्रभाकर-वर्धन आणि हर्ष अशा दोघांनींहि त्याचा पराजय केला होता. पण या राजाच्या नांवाचा वगैरे पत्ता लावणें जरा कठीणच आहे. तो बौद्ध धर्मीय असून जातीनें शूद्र होता असें ह्युएनत्संग म्हणतो. पुढे आठव्या शतक्यांत आरब लोकांनीं सिंध प्रान्त जिंकिल्याचा इतिहास सांगणारा जो चचनामा ग्रंथ त्यांत म्हटलें आहे कीं, चचनामक ब्राह्मण राजापूर्वीं सिंध प्रान्तांत जें राजघराणें नांदत होतें त्याचा मूळ पुरुष देवाजी म्हणून होता व शेवटचा राजा सहसीराय नांवाचा होता. सहसीरायच्या मृत्यूनंतर त्याच्या खासगी कारभाऱ्यानें त्याची गादी बळकावून त्याच्या विधवा स्त्रीशीं लग्न लाविलें. हा गादी बळकावण्याचा प्रकार केव्हां घडून आला हें चचनाम्यावरून आपल्याला ठरवितां येण्यासारखें आहे. कारण त्यांत असें म्हटलें आहे कीं, हिजरी शक ११ या वर्षीं म्हणजे इ. स. ६३२ या वर्षीं सिंधप्रांतावर मुसलमानांची पहिली स्वारी झाली; 'त्यावेळीं चच हा राजा असून त्याच्या कारकीर्दीचीं ३५ वर्षें होऊन गेलीं होतीं.' यावरून चचानें सिंधची गादी बळकाविली, ती इ. स. ५९७ त असें येतें. त्यानें एकंदर ४० वर्षें राज्य केल्यावर इ. स. ६३७ त त्याच्या पाश्चात् त्याचा भाऊ चंद्र गादीवर आला आणि त्यानें ७ वर्षें म्हणजे इ. स. ६४४ पर्यंत राज्य केलें. म्हणजे इ. स. ६४१ त जेव्हां ह्युएनत्संग सिंध प्रांतांत गेला तेव्हां तेथें चंद्र राज्य करीत असला पाहिजे. हा चंद्र बौद्ध धर्मीय होता असें चचनाम्यांत लिहिलें आहे; पण तो तर खरोखर ब्राह्मण होता. यास्तव ह्युएनत्संगच्या सिंधुराजाचें वर्णन त्याला

लागत नाहीं; कारण त्याचा राजा शूद्र आहे. तेव्हां आतां चूक कोण? चचनामा कीं ह्युएनत्संग? आम्हाला वाटतें ह्युएनत्संगचें म्हणणें बरोबर असून चचनामा चुकीचा असावा. कारण त्यांतील पुष्कळ वर्णनें कांहीं काल्पनिक व बरींच ऐकींव माहितीच्या आधारें लिहिलीं असून प्रत्यक्ष पाहिलेल्या माणसाचीं नव्हत. या उलट ह्युएनत्संग स्वतः पाहिलेल्या गोष्टी सांगत आहे. शिवाय चंद्रावर सांगितल्याप्रमाणें जर इ. स. ६४४ त मृत्यु पावला असेल, तर तेव्हांच त्याचा पुतण्या जो दाहर तो गादीवर आला असला पाहिजे. पुढें महमद कासिमानें इ. स. ७१२ त जेव्हां सिंध प्रांतावर स्वारी केली, तेव्हां तेथें दाहर राज्य करीत होता याबद्दल फारसा वाद नाहीं. तें चच नाम्याचें वर्णन खरें मानिल्यास दाहर ६८ वर्षें गादीवर होता असें म्हणावें लागतें. हें जरी अशक्य नसलें तरी असंभवनीय दिसतें. म्हणून आम्हाला असें दिसतें कीं, ह्युएनत्संग सिंधुदेशांत गेला तेव्हां म्हणजे इ. स. ६४१ त दुसरा सहसीरायच त्या गादीवर असावा. चचनाम्यांत त्याचा संबंध चितोडच्या घराण्याशीं आहे असें सांगितल्यामुळें हा साहसी मौर्य घराण्यांपैकीं असला पाहिजे. इ.स.६४१च्या सुमारास चितोडचें राज्य शिसोदे वंशाकडे आलेलें नसून मौर्यवंशाचीच एक शाखा त्यावेळीं तेथें राज्य करीत होती; व त्यांच्यापासून पुढें बापा रावळ यानें तें जिंकून घेतलें असें शिशोद्यांच्या हकीकतीवरून दिसतें. मौर्य घराणें हें शूद्र होतें हें प्रसिद्धच आहे. चंद्रगुप्त मौर्याचे व अशोकाचे वंशज हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं राज्य करीत असणें संभवनीय आहे. याचा विचार करतां ह्युएनत्संग म्हणतो त्याप्रमाणें त्याच्या वेळीं सिंधु-

राजा बौद्ध असून तो शूद्र दुसरा सहसीरायच असावा असा आमचा तर्क आहे. तसेंच हर्षानें ज्या सिंधुराजाचा पराभव केला तो चच नसून हा दुसरा साहसीरायच असावा असें मानणें अधिक संयुक्तिक दिसतें. चच हा मोठा दैववान् राजा असून त्यानें उत्तर, पश्चिम, आणि दक्षिण अशा तिन्ही दिशांस आपलें राज्य वाढविलें असें वर्णन आहे. त्यानें मुलतान आणि पर्वत हेही प्रांत जिंकले असून आपली सरहद्द काश्मीरला नेऊन भिडविली होती असें दिसते. इ. स. ६४१ त ह्युएनत्संग टेक्का प्रांतांत गेला तेव्हां मुलतान त्याच्या राजाच्या अंमलाखालीं असून सिंधुराजाच्या नव्हतें; यावरून आपल्याला आणखी असेंही म्हणतां येईल कीं,तो सिंध प्रान्तांत गेला तो दुसऱ्या साहसीरायाचा कारकीर्दींतच होय. सिंध आणि भावलपुरच्या गॅझिटिअरमध्यें चच राजानें सिंधची गादी इ. स. ६५१ त बळकाविली असें एका मुसलमानी इतिहासकाराच्या आधारानें प्रतिपादिलें आहे. परंतु आमच्यामतें ती गोष्ट केव्हां तरी हर्षाच्या मृत्यूनंतर ह्मणजे ६४८ इ. च्या सुमारास घडली असावी. चचानें इ. स. ६८८ पर्यंत ह्मणजे ४० वर्षे राज्य केलें. नंतर त्याचा भाऊ चंद्र गादीवर आला व त्यानें ७ वर्षें म्हणजे इ. स. ६९५ पर्यंत राज्य केलें व त्याच्या मागून चचाचा मुलगा दाहिर हा राजा होऊन तो ७१२ इ. त महमद कासिमाकडून जिंकिला जाईपर्यंत १७ वर्षें गादीवर असावा.

ह्युएनत्संगचे लेख आणि चचनामा यांतील वर्णनांत तफावत असल्यामुळें त्यावेळीं सिंधु देशच्या राजाच्या जातीविषयीं शंका पडून ज्याप्रमाणें तो राजा दुसरा साहसीराय असावा कीं चचाचा भाऊ चंद्र असावा याचा निर्णय करणें भानगडीचें झालें, तसा प्रकार पुढील उत्तर हिंदुस्थानचें महत्वाचें राज्य वलभी म्हणजे

पूर्व काठेवाड याचा झालेला नाहीं. या देशच्या राजाचें वर्णन ह्युएनत्संगनें सविस्तर केलें आहे. ‘ तो जातीनें क्षत्रिय असून हर्षाचा जांवई होता; व त्याचें नांव ध्रुवभट होतें. तो तरुण व उताविळ्या स्वभावाचा होता तथापि बौद्ध धर्माचा मात्र कट्टा अभिमानी होता ” याचें आणखी वर्णन करतांना ह्युएनत्संगनें म्हटलें आहे कीं, तो हर्षाच्या दौऱ्यांत त्याच्याबरोबर वारंवार जात असे व प्रयाग येथें जो इ. स. ६४३ त बडा दान–समारंभ हर्षानें केला व ज्या प्रसंगीं ह्युएनत्संग हाच मुख्य भिक्षु होता, त्यावेळींही तो हजर होता. या गोष्टीला ताम्रपटादि लेखांचाहि चांगला आधार आहे. असो. वलभीचें हें राजघराणें मूळ अयोध्येकडील असून सहाव्या शतकाच्या आरंभीं ( कांहींच्या मतें इ. स. ४८५ च्या सुमारास ) हूणांनी सताविल्यामुळें तेथून येऊन सेनापति भट्टारकानें त्याची काठेवाडांत स्थापना केली. त्यांच्या दानलेखांवरून त्यांचें सामर्थ्य दिसून येत असून त्यांची थोडीशी माहितीहि मिळते. ते मूळचे कट्टे शिवभक्त असून हर्षाचा जांवई ध्रुवभट्ट मात्र बौद्ध झाला होता. हें वलभीचें जत्रिय घराणें निःसंशय फार उच्च दर्जाचें होतें, कारण अलीकडील इतिहासांतील सुप्रसिद्ध श्रेष्ठ रजपूत घराणें जें उदेपुरच्या शिसोद्यांचें त्यांतील राजे आपलें मूळ वलभी घराण्याशीं जोडतात. यावरून त्या राजाला हर्षानें आपली कन्या दिली असणें कांहीं असंभवीय नाहीं. कारण वलभीचा राजा उच्च दर्जाचा क्षत्रियच होता. प्रभाकर वर्धनाने राज्यश्रीला कनोजचें घराणें उच्च क्षत्रियांचें समजूनच आपली राज्यश्री त्यांत दिली होती. आतांच्याप्रमाणें तेव्हांचे राजेही खऱ्या क्षत्रिय घराण्यांतच आपल्या मुली देण्याचा प्रयत्न करीत असत. या संबंधांत बाणानें हर्षचरितांत म्हटलें

आहे " सत्स्वप्यन्येषु वरगुणेषु अभिजनमेवाभिरुध्यन्ते धीमन्तः–" म्हणजे वरांमध्यें अन्य कितीहि गुण असले, तरी सुज्ञ लोक त्याच्या जातकुळीचाच अधिक विचार करतात.

वलभीनंतर महत्वाचें राज्य म्हटलें म्हणजे राजपुतान्यांतील गुर्जर हें होय. त्याची राजधानी भिनमाल नांवाची होती. गुर्जरांचा त्या काळीं हाच मुख्य देश असून आतां मात्र तो बदलून गुजरात हा झाला आहे. ह्युएनत्संग म्हणतो कीं, त्या वेळचा गुर्जर राजा जातीनें क्षत्रिय असून मोठा धोरणी, शूर आणि बौद्ध धर्माचा कट्टा अभिमानी होता. सुप्रसिद्ध ज्योतिषी ब्रह्मसिद्धांतकार ब्रह्मगुप्त यानें ज्या व्याघ्रमुख नामक राजाच्या अमदानींत आपला ग्रंथ इ. स. ६२८ त लिहिला त्या व्याघ्रमुखाचा हा गुर्जरराजा पुत्र असावा. ह्युएनत्संग तेथें स. ६४१ च्या सुमारास गेला होता; म्हणजे व्याघ्रमुखाच्या मागाहून आलेला राजा ह्युएनसंगचे वेळीं तरुणच असावा. हर्षाच्या बापानें म्हणजे प्रभाकरवर्धनानें गुर्जर राजाला जिंकिलें होते असे बाणानें हर्षचरितांत म्हटलें आहे ( गुर्जर-प्रजागरः ). हर्षाच्या दिग्विजय–वर्णनांत त्यानें हा प्रांत जिंकिल्याचें जरी सांगितलेलें नाहीं, तरी तसें गृहीत धरावयास कांहीं हरकत नाहीं. तथापि त्याचें ह्युएनत्संगनें जें वर्णन केलें आहे त्यावरून सिंध किंवा काश्मीरप्रमाणें गुर्जर राज्यहि हर्षाच्या अधिराज्याखालीं नांवाचेंच असावें.

वलभीच्या दक्षिणेसहि दुसरें एक गुर्जर राज्य होतें. आज जो प्रान्त गुजरात म्हणून प्रसिद्ध आहे त्या देशांत आलेले हेच गुर्जर पहिले होत. ह्या राज्याचें नांव भरुकच्छ असून त्यांची राजधानी भरुकच्छ म्हणजे हल्लींचें भडोच ही होती. हें शहर नर्मदेच्या

उत्तर तीरीं तिच्या मुखाजवळच आहे. त्या राज्याचें मुख्य उत्पन्न समुद्रावरील व्यापाराचें असे. यावेळीं भरुकच्छाचा राजा दुसरा दद्द हा असून त्याचीं जीं दानपत्रें सांपडलीं आहेत, त्यांवरून त्याची वंशावळ समजून येते. त्याच्या वंशाला गुर्जर वंश असेंच त्यांत म्हटलें आहे. या वंशांतील राजे सूर्योपासक असून त्यावरून त्यांचा भिनमालच्या घराण्यांशीं असलेला मूळ संबंध दिसून येतो. कारण भिनमाल येथें सूर्याचें एक फार प्रसिद्ध मंदिर होतें. त्या राजाची वंशावळ अशीः–पहिला दद्द, यानें इ. स. ५२८ त भरुकच्छ येथें येऊन राज्य स्थापिलें; २ जयभट, ३ दुसरा दद्द, हा हर्ष व ह्युएनत्संग यांचा समकालीन होता. त्याचीं उपपदें जरी महासामन्तादिक आहेत, तथापि तो वस्तुतः स्वतंत्रच होता. कारण हर्षानें जेव्हां वलभीवर स्वारी केली, तेव्हां तेथील राजाला त्यानें आश्रय दिला होता. हा वलभीचा राजा म्हणजे जो पुढें हर्षाचा जांवई झाला तो ध्रुवभटच असेल; पण जर ही हर्षाची स्वारी त्याच्या अमदानींत आरंभींच झाली असेल, तर कदाचित् ध्रुवभटाचा बापहि असूं शकेल.

आतां पुढें मोलापो असें ज्याला ह्युएनत्संग म्हणतो त्या माळव्याच्या राज्याकडे आपण वळूं. "याची राजधानी नैऋत्येस मही नदीच्या कांठीं आहे. येथील लोक बुद्धिमान, शुद्ध भाषा बोलणारे आणि सुशिक्षित असे आहेत. ईशान्येकडे मगधांत व नैऋत्येकडे माळव्यांत अशा दोन ठिकाणीं विद्येला विशेष मान्यता असून माळव्यांत सद्गुणाची चहा होत असून भूतदयेला अग्रमान मिळत असतो" हें स्तुतिपर ह्युएनत्संगचे वर्णन सर्वच माळव्याला

१. विपुल-गुर्जर-नृपान्वय-प्रदीपतो इ. ( इंडियन ॲंटिक्वरी पु. ७ नं ६१

लागू आहे. कारण संस्कृत वाङ्मयांत सर्वत्रच विद्येसंबंधानें माळव्याची ख्याति पसरलेली आहे. परंतु ह्युएनत्संगचा मोलापो म्हणजे आजच्या माळव्याचा पश्चिम भाग होय. कारण त्याची राजधानी मही नदीवर सांगितली आहे; व ही नदी गुजरात व पश्चिम माळवा यांतूनच वहाते. ही राजधानी पुढें विद्येच्या व विद्वानांच्या चाहत्या परमार राजांच्या वेळीं प्रसिद्धीस आलेली धारा नगरी असण्याचा संभव आहे. ईश्वरवर्म्याच्या जोनपूरच्या लेखांत ( गुप्तांचे लेख व्हॉ. ३ लेख नं. ५१ ) धारानगरीचा उल्लेख असल्यामुळें हर्षाच्या वेळींहि ती अस्तित्वांत असावी. ही राजधानी कोणतीहि असली तरी ती मही नदीवर असल्यामुळें तो प्रांत पश्चिम माळवा होय यांत मात्र संशय नाहीं. कारण त्यापासून चंबळा नदीच्या मुळें विभागून निघालेला जो पूर्व माळवा त्याचा ह्युएनत्संगनें उज्जनी नांवाने उल्लेख केला आहे व त्याचें पुढें वर्णन यावयाचेंच आहे. या पश्चिम माळव्याचा राजा या वेळीं कोण असावा हें स्पष्ट कळत नाहीं. ह्युएनत्संग लिहितो कीं, " तो इकडे येण्यापूर्वी साठ वर्षांच्या सुमारास अद्वितीय दयाशाली असा प्रसिद्ध शिलादित्य नांवाचा राजा पश्चिम माळव्याच्या गादीवर होता असें त्या राज्याच्या दप्तरांवरून दिसून येतें. हा शिलादित्य बौद्धधर्मीय असून त्यानें आपल्या राजवाडयाजवळच एक बुद्धाचें मंदीर बांधिलें होतें. या सुंदर मंदिराचें काम कांहीं पिढया अखंड चाललें आहे " ह्युएनत्संगच्या चरित्रांत म्हटलें आहे ' शिलादित्य माशीचीदेखील प्राणिहिंसा न होईल अशी खबरदारी घेई. घोडे हत्तींना पाजावयाचें पाणी त्यांतील जंतु मरूं नयेत म्हणून गाळून घेण्यासही तो सांगत असे. कोणीहि प्राणिहत्या करूं नये असा तो कळकळीचा सर्वांना उपदेश

करी. अशा रीतीनें त्यानें पन्नास वर्षें राज्य केलें." ह्युएनत्संगाच्या म्हणण्याप्रमाणें तो इकडे येण्यापूर्वी (स. ६४०) ६० वर्षांच्या सुमारास जर शिलादित्याची पन्नास वर्षांची आमदानी संपली होती तर तो इ. स. ५३० त सिंहासनारूढ होऊन ५८० च्या सुमारास मरण पावला असला पाहिजे. म्हणून सन ६४० च्या सुमारास त्याचा नातु किंबहूना पणतूहि पश्चिम मावळ्यांत राज्य करीत असावा. हा शिलादित्य कोण याविषयीं अधिक विवेचन पुढें स्वतंत्र टिपेंत करूं.

आतां उज्जनी राजधानीवरून ज्या राज्याला उज्जनी हेंच नांव ह्युएनत्संगनें दिलें आहे त्याचा विचार करूं.हें राज्य म्हणजे प्रामुख्यानें माळव्याचेंच राज्य होय व तेंच नांव त्याला द्यावयास पाहिजे होतें; परंतु ह्युएनत्संग प्रथम पश्चिम माळव्यांत आला आणि तेथें बौद्धधर्माचें पूर्ण वर्चस्व पाहून त्यालाच त्यानें माळवा म्हटलें, व पुढें पूर्वेकडचे जे ब्राह्मणी राज्य जेथें त्याला बौद्ध धर्माचें वर्चस्व आढळलें नाहीं त्याला त्यानें उज्जनीचें राज्य म्हटलें. परंतु खरा माळवा म्हणजे उज्जनीचाच होय. जुन्या बौद्ध व ब्राह्मणी वाङ्मयांत जी उज्जनी प्रसिद्ध आहे ती हीच, यांत संशय नाहीं. कारण तिचें अशोक-कालचें वर्णन करतांना ह्युएनत्संग ह्मणतो कीं, अशोकानें त्या नगरीबाहेर आपल्या तरुण-पणीं अपराध्यांना शिक्षा करण्याकरितां एक कारागृह बांधिलें होतें. ह्युएनत्संग तेथें गेला तेव्हां तेथें ब्राह्मण राजा होता हें पूर्वी सांगितलेंच आहे. याला हर्षानें राज्यावर बसविलें असेल, किंवा ती गादी रिकामी पडली तेव्हां त्यानें ती बळकाविली व हर्षानें त्याला ती भोगूं दिली असेहि असेल. हर्षाच्या अमदानीच्या प्रारंभीं येथें राज्य करीत असलेल्या गुप्त घराण्याविषयीं पूर्वी विवे-

चन आलेंच आहे. हें माळव्याचें राज्य पाटलीपुत्र आणि अयोध्या येथील गुप्त राजांनीं इ. स. ४०० च्या सुमारास दुसऱ्या चंद्रगुप्ताचे कारकीर्दींत इकडे येऊन जिंकिलें.या चंद्रगुप्ताच्या वंशजांनीं पुढें माळवा, काठेवाड व गुजरात येथें राज्य केलें असें त्यांच्या सांपडलेल्या नाण्यांवरून दिसून येत आहे. या वंशांतील स्कन्दगुप्ताबरोबर त्याचा शेवट झाला. त्याचा हूणांनीं मोड केल्याचें प्रसिद्धच आहे. तथापि इ. ४८० ते ५०० च्या सुमारास यमुना आणि नर्मदा या नद्यांच्या मधील मुलखांत कोणी बुधगुप्त राजा राज्य करीत होता (मुंबई गॅझिटीअर मधील गुजरातचा इतिहास पा.७१) असें त्याचीं नाणीं आणि एरण येथील लेख यांवरून उघड दिसतें गुप्तांचें मुख्य साम्राज्य मोडल्यावर त्याच्या निरनिराळ्या शाखा निरनिराळ्या ठिकाणीं राज्य करूं लागल्या असल्या पाहिजेत व त्यापैकींच एक शाखा अफसड लेखांत सांगितल्याप्रमाणें उज्जनी येथें स्थापन होऊन तिचा शेवटचा राजा देवगुप्त हा राज्यवर्धनाचे हातून मारला जाऊन हर्ष त्याचें राज्य बळकावीपर्यंत, तेथें राज्य करीत होती असें म्हणावयास हरकत नाहीं. यानंतर इ.स. ६४० पर्यंत माळव्याचें हें राज्य पूर्वीं सांगितल्याप्रमाणें एका ब्राह्मण राजाकडे होतें.

गुप्तांचें प्राबल्य नष्ट होऊन यमुना नर्मदांच्या मधील मुलखांत राज्य करणारा बुधगुप्तहि जेव्हां नाहींसा झाला, तेव्हां या मुलखांत उज्जनीशिवाय आणखीहि राज्यें स्थापन झालीं. त्यांपैकीं चिचिटो ऊर्फ झजोटी व महेश्वरपूर या दोघांचा उल्लेख ह्युएनत्संगनें केला आहे. यांपैकीं झजोटी हें बुंदेलखंडांत असून त्याची राजधानी एरण येथें असावी. महेश्वरपूर म्हणजे ग्वाल्हेर असें कांहींनीं ठरविलें आहे व कांहीं त्याला नरवरहि समजतात. हीं सर्व राज्यें आपल्या राजधानीच्या नांवावरच ओळखलीं जात

असून त्यांचे राजे ब्राह्मण होते. हे बहुधा मूळचे गुप्त साम्राज्य-कालीन प्रांतिक अधिकारी असून पुढें साम्राज्याच्या लयानंतर त्यांनीं आपल्याला राजपद लावून घेतलें असावें.

येथवर हर्षाच्या साम्राज्याच्या पश्चिमेकडील राज्यांचा विचार झाला. पुनः थोडक्यांत सांगावयाचें तर तीं राज्यें काबूल, काश्मीर, टेक्का ( पंजाब ), सिंध, वलभी, गुर्जर, भडोच, माळवा, उज्जनी, बुंदेलखंड आणि ग्वाल्हेर हीं होत. यांपैकीं काश्मिरांत दुर्लभवर्धन आणि सिंधप्रांतांत दुसरा साहसीराय हे राज्य करीत होते. वल्लभी येथें उच्च क्षत्रिय जातीचा ध्रुवभट नांवाचा राजा असून तो हर्षाचा जांवई होता. उत्तर गुर्जर ऊर्फ रजपुताना आणि दक्षिण गुर्जर ऊर्फ भडोच येथें व्याघ्रमुखाचा पुत्र आणि दुसरा दद्द या नांवाचे क्षत्रिय राजे अनुक्रमें राज्य करीत होते. आज मध्यहिंदुस्थान म्हणून इंग्रजी राज्यांत प्रसिद्ध असलेल्या प्रांतांत उज्जनी, झजोटी व महेश्वरपुर (ग्वाल्हेर अथवा नरवर) येथें ब्राह्मण राजे होते. हीं सर्व राज्यें हर्षाच्या साम्राज्यांत बहुधा मोडत असून वलभी आणि भडोच हीं निःसंशय तशीं होतीं व गुर्जर, सिंध, काश्मीर आणि टेक्का हीं नांवाला मात्र होतीं. मोलापो हेंहि खरोखरी हर्षाच्या अमलाखालीं असून तेथें शिलादित्याचा नातू राज्य करीत होता. हा शिलादित्य कोण होता हें अद्यापि निश्चित झालेलें नाहीं, तथापि बहुतांशी तो हूणांना पादाक्रान्त करणाऱ्या यशोधर्म विक्रमादित्याचा पुत्र असावा हें पुढील टिपणी-वरून दिसून येईल.

---

१ यांपैकीं चिचिटोचा राजा एका ताम्र लेखांत (कार्पस इन्स्क्रिम० ए.३० नं. २५ ) आलेल्या परिव्राजक कुळांतील संक्षोभनामक ब्राह्मण राजाचा वंशज, अथवा एरण येथें ज्याचा लेख सांपडला आहे या ध्यानविष्णूचा वंशज असावा.

आतां मध्यदेशांतील राज्यांच्या वर्णनाकडे वळण्यापूर्वी ह्युएन-त्संगनें न पाहिलेल्या एका छोटया राज्याकडे येथें थोडी दृष्टी दिली पाहिजे; कारण त्याच्या राजांनीं पुढें ८ व्या शतकांत मेवाड यथें आपली गादी स्थापिली व त्याचें घराणें अलीकडील इतिहासांत शौर्य आणि रजपुती बाणा यांबद्दल फार प्रसिद्ध आहे. हें राज्य ह्मणजे मेवाडच्या आग्नेयीस असलेलें ईडरचें संस्थान होय. सहाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास वलभी येथील क्षत्रिय घराण्यांतील गुहादित्यानें याची स्थापना केली. या गुहादित्याच्या वंशजांना घेलोट ( गोहिलपुत्र–गोहिलउत्त गेहलोट ) असें ह्मणत, पण पुढें त्यांनीं आपल्याला शिसोदे असें नांव घेतलें व मेवाडच्या रजपूत राजांना अलीकडे हेंच नांव चालू आहे. यावेळीं म्हणजे इ. ६४० च्या सुमारास या संस्थानाचा राजा नागादित्य शिलादित्य ह्या नांवाचा असून इ. स. ६४६ तील एका ताम्रलेखांत त्याचा उल्लेख आला आहे ( रजपुताना गॅझिटीअर, मेवाड एजन्सी पु.). याच वंशांत बाप्पा रावळ हा उत्पन्न होऊन त्यानें आठव्या शतकाच्या आरंभीं चितोड काबिज करून मेवाडच्या रजपूत घराण्याची स्थापना केली, त्याचें वर्णन पुढें येणार आहे. पण हा जो मेवाडच्या घराण्याचा संबंध वलभीच्या क्षत्रिय घराण्याशीं मानला गेला आहे, त्याविषयीं पुष्कळ इतिहासलेखकांना संशय वाटतो. परंतु त्यांत अविश्वासार्ह असें काय आहे हें आह्मांला समजत नाहीं. खरें पाहिलें असतां परंपरागत कुलकथांत जर कांहीं असंभवनीय गोष्ट असेल तर वेगळें, पण एरवीं त्यांना असत्य मानण्याला आधार काय ? बाप्पारावळचा काळ आठव्या शतकांत असल्यामुळें साहाव्या शतकांतील वल्लभी घराण्यांतून त्याचा वंश निघाला असण्यांत सकृद्दर्शनीं तरी कांहीं हरकत दिसत नाहीं.

आतां मध्यदेश ह्मणजे आज ज्याला संयुक्त प्रांत ह्मणतात त्यांतील राज्यांचा विचार करूं. गंगायमुनांचें खोरें हें प्राचीन काळापासून भारतीयआर्यसुधारणेचें केन्द्र बनून गेलेलें आहे. भारतीय आर्यांचा मानसिक आणि शारीरिक विकास येथेंच झाला आणि येथूनच त्यांनीं भरतखंडाच्या उत्तर भागावर म्हणजे ज्याला हल्लीं सामान्यतः हिंदुस्तान म्हणतात त्यावर आपलें वर्चस्व स्थापिलें. या प्रदेशाला पूर्वकाळीं मध्यदेश ह्मणत असून महाभारताच्या सभापर्वांत श्रीकृष्णानें त्याविषयीं बोलतांना असें ह्मटलें आहे कीं, 'यांतून जरासंधानें घालवून दिल्यामुळें यादवांनीं अत्यन्त वाईट वाटून ते येथें परत येण्यासाठीं सारखे झुरत आहेत,' या मध्यदेशाला ह्युएनत्संगानेंहि मध्यदेशच म्हटलें असून वराहमिहिरानेंहि त्याला ( मनुप्रमाणेंच ) हिन्दुस्थानचा मध्य कल्पिलें आहे. त्याकाळीं या प्रदेशाचें हवामान विशेषेंकरून कोरडें व त्यामुळें फारच निरोगी होतें. अलीकडे गंगा व यमुना या नद्यांपासून काढिलेलें कितीतरी कालवे या प्रदेशांतून जात असल्यामुळें जरी त्याचा सुपीकपणा वाढून त्याला दुष्काळाची भीति राहिलेली नाहीं, तरी त्यामुळें तेथें हवा दमट झाल्यामुळें तेथील पूर्वींचा निरोगीपणा नाहींसा झाला आहे. हा प्रदेश आतांच्याप्रमाणेंच तेव्हांही फार सुपीक होता. म्हणून पूर्वकाळीं एवढ्याशा लहान प्रदेशांत अनेक राज्यें स्थापन होऊन महत्वास पोंचली. या वेळचीं तेथील प्रमुख राज्यें म्हणजे ठाणेश्वर[1] व कनोज[2] हीं असून

१ स्थानेश्वर म्हणजे श्रीकण्ठ हें दिल्लीच्या उत्तरेस जवळच कुरुक्षेत्रांत आहे येथील सांबाचें स्थान व स्वमन्तपंचकतीर्थ प्रसिद्ध आहे.

२ कनोज हल्लीं संयुक्त प्रांताच्या फरुकाबाद जिल्ह्यांतील एक लहानशा तहशीलीचें म्हणजे तालुक्याचें ठाणें होऊन राहिलें आहे. त्याच्या पूर्वकालीन मोठेपणाची साक्ष मोठमोठ्या पडक्या राशीशिवाय आज कांहींच राहिलेली नाहीं.

दोन्ही हर्षाच्याच अमलाखालीं होतीं. वस्तुतः पूर्वींचीं जीं कुरु आणि पांचाल राज्यें तींच हीं असून जयमेजयाच्या अमलाखालीं जशीं तीं एकत्र झालीं होतीं, तशीं आंतां पुनः तीं हर्षाच्या अमदानींत एक झालीं. या एकीमुळें त्याचें बल एवढें झालें कीं, जनमेजयाप्रमाणें हर्षालाही उत्तरेचा सार्वभौम होण्यास फारसे प्रयास पडले नाहींत. सार्वभौमपद प्राप्त झाल्यावर हर्ष कनोजला राहूं लागल्यामुळें पुढें तेंच शहर महत्वाला पोंचून हिंदुस्थानची राजधानी या पदवीला चढलें. या पुस्तकांत ज्या काळाच्या इतिहासाचा आम्ही विचार करीत आहों, त्या सर्व काळांत कनोजचें हें मोठेपण टिकून राहिलें होतें. पूर्वींच ईशान, शर्व आणि अवन्तिवर्मा यांच्या अमदानींत तें भरभराटीस आलें होतें व त्यांच्या अमलाखालीं सहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत गंगेच्या खोऱ्यांतील पूर्वेकडील प्रदेश आलेले होते व पश्चिमभाग ठाणेश्वराच्या आधिपत्याखालीं आलेला होता.हर्षाच्या साम्राज्यांत ठाणेश्वर आणि कनोजचें एकीकरण झाल्यामुळें पूर्वीं मगधांतील पाटलीपुत्राला उत्तर हिंदुस्थानची राजधानी म्हणून जें महत्व होतें तें लयाला जाऊन कनोजनें तें पटकावि्लें. ह्युएनत्संगाचा वेळीं पाटलीपुत्र मोडकळीस येऊन बहुतेक नामशेष झालें होतें. तें हिंदुस्थानच्या रंगभूमीवरील आपलें काम करून आतां अन्तर्धान पावलें होतें. हिंदुस्थानच्या राजधानीचें महत्व त्या शहरास मौर्य चंद्रगुप्तानें मिळवून दिलें असून अशोकानें त्याला चिरस्थाई केलें होतें. गुप्तांपर्यंतच्या पुढील राजघराण्यापर्यंतही त्याचा राजधानी म्हणून आदर होत आलेला होता; परंतु जेव्हां गुप्तानीं थोडा थारेपालट म्हणून अयोध्येचा आश्रय केला तेव्हां प्रथम त्याच्या उतरत्या कळेला सुरवात झाली; आणि ८०० वर्षें म्हणजे चंद्रगुप्तापासून इ. स. ५०० पर्यंत

आपल्या बहुमानाचा उपभोग घेतल्यावर हर्षाच्या काळीं त्यानें तो अधिकार कनोजच्या स्वाधीन केला. कनोजला याप्रमाणें मिळालेलें महत्व हिंदुस्थानच्या मध्ययुगीन इतिहासाचा काळ असें ज्याला म्हणतां येईल त्या काळाच्या अखेरपर्यंत राहिलें. यावेळीं दिल्ली तर लहानसें खेडें होतें. भारतीय इतिहासाच्या आरंभीं पांडवांच्या वेळीं तें एकदां क्षणभर चमकून जें अन्तर्धान पावलें तें पुनः इ. स. च्या ९ व्या शतकांत पांडवांशीं आपली पीठिका जोडणारा जो अनंगपाळ त्याच्या आमदानींत डोकें वर काढूं लागलें. तथापि १२ व्या शतकापर्यंत कनोजच्या मानानें तें अगदींच गौण होतें. त्यावेळींमात्र पृथ्विराजानें जयचंदाचा पराभव केल्यावर कनोजच्यावर त्याची कडी चढली. पुढें पृथ्वीराजाचा मुसलमानानीं जेव्हां पुरा मोड केला तेव्हां त्यांनीं आपली राजधानी दिल्लीसच केली; आणि तेव्हांपासून तहत आजपावेतों तें शहर भरतखंडाची राजधानी म्हणून गाजत आहे.

भरतखंडांतील राजकारणाच्या गुरुत्वाचा मध्य गंगेच्या खोऱ्यांतून पूर्वेकडून पश्चिमेकडे ढकलत ढकलत पाटलिपुत्राकडून कनोजच्या मार्गानें दिल्लीपर्यंत येऊन पोंचल्याचें हें जें वर त्रोटकवर्णन दिलें आहे तें वाटेल मनोरंजक आहे. इ. स. ६०० पासून १२०० पर्यंतच्या काळांत कनोज शहर हिंदुस्थानचें राजकीय केन्द्र होतें, ही गोष्ट अरब इतिहासकारांनीहि नमूद करून ठेविली आहे. जेव्हां जेव्हां त्यांना हिंदुस्थानच्या राजधानीविषयीं कांहीं सांगावयाचें असतें तेव्हां तेव्हां तें कनोजचेंच नांव घेतात. या ६०० वर्षांत हर्षाच्या साम्राज्याचें तेजोवलय त्या नगरावर फिरत असल्यामुळें त्याच्या पश्चात् झालेल्या प्रत्येक सार्वभौम सत्ताधाऱ्याला त्याच ठिकाणीं आपलें घराणें स्थापन करावें असें वाटे. यापूर्वी, सार्वभौम पदाकांक्षी राजांची दृष्टि पाटलीपुत्रावर असे, व यानंतर मुसलमानी

अमदानीपासून ती दिल्लीवर वळूं लागली. १२ व्या शतकापर्यंत कनोजचें ऐश्वर्य व संपत्तिही त्याच्या राजधानी पदाला शोभेलशा प्रमाणांत सारखीं वाढतच गेली. गझनीच्या महमदाच्यावेळीं तर तीं कळसास पोंचली होतीं. महमदानें खुद्द तेथील स्फटिकाचे ( संगमरवरी दगडाचे ) राजवाडे व मंदिरें पाहून त्याचा अद्वितीयपणा कबूल केला आहे. ह्युएनत्संगच्या वेळींसुद्धां तें बऱ्याच मोठेपणाला पोंचलें असून तें पांच मैल लांब व एक मैल रुंद, मजबूत तटबंदीचें आणि उंच उंच प्रकारांनीं युक्त होतें असें त्यानें म्हटलें आहे. त्यांत ठिकठिकाणीं रम्य उपवनें आणि स्वच्छ पाण्याच्या टांक्या असून देशोदेशींच्या अद्भुत पदार्थांचीं संग्रहालयेहीं होतीं. कनोज शहर आठव्या शतकांत इतकें विभवसंपन्न असून दुर्भेद्य होऊन गेलें होतें कीं, अशक्य गोष्ट साध्य करण्याचा प्रयत्न करणाराविषयीं 'तुला कनोज पाहिजे आहे' असा म्हणी दाखल प्रयोग चच नाम्यांत केला आहे !!!

अशा या भव्य शहरामध्यें बाण आणि ह्युएनत्संग या दोघांचाहि आश्रयदाता चक्रवर्ती हर्ष राज्य करीत होता. ठाणेश्वर म्हणजे ज्याला बाणानें श्रीकंठ म्हटलें आहे तें आणि कनोज हीं दोन्हीं राज्यें हर्षाच्या हातांतच होतीं. याखेरीज गंगाखोऱ्यांतील दुसऱ्या बऱ्याच राज्यांचीं नावें ह्युएनत्संगनें सांगितलीं असून तीं बहुतेक हर्षाच्या प्रत्यक्ष अमलाखालींच असलीं पाहिजेत. तथापि पारियात्र ऊर्फ हल्लींचें अलवार, तसेंच स्त्रुघ्न म्हणजे हल्लींचें हरद्वार हीं वैश्यराजांच्या ताब्यांत असून, मतिपुर व ब्रह्मपुर म्हणजे हल्लींचें गऱ्हवाल येथें शूद्रराजे राज्य करीत होते. अहिछत्र, पिलोशन, संकाश्य, अयोध्या, अलाहाबाद ( प्रयाग ) आणि कौशाम्बी

ते प्रान्त हर्षाच्या प्रत्यक्ष राज्यांतच मोडत असावे. हिमालयाच्या पायथ्याच्या बाजूनें श्रावस्ती, कपिलवस्तु, रामग्राम, कुशीनगर इत्यादि लहान लहान राज्यें लहान लहान राजांच्या अमलाखालीं होतीं. हीं बहुतेक ठिकाणें बौद्धधर्मीयक्षेत्रें असल्यामुळें तेथें कांहीं लोक तरी जात येत असत. एरवीं म्हटलें तर हा प्रदेश बहुतेक निर्जनच होता. हिंदुस्थानच्या बऱ्याच सुपीक व सपाट भागावर प्राचीन काळीं दाट जंगलें होतीं व तीं अलीकडे ब्रिटिश राज्यांतच तुटलीं गेलीं आहेत. पूर्वकाळीं सुधारणा आणि वैभव यांचा ओघ गंगा-यमुनांच्या तीरानेंच वळत असे आणि इतर दूरच्या ठिकाणीं हत्तीनीं भरलेलीं अरण्येंच असत. निरनिराळ्या राज्यांमध्यें नेहमीं शत्रुत्व चालू असून लढाया होत व त्यामुळें फाजील लोकसंख्या कधींच वाढत नसे. तसेंच दळणवळणाच्या साधनांच्या अभावीं येथें उत्पन्न होणाऱ्या धान्याची बाहेर होणारी निर्गतहि शून्यच असे. त्यामुळें अधिकाधिक जमीन लागवडीस आणण्याची आवश्यकताच उत्पन्न न झाल्यामुळें हर्षाच्या साम्राज्याच्या दोन्ही सरहद्दींवर उत्तरेकडे हिमालयाचीं अरण्यें व दक्षिणेकडे विंध्याद्रीचीं अरण्यें विस्तारलीं असल्यास नवल नाहीं. या जंगलांतून त्यावेळीं युद्धमान राजांना उपयोगीं पडणारे हत्ती मात्र लागतील तितके पैदा होत. म्हणून तत्कालीन या देशस्थितीचा विचार करतां एका हर्षाच्या सैन्यांत ६०००० हत्ती होते व त्या मानानें इतर राजांच्याहि पदरीं अशींच मोठमोठीं हत्तींचीं दळें होतीं याविषयीं आश्चर्य वाटावयास नको.

आतां वर वर्णन केलेल्या मध्य देशाच्या पूर्वेकडील म्हणजे आजमितीस ज्या प्रान्तांत बहार आणि बंगाल यांचा समावेश होतो त्या प्रांतांतील राज्यांचें वर्णन करूं. त्यांत पहिलें राज्य मगधाचें होय. ह्युएनत्संग तेथें जाण्यापूर्वीं पूर्णवर्मा नांवाचा राजा

राज्य करीत होता; तो अशोकाचा वंशज असून त्यानें कर्णसुवर्णा (बंगाल)चा राजा जो शशांक त्यानें पाडून टाकिलेला बोधिवृक्षाचा पार पुनः बांधून काढिला होता असें त्यानें नमूद केलें आहे. मगध हें बौद्धधर्माचें मुख्य क्षेत्र असून त्यांत बोधिवृक्ष व बुद्धाचें पाऊल उमटलेली शिला होती. त्याशिवाय बौद्धधर्मीय विद्येचें मुख्यपीठ जो नालन्दाविहार तोहि या मगध देशांतच होता. मगधाच्या पलीकडे हिरण्यपर्वत ऊर्फ हल्लींचें मोंगीर, चंपा ऊर्फ भागलपूर, कजुगल ऊर्फ राजमहाल, व पौंड्रवर्धन ऊर्फ रंगपूर हीं राज्यें होतीं. या राज्यांच्या राजांविषयीं ह्युएनत्संगानें कांहीं सांगितलें नाहीं. त्यांच्या पलीकडे कामरूप म्हणजे आसाम देश असून त्याचा राजा यावेळीं भास्करवर्मा हा होता; व त्यालाच कुमारराज असें दुसरें नांव होतें. तो हर्षाचा सहकारी मित्र प्रथमपासूनच झाला होता हें पूर्वी सांगितलेंच आहे. याविषयीं मौजेची गोष्ट अशी आहे कीं, या कुमारराजासंबंधानें बाण व ह्युएनत्संग या समकालीन लेखकांनीं लिहून ठेविलेलीं वर्णने अगदीं बारीकसारीक गोष्टींतदेखील तंतोतंत जुळतात. उदाहरणार्थ ह्युएनत्संगच्या लेखांत म्हटलें आहे "येथील गादीवर असलेला राजा ब्राह्मण जातीचा असून नारायण देवाचा वंशज होता. त्याला भास्करवर्मा किंवा कुमार अशीं दोन्ही नांवें होतीं. त्याच्या वंशाकडे कामरूपाचें राज्य १००० पिढ्यांपासून चालत आलें होतें. कुमारराजा विद्येचा मोठा भोक्ता असे. बुद्धिमान लोक विद्याभ्यास करण्यासाठीं दूर दूर ठिकाणांहून येथें येत. हा राजा जरी स्वतः बौद्ध नव्हता तरी तो विद्वान् बौद्ध श्रमणांना फार मानीत असे." आतां हर्षचरितांत बाण काय लिहितो पहा—'महावराहसंपर्कसंभृतगर्भाया भगवत्या भुवो नरको नाम सूनुः। तस्यान्वये भगदत्त पुष्पदत्त वज्रदत्तप्रभृतिषु व्यतीतेषु बहुषु महीपालेषु प्रणैत्रो भूति-

वर्मणः पौत्रो चंद्रमुखवर्मणः पुत्रो स्थितवर्मणः सुस्थितवर्मा नाम महाराजाधिराजो जज्ञे । तस्यच भास्करवर्मा नाम तनयः कुमारः समभवत् । ' हीं वर्मान्त नांवें जरी क्षत्रियांचींशीं वाटतात, तरी ह्युएनत्संगानें त्यांना ब्राह्मण म्हटलें आहे तेंहि खरें धरावयास हरकत नाहीं. क्षत्रियांचा धंदा स्वीकारणारे ब्राह्मण क्षत्रिय नांवें धारण करीत व वैश्यांचा धंदा उचलणारे वैश्य नांवेंही घेत असें आढळून येतें. आसामची विद्येविषयींची ख्याति पुढेंही कांहीं शतकें म्हणजे शंकराचार्यांच्या काळापर्यंत टिकलेली होती. भास्करवर्म्याच्या मूळपिठिकेविषयीं जी दंतकथा दिली आहे ती अर्थातच ऐतिहासिक समजावयाची नाहीं; तथापि ते घराणें अनेक पिढ्या अविछिन्न चाललें होतें असें जें दोघांनीहि म्हटलें तें मात्र सत्य असावें. कारण तो देश अगदींच एकीकडे कोपऱ्यांत असल्यामुळें महत्वाकांक्षी वीरांच्या झटकन नजरेंत भरण्यासारखा नव्हता. असो. पूर्वी जसा या कुमारराजाचा अनेकवार उल्लेख केला आहे, तसा पुढेंहि करावा लागणारच आहे.

आतां खुद्द बंगाल्यांत जीं तीन राज्यें होतीं त्यांच्याकड वळं. हीं राज्यें म्हणजे कर्णसुवर्ण ( मुर्शिदाबाद ), समतट (पूर्वबंगाल) आणि ताम्रलिप्ति ( मिदनापूर ) हीं होत. ह्युएनत्संगाच्या वेळींहि या राज्यांची चांगली भरभराट असे. ह्युएनत्संगच्या येण्यापूर्वी कर्णसुवर्णाचा राजा शशांक ऊर्फ नरेन्द्रगुप्त हा होता. राज्यवर्धनाचा कपटानें घात करणारा व बौद्धधर्मीयांचा छळ करणारा म्हणून त्याचा पूर्वी उल्लेख केलाच आहे. इ. स. ६१९ तील गंजमयेथील लेखावरून त्या वर्षी तो राज्य करीत असल्याचें दिसत असल्यामुळें हर्षराजानें त्याला क्षमा करून सोडिलें असावें असें दिसतें. पण त्याच्या मरणानंतर मात्र त्याचें राज्य हर्षानें कुमार-

राजाला दिलें. कुमारराजाचा भास्करवर्मा नांवाखालील जो एक ताम्रलेख १९१३च्या डाक्कारिव्ह्यूच्या एका अंकांत छापिलेला आहे, त्यावर वर्ष नमूद केलेलें नाहीं, पण त्याचें स्थान मात्र कर्णसुवर्णच म्हटलें आहे, यावरून वरील तर्क खरा असला पाहिजे. ह्युएनत्संगाच्या वेळीं येथें राजा कोण होता तो त्यानें सांगितला नाहीं; परंतु बाणाचें विधान व वर सांगितलेला ताम्रलेख यांची सांगड घालतां हर्षानें शशांकाच्या मागून कुमाराला त्याच्या गादीवर बसविलें, असें म्हणावयास बराच आधार मिळतो. समतट ऊर्फ पूर्वबंगाल येथें एक ब्राह्मण वंश राज्य करीत असून त्यांत कोणी बडा बौद्धसाधु रहात होता, व ह्युएनत्संग त्याला भेटावयासहि गेला होता. ताम्रलिप्तीच्या राजाविषयीं कोठें कांहीं आढळत नाहीं. हीं सर्व राज्यें हर्षाचीं अंकित होतीं हें सांगावयास नकोच. यांपैकीं कोणत्याही देशाला ह्युएनत्संगानें गौड हे नांव दिलेलें नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे बाणानेंमात्र शशांकाला गौडराज म्हटलें आहे. संस्कृत वाङ्मयांमध्यें गौड हें नांव सुप्रसिद्ध असून गौडपंडितांच्या लेखांची व विचारांची धाटणी कांहीं विशिष्ट असून तिला गौडीरीति असें नेहमीं म्हणत असतात. कदाचित् गौड हें नांव वंग या अधिक प्राचीन नांवाप्रमाणेंच वरील तिन्ही राज्यांना व्यापकपणें लागत असल्यामुळें ह्युएनत्संगानें ते सांगितलें नसेल.

शेवटीं हर्षाच्या अधिराज्यांत मोडणारीं उत्तरहिंदुस्थानांतील अखेरचीं राज्यें म्हणजे ओद्र किंवा ओरिसा, व बंगालच्या उपसागराच्या किनाऱ्यावरील कोंगड ऊर्फ गंजम हीं होत. हीं भारतीय आर्याचींच राज्यें असून त्यांच्या सरहद्दी दक्षिणेच्या कलिंगाच्या द्राविडीराज्याला भिडलेल्या होत्या. कोंगडपासून दक्षिणे-

---

१ अत्र देवेन अभिषिक्तः कुमारः ।

कडे भाषेंत फरक होत गेलेला ह्युएनत्संगाच्या लक्षांत आला होता. ( आश्चर्याची गोष्ट अशीकीं, या प्रांताची भाषा द्राविडी असून लिपि मात्र उत्तरेकडील देवनागरीच होती ). हा भाषेंतील फरक कलिंग देशांत पूर्णपणें त्याला दिसून आला. तो म्हणतो ' त्यांचें बोलणें चालणें मध्यदेशांतील लोकांच्याहून अगदीं निराळें आहे.' त्यानें या दोन्ही प्रातांतील राजांचीं नांवें सांगितलेलीं नाहींत, व दुसऱ्याही कोठून तीं निश्चित समजण्यासारखीं नाहींत. कटक जिल्ह्यांतील जगन्नाथाच्या मंदिराच्या ताडपत्रावरील बखरींत ओरिसादेश ७ व्या शतकापासून १२ व्या शतकापर्यंत केसरी घराण्याच्या अमलाखालीं होता असें म्हटलें आहे. ( कटक गॅझिटीअर ), परंतु तें घराणें हर्षाच्या नंतरच बहुधा तेथें स्थापन झालें असावें.

येथें हर्षाच्या साम्राज्यांत अन्तर्भूत होणाऱ्या महत्वाच्या राज्यांची यादी खलास झाली. पूर्वी सांगितलेंच आहे कीं हर्षाच्या उत्तरेकडील साम्राज्याबरोबरच दक्षिणेंत महाराष्ट्राचा राजा दुसरा सत्याश्रय पुलकेशी यानेंही प्रबल साम्राज्य स्थापन केलें होतें व त्यांत दक्षिण हिंदुस्थानांतील सर्व राज्यांचा समावेश होत होता. हीं राज्यें देखील ह्युएनत्संगाच्या पहाण्यांत आलीं असून त्यांचें वर्णनही त्यानें केलें आहे. तीं राज्यें म्हणजे, कालिंग म्हणजे राजमहेन्द्री, कोसल ऊर्फ रायपूर, आंध्र म्हणजे वारंगळ, धनककट ऊर्फ वेंगी, चोल ऊर्फ येलूर, द्रविड ऊर्फ कांची, मलयकूट ऊर्फ मदुरा, कोकणपुर म्हणजे म्हैसूरचा कांहीं भाग व पश्चिम किनाऱ्यापैकीं

---

१ नेपाळचें राज्य हर्षानें जिंकिले होतें कीं काय याचा निर्णय होत नसल्यामुळें व ह्यूएनत्संग च्या वेळीं तें तिबेटच्या राजाला कारभार देत असल्यामुळें तें यांतून वगळलें आहे.

उत्तरेकडचा मुलूख. (याची राजधानी घांटाजवळ बनवासी ही बहुधा असावी ) आणि शेवटीं महाराष्ट्र हीं होत. महाराष्ट्राची राजधानी बदामी ही असून त्याचा राजा सत्याश्रय पुलकेशी यानें वर सांगितलेलीं सर्व राज्यें पादाक्रांत केलीं होतीं. ( ऐहोळे व दुसरे ताम्रलेख पहा ). कांची म्हणजे 'चोलसहित' द्रविड येथें पल्लव घराण्यांतील राजे राज्य करीत असून ह्युएनत्संगाच्या वेळीं त्यांतील नरसिंहवर्मा नामक राजा गादीवर होता. मलयकूट अथवा पांड्य देशांत ( मदुरा व तिनेवेल्ली ) पांड्य वंशाचें राज्य असून आसामांतील कुमाराच्या घराण्याप्रमाणेंच हाहि वंश फार प्राचीन काळापासून येथें नांदत होता. वेंगी येथें सत्याश्रय पुलकेशीचा भाऊ विष्णुवर्धन किंवा त्याचा पुत्र हा राज्य करीत होता. बनवासीच्या गादीवर कोणता राजा होता हें समजण्याला मार्ग नाहीं, तरी पण कदंब वंशांतील कोणी राजा तेथें असावा असें दिसतें. हीं सर्व राज्यें पुलकेशीच्या सार्वभौमत्वाखालीं असून तीं त्यानें इ. स. ६१० ते ६२० च्या दरम्यान जिंकिलीं होतीं. हा एक विलक्षण योगायोगच म्हणावयाचा कीं, उत्तरेकडे हर्षाचें साम्राज्य स्थापन होण्याच्याच सुमारास पुलकेशीचें साम्राज्य दक्षिणेंत स्थापन झाले व उत्तरेकडील आपल्या प्रतिस्पर्ध्याप्रमाणें तेहि सातव्या शतकाच्या मध्याच्या सुमारासच लयास गेले. कारण कांचीचा राजा नरसिंहवर्मा प्रबळ होऊन त्यानें बदामीवर स्वारी करून तिला उध्वस्त करून टाकिलें.

# टिपण्णी.

मोलापो ( माळवा ) चा राजा शिलादित्य-

या शिलादित्याचें ह्युएनत्संगानें जें वर्णन दिलें आहे त्यावरून पहातां तो इ. स. ५३० त गादीवर आला, व इ. स. ५८०त मरण पावला, म्हणजे ह्युएनत्संग तेथें इ. स. ६४० त गेला तेव्हां शिलादित्याची कारकीर्द संपून ६० वर्षें झालीं होतीं. राजतरंगिणीमध्यें माळव्याच्या एका शिला-दित्याचा उल्लेख आहे. तो विक्रमादित्याचा पुत्र असून त्याला शत्रूंनीं राज्यावरून हुसकून लाविल्यावर काश्मीरच्या दुसऱ्या प्रवरसेन राजानें त्याला पुनः गादीवर बसविलें असें त्यांत वर्णन आहे. ह्युएनत्संगाने सांगि-तलेला तोच हा शिलादित्य कीं काय ? स्टीननें म्हटलें आहे कीं कल्हणानें दिलेला काश्मीरचा इतिहास कर्कोट घराण्यापूर्वींच्या काळाविषयीं पहातां जरी विश्वसनीय नसला, तरी त्या पुढील काळासंबंधानें विश्वासार्ह आहे. हें विधान ह्युएनत्संगाच्या लेखांवरूनहि आतां खरें ठरलें आहे. कारण ह्युएन-त्संग काश्मिरांत गेला तेव्हां तेथें कर्कोट घराणें राज्याधिष्ठित होतें असें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्याच्या लेखांत म्हटलें आहे ' या राजांचें नाग रक्षण करीत असल्यामुळें ते जवळच्या राजांना तुच्छ लेखितात.' कल्हणानें दुर्लभवर्धन राजाचा जो काळ सांगितला आहे त्यावरूनही तोच ह्युएन-त्संगाच्या वेळीं गादीवर होता असें ठरतें. मागें सांगितल्याप्रमाणें कल्हणानें दिलेला त्याचा काळ लौकिक शक ३६७७ म्हणजे इ. स. ६०२ हा होय. या राजाच्या पूर्वीं प्रवरसेनापर्यंत होऊन गेलेल्या साहा राजांचीं कल्हणानें जीं नांवें दिलीं आहेत तीं अशीं:—

| नांव | लौकिकशक | कारकीर्दीचा काळ. |
|---|---|---|
| १ प्रवरसेन ( दुसरा ) | ३१८६ | ६० वर्षें |
| २ युधिष्ठिर ( दुसरा ) | ३२४६ | ३९ " |
| ३ लल्लण | ३२८८ | १३ " |
| ४ रणादित्य | ३२९९ | ३०० " |
| ५ विक्रमादित्य | ३५९७ | ४२ " |
| ६ बालादित्य | ३६४१ | ३६ " |

यावरून कल्हणाच्या मतें प्रवरसेन लौकिक शक ३१८६ म्हणजे इ. स. १११

त गादीवर आला. त्याच्या पूर्वीच्या राजाच्या मृत्यूनंतर तेथील गादी कांहीं वेळ रिकामी असल्यामुळे माळव्याच्या विक्रमादित्यानें मातृगुप्ताची स्थापना तेथें केली होती. विक्रमादित्य मेल्याबरोबर प्रवरसेनानें मातृगुप्तापासून राज्य आपल्या ताब्यांत घेतलें. यांतील विक्रमादित्य म्हणजे इ. स. पूर्वी ५७ व्या वर्षी सुरू झालेल्या विक्रमशकाचा संस्थापक होय असें कल्हणाचे म्हणणें आहे. हें खरें म्हणावें तर हा विक्रमादित्य निदान ५७+१११=१६८ वर्षें तरी राज्य करीत असला पाहिजे. परंतु हें असंभवनीय आहे हें सांगणें नकोच. याशिवाय कल्हणानें रणादित्याची कारकीर्द ३०० वर्षांची असंभवनीय सांगितली आहे तें वेगळेंच. हा कल्हणाचा सर्व घोंटाळा मातृगुप्ताला काश्मिरांत पाठविणारा विक्रमादित्य हा शककर्ता विक्रम होय असे मानिल्यामुळे झालेला आहे. हे दोन विक्रम वस्तुतः अगदी निराळे आहेत. पण कल्हणाने या मताचा निर्देश करतांना एक दंतकथा दिली आहे कीं, शककर्ता विक्रम हा प्रतापादित्य नांवाच्या काश्मीरच्या पूर्वीचा एका राजाचा संबंधी व समकालीन होता; परंतु ती दंतकथा त्याज्य म्हणून त्यानें सोडून दिली. आतां मातृगुप्ताला अधिकार देणारा विक्रमादित्य म्हणजे ज्यानें स, ५२८त हूणांना पादाक्रान्त केलें व मन्दसोर येथील स्तंभलेखांत सांगितल्याप्रमाणें उत्तर हिंदुस्थानांत साम्राज्य स्थापिलें, तो यशोवर्मा विष्णुवर्धन जर असेल तर वरील गोष्टीचा ऐतिहासिक दृष्ट्या बराच उलगडा होऊन कांहीं गोष्टींचा कालनिर्णय होईल. असें करण्यांत ह्युएनत्संगाचाहि थोडासा आधार मिळण्यासारखा आहे. तो जेव्हां काश्मिरांत गेला तेव्हां तेथील राजधानी नवीनच बांधलेली होती. या नव्या व जुन्या राजधान्यांचा त्याने स्पष्ट निर्देश केला आहे. काश्मीरची सध्यांची राजधानी श्रीनगर ही दुसऱ्या प्रवरसेनाने वसविली व तदनुसार त्या नगराला प्रवरपूर असे दुसरें नांव आहे हें निश्चित आहे. ह्युएनत्संग काश्मिरांत इ. स. ६३१ त गेला. तेव्हां श्रीनगर नवीन वसविलें असल्यामुळें त्याला शंभराहून अधिक वर्षें तेव्हांपर्यंत झालेलीं असणें शक्य नाहीं. कारण नवीन म्हणजे निदान एकदोन पिढयांच्या प्रत्यक्ष आठवणींतील असलीं पाहिजे. आतां तसे धरून हिशोब केल्यास प्रवरसेन स. ५३१ च्या सुमारास केव्हां तरी गादीवर आला असला पाहिजे असं दिसून येईल. हा

काल स. ५३३ त मन्दोसर येथें जयस्तंभ उभारणाऱ्या यशोधर्मा विक्रमादित्याच्या काळाशीं चांगला मिळतो. कल्हणानें गोनर्दीय राजाची वंशावळ व कथा जी दिली आहे ती अर्थातच सोडून दोनतीन मुख्य गोष्टीकडेसच आपल्याला लक्ष दिलें पाहिजे. त्याने म्हणजे प्रवरसेनानें काश्मीरची नवी राजधानी स. ५४० च्या सुमारास वसविली. प्रवरसेनापूर्वी काश्मीरचा कारभार पहाण्यासाठीं यशोधर्माविक्रमादित्यानें मातृगुप्ताला तेथे पाठविले होते; आणि प्रवरसेनानें पुढें विक्रमादित्याचा पुत्र जो प्रतापशील, ज्याला शिलादित्य असेंहि म्हणत, त्याला शत्रूनी बळकाविलेले राज्य परत मिळवून देण्यासाठीं साह्य केलें. * हा प्रतापशील म्हणजेच ह्युएनत्संगनें सांगितलला मोलापोचा शिलादित्य असला पाहिजे.

असें मानण्यांत एकच अडचण येते. ह्युएनत्संग म्हणतो की, हर्षाचा जांवई जो वलभीचा राजा ध्रुवभट तो या शिलादित्याचा पुतण्या ( किंवा भाचा ) होता. आतां पूर्वी सांगितल्याप्रमाणे ह्युएनत्संगाच्या म्हणण्यावरून हा शिलादित्य ५० वर्षें राज्य करून इ. स. ५८० त मृत्यु पावला असें ठरतें; त्याचा बाप विक्रमादित्य अर्थातच त्याच्या पूर्वी ५० वर्षें म्हणजे स. ५३० त मरण पावला असला पाहिजे. आतां अडचण अशी की, ५३० मेलेल्या विक्रमादित्याचा मुलाचा किंवा मुलीचा मुलगा ६४० त तरुण वयाचा कसा असूं शकेल ? ह्युएनत्संगचा शिलादित्य विक्रमादित्याच्या मुलाहून निराळा धरल्यास मात्र त्याच्या बहिणीचा वलभीचा ध्रुवभट मुलगा होऊं शकेल. एकंदरींत तात्पर्य असे की, माळव्याचा शिलादित्य म्हणजे कल्हणानें राजतरंगिणींत सांगितलेल्या विक्रमादित्याचा पुत्र प्रतापशील शिलादित्य होय असें मानण्यांत कांहीं अडचणी आहेत.

पण ते जर एकच मानतां आले ( व ध्रुवभटाचा बाप आणि शिलादित्य हे मावस भाऊ होते असें धरिल्यानें तसें मानतां येण्यासारखें आहे. ) तर पश्चिममाळव्याचा इतिहास अगदीं सुसंगत व सोपा होतो. हूणांच्या पराभव

* राजतरंगिणींतील हा श्लोक असा आहे:—( बैरिनिर्यासितं राज्यें विक्रमादित्यजं न्यधात्। राज्ये प्रतापशील स शिलादित्यपराभिधम् ॥ तरंग ७, ३२०. सहाय करून प्रवरसेनानें काश्मीरचें सिंहासन विक्रमादित्यानें नेलेलें परत आणिलें असें तरंगिणींत म्हटलें आहे.

करणाऱ्या यशोधर्म्याचा वंश त्याच्या नंतर शंभर वर्षें तरी लय न पावता माळव्यांत, राज्य करीत होता, आणि ज्या ठिकाणीं त्यानें आपला जयस्तंभ उभारिला तें मच्न्दसोरहि त्याच माळव्यांत मोडत होतें. ह्युएनत्संग येथें आला तेव्हां शिलादित्याचा नातू राज्य करीत होता. शिलादित्य कट्टा बौद्ध असून त्यानें आपल्या राजवाड्याजवळ बुद्धाचें मंदिर बांधिलें व त्याचें काम पुढें कांहीं पिढ्या अविछिन्न चाललें होतें असें या प्रवाशानें लिहून विलें आहे. या अनेक पिढ्या म्हणजे निदान तीन धरिल्या, तरी हें घराणें स. ५२८ च्या पूर्वीपासून स. ६४० पर्यंत माळव्यांत राज्यारूढ होतें असें म्हणतां येतें. शिलादित्याच्या मागून त्यानें आरंभिलेलें मन्दिर कांहीं पिढ्या-पर्यंत बांधण्याचें काम चाललें होतें या ह्युएनत्संगच्या म्हणण्यावरून सं. ६६० त कनोजच्या ग्रहवर्म्यावर स्वारी करणारा मालवराजा म्हणजे शिलादित्यच होय असें जें डॉ. होर्नेलनें कल्पिले आहे तें निःसंशय अशक्य ठरतें; तो मालवराज देवगुप्तच होता हें आम्हीं पूर्वी निश्चित केलेंच आहे.

डॉ. होर्नेल याने मोलापोचा शिलादित्य हूणांच्या बाजूचा होता असें म्हटलें आहे तेंहि ग्राह्य दिसत नाहीं. त्यानें काश्मीरच्या प्रवरसेनाचें साह्य मागितलें एवढ्यावरून होर्नेलनें ही कल्पना केली आहे. पण प्रवरसेन कांहीं हूण नव्हता. त्याचा बाप तोरमाण होता असें मानिलें तरी तोरमाण पुनः मिहिर कुलाचा मुलगा होता असें कांहीं कल्हण म्हणत नाहीं. डॉ. होर्नेल म्हणतो याप्रमाणें राजतरंगिणीवरून तसें सिद्ध होण्यासारखे नाहीं. हिरण्य या काश्मीरच्या राजाचा तोरमाण हा धाकटा भाऊ असून त्याने आपल्या नांवाचीं नाणीं पाडिल्यामुळ हिरण्यानें त्याला कैद केलें. त्यावेळीं त्याची स्त्री गरोदर होती, ती तेथून निसटून गेल्यावर पुढें तिला प्रवरसेन हा मुलगा झाला. हिरण्याच्या मरणानंतर गादीला कोणीच वारस तेथें न उरल्यामुळें माळव्याच्या विक्रमादित्यानें मातृगुप्ताला त्या जागीं नेमिलें. पुढें प्रवरसेन वयांत आल्यावर त्यानें विक्रमादित्याच्या मरणानंतर आपले राज्य पुनः मातृगुप्तापासून परत घेतलें. ही राजतरंगिणीची हकीगत खरी धरिल्यास प्रवरसेन हूण ठरत नाहीं. प्रवरसेनानें शिलादित्याला पुढें जी मदत केली व त्याचे राज्य त्याला परत मिळवून दिलें त्यांत त्याचा उद्देश निराळा होता. काश्मीरचे सिंहासन विक्रमादित्यानें पूर्वीं माळव्यांत नेलें होतें असें राजतरं-

गिणींत ( ३,३३१ ) सांगितलें आहे. तें युक्तीनें परत मिळवावें असा प्रवरसेनाचा शिलादित्याला मदत करण्यांत हेतु असल.

आतां कल्हणाची हकीगत बाजूस ठेविली तर असें म्हणतां येईल कीं, काश्मिरांत कांहीं काळ तरी हूणांचा परका अंमल चालू होता तो विक्रमादित्यानें मोडून काश्मिरच्या पूर्वघराण्यांतील कोणी वारस त्याला तेथें न आढळल्यामुळे तेथे मातृगुप्ताची त्याने योजना केली. विक्रमादित्य मृत्यु पावल्यावर प्रवरसेनानें आपला वारसा सांगून ते राज्य मातृगुप्ताजवळून घेतले. आतां वरील हकीगतींपैकी कोणतीहि खरी असली तरी तीवरून शिलादित्य हूणांच्या बाजूचा ठरत नाहीं. तो पक्का बौद्ध असल्यामुळें वाईट मनुष्य असणे शक्य नाही. त्याची राजधानी मात्र उज्जनी नव्हे. उज्जनीचा शककर्ता विक्रम व मन्दोसर येथें पश्चिम माळव्यांत आपल्या सार्वभौम पदाचा साक्षी असा जयस्तंभ उभारणारा व हूणांचा शत्रु जो विक्रमादित्य* यशोधर्मा यांचा कल्हणाने घोटाळा केला असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. पण ते निराळे असून शिलादित्य हा मन्दसोरच्या विक्रमाचा पुत्र होय.

डॉ. होर्नलच्या कल्पनांपैकीं एक मात्र ग्राह्य दिसते. तो म्हणतो की, फैजाबाद जिल्ह्यांत बियोरा येथे ईश्वरवर्मा आणि ग्रहवर्मा यांच्या नाण्यांबरोबर कांहीं हर्ष, प्रतापशील आणि शिलादित्य या नांवाचीं नाणीं सांपडलीं आहेत ( रॅायल एशिआटिक सोयायटीचे जर्नल १९०९ ) तीं यशोधर्मा आणि त्याचा पुत्र शिलादित्य यांचीं समजावीं. या कल्पनेकडे कोणाचें फारसें लक्ष गेलेले नाही, पण तिचा नीट विचार करण्यासारखा आहे. हर्ष, प्रतापशील आणि शिलादित्य हीं नांवें ठाणेश्वरच्या हर्ष व प्रतापशीलाला जशीं लागू पडतात, तशीच यशोधर्मा आणि शिलादित्यालाही लागतात. राजतरंगणींत ( ३, १२५ ) विक्रमादित्याचेंही हर्ष हें नांव सांगितले आहे व त्याचा पुत्र प्रतापशील यालाही शिलादित्य हें दुसरें नांव होतें. ( रा. त. ३, ३३० ). यांच्या नाण्यांवर ज्या वर्षांचे आंकडे आहेत तीं त्याच्या कारकीर्दीतील वर्षें असावीं असें त्याविषयीं विवेचन करतांना बर्न यानें म्हटलें आहे ( रा. ए. सोचें जर्नल १९०९ ). ठाणेश्व-

* याविषयीं ‘ शकान् विनाश्य येमादौ कार्यभारो लघूकृतः ’ ( ३,१२५ व १२८ ) असें कल्हण म्हणतो.

रच्या हर्षानें आपला नवीन शक चालू केल्यामुळें त्याचीं वर्षें त्याच्या कारकीर्दीला धरून असताल. पण त्याचा बाप जो प्रतापशील त्यानें ईशानवर्म्याप्रमाणें गुप्तशक किंवा दुसरा कांहीं शक यांचाच उपयोग करणें स्वाभाविक आहे. तो सार्वभौम नव्हता व त्यानें स्वतःला हें नांव घेतलेलेंही नाहीं. ईशानवर्म्यासारखींच त्याचीं हीं उपपदें असल्यामुळें, त्यानें आपल्या नाण्यांवर स्वतःच्या कारकीर्दीचीं वर्षें घातलीं असतील असें दिसत नाहीं शिवाय तीं वर्षें तशींच आहेत असें मानिलें तरी प्रतापशील ऊर्फ प्रभाकरवर्धन याची कारकीर्द ३१ किंवा ३३ वर्षेंपर्यंत लांबलेली दिसत नाहीं अर्थात् हे आंकडे त्याच्या कारकीर्दीतील वर्षांचे नव्हत. आणखी असें कीं, हर्षवर्धनाच्या नाण्यावर नंदीचा छाप होता. निदान त्याच्या कारकीर्दीच्या आरंभीं तरी तो होता, कारण तो ठाणेश्वराहून दिग्विजयाला निघाल्यानंतर त्यानें पहिलाच मुक्काम केला. तेथें एका पाटलानें नवीन पाडलेली मोहर जी त्याला नजर केली तीवर नंदीचा छाप होता असें बाणानें लिहिलें आहे (वृषांकांमभिनवघटितां मुद्रां समुपनिन्येबाणं ). या नाण्यांवर नंदी नसल्यानें तीं हर्षाचीं नव्हींत हें उघड आहे. तेव्हां तीं यशोधर्म विक्रमादित्य ज्याचें दुसरें नांव र्ष होतें त्याची व त्याचा पुत्र प्रतापशील याचींच मानलीं पाहिजेत. आतां यशोधर्म्यानें गुप्त शक वापरला यामुळे तो गुप्तांचा अंकित होता अथवा प्रतापशील शिलादित्य अंकित होता असें बर्न म्हणतो पण तसें मान याची अवश्यकता नाहीं, कारण कित्येक वेळां साम्राज्य नष्ट झाल्यावर पूर्व शक चालू राहतो, याचीं उदाहरणें इतिहासांत आहेत. उदाहरणार्थ अकबराचें साम्राज्य संपल्यानंतर व मराठे स्वतंत्र झाले होते तरी अकबराचा फसली सन मराठे वापरीत होते. किंबहुना इंग्रजी अमलांतहि कांहीं वर्षें फसली सन चालू होता. तसेंच नाण्यांचे स्वरूप परिचित असते तेंच स्वरूप राज्य संपल्यानंतरहि चालू राहतें. जे तीन-अंकी आकडे नाण्यांवर दिलेले आहेत ते गुप्तशकाचे मानल्यास कालदृष्ट्या कोणतीहि अडचण पडत नाहीं. तात्पर्य मोलापोचा शिलादित्य ह्युएनत्संगनें वर्णिलेला मंदसोरच्या यशोधर्म विक्रमादित्याचा पुत्र असावा आणि याचींच नाणीं सांपडलेलीं असावी असा आमचा तर्क आहे आणि इतक्यापुरतें होर्नलचें मत मान्य करण्याजोगें आहे.

## प्रकरण ४ थें.

### लोकवर्णन.

आतां पुढील काळाच्या इतिहासाकडे जाण्यापूर्वी हर्षाच्या वेळीं अनेक बाबतींत हिंदुस्थानाची कोणत्या प्रकारची स्थिति होती हें पहाणें अवश्य आहे व तसें करणें सोईचेंहि होईल. हर्षाची अमदानी खरें म्हटलें तर संपत संपत आलेल्या एका युगाचें शेवटचें उज्जल टोंकच होती. दिवा विझण्याच्या बेतांत आला म्हणजे त्याची ज्योत जशी एकदम मोठी होते व क्षणमात्र लख्ख उजेड पाडून लगेच ती नाहींशी होते, त्याप्रमाणें हर्षाच्या काळीं या देशाची स्थिति सर्वतोपरि स्पृहणीय वाटण्यासारखी होती यांत कांहीं शंका नाहीं. पण वरील दृष्टांतात सुचविल्याप्रमाणें येथील आर्यसुधारणेचे खरे भरभराटीचे दिवस यावेळीं संपले असून तिच्या मध्ययुगीन काळाला सुरुवात होत होती व त्या पुढच्या काळांत तिचा क्रमशः ऱ्हास होऊन ती नष्टप्राय झाली म्हणून हा ऱ्हास सुरू होण्याच्या सुमारास हिंदुस्थानाची एकंदर परिस्थिति कोणत्या प्रकारची होती हें पहाणें अवश्य आहे; कारण पुढील ऱ्हासाचीं बीजें त्यांत दिसून येणारीं असल्यामुळें हें पाहणें मनोवेधक होणार आहे.

या प्रकारचें आपल्या देशाचे तत्कालीन परिस्थितीचें निरीक्षण करतां येण्यास साधनें सुदैवानें विपुल असून तीं सर्वथा विश्वसनीयहि आहेत. प्रथम, सुप्रसिद्ध चिनी बौद्ध प्रवासी ह्युएन-त्संग यानें या देशांत सर्वत्र प्रवास करून सर्व परिस्थितीचें बारकाईनें निरीक्षण केलें व त्यांत आढळून आलेल्या गोष्टी सविस्तर

लिहून ठेविल्या आहेत. दुसरें साधन म्हणजे ह्युएनत्संगाचा समकालीन जो सुप्रसिद्ध विश्वसनीय गद्यलेखक बाणभट्ट त्यानें लिहिलेलें हर्षाचें चरित्र हें होय. हर्षचरिताचें मूळ सर्वच पाश्चात्य पंडितांना कळण्यासारखें नसल्यामुळें त्यांना त्याची खरी योग्यताच अजून कळलेली नाहीं. हर्षचरितांत बाणानें हर्षाची जी स्तुति केली आहे तिचा ह्युएनत्संगाच्या वर्णनाशीं विरोध दाखवून व्हिन्सेन्ट स्मिथनें तिला कंटाळवाणी व अतिशयोक्तिपूर्ण म्हटलें आहे. पण नशीब त्या बाणाचें कीं त्याची अत्युदात्त लेखनशैली व वर्णनें हुबेहुब उठवून देण्याची हातोटी हीं तरी त्यानें मान्य केली. खरें पाहिल्यास बाणाच्या वर्णनांतील निव्वळ काव्य तेवढें बाजूला ठेवून त्याचा विचार केल्यास त्याच्या हर्षचरितांत तत्कालीन देशस्थितीचें बारकाईनें निरीक्षण करून बांधलेलीं अनुमानेंच सविस्तर ग्रथित केलीं आहेत असें आढळून येतें. प्रस्तुत विषयावरील विचार निश्चित रूपानें मांडण्याची स्फूर्तिहि आम्हाला हर्षचरिताच्या वाचनानेंच झाली असून पुढें लोकस्थितीचा विचार करितांना आम्हीं त्याचाच विशेषतः आधार घेणार आहों हें येथें सांगितल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं. ह्युएनत्संगाचें प्रवासवर्णन व बाणभट्टाचे हर्षचरित या दोघांनाही शिलालेख, ताम्रलेख, नाणीं इत्यादिकांवरून मिळालेल्या माहितीमुळें पूर्ण प्रत्यंतर मिळत असून त्यांत असलेला कमीपणाहि अंशतः भरून निघालेला आहे. हीं तिन्ही साधनें एकत्र करून त्यांच्या साहाय्यानें हर्षकालीन भरतखंडाच्या स्थितीचें बऱ्याच अंशीं सविस्तर चित्र रेखाटतां येण्यासारखें झालें आहे. आतां प्रथम तत्कालीन लोकांच्या म्हणजे त्यांतील वर्ण व्यवस्था, जाति व्यवस्था, त्यांचे पेहराव, त्यांचे उद्योगधंदे इत्यादिकांच्या वर्णनाला सुरुवात करूं.

ह्युएनत्संगानें आपल्या लेखांत या देशाला शितु अथवा हिंतु (हीं नांवें उघडच अरब लोकांनीं दिलेल्या सिंध व हिंद या नांवाशीं सदृश आहेत) असें नांव आहे असें सांगून पुढें म्हटलें आहे कीं, 'त्यांत आढळून येणाऱ्या नानाविध लोकांत व जातींत ब्राह्मण हे अति शुद्ध व सर्वांना बहुमान्य असे आहेत; इतकें कीं, त्यांच्या निष्कलंक कीर्तीमुळेच त्या सर्व देशाला ब्रह्मावर्त किंवा ब्राह्मणांचा देश असें लोकसंमत नांव पडलें होतें.' (वाटर्सकृत ह्युएनत्संगाचे लेख; पु. १ पा. १४१) अति प्राचीन काळापासून सहाव्या सातव्या शतकापर्यंत ब्राह्मणांनीं आपल्या चारित्र्यामुळें व बुद्धिसामर्थ्यामुळें आपले समाजावरील वर्चस्व अबाधित ठेविलें होतें ही गोष्ट त्यांना खरोखरच अभिमानास्पद आहे; पण त्या-बरोबरच हर्षाच्यावेळीं त्यांच्याविषयीं परदेशस्थ लोकांची जी भावना होती तिच्या अगदीं उलट आज झालेली आहे ही मात्र खेदाची गोष्ट होय. सर्व देशाचें नांव त्यांच्या नांवावरून पडलें होतें व तें लोकांना मान्यही झालेलें होतें; ही परकीय लोकांची साक्ष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ब्राह्मणांच्या खालोखाल क्षत्रियांनींसुद्धां उच्च नीतिमत्ता, साधी रहाणी आणि शौर्य याविषयींची आपली ख्याति कायम ठेविली होती. ह्युएत्संगानें म्हटलें आहे (पा. १५७ सदर.) "क्षत्रिय आणि ब्राह्मण यांचें वर्तन निष्कलंक आणि अगदीं साधें असून त्यांच्यांत डामडौल फारसा नसतो व त्यांची रहाणी काट-कसरीची असे" एवंच, हिंदुस्थानांतील जातींपैकीं प्रमुख गणले गेलेले जे ब्राह्मण व क्षत्रिय सातव्या शतकांत तरी त्या प्रमुख पणाला सर्वथैव पात्र होते, यांत संशय नाहीं. ह्युएनत्संग पुढें ह्मणतो (पा. १६९ सदर) "या देशांत आनुवंशिक अशा चार भिन्न जाती आहेत. त्या आपापल्या तत्वाला न सोडतां समाधान

वृत्तीनें रहात असतात; व त्यांच्यांत धार्मिक व सामाजिक विधि यथासांग होत असतात. या जातींत क्षत्रियांचा क्रम वरून दुसरा असून त्यांत राजे लोकांचा अन्तर्भाव होतो. त्यांचें राज्य येथें पिढयानपिढ्या चाललें असून परोपकार व भूतदया हीं त्यांच्या राज्यपद्धतीचीं मुख्य तत्वें आहेत. तिसरी जात वैश्यांची म्हणजे व्यापाऱ्यांची असून ते नानाविध वस्तूंचा देशींपरदेशीं व्यापार करून द्रव्यसंचय करतात. चवथी जात म्हणजे शूद्रांची अथवा शेतकऱ्यांची होय. ते श्रम करून जमिनीची मशागत करतात व पेरणीकापणीचे वेळीं आपल्या कामांत अगदीं चूर झालेले असतात. धार्मिक विधींच्या शुद्धतेच्या मानानें या चार जाती मिसळून पुष्कळ दर्जांचे वर्ग झालेले आहेत. या लोकांत विवाह फक्त जातीजातीमध्येंच होतो; बापाकडून किंवा आई-कडून कांहीं पिढ्यापर्यंत सपिंडसंबंध असलेल्या स्त्रीपुरुषांचा विवाह होत नाहीं; आणि स्त्रिया पुनर्विवाह कधींच करीत नाहींत." असें हें सातव्या शतकाच्या पूर्वार्धांतील हिंदुस्थानांत आढळणाऱ्या जातिचतुष्टयाचें वर्णन असून तें एका परकीय पण बुद्धिमान् निरीक्षकानें येथील लोकांत अनेक वर्षें राहून, त्यांच्या भाषा शिकून व त्यांच्या चालीरीति नीट समजून घेऊन नंतर केलेलें आहे.

महाभारताच्या उपसंहारांत आम्हीं सांगितल्याप्रमाणें हिंदु-स्थानांतील जातिभेद हा मुख्यतः वंशभेद आणि वृत्तिभेद यांच्या पायावर उभारलेला आहे. या दोन्ही मौलिक गोष्टी महत्वाच्या असल्यामुळें त्यांच्याविषयीं येथें अधिक सविस्तर विचार करूं या. सांप्रत या देशांतील अनेक जातींच्या लोकांत जरी आर्यांचें येथील मूळच्या द्राविडी लोकांशीं झालेलें मिश्रण कांहींसें दिसून

येतें, तथापि त्यांतील वरचे सर्व व खालचे बरेच वर्ग बहुतांशीं आर्यच आहेत याविषयीं कांहीं आतां कोणाला शंका घेतां येणार नाहीं. त्यांचा सार्वत्रिक वंश पूर्वी आर्यच होता व हल्लींहि तो तसाच आहे. स. १९०१ सालच्या खानेसुमारींत या देशांतील निरनिराळ्या ठिकाणच्या लोकांच्या डोक्याचीं व नाकाचीं जीं मापें घेतलीं, त्यांवरून निःसंशय असें दिसून आलें कीं, पजाब व राजपुताना येथील लोक सर्वस्वीं आर्य असून संयुक्तप्रांत व मुंबई इलाखा यांतील लोकांत मात्र अंशतः द्रविड–मिश्रण आहे. येथील लोकांच्या नाकाचा ठळकपणा आणि लांबी हीं ह्युएन-त्संगाच्याहि लक्षांत आल्यावांचून राहिलीं नाहींत. तो लिहितो ( सदर पा. १५१ ) " त्याची ( हिंदुस्थानांतील लोकांचीं ) नाकें लांब असून डोळे मोठे ठसठशीत असतात. " हा ठळकपणा बाणानेंहि हर्षचरितांत स्कंदगुप्ताचें वर्णन करितांना काव्यरूपानें दर्शविला आहे. तो म्हणतो ( उल्लास ६ ) 'त्याचें नाक त्याच्या राजाच्या वंशाइतकें दीर्घ होतें' ( निजनृपवंशदीर्घं नासावंशं दधानः).* याप्रमाणे हिंदुस्थानांतील लोक निःसशय आर्य असतांना त्यांतील क्षत्रियांचें मूळ सिथियन आणि हूण लोकांशीं जोडण्याची चुकी अजूनहि पाश्चात्य पंडित पूर्वग्रहदूषित होत्साते करीत असतात याचें आश्चर्य वाटतें. धर्म व रूढि यांनीं विवाह-विषील घातलेल्या निर्बंधांमुळें या देशांत उच्चनीच अशा सर्व

* याच्या उलट अनार्यांच्या चपटया नाकाचा ही उल्लेख बाणानें केला आहे. हर्ष विन्ध्याद्री जवळ असतां त्याच्याकडे जो एक तरुण शबर व्याघ्रकेतूनें आणिला त्याला 'अवनाटनासिकम्' चिपिटाधरम्, चिकिन चिबुकम ह्मणजे बसक्या नाकाचा, जाड ओंठांचा, थबकडया हनवटीवरचा अशीं विशेषणें बाणानें दिला आहेत.

जातींची कुलशुद्धि बहुतांशीं कायम राहिलेली आहे. ह्युएनत्संगानें यात्रिषयीं असें म्हटलें आहे कीं, " हिंदु लोक जातीबाहेर विवाह करीत नाहींत व दरएक मुख्य जातींत कुलशुद्धीच्या मानानें अनेक पोटजातीहि त्यांच्यांत बनल्या आहेत." सिथियन किंवा शक व हूण यांसारख्या परदेशीय जातींचे लोक जरी येथें आले तरी त्यांची वेगळीच क्षत्रिय जात मानली जात असून त्यांचाच जुन्या खऱ्या क्षत्रियांशीं शरीरसंबंध बहुधा होत असे. शिवाय या परकीय लोकांचें संख्याबल अल्प असल्यामुळेहि ते जुन्या लोकांपासून अलग रहात व म्हणूनच त्यांचे पंजाब व राजपुताना या प्रांतांवर वारंवार हल्ले झाले असूनहि पूर्वीच्या क्षत्रियांचीं कुळें अद्यापि शुद्ध राहिलेलीं दिसून येतात.

विवाहाच्या बाबतींत इ. स. पूर्वीच्या चवथ्या शतकांतील ग्रीक लेखक मेगॅसस्थेनिस आणि पुढे इ.स.७व्या शतकांतील चिनी लेखक ह्युएनत्संग या दोघांच्या वर्णनांत एक ठळक भेद दिसून येतो हें येथें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मेगॅस्थेनिसच्या वेळीं ब्राह्मणांना खालच्या जातींतील स्त्रीशीं विवाह करतां येत होता;* ही गोष्ट मनुवचनाला धरूनच आहे. मनूनें म्हटलें आहे, " स्त्रीष्वनंतर जातासु द्विजैरुत्पादितानान्सुतान् । सदृशानेव तानाहुर्मातृदोषविगर्हितान् ।" ( म. स्मृ. १०, ६ ) म्हणजे, द्विजानें आपल्या अगदीं जवळच्या खालच्या जातीची स्त्री केल्यास होणारी संतति त्याच्याच जातीची होते." या मनुवचनाचा पुढील स्मृतिकारांनीं त्याग

* मॅक्रिंडलकृत मेगॅसस्थेनिस व अरायनचे लेख ( पा. ८६ ) " आपल्या जाती बाहेर विवाह करणें व धंदा बदलणें या गोष्टीची त्यांच्यांत मनाई आहे. पण ब्राम्हणांना मात्र त्यांच्या सद्गुणाबद्दल अपवाद समजून याविषयीं मुभा दिलेली आहे."

केलेला आहे, हें प्रसिद्धच आहे. त्यापुढील स्मृतींमध्यें हल्लीं ज्या जातीची संतति पाहणें असेल त्याच जातीची उभय मातापितरें असलीं पाहिजेत असा नियम झाला आहे. ह्युएनत्संगानें जो प्रकार पाहिला तो या नवीन स्मृतींना धरून होता. तथापि हें लक्षांत ठेंविलें पाहिजे कीं, ७ व्या शतकांत हर्षाच्या काळींहि मनुवचनानुसार होणारे विवाह सर्वथा बद झाले नव्हते. या काळींहि जातिबंधनें आज दिसतात त्याहून शिथिल असून उच्च जातीच्या पुरुषाला लगेच खालच्या जातीच्या स्त्रीशीं विवाह करून होणाऱ्या संततीला आपल्याच जातीची मानतां येत होतें. उदाहरणार्थ ह्युएन त्संगानें सांगितलें आहे कीं, हर्षाची कन्या वलभीच्या ध्रुव भटाला दिली असून हर्ष हा वैश्यजातीचा व ध्रुवभट क्षत्रिय जातीचा होता. तसेंच हर्षचरितांतहि हर्षाची बहीण राज्यश्री कनोजच्या ग्रहवर्मा मौखरीला दिली होती असें बाणानें सांगितलें आहे. आतां हर्षाच्या घराण्यांत नांवापुढें वर्धन किंवा भूति हा शब्द येत असून त्यावरून तें घराणें वैश्य होतें व मौखरींच्या नांवापुढें वर्म शब्द असल्यामुळें ते क्षत्रिय होते ( याविषयीं पुढें विवेचन यावयाचेंच आहे ). या गोष्टीचा विचार करितां हर्षाचा काळ म्हणजे ज्या काळांत जातिनिर्बंधाचा सैलपणा जात जात पुढें कांही शतकांनीं त्या अगदीं सर्वथैव परस्पर भिन्न झाल्या व एका जातीचा त्यामुळें दुसऱ्या कोणत्याहि जातीशीं शरीरसंबंध होईनासा झाला त्या काळाचा आरंभ होय असें म्हणावयास हरकत नाहीं.

एकदरींत हर्षकाळीं वर सांगितलेले अनुलोभ विवाह अगदीं बंद झालेले नव्हते. जवळ जवळच्या जातींत तर ते होत असतच, पण ब्राह्मण वैश्य, क्षत्रिय शूद्र व क्वचित् ब्राह्मण शूद्र अशाहि प्रकारें हे अनुलोभ विवाह झालेले आढळण्यांत येतात. उदाहरण, बाणानें आपल्या दोन पारशव बंधूचा उल्लेख हर्ष चरितांत केला

आहे ( भ्रातरौ पारशवौ चन्द्रसेन मातृषेणौ । उच्छ्वास १ ).* पारशव म्हणजे ब्राह्मण पुरुषाला शूद्रस्त्रीपासून झालेली संतति. बाणानें या बंधूना पारशव म्हटलें असून त्यावरून जरी ते पित्याच्या जातीचे नव्हते असें सुचविलें आहे तरी त्यांना बेकायदेशीर म्हटलेलें नाहीं. पण जेव्हां हे अनुलोम विवाह निकटच्या जातींत होत, तेव्हां त्यांची संतती पित्याच्याच जातीची मानिली जाई; म्हणजे ब्राह्मणाला क्षत्रिय स्त्रीपासून झालेली संतति ब्राह्मण, क्षत्रियाला वैश्य स्त्रीपासून झालेली संतति क्षत्रिय असेंच समजत असत. कारण हर्षाच्या कन्येच्या पुत्रांना म्हणजे ध्रुवभट या क्षत्रियाच्या पुत्रांना क्षत्रियांहूनहि कमी असें कोणी मानिलें नाहीं. याविषयीं ताम्रपटादिलेखांतून पुष्कळ प्रमाणें मिळण्यासारखीं असून त्यांवरून त्याकाळीं ब्राह्मण खरोखरच क्षत्रियस्त्रीशीं किंबहुना वैश्यस्त्रीशींहि विवाह करीत व त्यायोगें त्यांच्या जातिवर्चस्वालाहि कधीं बाध येत नव्हता असें दिसून येते.+

---

* ब्राह्मणाद्वैश्यकन्यायामम्बष्ठो नाम जायते । निषादः शूद्रकन्यायां यः पारशव उच्यते ॥ म. स्मृ. १०,८.

\+ मन्दसोर येथील शिलालेखावरून असें दिसतें कीं ( कॉर्पस् इन्स्क्रिपशनम् इंडिकॅरम्. पु. ३ पा. १५२-३-४ ) रविकीर्ति नांवाच्या ब्राह्मणानें भानुगुप्ता नांवाच्या वैश्य स्त्रीशीं विवाह केला. तिजपासून त्याला जे तीन पुत्र झाले त्यांतील एक अभयदत्त हा यशोधर्माच्या साम्राज्यांत नर्मदा प्रांताचा सुभेदार होता. डॉ. फ्लीट यानें याविषयीं आणखी असें लिहिलें आहे कीं “वाकाटकच्या देवसेन महाराजाचा मंत्री जो हस्तिभोज त्याच्या लाडकची येथील लेण्यांतील शिला लेखांत असलेल्या अनुलोम विवाहाचें उदाहरण सांपडतें. त्यांत म्हटलें आहे ‘ सोम नांवाचा ब्राह्मण हस्तिभोजाचा जन्मास मूळ पुरुष असून त्यानें वेदाज्ञा व रूढि यांना अनुसरून एका क्षत्रिय स्त्रीशीं विवाह केला व त्यापासून झालेल्या वंशांत पुढें हस्तिभोज जन्मास आला. ऑर्किऑलॉजिकल सर्व्हे आफ वेस्टर्न इंडिया पु. ४. पा. १४० )

येथवर वंशदृष्ट्या जातींचा विचार करून असें दाखविलें कीं, हर्षाच्या काळीं अनुलोम विवाह जरी होत होते, तरी क्रमशः त्यांचा प्रघात बंद होत होता व जे थोडे विवाह अशा प्रकारें होत ते बहुधा पहिल्या आर्य त्रैवर्णिकांतच होत असल्यामुळे आर्य वंशाची शुद्धि कांहीं एकंदरींत त्यामुळें कमी झाली नाहीं. आतां यापुढें धंद्या निमित्त जो जातीजातींत भेद उत्पन्न झाला त्याचा विचार करूं. त्यांत प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं, त्यावेळींहि ब्राह्मण व क्षत्रिय या दोन वर्णांचे धंदे मनूच्या कालांतील त्यांच्या धंद्याप्रमाणेंच असून वैश्यांच्या वृत्तीला मात्र निर्बंध पडला होता. ख्रिस्ती शकापूर्वी प्राधान्यें करून वैश्य म्हणजे शेतकरी व व्यापारी होते. पण आतां त्यांचा मुख्य धंदा व्यापार झाला होता. 'कृषिगोरक्ष्य वाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्' । असें जे भगवद्गीतेंत ह्मटलें आहे (१८,४४) त्यांपैकीं कृषि ह्मणजे शेती व गोरक्ष्य ह्मणजे गवळीपणा हे धंदे वैश्यांकडून निघून हर्षकाळीं शूद्रांकडे आले होते. ह्युएनत्संगानें स्पष्टच सांगितलें आहे कीं, ' व्यापार एवढाच धंदा वैश्यांचा असून शेतकी हा विषय शूद्रांचा आहे ' याचा परिणाम असा झाला कीं, हिंदुस्थानांतील बऱ्याच शेतकरी वर्गांचा मूळ वर्ण वैश्य असूनहि त्यांची कनिष्ठ जातीच्या शूद्रवर्गांत गणना होऊं लागली. पंजाब व राजपुताना येथील कनिष्ठ जाती देखील स्पष्टपणें आर्यवंशीय आहेत या गोष्टीवरूनहि असें सिद्ध होतें कीं, हर्षकाळीं किंबहुना आजही ज्या बऱ्याच लोकांची शूद्रांत गणना होते ते वास्तविक मूळचे आर्यच होत. धंद्याच्या भेदावरून जातिनामावर असा विशेष अनिष्ट परिणाम झाला असे लोक ह्मटले पाहिजे पंजाब व सिंध येथील जाट लोक होत. त्याच्या खालोखाल गुर्जर लोकांवर देखील असाच परिणाम झाला आहे;

व आपल्या महाराष्ट्रांत तर मराठ्यांवर तो फार झालेला आहे. यांपैकीं जाट लोक मूळ आर्यवंशीय आहेत हें अगदीं स्पष्ट असून कोणाला तें नाकबूल करतां येण्यासारखें नाहीं. मुजफरनगर गॅझिटीअर मध्यें त्यांच्याविषयीं असें म्हटलें आहे कीं, 'शरीर-रचनेवरून जर कांहीं अनुमान काढतां येणार असेल, तर जाट लोक मूळचे आर्यवंशीयच होत'. त्यांचा वर्ण गौर, शरीराची काठी उंच आणि मस्तक व नाकहीं लांब असल्यामुळें सर हर्बर्ट रिस्ले यानें १९०१ सालच्या खानेसुमारीच्या इतिवृत्तांत ते आर्य आहेत असें कबूल केलें आहे. हें असें असूनहि इतिहासकार त्यांना सिथिअन वंशांत ढकलतात याचें आश्चर्य वाटतें. गुर्जर लोकांचा वर्ण जरी काळसर असला तरी त्यांच्या शरीररचनेवरून पहातां तेहि जाटांप्रमाणें आर्यच दिसतात. महाराष्ट्रांत थोडें फार द्रविडवंशमिश्रण झालेलें असल्यामुळें मराठ्यांचीं नाकें जरी इतकीं ठळकपणें आर्यनमुन्यांची नाहींत तरी प्राधान्येंकरून त्यांचें स्वरूप आर्यवंशीयच आहे. तथापि हिंदी काय व पाश्चात्य काय दोन्ही प्रकारच्या पंडितांनीं त्यांना दुर्दैवानें त्यांस आर्येतर म्हणून गणिलें आहे. या लोकांचा धंदा शेती व गोरक्ष्य असून त्यांच्यांत विधवाविवाहाची* रूढि असल्यामुळें या तिन्ही गोष्टींच्या सर्वथा विरुद्ध ग्रह असलेल्या आमच्या शास्त्र्यांनीं त्यांना शूद्रवर्गांत ढकललें आहे. तसेंच पाश्चात्य पंडितांनीं त्याचें मूळ सिथिअन वंशाशीं

* हिंदुस्थानांतील स्त्रिया पुनर्विवाह करीत नाहींत असें जें ह्युएनत्संगानें लिहिलें आहे, तें उघडच पहिल्या तीन वर्णासंबंधानें होय. त्याच्या वेळींहि शूद्रांमध्यें स्त्रियांचे पुनःविवाह होत असत यांत शंका नाहीं. जाट, मराठे इत्यादि लोकांमध्यें जो हा प्रघात हल्लीं दिसून येतो, तो त्यांना शूद्र हें अभिधान प्राप्त झाल्यानंतर इतर शूद्रांच्या नित्यसंसर्गानें त्यांनीं उचललेला असण्याचाहि संभव आहे.

जोडिलें आहे; कां तर येथील उष्ण हवेंत फार दिवस राहिलेल्या लोकांत जाट, मराठे इत्यादि लोकांनीं अर्वाचीन काळीं दाखविल्या-प्रमाणें खडतर क्षात्रतेज असणें संभवनीय नाहीं, असलें तेज थंड हवेंतून नवीन आलेल्या सिथिअनवंशीय हूणादिलोकांतच असणें शक्य आहे असा त्यांनीं आपला एकदांचा ग्रह करून घेतला आहे. पण त्यांनीं कांहीं म्हटलें तरी जाट व गुजर अगदीं स्पष्ट-पणें आणि मराठे त्यांहून जरा कमी प्रमाणानें आर्यवंशीय आहेत हें शास्त्रीयरीत्या सिद्ध आहे, म्हणून त्यांना शूद्र म्हणण्यांत आमच्या शास्त्र्यांची व सिथिअन म्हणण्यांत यूरोपीय पंडितांची इतिहासदृष्ट्या व मनुष्यवंशशास्त्रदृष्ट्या चूक होत आहे.

गुर्जर, मराठे हीं नांवें प्राचीन नसून सिथिअन वगैरे लोकांच्या स्वाऱ्यानंतर अस्तित्वांत आलीं आहेत ही गोष्ट जरी कबूल करणें भाग आहे तथापि तेवढ्यावरून या जाती हिंदुस्थानांत नवीन आल्या व त्या आर्यवंशी नव्हत असें अनुमान काढणें शक्य नाहीं. नवीन नांवें अनेक कारणांवरून पडत असतात ही गोष्ट अली-कडील इतिहासावरून देखील सिद्ध होण्यासारखी आहे. तेव्हां जाट, गुर्जर, मराठा हीं नांवें सातव्या शतकाच्या सुमारास किंवा त्याहि काळापूर्वी प्रघातांत आलीं असल्यास आश्चर्य वाटावयास नको. ह्युएनत्संगानें जाट हें नांव सांगितलेलें नाहीं; तथापि ‘अजयज्जर्टो हूणान्’ या चंद्रव्याकरणांतील वाक्यांत तें आलें आहे व त्यांत सामान्य भूतकाळाचा उपयोग सांगितला आहे. गुर्जर व महाराष्ट्र हे शब्द राज्यांचीं नांवें म्हणून ह्युएनत्संगानें सांगितले आहेत. बाणभट्टानेंहि गुर्जर शब्द देशाचें किंवा राजाचें नांव म्हणून ‘गुर्जर-प्रजागरः’ या प्रतापवर्धनाच्या विशेषणांत योजिला आहे. पूर्वी एके ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें दद्दाच्या दानलेखामध्यें गुर्जर हें नांव आलेलें आहे. आतां उरलें महाराष्ट्र. हें नांव पूर्वी कोठें आलेलें

आढळत नाहीं, तथापि इ. सनाच्या पहिल्या शतकांतील प्राकृत भाषेचा वैयाकरण जो वररुचि त्यानें महाराष्ट्राच्या भाषेबद्दल लिहिलेलें आहे. आजच्या मराठ्यांच्या प्रान्ताला मात्र महाराष्ट्र हें नांव ह्युएनत्संगानेंच प्रथम दिलेलें आढळतें;* त्यापूर्वीच्या मराठदेशाला मिहिरादि ग्रंथकारांनीं निराळीं नांवें योजिलीं आहेत. महाराष्ट्र हा शब्द संस्कृत असून त्यापासून लोक किंवा देश अशा दोघांचाहि बोध होण्यास हरकत नाहीं. पण जाट किंवा गुजर या शब्दांचा अथवा त्यांचीं संकृत रूपें जीं जर्ट आणि गुर्जर त्यांचा अर्थ काय? तीं नांवे देशांचीं नसून बहुतकरून लोकांचीच असलीं पाहिजेत; आणि आमच्या मतें तर जाट लोकांत ब्राह्मण खेरीज इतर क्षत्रियादि वर्गहि होते. गुर्जरामध्यें सुद्धां ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे सर्व आहेतच आणि तसेच ते इकडे मराठ्यांतहि आहेत. गुर्जर ब्राह्मण, मराठा ब्राह्मण इत्यादि शब्दप्रयोग या बाबतींत साक्ष देत आहेत. हा विषय बराच वादग्रस्त असल्यामुळें येथें तो इतकाच सोडून एका स्वतंत्र टीप्पणीसाठींच तो राखून ठेवणें बरें. तरी पण जातां जातां इतकें सांगणें अवश्य आहे कीं, उज्जनीच्या बाजूला एक ब्राह्मणांची जात असून ती आपणाला गुजरगौड ह्मणवितें, गुजराथेंतील ब्राह्मणांप्रमाणें गुजराथी ह्मणवीत नाहीं; तसेंच हल्लींच्या रजपुतांच्या नानाविध पोट जातींपैकीं गुजर ही एक पोटजात आहे. तेव्हां गुर्जर देशांत क्षत्रिय राजा असल्याचें जें ह्युएनत्संगानें लिहिलें आहे, त्याबद्दल आश्चर्य वाटावयास नको.

असो. तात्पर्य काय कीं ह्युएनत्संगाचे वेळीं कृषीचा धंदा वैश्यांच्या ह्मटला जात नसून शूद्रांचा झाला होता; तथापि एवढया

---

* पुलकेशी राजाचा दानलेखहि पहा.

वरून आजकाल शूद्र म्हटले जाणारे सर्वच लोक वैदिक अर्थाप्रमाणें द्रविडवंशीय अथवा यूरोपीय पंडित ह्मणतात त्याप्रमाणें सिथिअन वंशाचे होते असें मानणें अवश्य होत नाहीं. धंद्यावरून जातीला नांव मिळण्याच्या या प्रकारामुळेंच मनुकाल व हर्षकाल यांत विशिष्ट भेद झालेला आहे. असल्या प्रकारचा दुसराही महत्वाचा भेद ह्युएन-त्संगाच्या लिहिण्यावरून दिसून येत आहे. तो म्हणतो " राज्या-धिकाराचा उपभोग पिढयानुपिढया असा क्षत्रियांनींच काय तो घेतला आहे. क्वचित् बंडें व राजांचे खून होऊन मात्र अन्य जातींनी हा अधिकार बळकाविला आहे " (वाटर्सकृत ह्यु. त्सं. पु. १ पा. १७० ), आतां मनूनें सांगितलेल्या वर्णव्यवस्थेप्रमाणें राज्याचा अधिकार क्षत्रियांना मात्र होता; व परंपरागत कथेवरून पहातां या मर्यादेचें उल्लंघन प्रथमतः चाणक्याच्या साहाय्यानें चंद्रगुप्तानें करून शेवटचे खरे क्षत्रिय राजे जे नंद त्यांच्या घराण्याचा उच्छेद केला. तेव्हांपासून मात्र ब्राह्मण, वैश्य अथवा शूद्र यांना अनेकवार राज्याधिकार प्राप्त झालेला हिंदुस्थानच्या इतिहासांत आढळून येतो. पण राज्यपद मिळालें तरी त्यांचा जातिदृष्टया समाजांतील दर्जा मात्र कमी अधिक झाला नाहीं. जातिदृष्टया ते होते तसेच राहिले व त्यांची जात बिघडली असें त्यांना स्वतःला किंवा लोकांनांहि वाटलें नाहीं. ह्मणूनच ह्युएन-त्संगालाहि राजांचें वर्णन करितांना त्यांच्या जातीहि सांगाव्या लागल्या. याकरितां त्यानें राजांचा जातिनिर्देश ज्या ठिकाणीं केला आहे, तेथें तो मुद्दाम केलेला असून चुकून झालेला नव्हे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. तो जेव्हां असें ह्मणतो कीं, अमुक राजा क्षत्रिय आहे किंवा अमुक वैश्य आहे, तेव्हां त्याच्या म्हणण्याचा अर्थ खरा काय हें आतां लक्षांत येईल.

उदाहरणार्थ, त्यानें आपला स्वतःचा हितकर्ता व आश्रयदाता जो सार्वभौम हर्षराजा त्यालाहि क्षत्रिय न ह्मणतां वैश्य असें स्पष्ट ह्मटलें आहे, व ही गोष्ट त्याच्या वंशांतील राजांच्या नांवांपुढें जें वर्धन किंवा भूति हें उपपद येतें, त्यावरून खरी असावी असें* ठरतें. निरनिराळ्या जातींतील नांवापुढें जोडावयाच्या उपपदांची यादी आह्मी पुढें देणारच आहों. पण येथें दिलेल्या प्रत्यक्ष हर्षाच्या उदाहरणावरून ह्युएनत्संगाच्या लिहिण्याचें औचित्य लक्षांत येईल. तसेंच राज्यप्राप्ति झाली तरी जातिदृष्टया मनुष्याची योग्यता कमी अधिक होत नसे हेंही सिद्ध करण्यास एवढें उदाहरण सध्यां पुरे आहे. आतां प्रत्येक जातीचा आपण पृथक् विचार करूं व उपलब्ध असलेल्या सर्व प्रमाणावरून त्यांच्या विशिष्ट लक्षणांविषयीं वगैरे जी माहिती मिळते ती सविस्तर देण्याचा प्रयत्न करूं.

प्रथम फार प्राचीन काळापासून सर्व वर्णांत मुख्य ह्मटले जाणारे जे ब्राह्मण त्यांचें वर्णन करूं. त्या काळाच्या ब्राह्मणांनीं आपला अनादि असा सर्ववर्णाधिक श्रेष्ठपणा आपल्या बुद्धिमत्तेच्या व नीतिमत्तेच्या जोरावर कायम ठेविलेला होता. ते सर्व समाजाचे ह्मणजे प्राचीन वैदिकधर्माभिमान्यांचे त्याचप्रमाणें नवीन बौद्ध जैनादि अवैदिक धर्माभिमान्यांचेहि नेते व त्यांच्या विचाराला वळण लावणारे होते. बौद्धजैनादि अवैदिक नूतन धर्मांनीं जरी जातिबंधनांचा तत्वतः त्याग केलेला होता, तरी व्यवहारांत त्यांच्यावर या पूर्वापार बंधनांचा एवढा दाब असे कीं, बुद्धिमान् ब्राह्मण किंबहुना क्षत्रिय सुद्धां आपली जात न गमावतां उपदेशक भिक्षु किंवा गुरु होत;

* हर्षाच्या घराण्याचा मूळपुरुष पुष्यभूति ह्मणून होता. ह. च. उच्छ्वास ३ निरनिराळया वर्णांच्या व्यक्तींच्या नांवापुढें लावावयाची उपपदें पुढील श्लोकांत दिलीं आहेत. ' शर्मादेवश्च विप्रस्य वर्मा त्राताच भूभुजः भूति र्दत्तश्च वैश्यस्य दासःशूद्रस्य कारयेत्; ॥मनुस्मृती वरील कुल्लुक भट्टाची टीका अ. २, श्लो. ३.

कारण असें केल्यानें मठाचें किंवा संघाचें आधिपत्य मिळाल्यामुळें त्यांचा दर्जा फार वाढत असे. * तरी पुढें जें विवेचन केलें आहे, तें अशा ब्राह्मणांविषयीं नसून पुराणमताभिमानी वैदिकधर्मानुयायी ब्राह्मणाविषयींच तें मुख्यतः आहे असें समजावें

या ब्राह्मणवर्गाविषयीं पहिली सांगण्यासारखी गोष्ट ह्मणजे हा वर्ग अद्यापि एकच असून त्याचे हल्लींच्यासारखे पोटभेद झालेले नव्हते. हल्लीं ज्याप्रमाणें गुर्जर ब्राह्मण, महाराष्ट्र ब्राह्मण, काश्मिरी ब्राह्मण इत्यादि प्रांतिक भेद आहेत तसेहि त्यावेळीं नव्हते. पंच द्राविड आणि पंच गौड असे ज पोटविभाग आज आढळत आहेत, त्यांचा त्याकाळीं मागमूस दिसत नव्हता. मग देशस्थ, कऱ्हाडे, कोंकणस्थ, नागर, औदीच्य इत्यादि बारीकसारीक भेद नव्हते, हें सांगावयास नकोच; त्यावेळीं ब्राह्मणांमध्यें जो भेद होता तो केवळ वेद शाखा किंवा चरण यापुरताच होता. तसेंच ब्राह्मणाचें वर्णन करतांना तो अमुक गोत्राचा व अमुक प्रवराचा असें सांगण्याचा प्रघात असे. या बाबतींत तत्कालीन ब्राह्मण आणि आजचे ब्राह्मण यांत चांगलाच भेद आहे. अलीकडील ब्राह्मण जातीपैकीं पुष्कळांना आपले गोत्र कोणतें व कोणत्या वेदशाखेचे आपण अधिकारी आहों, त्याचा पत्ताहि नसतो. पण त्यांना तुम्हीं कोण ब्राह्मण ह्मणून विचारल्यास पटकन ते कनोजी, सनाढय, मराठे, मद्रासी द्राविड इत्यादि कांहीं प्रांतिक नांवें मात्र सांगून देतील. पण हर्षकालीन सातव्या शतकांतील ब्राह्मण आपण कोण हें सांगतांना गोत्र व शाखा यांचीच

* याचें उदाहरण पाहिजे असल्यास समतटच्या ब्राह्मणराजाच्या भावाचें आहे. हा भाऊ ब्राह्मण असून नालंदा येथील बौद्ध मठाचा अधिपति व तेथील पाठशाळेचा गुरु होता असें ह्युएनत्संगानें लिहिलें आहे.

नांवें सांगत असे. हर्षचरित्रांत बाणभट्टानें आपण कनोजी ब्राह्मण किंवा मागधी ब्राह्मण असें न सांगतां वात्स्यायन गोत्राचा मात्र उल्लेख केला आहे. तत्कालीन शिलालेख व ताम्रपट यांमध्येंहि ब्राह्मणांसंबंधानें लिहितांना गौड किंवा द्राविड या विशेषणाचा उपयोग न करितां त्यांच्या गोत्राचा व शाखेचा निर्देश केलेला असतो. ही गोष्ट इतकी स्पष्ट आहे कीं, तिची येथें उदाहरणेंहि देण्याचें कारण नाहीं. कोणताहि एखादा शिलालेख किंवा ताम्रपट पाहिल्यास त्यांत ही गोष्ट दिसून येईल. तथापि ज्या एका दान-पत्रांतील शब्दांसंबंधानें ऐतिहासिकांमध्यें गैर समज झालेला आहेसा वाटतो त्याचा थोडा विचार करणें आवश्यक आहे. बुलंद शहर गॅझिटियरमध्य अनुप शहरजवळील इंदूर गांवीं सांपडलेल्या ताम्रपटाचा उल्लेख आला आहे व त्यांत गौड या ब्राह्मण जातीचा उल्लेख केलेला आहे असें ह्मणून गॅझेटीयरकारानें विशेष महत्वहि दिलें आहे. आतां हा ताम्रपट गुप्तशक १६४ ह्मणजे ख्रिस्तीसन ४६५ तील असल्यामुळें साहजिकच गौड शब्दानें निर्दिष्ट होणारा ब्राह्मणांचा पोटभेद इ. स. च्या ५ व्या शतकाइतका ह्मणजे बाणाच्या पूर्वी १५० वर्षें इतका जुना असला पाहिजे असें उघड होतें. परंतु सदर गॅझिटियरलेखकाला 'गोरान्वयसंभूत' या त्या ताम्रपटांतील शब्दाचा नीट अर्थ कळला नाहीं असें ह्मणावें लागतें. याचें कारण असें कीं गौड द्राविड इत्यादि भेद कुला-वरून झालेले नसून देशावरून झालेले आहेत, व यासाठीं 'गौरान्वय संभूत' या शब्दाचा संबंध गौड या पोटभेदाशीं लावणें शक्य नाहीं. शिवाय या समासांतील पद 'गोर' असें असून गौड असें नाहीं. पूर्वीच्या लेखांत कुलाचें नांव ह्मणजे ज्याला आज आपण आडनांव ह्मणतों तें सांगून ब्राह्मणांचा निर्देश केलेला

फारसा कोठें आढळत नाहीं व त्यामुळें 'गोर' हें कुलवाचक नांव सदरील दानपत्रांत सांगितलें आहे ही गोष्ट देखील चमत्कारिक दिसते खरी. पण गोर हें नांव प्रांतिक असणें शक्य नसल्यामुळें प्रांतिक भेदांनीं ब्राह्मणांचा निर्देश करण्याची तऱ्हा सातव्या शतका-पर्यंत सुरू झाली नव्हती असेंच मानणें अवश्य आहे. त्या वेळीं भरतखंडांतील सर्व ब्राह्मणांची मिळून एकच एक जात असून गोत्रभेद, चरणभेद, किंवा शाखाभेद यांशिवाय इतर कोणतेच भेद त्यांस माहीत नव्हते. त्यावेळीं भिन्नप्रान्तीय ब्राह्मणांमध्यें विवाहसंबंध होत असत कीं नाहीं हें समजणें कठीण आहे. तथापि तसे होत नसत असेंहि म्हणावयास कांहीं आधार नाहीं. अशा विवाहांना स्मृतिग्रंथांची आडकाठी मुळींच नाही. सांप्रतकाळीं सुद्धां एकशाखियांतच शरीरसंबंध व्हावा असें वाटण्याची प्रवृत्ति केवळ रूढीला अनुसरून झालेली असून तिला शास्त्राचा कांहीं आधार नाहीं. अजूनहि ऋग्वेदी व यजुर्वेदी ब्राह्मणांत, महाराष्ट्र, मध्य किंवा संयुक्त प्रान्त, इत्यादि ठिकाणीं शरीरसंबंध होऊं शकतो. म्हणून प्राचीन लेखांत आढ-ळून येणाऱ्या शाखा-निर्देशावरून भिन्नशाखीय ब्राह्मणांत त्या-वेळीं विवाह होत नव्हते असें अनुमान निघत नाहीं. वेद व त्याची शाखा यांच्या निर्देशामुळें ब्राह्मणांची दानपात्रता, किंवा कांहीं धर्मविधि, अथवा यज्ञकर्म वगैरे करण्याची योग्यता केवळ ध्वनित होत असावी. उदाहरण, अथर्ववेदी ब्राह्मण सूर्यपूजनाला योग्य होय असें त्यावेळीं मानीत असत. जातां जातां हेंहि सांगितलें पाहिजे कीं, वेद व त्याची शाखा सांगण्याची तेव्हांची रीत आज-च्याहून थोडी भिन्न होती. उदाहरणार्थ, आज ज्यांना आपण ऋग्वेदी किंवा सामवेदी म्हणतों त्यांना त्यावेळीं बह्वृच किंवा छंदोग असें अनुक्रमें म्हणत असत; तसेंच गोत्र निर्देश करतांना

आपण आज जें काश्यप-गोत्र असें सामासिक पद घालतों, त्या ऐवजीं तेव्हां नुसतें काश्यप असेंच म्हणत, किंवा काश्यप-सगोत्र असें म्हणत. तसेंच शाखा सांगताना वाजसनेयिसब्रह्मचारि असें म्हणत.

तत्कालीन ब्राह्मणांसंबंधानें सांगावयाची दुसरी गोष्ट म्हणजे त्यांच्यानांवापुढें कांहीं उपपदें नित्य येत असत. एकंदरींत असें दिसतें कीं, त्याकाळीं सगळ्याच लोकांच्या नांवापुढें जातिविशिष्ट कांहीं तरी उपपद घालण्याची रीत होती. या उपपदांची यादी स्मृतिग्रंथातूनहि दिलेली आहे. ब्राह्मणांच्या नांवापुढें जोडावयाच्या या उपपदांत शर्मन् ( शर्मा ) हें मुख्य असून भट्ट, देव आणि स्वामी हींहि कधा कधीं जोडीत असत.* चम्मक येथील ताम्रपटांत जो वऱ्हाडांतील ( प्राचीन विदर्भ ) वाकाटकांच्या दुसऱ्या प्रवरसेनराजाचा दानलेख आहे ( कॉर्पस इन्स्क्रिपशनन् पु. ३ ले ५५ पा. २३५ ) प्रतिग्रह घेणाऱ्या अनेक ब्राह्मणांचीं नांवें आलेलीं असून त्यांतील काहीं सांख्यायन गणार्य, वात्स्य देवार्य, भारद्वाज कुमारशर्मार्य, पाराशर्य गूहशर्मा, काश्यप देवार्य, माहेश्वरार्य, भारद्वाजबप्पार्य, गौतमसगोत्र मातृशर्मार्य इत्यादि आहेत.

---

* बहारी किवा बंगाली ब्राह्मणांच्या नांवापूढें मिश्र हें पद जोडतात. पण ७ व्या शतकांत या उपपदांवरून प्रान्तांचा बोध होत होता असें दिसत नाहीं. संयुक्तप्रान्तातील पुंजबंदच्या दानलेखांवरून असें दिसतें कीं, भट्ट हें उपपद त्यावेळीं गुजराथी किवा दक्षिणी ब्राह्मणांना जितकें प्रिय होते तितकेंच तें कनोजी ब्राह्मणांनाहि होतें.बाण हा मगधांतील (बहारांतील ) असूनहि त्याच्या नांवापुढें भट्ट हेंच पद लाविलें आहे. परतु सांप्रतमात्र त्याचा अधिकार महाराष्ट्री ब्राह्मणांकडेच राहिला असून **आर्य** किंवा **अय्या** हें तेलगू ब्राह्मणांकडे, आचार्य कर्नाटकी ब्राह्मणांकडे, पंडित काश्मीरी ब्राह्मणांकडे व मिश्र हे बहारी म्हणजे मागधी ब्राम्हणांकडे सोपविलें आहे.

यांत आर्य हें दुहेरी बहुमानास्पद उपपद जोडलेलें आहे. आर्य हें उपपद ( हल्लींचें अय्या ) दक्षिणेंतील द्राविड ब्राह्मणांच्या नांवा-पुढें येत असल्यामुळें ही ब्राह्मण मंडळी दक्षिणेंतून गेलेली असावी असेंहि म्हणतां येईल.

पूर्वी एके ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें ब्राह्मण कधीं कधीं वर्मा व गुप्त हीं उपपदें आपल्या नांवांपुढें जोडून आपण क्षत्रियाचा किंवा वैश्याचा धंदा करीत आहों, असें सुचवीत असत. आजच्या प्रमाणेंच त्यावेळींहि स्मृत्युक्त धंद्यांशिवाय ह्मणजे यजन, याजन आणि अध्ययन, अध्यापन यांशिवाय दुसरेहि नाना प्रकारचे धंदे ब्राह्मण करीत असत. बाणानें आपल्या चुलत्यांचें वर्णन करतांना ते विद्वान् असून स्वतः अध्ययन करीत व इतरांकडून करवीत, यज्ञयाग करीत, अग्निहोत्र बाळगीत व गृहस्थाश्रमी ब्राह्मणांनां उचित अशा धार्मिक रीतीनें कालक्रमणा करीत असें सांगि-तलें आहे. पण स्वतःची हकीगत देतांना आपल्या बाल-संवगड्यांची जी यादी त्यानें दिली आहे तींत नृत्यगीत-शिक्षक, नाटकी, जांगलिक ( विषवैद्य ), जादूगार, कवि, लेखक, चित्रकार, किमयागार, सोनार, संवाहिका ( मोलकरणी ) तसेंच हिंदु सन्यासी व बौद्ध भिक्षु इत्यादि प्रकारचीं दुसरींहि कित्येक विलक्षण नांवें आहेत. मृच्छकटिक नाटकांतहि शर्विलक नांवाचें ब्राह्मणजातीचें चोर पात्र आलेलें आहे. या गोष्टीचा विचार करतां त्याकाळींहि आतांच्याप्रमाणेंच चांगलें वाईट असे सर्व तऱ्हेचे ब्राह्मण असून बरेवाईट धंदेहि आतांप्रमाणेंच तेव्हांहि ते करीत असत असें समजल्यास तें कांहीं वावगें होणार नाहीं. तथापि आतांच्याप्रमाणेंच तेव्हांहि ब्राह्मणांचे सामान्यपणें शिष्ट धंदे ह्मणजे धर्मविधि करणें व करविणें किंवा वरिष्ठ प्रकारची सरकारी नोकरी

करणें हेंच होतें. या दुसऱ्या धंद्यामध्यें ते केव्हां केव्हां चढत चढत प्रांताचे सुभेदारहि होत. मन्दसोरच्या शिलालेखांत (कॉर्पस इन्स्क्रि० पु. ३ लेख ३५ ) अशा प्रकारचें एक उदाहरण आलें असून, रविकीर्तीचा पुत्र अभयदत्त हा राजस्थानीय ( राजप्रतिनिधि-हल्लींचा व्हाइसराय ) असून तो पुष्कळ प्रांत मिळून झालेल्या देशावर रक्षणार्थ नेमलेला होता. यांपैकीं लहान प्रांतांवर त्याचे विश्वासू मंत्री नेमले असून हा सर्व देश रेवानदीचे उगमस्थान जो विन्ध्यपर्वत तो व समुद्राजवळच्या पारियात्रपर्वत यांच्यामध्यें होता, ' अशा अर्थाचा मजकूर त्यांत आहे. इतरहि लेखांतील अशीं दुसरीं उदाहरणें देऊन ही गोष्ट सिद्ध करतां येईल. हे ब्राह्मण सुभेदार किंवा राजप्रतिनिधि पुढें स्वतःच राजे बनत.

आतां क्षत्रियांविषयीं विचार करूं. पहिली गोष्ट अशी कीं त्यांचीहि सर्व भरतखंड मिळून एकच जात होती. जसे ब्राह्मणांचे पंच द्राविड आणि पंच गौड असे भेद झाले नव्हते त्याप्रमाणे क्षत्रियांचेहि रजपूत आणि खत्री हे भेद अद्यापि झालेले नव्हते. आज पहावें तर खत्रि हें नांव रजपूतांपेक्षां कमी दर्जाचें लेखितात. असो. आज क्षत्रियांमध्येंहि शुद्ध मानलेलीं ३६ कुळेंच असून विवाहसंबंध फक्त एवढ्यांतच होऊं शकतो; ही स्थितिहि त्या वेळीं नव्हती. या ३६ कुळांचीं नांवेंहि त्या वेळीं अस्तित्वांत नव्हतीं. चव्हाण, सोळांके, शिसोदे, राठोड इत्यादि कुळें अजून पुढेंच व्हावयाचीं होतीं. तात्पर्य, तत्कालीन सर्व हिंदुस्थानांतील क्षत्रियांची मिळून एकच जात मानीत असून कोणत्याहि एका क्षत्रियकुळाचा दुसऱ्या कोणत्याहि कुळाशीं शरीरसंबंध होण्यास बहुधा प्रत्यवाय नसे. किंबहुना एकंदर जातिबंधनेंच त्यावेळीं आजच्याहून शिथिल असून क्षत्रियघराण्यांचा, नांवारूपास येऊन राजपद

पावलेल्यावैश्यांशींहि विवाहसंबंध घडत असे. याचीं उदाहरणें पूर्वी सांगितल्याप्रमाणें हर्षाच्याच घराण्यांत आहेत. तो स्वतः वैश्यकुळांतील असून त्याची बहीण राज्यश्री कनोजच्या क्षत्रिय ग्रहवर्म्याला दिली होती;व कन्या वल्लभीच्या ध्रुवभटाला दिली होती असे अनुक्रमें बाण व ह्युएनत्संग यांच्या लेखांवरून दिसून आलेंच आहे. तथापि असले विवाह सरसकट नियम म्हणून होत नसून वर्णसंकर व जातिसंकर होऊं नये अशीच प्रवृत्ति त्या-वेळींही पूर्वीप्रमाणें रूढ होती. ताम्रलेखांतून 'वर्णाश्रमव्यवस्था-पन-प्रवृत्तचक्र' ( मधुवन ताम्रपट ) 'वर्णाश्रमव्यवस्थपनप्रवृत्तः ( सोनपत ताम्रलेख, ) इत्यादि राजांना दिलेल्या विशेषणांवरून वर्णसंकर व जातिसंकर न होऊं देण्याविषयींची लोकांची कळ-कळ व उत्कंठा दिसून येते.वरच्या वर्णानें खालच्या वर्णाची मुलगी करणें याविरुद्ध प्रवृत्ति याप्रमाणें दिसून येत असल्यामुळें विलोम म्हणजे त्याच्या उलट विवाहांची पद्धत त्या काळीं नव्हतीच हें उघड झालें; म्हणजे विलोम विवाहाविषयीं मनूचा * नियम यावेळी चांगला अमलांत होता असें होतें. यावरून जेथें जेथें म्हणून ह्युएनत्संगानें राजांच्या जातीचा निर्देश करून क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र असें त्यांना म्हटलें असेल तेथें तेथें त्यानें वास्तविक प्रकारच वर्णन केलेला आहे, व बौद्धधर्माचा जातिबंधनाविरुद्ध कटाक्ष असतांहि त्या वेळीं ती बंधनें चांगलींच पाळलीं जात होतीं हें अगदीं उघड होतें.

दुसरी क्षत्रियविषयक बाब अशी आहे कीं, आजच्या क्षत्रियांत जसी आपली पूर्वपीठिका सूर्य, चंद्र व अग्नि याशीं नेऊन भिड-विण्याचा प्रघात आहे व त्या मानानें आपल्याला ते सूर्यवंशी,सोमवंशी

* मनुस्मृति १०, ११.

किंवा अग्निवंशी म्हणवितात तसाहि प्रकार हर्षकाळीं फार प्रचलित नव्हता. त्या काळच्या कोणत्याच लेखांत कोणत्याच राजाचा वंश सांगितलेला नाहीं. अर्थात तेव्हां सूर्यवंश, सोमवंश, अग्निवंश हे महत्वाचे नव्हते हें सांगावयास नकोच. वलभीराजांच्या दानलेखांतहि सेनापति घराणें, म्हणजे ज्याशीं हल्लींचें मुख्य सूर्यवंशी शिसोद्यांचें रजपूत घराणें आपला मूळसंबंध जोडतें तें, सूर्यवंशी होतें असें सांगितलेल नाहीं. सूर्यवंश आणि सोमवंश उर्फ ऐक्ष्वाक आणि ऐल वंशांचा महाभारताच्या सभापर्वांत निर्देश केलेला आहे. त्या ठिकाणीं कृष्ण म्हणतो ‘ सांप्रत भरतखंडांत ऐल व ऐक्ष्वाक या वंशातील १०१ कुळें आहेत ’ यावरून सूर्यवंश आणि सोमवंशाच्या कल्पना निदान इ. स. पूर्वी ३०० वर्षांच्या इतक्या तरी प्राचीन आहेत; कारण महाभारताची सौतिकृत वाढविलेली शेवटची आवृत्ति त्या सुमारास रचिली गेली हें आतां निश्चित ठरलें आहे. तथापि इ. स. पूर्वी ३०० पासून इ. स. ६०० पर्यंत येथील राजपदावर बरींच वैश्य व शूद्र घराणीं तशींच कांहीं परदेशीय घराणींहि आल्यामुळें सूर्य व चद्र वंशांची मातब्बरी नाहींशी होऊन ताम्रलेखांत वगैरे राजांच्या वंशाचा निर्देश करण्याची आवश्यकता राहिली नसावी असें असण्याचा संभव आहे. वलभीचे राजे खरे क्षत्रिय असूनहि त्यांच्या ताम्रलेखांतून वंशनिर्देश केलेला नाहीं.* पण असें असलें म्हणून सूर्यचंद्रवंशांचीं नांवें सुद्धां त्यावेळीं स्मृतिपंथातून गेलीं होतीं असें मात्र नाहीं.

* भडोच येथील गुर्जरराजाच्या एका लेखांत वंश सांगताना **महाराजकर्णा**च्या वंशाचा उल्लेख केला असून, प्राचीन इतिहासज्ञांनीं त्याला भारतांतील कर्णाचा वंशच ठरविलें आहे. परंतु त्याच्या समकालीन किंवा पूर्वीच्या कोणत्याच लेखांत वंशनिर्देश नसल्यामुळें कर्ण हा गुर्जरराजांपैकींच पूर्वीचा एक राजा असावा असें आम्हांला वाटतें.

कांहीं क्षत्रिय घराण्यांत तीं जागृत असून त्याबद्दल त्यांना अभिमानहि वाटत असावा, असें हर्षचरितांतील निर्देशावरून दिसतें. ( कथयतं यदि सोमवंशसंभवो सूर्यवंशसंभवो वा युवां भूपतिरभूदेवंविधः उछ्वास २ रा )* ठाणेश्वरच्या पुष्यभूतीचें घराणें चंद्रवंश किंवा सूर्यवंश या पैकीं कोणत्याच वंशाचें नव्हतें. अर्थात अशा वैश्य राजांना पुराणांतील कोणत्या वंशांचे आपण आहों याचा पत्ता न लागल्यामुळें आपला वंशनिर्देश करण्याची गरजच लागली नाहीं. बदामीच्या चालुक्य राजांच्या लेखांत त्या कुळाचें गोत्र **मानव्य** असें सांगून शिवाय त्या राजांना **हारीतीपुत्र** असेंहि नांव दिलें आहे. या **मानव्य** गोत्राचा संबंध कांहीं दानलेखांत स्वायंभुव मनूशीं जोडलेला असल्यामुळें हा वंश सूर्यवंश नव्हे हें उघड होतें ( सूर्यवंशांतील मनु वैवस्वत होय ). ब्राह्मण राजाच्या दानपत्रांशिवाय इतर लेखांतून वरील अपवाद वगळतां गोत्र-निर्देश कोठेंहि केलेला आढळत नाहीं. हल्लींच्या प्रमुख रजपूत घराण्यापैकीं कांहींची विशिष्ट गोत्रें असून बाकीचीं घराणीं आपल्याला उपाध्यायांचींच गोत्रें घेत असतात. हर्षकाळीं ब्राह्मणांशिवाय गोत्रपरंपरा दुसऱ्या कोणत्या जातींत पूर्णपणें राहिली असेलसें दिसत नाहीं; तथापि रजपूत घराण्यांची हीं आजचीं गोत्रें कितपत विश्वसनीय मानावी याबद्दल पुढें चर्चा करण्यांत येईल. सूर्यवंश व चंद्रवंश या परंपरा पुढें कशा महत्वास पोंचल्या व त्यांत तिसऱ्या अग्निवंशाची भर पडून त्यालाहि पुढें कसें महत्व आलें याचा पुढें विचार करणें अवश्य होणार आहे, येथें नाहीं.

---

* तिसऱ्या उच्छ्वासांत लक्ष्मीनें पुष्पभूतीला दिलेल्या आशीर्वादांत म्हटलें आहे ' भवान्भुवि सूर्यचंद्रमसोस्तृतीय इव....महतो राजवंशस्य कर्ता भविष्यति'। तूं सूर्य चंद्रांप्रमाणें मोठ्या एका राजवंशाचा तिसरा स्थापक होशील.

क्षत्रियांविषयींची शेवटची गोष्ट म्हणजे त्यांच्या नांवापुढें जोडावयाचीं उपपदें. स्मृतिग्रंथांत सांगितलेलीं क्षत्रियांचीं मुख्य उपपदें वर्मन् व त्रातृ ( वर्मा व त्राता ) हीं होत. प्राचीन लेखांवरून सेन, भट इत्यादि दुसरींहि उपपदें असल्याचें दिसतें. वलभीचे राजे **सेन** व **भट** उपपदेंच लावीत होते असें त्यांच्या लेखांवरून आढळून येतें. अलीकडे मुसलमानी अमदानीनंतर विशेष प्रचारांत आलेलें सिंह उपपद सातव्या शतकांतील लेखांत फारसें आढळत नाहीं; तरी वलभी राजांच्या वंशावळींत द्रोण सिंह असें नांव आलेलें आहे.

आतां त्रैवर्णिकांतील तिसरा वर्ण जो वैश्य त्याकडे वळूं. हर्ष-काळीं सुद्धां वैश्य वर्णाचा क्रम क्षत्रियांच्या खालचा म्हणजे तिस-राच होता. वैश्य हे आर्यवंशीय होत असें प्राचीन काळापासून सर्व मानीत आलेले आहेत. कारण आर्य शब्दाचा वेदभाष्यकार सायणाचार्य यांनें ' ब्राह्मण, क्षत्रिय, व वैश्य ' असाच नित्य अर्थ केलेला आहे. तथापि पहिल्या दोन उच्च वर्णांप्रमाणें वैश्यांनीं आपली वर्णशुद्धि सामान्यतः काळजीपूर्वक जतन केलेली नव्हती; व या कारणास्तव त्यांचें शूद्रजातींत पतन झालें. तथापि ह्युएन-त्संगानें वर्णिलेले हर्षकालीन वैश्य व्यापारी, उदमी, पेढीवाले, सावकार असेच होते व यावरून त्यांचाहि नियमित जातिसंघ असला पाहिजे असें वाटतें. हल्लींच्यासारखीं वैश्यांच्या पोटजातींचीं नांवेंही तेव्हां उत्पन्न झालीं नसून **महेश्री** वैश्य, **अगरवाल** वैश्य हे शब्द तेव्हां माहीत नव्हते. सांप्रत उत्तर हिंदुस्थानांतील वैश्याच्या साडेबारा जाति असून दक्षिणी वैश्यांचा व त्यांचा अर्थाअर्थीं कांहींच संबंध राहिलेला नाहीं. पण सातव्या शतकांत ब्राह्मण व क्षत्रियां-प्रमाणें वैश्यांचीहि सर्व हिंदुस्थानामिळून एकच जात होती. त्यांचीं

विशिष्ट उपपदें स्मृतिग्रंथांत आढळणारीं भूति व गुप्त हीं असून इतर लेखांतून आढळणारीं वर्धन वगैर होत. यांपैकीं कांहीं वैश्यांनीं व्यापार उदीम सोडून देऊन क्षत्रियांचा पेशा स्वीकारला व त्यामुळें त्यांना उच्च दर्जा प्राप्त होऊन कांहींतर राजेहि झाले. असल्या वैश्यापैकीं मगधांतील गुप्त घराणें प्रमुख होय. बुद्धोत्तर-कालीन इतिहासांतील अशोकाच्या ( हा शूद्र होता ) खालोखाल सुप्रसिद्ध असा हिंदुस्थानांतील राजा म्हणजे समुद्रगुप्त हा होता; व तो वैश्य होता असें म्हणावें लागतें. तसेंच त्याच्या मागूनचा प्रसिद्ध चक्रवर्ती हर्ष हाहि वैश्यच होता. त्याच्या कुलानें धारण केलेलें वर्धन हें उपपद त्याचें वैश्यत्वच दर्शवीत असून ह्युएनत्सं-गाच्या स्पष्ट सांगण्यावरून तर ती गोष्ट निश्चितच होते. तत्कालीन वैश्य घराण्यांत एकंदरींत शिपाई व मुत्सद्दी निर्माण होत असून त्यांतील कांहीं विद्येनेंहि ख्यातीस येत असत. समुद्रगुप्त व हर्ष हे दोघेहि विद्वान व लेखक होते हें सुप्रसिद्धच आहे. मध्ययुगीन व अर्वाचीन इतिहासांतदेखील पुष्कळ वैश्य घराणीं तरवार गाजवून प्रसिद्धीला आलेलीं आहेत व अयोध्या प्रांतांतील हल्लींचे बैस रजपूत जरी आपल्याला दक्षिणेंतील पैठणच्या काल्पनिक शालि-वाहनाचे वंशज म्हणवितात तरी वस्तुतः ते वर सांगितलेल्या मध्ययुगीन तरवारबहाद्दर वैश्यांचेच वंशज असले पाहिजेत. गुप्त घराण्यांतील लोक उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेले होते; आणि तत्कालीन सरदार व मुत्सद्दी यांच्या नांवापुढें सामान्यतः गुप्त उप-पद येत असून त्यावरून त्यांचा लष्करांतील मोठमोठीं कामें कर-ण्याचा अधिकार दिसून येतो.*

* हे लोक खरोखरी क्षत्रिय असून त्यांनी वैश्यांची उपपदें मात्र स्वीकारिलीं असें म्हणणें योग्य नाहीं. कारण खालच्या वर्णांच्या उपपदांची आवड कोणाला उत्पन्न होणें शक्य दिसत नाहीं. व तसें असतें तर ह्युएनत्संग हर्षासंबंधें तसें स्पष्ट सांगता.

आतां राहिलेल्या शूद्रांचा विचार करावयाचा. यांचा धंदा ह्युएनत्संगानें सांगितल्याप्रमाण शेतकी हा होता. ख्रिस्ती सनापूर्वीच्या काळीं शेतकीचा धंदा खरें म्हटल्यास वैश्यांचा असून हलक्या दर्जाची नोकरी करणें हाच धंदा शूद्र जातीकडे राहिलेला होता. पण बौद्धधर्माच्या प्रसारामुळें अहिंसेच्या तत्वाचा बडेजाव होऊन शेतकी करतांना सहजच होणारी जीवजंतूंची हत्या वैश्य लोकांना निन्द्य वाटूं लागली; आणि म्हणून त्यांनीं तें काम सोडून शूद्रांकडे दिलें. कृषिकर्मांत हिंसा होत असल्यामुळें वैश्यवृत्तीचा प्रसंग आला तरी तेवढें वगळून इतर वैश्यकर्म द्विजांनीं करावें असें मनूनेंहि सांगितलें आहे.* याप्रमाणें बौद्धधर्माच्या छायेंत शेतकीचें काम वैश्यांकडून शूद्रांकडे आलें. तथापि पंजाब व दुसरे कांहीं प्रदेश यांत कांहीं वैश्य जातींनीं हा निषेध मान्य केला नाहीं व त्यामुळें कालान्तरानें त्यांच्या जातीचा दर्जा कमी ठरून त्या शूद्रांत समाविष्ट होऊं लागल्या. याच कारणास्तव वस्तुतः आर्यवंशीय असूनहि कृषिकर्मांत पडल्यामुळें जाट, गुजर व मराठे या जातींना शूद्रवर्गांत जाण्याची पाळी आली. असो, वैश्यांकडून कृषिकर्म गेल्यावर येथील मूळच्या द्राविड जातींकडे तें मुख्यतः आल्यामुळें त्यांचा वर्ग म्हणजेच शूद्र वर्ग झाला. सामान्यतः सांगावयाचें तर उत्तर हिंदुस्थान व पश्चिमहिंदुस्थान यांतील कनिष्ठ वर्गांतील लोक विशेषेंकरून आर्यांचें बरेंच मिश्रण झालेले द्राविड होत, व दक्षिण हिंदुस्थानांत व विशेषेंकरून मद्रासकडील भागांत आर्यांची प्रगति प्राचीनकाळीं फारशी न झाल्यामुळें तेथील शेतकरी लोक मात्र सर्वस्वी द्राविडच राहिले आहेत.

---

* हिंसाप्रायां पराधीनां कृषिं यत्नेन वर्जयेत् । कृषिं साध्विति मन्यन्ते सा वृत्तिः सद्विगर्हिता ॥ १०, ८३–८४.

शेतकऱ्यांखेरीज दुसरीं पुष्कळ प्रकारचीं श्रमाचीं कामें करणार अनेक वर्ग होते व या वर्गांतील लोक बहुधा मिश्र वंशाचे असावेत. असे किती तरी वर्ग आहेत असें ह्युएनत्संगानें लिहिलें आहे. जे आपला ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र यांपैकीं कोणत्याच जातींत समावेश करून घेत नसत त्यांना त्यानें या मिश्र वर्गांत घातलें आहे. 'हे आपापल्या कामाप्रमाणें स्वतंत्र संघानें रहाणारे वर्ग असंख्य असून त्यांचें वर्णन करणें शक्य नाहीं.' असें त्याविषयीं त्यानें म्हटलें आहे ( वाटर्सकृत ह्युएनत्संग पा. २६८ ). खरोखर असल्या जातींची संख्या आतांच्याप्रमाणेंच तेव्हांहि शेकड्यांनीं मोजण्यासारखी असावी व म्हणून ह्युएनत्संगानें त्याचें वर्णन करतां येत नाहीं असें म्हटलें असावें. विशिष्ट कामें करणाऱ्या मिश्र जाति स्मृतींत अनेक सांगितल्या आहेत व त्यांतही आणखीं कामाच्या बारीक भेदानीं अनेक पोटभेद झालेले आहेत. या सर्व जाति आर्य व द्रविड यांच्या मिश्रणानें बनल्या असून हें मिश्रण हर्षाच्या पूर्वीं बराच काळ झालेलें असावें. कारण हर्षकाळीं वर सांगितलेले अपवाद खेरीज करून, सामान्यतः विवाहसंबंध निरनिराळ्या जाती व पोटजाती यांमध्यें मर्यादित झालेले होते.

हें प्रकरण पुरें करण्यापूर्वीं आणखी एका तत्कालीन वर्गाचा उल्लेख करणें अगदीं अवश्य आहे. तो वर्ग म्हणजे मद्रासेकडे ज्यांना पंचम किंवा पांचवा वर्ग म्हणतात त्या अस्पृश्यांचा होय. ह्युएनत्संगानें त्याविषयीं असें लिहिलें आहे कीं, "खाटीक, मासे धरणारे, झाडू, कत्तल करणारे, मांग इत्यादि लोकांच्या वसतिस्थानावर कांहीं विशिष्ट निशाणी असे. त्यांना सर्वत्र गांवाबाहेर रहावें लागे आणि गांवांच्या रस्त्यांतून समोर न जातांना आपल्या डावीकडून ते हळूच जपून जपून चालतात" (वाटर्स ह्यु. त्सं. पु. १ पा. १४७ ). या लोकांना गांवाच्या बाहेर रहावयास लावण्याची

पद्धत वेदांइतकीच जुनी आहे; कारण चांडाळ लोक नगराच्या किंवा गांवाच्या बाहेर रहातात व त्यांच्या घरांत आर्यांनीं जाऊं नये असें ब्राह्मणादि श्रुतिग्रंथांत सांगितलेलें आहे. या वैदिक चांडाळांचे धंदेहि ह्युएनत्संगानें वर सांगितलल्यांपैकीं असून खाटीक व मासे मारणारे यांचा मात्र त्यांत समावेश होत नस. पण हे दोन्ही धंदे हत्याप्रधान असल्यामुळें बौद्ध धर्माच्या अमदानींत अहिंसेच्या तत्वानुसार निंद्य ठरून ते करणारे लोक अस्पृश्य वर्गांत ढकलले गेले. हे अस्पृश्यांचे कनिष्ठ वर्ग द्राविड वंशांतील घाणेरड्या राहणीच्या मृतमांसोपजीवी निकृष्ट लोकांतून बहुधा बनलेले होते. पण उत्तर हिंदुस्थानांतील अस्पृश्य वर्गांत १९०१ सालच्या खानेसुमारींत रिस्लेनें घेतलेल्या शरीराच्या मोजमापांवरून आर्यांचें बरेंच मिश्रण आढळून आलें. पंजाबांतील चांभार आणि चुहरा लोक ठळकपणें आर्यवंशीय आहेत; म्हणून बौद्धकाळीं केवळ धंद्यावरून त्यांचा वर्ण हीन ठरविण्यांत आला असावा; अथवा स्मृतींत सांगितल्याप्रमाणें क्वचित् प्रसंगीं घडून यणाऱ्या शूद्र-ब्राह्मणी-संयोगापासून झालेली संतति तत्कालीन नियमाप्रमाणें निन्द्य ठरून तिला या अस्पृश्य वर्गांत ढकलण्यांत आल्यामुळें त्यांत आज आर्यांचें मिश्रण दिसत असावें.

# टिप्पणी.

## जाट, गुजर आणि मराठे.

जाट, गुजर व मराठे हे मूळचे आर्य कीं सिथिअन यासंबंधानें अद्याप मतभेद मिटलेला दिसत नाहीं. तथापि आमचें मत असें आहे कीं, हे लोक वंशानें आर्य आहेत ह्यांत काडीमात्र संशय नाहीं. ह्या मताची उभारणी मुख्यतः मानवजातिशास्त्रावर ( अंथ्रपोमेट्रीवर ) असून त्या मताला इतिहासाचाही पूर्ण पाठिंबा आहे. १९०१ सालच्या हिंदुस्थानचे सेन्ससचे कमिशनर सर एच् रिस्ले यांच्या नजरेखालीं खानेसुमारीच्या वेळीं मानवजातिशास्त्राची सर्व परिमाणे घेतली गेली. ही परिमाणें निर्णायक असून जाट यांची मूळपीठिका कोणती व गुजर कोणत्या वंशाचे असल्या शंका लोकांना अजून राहाव्यात ही मोटी आश्चर्याची गोष्ट आहे. तसेच रजपुतांच्या उत्पत्ती संबंधानेंही पुनः हाच घोंटाळा कां माजावा ते समजत नाहीं. त्यांची नाकाडोळ्याची ठेवण व शरीराची उंची यांवरून ते आर्यवंशाचेच असले पाहिजेत असें अनुमान निघतें; व ते निःसंशय आर्यवंशीच आहेत यासंबंधानें रिस्ले यांची बालंबाल खात्री होऊन चुकली आहे. जाट, गुजर व रजपूत हे लोक आर्य आहेत, याविषयीं जितकें निःसंशय प्रमाण मिळालें आहे, तितकें निःसन्दिग्ध प्रमाण जरी मराठ्यांविषयीं मिळत नाहीं, तरी एकंदरीनें विचार करितां मराठेहि मूळचे आर्यच आहेत असेंच ठरतें. त्यांच्या रक्तांत द्रविडवंशाच्या रक्ताची मात्र थोडीअधिक भेसळ झाली असावी. अंथ्रोपोमेट्रिक प्रमाणाविषयी कांहीं विद्वान् तार्किकांची मजल उलट दिशेनें गेलेली आहे. कृत्रिम उपायांनीं डोकीं लांबट किंवा चपटीं करतां येतात व त्याचप्रमाणें नाकावर पण प्रयोग केल्यास नाकाला निराळा आकार देतां येतो असें प्रतिपादन करण्यास हे लोक मागेंपुढें पहात नाहींत. पण या मुद्यावर वादविवाद करतांना त्यांचा बराच तोल जाऊन ते घसरत आहेत असें म्हणावें लागतें. जर कृत्रिम उपायांनीं डोकें लांब करतां येतें किंवा केवळ ओढून ओढून नाकाची ठेवण सुबक करतां येती, तर बिचाऱ्या मानवजातिशास्त्राला या भूतलावरून पळच काढावा लागता. पण या शास्त्राप्रमाणें

मनुष्याचा वंश ठरविण्यास नाकाची ठेवण हें एक अचूक साधन ठरलें आहे. कारण, एखाद्यानें आपलें चपटें व रुंद नाक चांफेकळीसारखें बनविण्याचा कितीही प्रयत्न केला किंवा सुबक आकार देण्यासाठीं आपलें नाक यंत्रामध्यें घालून तो कितीही दिवस बसला, तरी त्याचें हट्टी नाक आपला पूर्वीचा आकार बदलणार नाहीं. वर सांगितलेली वस्तुस्थिति जर नसती तर हिंदुस्थानच्या द्राविडी लोकांनीं आपलीं चपटीं नाकें बदलून त्यांना केव्हांच चांगला आकार दिला असता. हिंदुस्थानांतच काय पण सगळ्या जगभर चांगलें नाक असणें हें भूषण मानतात. मग नाकें बदलण्याची आयती सोन्यासारखी युक्ति साध्य असतां तीं न बदलतां हात जोडून स्वस्थ बसण्याइतके द्राविडी लोक मूर्ख असतील असें निदान आम्हांला तरी वाटत नाहीं. तात्पर्य डोक्याचा किंवा नाकाचा आकार बदलण्याचे मनुष्याच्या हातांत असतें, तर मानवजातिशास्त्राला शास्त्र म्हणून कोणी विचारलें सुद्धां नसतें. यासाठीं एखाद्या मनुष्यजातीचा वंश ठरवितांना मानवजातिशास्त्राच्या प्रमाणालाच अग्रस्थान दिलें पाहिजे. एखादें निःसंशय ऐतिहासिक प्रमाण जर त्याच्याविरुद्ध जाऊं लागलें तर कदाचित् विचार पडेल; म्हणून या बाबतींत विशेषतः नाकाच्या बाबतींत मानवजातिशास्त्राचें काय म्हणणें आहे याचें विस्ताराने पर्यालोचन करूं.

प्रथम रिस्लेसाहेब आपल्या १९०१ सालच्या खानेसुमारीच्या रिपोर्टांत ( पृ० ४९८ ) काय म्हणतात तें पाहूं:—

“ रुंद नाक असणें ही द्राविडी किंवा निग्रो लोकांना ओळखण्याची मोठी खूण होय. नाकाचा रुंद आकार मद्रास, मध्यप्रांत व छोटानागपूर या प्रांतांत विशेषें करून दिसून येतो; नाकाची उंच निटस ठेवण पंजाब व बलुचिस्थान प्रांतांत आढळते; आणि हिंदुस्थानांतील बाकीच्या लोकांच्या नाकाचा आकार या दोन प्रमाणांच्या मध्यें असतो. पंजाबमधल्या शेतकरी गुजर लोकांच्या नाकांचें उंचीचें माप ६६-९ या प्रमाणांत असतें. शीख लोकांच्या नाकांचें प्रमाण ६८-९ व बंगाल्यांतील ब्राह्मण व कायस्थ यांचें ७० असून द्राविडी माल पहारी लोकांचीं नाकें तर ९४-५ या प्रमाणांत असतात. दुसऱ्या शब्दांत बोलावयाचें म्हणजे नीग्रो लोकांप्रमाणेंच माल

पहारी लोकांचीं नाकें जितकीं लांब तितकींच रुंद असतात; परंतु इंडो-आर्यन लोकांचीं नाकें पॅरिसमधल्या लोकांच्या नाकांप्रमाणेंच असतात. असें म्हणावयास कांहीं प्रत्यवाय नाहीं. कारण फ्रेंच शास्त्रज्ञ "सेना" यानें पॅरिसमधल्या ६८ लोकांच्या नाकांचीं मापे घेऊन असें दाखविलें आहे की, त्यांच्या नाकाची लांबी व रुंदी यांचे प्रमाण ६९-४ असें पडतें" वरील उताऱ्यावरून असे दिसून येतें की पंजाब व राजपुताना यांतील लोक आर्य आहेत, यांबद्दल मुळींच संशय नाहीं. इतकेंच नव्हे, तर मराठे आदिकरून मुंबईइलाख्यांतले लोकसुद्धां आर्य आहेत याबद्दल फारसा वाद करण्याचे कारण नाहीं. नाकाचा सुबक आकार असण्याबद्दल अग्रमान पंजाबांतील गुजर लोकांनाच दिला पाहिजे. कारण त्यांच्या नाकाचे रुंदीचे प्रमाण पॅरिसमधील लोकांच्या नाकापेक्षांही कमी आहे. पण दुराग्रहाने मनुष्य किती बहकतो हें याच गुजर लोकांना कित्येक इतिहासकार अनार्य ठरवूं पहातात यावरून दिसेल. शब्दसादृश्यावरून आजपर्यंत कित्येक पुराणइतिहाससंशोधक चकले आहेत व त्यांनीं निरनिराळ्या चुका केल्या आहेत. एकेकाळीं "जाट" व "जीटी" (हिराडोटसनें वर्णिलेले सिथियन लोक ) एकच होत असें मानण्यांत येत असे. आतां मात्र हें मत कोणी प्रतिपादन करीत नाहीं. त्याचप्रमाणे हल्लीं कोणी म्हणतात कीं, गुजर व खझर लोक एकच होत. परंतु मानवजातिशास्त्राचा व सत्याभिमान-लेशानें लिहिलेल्या इतिहासाचा जर कोठें उपयोग व्हावयाचा असेल, तर तो असल्याच ठिकाणी व्हावयाचा असतो. कारण शब्दसादृश्यावरून जर कोणी वाटेल तशीं अनुमानें बांधूं लागला व तर्क लढवूं लागला तर ह्या शास्त्रानें त्याला आळा घातला पाहिजे. जाट व गुजर लोकांच्या बाबतींत तर्कटीविचारसरणीचें पटल दूर करण्यासाठीं या शास्त्राचा बराच उपयोग होईल. रिस्ले यांनीं स्पष्टपणें मत दिले आहे कीं, जाट लोक इंडो-आर्यन लोकांत मोडतात. कारण हिंदुस्थानामध्ये वसाहतीसाठीं प्रथम आलेल्या आर्यलोकांप्रमाणें " यांचींही डोकीं लांबट असून नाकाचा दांडा अरुंद असून उंच आलेला पण फार लांब नसलेला असा असतो ( Census Report of 1901 p. 500 ). त्यांचा बांधा उंच असून रंग गोरा असतो" खुद्द नेस्फील्ड असें म्हणतो कीं, "जर चेहेरे-

पट्टीच्या प्रमाणाला कांहीं मान द्यावयाचा असेल, तर ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होते कीं, जाट लोक हे आर्यच असले पाहिजेत." गुजरलोकांसंबंधानें ही हेंच म्हणतां येईल. या लोकांचींहीं नाकें अतिशय सुंदर असतात व डोकीं लांब असून बांधा उंच असतो. त्यांचा रंग थोडासा काळसर असतो, पण मूळ वंश ठरवितांना वर्ण काळा का गोरा हा भेद फारसा मनांत आणीत नाहींत. "इंडो-आर्यन लोकांचीं मापें घेत असतां असें दिसून येतें कीं, वरच्या व खालच्या दर्जाच्या लोकांमध्ये फारसा फरक दिसून येत नाहीं. सर्व ठिकाणीं बहुतकरून एकच तऱ्हा व साम्य दिसतें." असें दिसण्याचें कारण हिंदुलोकांमध्यें रूढ असलेली वर्ण-व्यवस्थाच होय. कारण या व्यवस्थेमुळें एका जातीचा दुसऱ्या जातीशीं फारसा संबंध होत नाहीं व त्यामुळें वर्णसंकर होण्याचा प्रसंग थोडा येतो. याच कारणामुळें ज्या ज्या ठिकाणीं जाट व गुजर लोक सांपडतात त्या त्या ठिकाणीं त्यांचीं नाकें, बांधा व चेहेरा सारखाच सांपडतो. एकंदरींत विचार करितां मानवजातिशास्त्रावरून जाट व गुजर हे मूळचे आर्यच असले पाहिजेत असें सिद्ध होतें. कित्येक लोक शब्दसादृश्यावर आपली सर्व मदार राखून म्हणतात कीं, हल्लींचे जाट व गुजर लोक पूर्वीच्या जीटी व खजर लोकांचे वंशज आहेत. पण ते लोक तर त्यांच्या मूळपीठिकेवरून व चेहेऱ्यावरून सिथिअन व मंगोलियन आहेत यांत संशय नाहीं. सारांश, जाट व गुजर लोकांचा या लोकांशीं बादरायण संबंध लावण्यांत कित्येक विद्वानांनीं चूक केली आहे. हें कसें तें आपण पुढें सविस्तर पाहूं.

मराठ्यांच्या बाबतींत असलीं शारीरिक प्रमाणें स्पष्टपणें दिसून येत नाहींत. पण एवढ्यावरून ते आर्य नव्हत असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. जरी जाट व गुजर लोकांप्रमाणें ते अस्सल आर्य नाहींत, तरी त्यांची गणना आर्यलोकांमध्येंच करणें भाग आहे. रिस्ले साहेबांनीं मराठ्यांना स्किथोद्रविड लोकांमध्यें घातले, ही मोठी आश्चर्याची गोष्ट होय. त्यांचीं डोकीं रुंद असतात ही गोष्ट खरी. पण डोक्याच्या आकारावरून मनुष्याची पूर्वपीठिका अथवा वंश केव्हांही निश्चयानें ठरवितां येणार नाहीं. ही गोष्ट दुसऱ्या ठिकाणीं आम्ही सिद्ध केली आहे, व रिस्ले साहेबांनींही मान्य केली आहे.

मंगोलियन लोकांची डोकीं रुंद असतात ही गोष्ट आम्हांला कबूल आहे. पण केल्ट वगैरे लोक आर्य असून सुद्धां त्यांचीं डोकीं रुंद असतात याची वाट काय ? मराठे हे पूर्वीचे सिथिअन होते असें रिस्ले साहेबांचें म्हणणें आहे. पण या म्हणण्यावर पुढील म्हणजे १९११ सालच्या खानेसुमारीच्या रिपोर्टीतच आक्षेप घेतला आहे. इतकेंच नव्हे, तर ते बहुतकरून अल्पाइन आर्यांचे वंशज असावेत असेंही मत Haddon's Wanderings of peoples या पुस्तकाच्या आधारें तेथें प्रदर्शित केलें आहे. आम्ही आपल्या Epic India या पुस्तकांत दाखविलेंच आहे कीं, आर्य लोकांची जी दुसरी तुकडी ( चंद्रवंशी ) भरतखंडात आली, तिने मध्यप्रांत व दक्षिणदेश या प्रदेशांत आपल्या वसाहती केल्या; या आर्य लोकांची डोकीं रुंद असावींत असें अनुमात होते. असे जर नसतें, तर मध्यप्रदेशांतील लोकांची डोकीं मध्यम आकाराचीं असतात हे कसें संभवतें ? येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, मध्यदेशांतील लोकांनां रिस्ले साहेब आर्यो-द्रविडियन समजतात. द्राविडी लोकांचीं डोकीं तर **लांबट** असतात आणि पंजाब व राजपुताना या दोन ठिकाणीं वस्ती करून रहाणाऱ्या पहिल्या टोळीच्या आर्य लोकांचीं डोकींही लांबटच आहेत. मग या दोनजातींचे मिश्रण झालें असें जर गृहीत धरलें, तर दोन लांबट डोक्याचा लोकांपासून मध्यम आकाराचीं डोकीं कशीं निर्माण होतील ? यासाठीं दुसऱ्या खेपेला जी आर्यलोकांची टोळी भरतखडांत आली व जी मध्यदेश व दक्षिणदेश या ठिकाणीं वसाहत करून राहिली या लोकांचीं डोकीं रुंद होतीं व या प्रांतातील मूळच्या द्राविडी लोकांशीं त्यांचे शरीरसंबंध सुरूं झाले तेव्हां रुंद व लांब डोक्याच्या जातीचें मिश्रण झाल्यानें या प्रांतांत मध्यमप्रमाणाची डोकीं झालीं आहेत असें मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

आम्हीं वर म्हटलेंच आहे कीं, डोक्याचा आकार हा वंशाचा खात्री लायक पुरावा मानतां येत नाहीं; व रिस्ले साहेबांचें मतही असेंच आहे. वंश ठरविण्यास नाकासारखें दुसरें कोणतेंही साधन नाहीं. आर्यन्,द्रविडियन् किंवा सिथियन् वंश मनुष्याच्या नाकांवरूनच ओळखूं येतात. आर्यलोकांचीं नाकें उंच असतात तर द्राविडीलोकांची रुंदट असतात. तसेंच मंगोलियन

लोकांचीं तोंडें चपटीं व थबकट असतात म्हणजे नाके मुळांशी बसलेली असतात; पण आर्यलोकांच्या नाकांची ठेवण या उलट असते. मंगोलियन लोकांचीं थापटीं तोंडें वरवर पाहणाऱ्याच्याही लक्षांत आल्यावांचून रहात नाहींत. कारण त्यांच्या नाकाचा दांडा डोळयांच्या सपाटीपेक्षां फारसा वर आलेला दिसत नाहीं. ही उंची मोजण्या करतांच Orbito-nasal index म्हणून एक परिमाण बसविलें आहे व फौलर साहेबांनीं सुचविल्याप्रमाणें ज्या ठिकाणीं मंगोलियन लोकांशीं शरीरसंबंध झाल्याचा संशय येतो त्या-ठिकाणीं या परिमाणाचाच उपयोग करण्यांत येतो. (सेन्सस रिपोर्ट स. १९०१ पान ४९७ ). मराठे, गुजर किंवा जाट याच्यामध्यें मंगोलियन किंवा सिथिअन रक्ताची भेसळ झाली आहे किंवा काय याचा विचार करण्यासाठीं आपणास आतां वर सांगितलेल्या प्रमाणाकडेच वळलें पाहिजे. या बाबतींत कोणतीं प्रमाणे ठरविलीं गेलीं आहेत तें प्रथम पाहूं. चपटया तोंडांच्या मंगोलियन लोकांना platyopic असें नांव देतात, यांचें कारण त्यां नाकाच्या उंचीचें ( orbito-nasal Index ) प्रमाण ११० च्या खालीं पडतें. ज्याचें प्रमाण ११० व ११२.९ यांच्या दरम्यान असतें त्यांना mesopic असें म्हणतात व ज्यांचें प्रमाण ११३ च्या वर जातें त्यांना pro-opic असें नांव देण्यांत येतें. या प्रमाणांवरून असें दिसून येईल कीं जे लोक pro-opic वर्गांत मोडतात त्यांच्यांत मंगोलियन रक्ताची भेसळ असणें शक्य नाहीं. जे लोक इंडो-आर्यन म्हणून समजले गेले आहेत ते सर्व pro-opic वर्गांत येतात. ( से. रि. १९०१ पान ६०२ ) आणि म्हणूनच जाट व गुजर लोकामध्यें मंगोलियन रक्ताची भेसळ झाली आहे असें जें कांहीं लोक समजतात, तें अजीबात चुकीचें आहे. लांब डोकें, सरळ नाक, उंच बांधा या आर्यलोकांच्या सर्व हि खाणाखुणा जाट व गुजर लोकामध्यें दिसून येतात. शिवाय त्यांची तोंडें चपटीं नसतात आणि नाकाचा दांडा डोळ्याच्या सपाटीपेक्षां पुष्कळ उंच आलेला असतो. इतकें असून सुद्धां त्यांना कित्येक विद्वान् सिथिअन समजतात हें आश्चर्य नव्हे काय? मानवजातिशास्त्रावरून जाट व गुजर लोक आर्य असल्याबद्दल हा निर्विवाद पुरावा आहे. याचे विरुद्ध जर एखाद्यानें ते

सिथिअन असल्याबद्दलचा ऐतिहासिक पुरावा आणला तर त्या पुराव्याची योग्य छाननी झाल्याशिवाय त्याकडे फारसें लक्ष देण्याची अवश्यकता नाहीं.

मराठ्यांच्या बाबतींत orbito-nasal परिमाणावरून वंशाचा निश्चय करतानां थोडीशी शंका उपस्थित होते. त्यांच्या रुंद डोक्यावरून व नाकाच्या कमी सुंदर आकारावरून शंका घेण्यास जागा रहाते हें आम्हीं वर दाखविलेंच आहे, तशी याही प्रमाणांत रहाते. पण ते लोक सिथिअन असल्या बद्दलचा पुरावा जाट गुजरांप्रमाणें याही बाबतींत मिळत नाहीं असें आम्हांस वाटते. कारण आपण हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं द्रविडियन लोक mesopic वर्गांत म्हणजे मध्यमनाकाच्या वर्गांत मोडतात. इंडो-आर्यन लोकांमध्यें ज्याप्रमाणें नाकाचा दांडा डोळ्यांच्या सपाटीपेक्षां उंच आलेला असतो तसा जरी मराठ्यांमध्यें दिसत नाहीं, तरी मराठे लोक mesopic म्हणजे मध्यम प्रमाणाचे आहेत यांत शंका नाहीं. आम्ही वर सांगितलेंच आहे कीं मराठ्यांमध्ये द्राविडी लोकांचे मिश्रण आहे. Orbito-nasal प्रमाणावरून ते mesopic आहेत याचें कारण प्रारंभीं त्यांचा द्रविडी लोकांशीं शरीर-संबंध झाला हें होय. यावरून सिथिअन लोकांशींच त्यांचा संबंध आला असला पाहिजे असेंच मानण्याचें कारण नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांचा द्रविडी लोकांशींच संबंध झाला असला पाहिजे असे मानण्यास आणखी एक पुरावा मिळतो. कारण वर पाहणाऱ्यांच्या सुद्धां असें नजरेस येईल कीं वरिष्ठ दर्जाच्या मराठे लोकांमध्यें आर्य लोकांसारखी शरीराची व नाकाची ठेवण जास्तच प्रामुख्यानें दिसून येते. मराठे लोकांतील संपन्न व अधिकारी कुटुंबांत चपट्या तोंडाचा मागमूस दिसत नाहीं. त्यांची नाके उठावदार व सुंदर असतात व त्यांचा बांधा उंच असतो. यावरून असे सिद्ध होते कीं मराठे लोक mesopic जातींत मोडतात याचें कारण प्रारंभीं त्यांचा द्राविडी लोकांशी शरीर-संबंध झाला हें होय. या विषयाचा सांगोपांग विचार आम्ही आमच्या ( Epic India ) "एपिक इंडिया" नांवाच्या पुस्तकांत केलेला आहे या साठीं हा प्रश्न आम्हीं येथेंच सोडून देतों. परंतु जातां जातां एवढें मात्र सांगावेंसें वाटतें कीं जरी रिस्ले साहे-

यांनीं मराठे लोक सिथो-द्रविडियन आहेत असें आपलें मत दिलें आहे तरी हल्ली त्यांना आर्यो-द्रविडीयनच मानण्यांत येते असें १९११ साळच्या खानेसुमारीच्या सरकारी रिपोर्टांकरून दिसून येईल.

मानवजातिशास्त्राच्या आधारें आम्हीं जो सिद्धांत आतांपर्यंत प्रतिपादन केला आहे त्याला इतिहासाचाही आधार आहे असें पुढील विवेचनावर दिसून येईल. जाट किंवा गुजर लोकांपेक्षां मराठ्यांच्या बाबतींत या ऐतिहासिक प्रमाणाचा जास्त उपयोग होण्या सारखा आहे. कारण त्यांचा इतिहास बराच जुना असून विस्तृत व ज्ञात आहे. अशा इतिहासाची जीं साधनें उपलब्ध आहेत तीं विश्वसनीय ही आहेत. हीं साधनें एके ठिकाणीं करून डाक्तर भांडारकरांसारख्या नामांकित विद्वानांनीं मराठ्यांचे इतिहास लिहिले आहेत; व जी आणखी माहिती आम्हांस उपलब्ध झाली आहे तिची जोड आम्ही वरील माहितीस देणार आहों. या इतिहासांत पहिली जी गोष्ट सांगावयाची ती ही कीं ख्रिस्ती सना पूर्वीच कित्येक शतकें आर्यांचा शिरकाव दक्षिणेंत झाला होता व त्यांनीं येथें वसाहती केल्या होत्या, ही गोष्ट हल्लीं विद्वानांना मान्य झाली आहे. या आर्य लोकांनंतर कित्येक वर्षांनीं म्हणजे ख्रिस्तीसनानंतर पहिल्या शतकांत सिथिअन लोकांनी दक्षिण हिंदुस्थानावर स्वारी केली असें इतिहासावरून आपल्यास कळतें. पण ते येथें फार वर्षे राहिले नाहींत. कारण नाशिकच्या शिला-लेखांवरून असें दिसून येते कीं शातवाहन गौतमीपुत्र पुलुमायि यानें त्यांची लवकरच दक्षिणेंतून हकालपट्टी केली.

जर आपल्यास इतिहास वर प्रमाणें सांगतो तर दक्षिणेंतील लोक सिथो-द्रविडियन कसे असूं शकतील? सिथिअन लोकांपूर्वी आलेले व येथेंच राहिलेले जे आर्य लोक त्यांचा मागमूस सुद्धां राहूं नये काय? आर्य लोक पूर्वी महाराष्ट्रांत रहात असत ही गोष्ट निर्विवाद रीतीनें सिद्ध झाली आहे. डॉ. भांडारकर आर्य लोकांच्या वसाहती संबंधानें म्हणतात " दक्षिण हिंदुस्थानांत आर्य लोकांचा सर्वांत जुना व पहिला प्रांत म्हटला म्हणजे विदर्भ किंवा वऱ्हाड हा होय. रामायण व महाभारत यावरून असें दिसतें

कीं ज्यावेळीं दंडकारण्य किंवा महाराष्ट्र केवळ निर्जन अरण्य होतें, त्यावेळीं विदर्भ देशांत लोक-वस्ती होती" (सर भांडारकर यांचा दक्षिणचा इं. इतिहास पान ३०४ ). या विदर्भदेशांत रहाणाऱ्या लोकांना भोज असें म्हणत असत; दमयंती एका भोजराजाची मुलगी होती आणि महाभारतामध्यें दमयंतीला तिच्या बापाच्या देशाचा मार्ग दाखवितांना ज्या खाणाखुणा नल सांगतो, त्या हल्लींच्या वऱ्हाड प्रांताशीं तंतोतंत जुळतात.

यानंतर आर्य लोकांनीं दंडकारण्यांत म्हणजे महाराष्ट्रांत आपल्या वसाहती केल्या. या प्रांतांतील मुख्य नदी गोदावरी होय. तेथील मूळच्या रहिवाशांची संख्या आर्यांच्या मानानें अगदीं थोडी असल्यामुळें सर्वजण आर्यभाषाच बोलूं लागले. फरक एवढाच कीं, या भाषेला भ्रष्ट अर्थात् प्राकृत स्वरूप प्राप्त झालें. कृष्णानदीच्या दक्षिणेकडील भागांत मात्र द्राविडी लोकांची बरीच वस्ती होती. यामुळें आर्यांच्या वसाहतीची व भाषेची ही नदी जणूकाय सीमाच झाली आहे; परंतु आर्य लोकांच्या कांहीं टोळ्या थेट कन्याकुमारीपर्यंत जाऊन पोहोंचल्या व त्यांनीं आपला धर्म व संस्कृति तेथील लोकांमध्यें सुरू केली. तथापि तेथील मूळच्या रहिवाश्यांची भाषा मात्र त्यांना बदलतां आली नाहीं. उलट तेथील लोकांची भाषा आर्य हे थोडे असल्यामुळे यांनांच उचलावी लागली. इतकेंच नव्हे तर त्यांचे कांहीं रीतिरिवाजही यांनीं घेतले. आर्य लोकांच्या दक्षिणेंतील प्रसाराचे थोडक्यांत दिग्दर्शन असें आहे. डेक्कन अथवा महाराष्ट्र पूर्वीं अरण्यमय होता; व ह्या ठिकाणीं आर्यांच्या वसाहती झाल्यामुळें हा प्रदेश भाषेच्या व वसाहतीच्या दृष्टीनें आर्यच राहिला; परंतु याच्याही दक्षिणेकडील प्रदेश द्राविडी लोकांनीं गच्च भरलेला राहिला. दक्षिण हिंदुस्थानच्या या दोन भागांसंबंधाची ही ऐतिहासिक माहिती व मानवजातिशास्त्रादृष्ट्या तेथील लोकांचें नाकाचें प्रमाण कशीं तंतोतंत जुळतात हें यावरून दिसून येईल.

डा. भांडारकरांनीं निर्विवाद रीतीनें असें सिद्ध केलें आहे कीं, ख्रिस्तीसनापूर्वी सातव्या शतकाच्या सुमारास आर्य लोक दक्षिण हिंदुस्थानांत

राहूं लागले. या अनुमानाचा सबळ पुरावा त्यांनीं दिला आहे, तो हा कीं, विन्ध्यपर्वताच्या दक्षिणेकडील देशासंबंधानें पाणिनीनें कांहीं उल्लेख केलेला नसून, त्यांचा उल्लेख प्रथम कात्यायनानें आपल्या वार्तिकांत केलेला आहे. याहीपेक्षां निश्चित पुरावा ख्रिस्तीशकापूर्वीच्या तिसऱ्या शतकाच्या अशोकाच्या शिलालेखावरून मिळतो. कारण त्या लेखांत राष्ट्रिक, पेठेनिक आणि अपरान्त अशीं नांवें आढळतात. अपरांत म्हणजे उत्तर कोंकण होय व त्याची त्यावेळची राजधानी शूर्पारक होती. ( या ठिकाणीं दुसरी गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, बुद्ध लोकांच्या प्राचीन धर्मग्रंथांतून शूर्पारक व पैठण यांचा उल्लेख याच्याही पूर्वी कलेला दिसतो ).पैठण किंवा प्रतिष्ठान या ठिकाणीं रहाणाऱ्या लोकांना पैठणिक अशी संज्ञा दिली आहे; व हल्लींच्या मराठ्यांचे पूर्वज जे राष्ट्रिक त्यांचा उल्लेख रास्तिक या नांवानें आढळतो. अशोकाच्या शिलालेखांतून भोज लोकांचाहि नामनिर्देश झालेला आहे. कुडें येथील शिलालेखांत महाभोजांचा उल्लेख आहे, त्यावरून असें अनुमान निघतें कीं, निरनिराळ्या राष्ट्रांत रहाणाऱ्या राष्ट्रिक लोकांनी स्वतःस समुच्चयाने महाराष्ट्रिक असें म्हणून घेतलें. व त्यामुळें ते ज्या देशांत रहात होते, त्याला अखेरीस सहाजिक महाराष्ट्र असें नांव मिळालें. " याप्रमाणें पतंजलीच्या पूर्वी शंभर वर्षे उत्तर व दक्षिण यामध्यें दळणवळण चालू होतें व महाराष्ट्र किंवा दख्खनमध्यें रठ्ठ किंवा भोज लोकांचीं राज्यें होतीं." ( भांडारकर, दक्षिणचा इंग्रजी इतिहास पान ११ )

महाराष्ट्र शब्दाची उपपत्ति खालील रीतीनें आणखीं लागण्यासारखी आहे. महाभारतांत भीष्म पर्वामध्यें जीं लोकांचीं नांवें आली आहेत, त्यांत गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र व पांडुराष्ट्र अशा तीन राष्ट्रांचा उल्लेख आहे. पांचव्या शतकांच्या लेखांत नाशकाच्या भोंवतालच्या प्रदेशास गोपराष्ट्र म्हणत असत. अलाहाबाद येथें सांपडलेल्या समुद्रगुप्ताच्या स्तंभावरील लेखामध्यें देवराष्ट्र नांवाच्या आणखी एका राष्ट्राचा उल्लेख आलेला आहे. हीं राष्ट्रें व अश्मक, अपरांत आणि विदर्भ या सर्वांचा मिळून महाराष्ट्र देश गणला जात असे. या सर्व प्रांताची भाषाही एकच होती.

महाभारतांतील देशांच्या यादींत महाराष्ट्राचें नांव दिसत नाहीं. याचें कोणाला आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. महाभारतांत अनेक राष्ट्रांचा उल्लेख आहे व ख्रिस्तीशतकापूर्वी चवथ्या शतकांतील देशामध्यें त्या देशांचा पृथग् निर्देश झाला हें साहाजिक होय. अकराव्या शतकांतील हेमचंद्राच्या एका सूत्रावरून असें दिसतें कीं, मराठा व मराठी हे शब्द महाराष्ट्र व महाराष्ट्री या शब्दावरून साधले आहेत. कारण त्याच्या सूत्राअन्वयें अक्षर-विपर्यासाने महाराष्ट्र याचें मराहाट्ट असें रूप तयार होतें. हें नांव अजून-हि प्रचारांत आहे. या शब्दाचें पुढें मराठा असें पुन्हां वर्णव्यत्यासानें रूप बनलें.

यावरून निर्विवादरीतीनें असें सिद्ध होतें कीं, ख्रिस्तीशकापूर्वी तिसऱ्या शतकांत मराठा देशामध्यें राष्ट्रिक किंवा रठ्ठ या लोकांचीं विशेषें करून वस्ती होती. आतां, हे लोक कोण होते, असा प्रश्न उपस्थित होतो. ते आर्यच असले पाहिजेत. कारण जर ते द्राविडी असते, तर त्यांची भाषा आर्य कशी असती ? खालीं दक्षिणेंतील किंवा मद्रास इलाख्यांतील लोकां-प्रमाणें हेही द्राविडीच बोलते. या भाषेवरून काढलेल्या अनुमानाला दंत-कथेचाही आधार मिळतो. हरिवंशांत असें सांगितलें आहे कीं, चार नाग-कन्यांपासून झालेल्या यदूच्या चार पुत्रांनीं सह्याद्रीपासून थेट कन्याकुमारी पर्यंत चार राज्यें स्थापिलीं. त्याचप्रमाणें विदर्भ देशाचे भोजराजे सोमवंशी असून यदूच्या कुळांत उत्पन्न झालेले आहेत, असा उल्लेख हरिवंशांत सांपडतो. यावरून असें दिसतें कीं, हरिवंशाच्या हकीकतीप्रमाणें महाराष्ट्र व वऱ्हाड प्रांतांत प्रामुख्यानें वसाहती करून रहाणारे लोक सोमवंशी असून हिंदुस्थानांत आलेल्या दुसऱ्या टोळीच्या आर्यलोकांपैकीं होते. हरिवंश अति प्राचीन पुराण असून त्याचा काळ ख्रिस्तीसनापूर्वी पहिलें शतक होय.

परंपरागत दंतकथेवरून रठ्ठ व भोज लोक सोमवंशी क्षत्रिय होते याला पांचव्या व सहाव्या शतकांतील लेखांचा आधार मिळतो. आम्हांला येथें महाराष्ट्राच्या राजकीय इतिहासाची चर्चा करावयाची नाहीं. पण तेथील लोक कोणत्या वंशाचे होते हें समजण्यास थोडासा अवश्य तितका

राजकीय इतिहास देणें जरूर आहे. ख्रिस्तीसनापूर्वी सातव्यापासून तिसऱ्या शतकापर्यंत वऱ्हाड व महाराष्ट्र या प्रांतावर भोज व राष्ट्र राजांचें राज्य होतें असे मानण्यास कांहीं हरकत नाहीं. पुढें तिसऱ्या शतकांत हीं राज्यें अशोकाचीं मांडलिक राज्यें बनलीं. पण या प्रांतावर अशोकाची सार्वभौमसत्ता नांवालाच होती. हें नांवाचें सार्वभौमत्व पाटलीपुत्रांतील शुंग घराण्यापर्यंत तसेंच चालू होतें. कारण ख्रिस्ती सनापूर्वी दुसऱ्या शतकांत अग्निमित्राच्या वेळीं विदर्भदेशावर माधवसेनाचें राज्य होतें असें मालविकाग्निमित्रावरून दिसून येतें. ख्रिस्ती सनापूर्वी पहिल्या शतकापासून तों ख्रिस्तीसनानंतर तिसऱ्या शतकापर्यंत या देशावर आंध्रभृत्य किंवा पैठणचे "शातवाहन यांचे राज्य होतें. ( हे शातवाहन कोण होते याचा विचार आम्ही पुढें करणार आहों ) त्यानंतर राष्ट्रिक पुनः स्वतंत्र झाले व सहाव्या शतकांत चालुक्याकडून त्यांचा पराभव होईपर्यंत महाराष्ट्रामध्यें लहान लहान राष्ट्रिक राजे राज्य करीत होते. चालुक्यांच्या एका लेखामध्यें असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, एका राष्ट्रकूट राजाचा पराभव करूनच चालुक्य राजे बलाढ्य झाले. तात्पर्य ख्रिस्तीसनापूर्वी तिसऱ्या शतकापासून तों तहत ई. सनाच्या सहाव्या शतकापर्यंत राष्ट्रिक अर्धेमुर्धे स्वतंत्र होते व आपल्या घराण्याच्या पूर्वपीठिकाहि पण त्यांनीं राखून ठेविल्या असल्या पाहिजेत. या पूर्व पीठिकेच्या कथानकावरून असें दिसतें कीं, सोमवंशी यदूचा वंशज जो सात्यकी होऊन गेला, त्याच्यापासून राष्ट्रकूट घराणें उत्पन्न झालें असें मानलें गेलें होतें. देवगिरीच्या यादवांनीं ही आपली वंशावळी राखली आहे. हे यादव कृष्णापासून उत्पन्न झाले असल्यामुळें ते खरोखरच यादव आहेत असें त्यांच्या वंशावळींत लिहिलें आहे. सारांश, महाराष्ट्रामध्यें राज्य करणारीं यादव व राष्ट्रकूट नांवाचीं जीं घराणीं होतीं, तीं आपल्याला सोमवंशी आर्य समजत असत, असें त्यांच्या पूर्वपीठिकेवरून दिसतें, व ही पूर्वपीठिका पांचव्या शतकांतील शिलालेखामध्यें उपलब्ध असल्यामुळें ऐतिहासिक आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां आपण चालुक्यासंबंधानें विचार करूं. हे चालुक्य ७ व्या व ८ व्या शतकांत महाराष्ट्रांत साम्राज्य करीत होते. प्रथम, शिलालेखांच्या

आधारें व तत्कालीन इतर लेखांच्या आधारें डा. भांडारकर आपल्या दख्खनच्या इतिहासांत काय म्हणतात तें पाहूं. " शिलालेखांवरून आपल्याला दिसून आलेंच आहे कीं, फार प्राचीन काळापासून क्षत्रिय जातीचे भोज, राष्ट्रिक व राठ्ठी लोकांचें या देशांत वर्चस्व होतें. दख्खनच्या उत्तर भागांत ते आपणास महाराठ्ठी म्हणत असत. दख्खनच्या इतर भागांत त्यांना नुसते राठ्ठी असें म्हणत असत. कारण दक्षिण महाराष्ट्रांतील एक राजा आपणास रठ्ठी हल्लीं हि म्हणत होता. ह्यांतील कांहीं राठ्ठी घराण्यांनीं एक संघ किंवा कूट स्थापन केला असेल. त्यामुळें त्यांना राष्ट्रकूट असें नांव प्राप्त झालें. किंवा सर्व देशभर पसरलेल्या राठ्ठ घराण्यांची ही एक प्रमुख शाखा असल्यामुळें त्यांना राष्ट्रकूट असे नांव मिळालें असेल. " ( पृ. ४६ ) त्याचप्रमाणें " बहुतकरून राष्ट्रकूट घराणें हे क्षत्रियांची एक प्रमुख शाखा होती व त्यावरून महाराष्ट्राला ह्लीचे नांव मिळालें आहे. हें राष्ट्रकूट घराणें अशोकाच्या वेळींही होतें असें दिसून येतें. " ( पृ. ६२ ) त्यानंतर सर भांडारकर म्हणतात " ह्या देशांतले खरे राज्यकर्ते जरी राष्ट्रकूट होते, तरी कधीं कधीं चालुक्य, शातवाहन यासारख्या परदेशी लोकांच्या पराक्रमामुळें त्यांच्या वर्चस्वाला हरताळ लागण्याचा प्रसंग येत असे. " हे चालुक्य परदेशी म्हणजे हिंदुस्थानच्या बाहेरचे लोक नव्हते. महाराष्ट्रांत ते बाहेरून आलेले म्हणजे राष्ट्रकूटांच्या फार मागून आलेले होते असा भांडारकरांचे म्हणण्याचा आशय आहे. शातवाहन महाराष्ट्राच्या बाहेरचे पूर्वेकडील धनकटक ( उत्तरसरकार ) प्रांतांतून इकडे आले होते, हें प्रसिद्धच आहे. ( ते बहुतकरून आर्य व द्रविड यांच्या मिश्रणापासून झाले असावेत व त्यांच्या दंतकथेंतसुद्धां असें मानलेलें आहे कीं, त्यांचा जन्म शेष किंवा नाग कुळांत झाला आहे. यावरून अर्थात् असें सिद्ध होतें कीं, ते नाग वंशाचे लोक होते. शातवाहन हळूहळू बलाढ्य होऊन त्यांनीं कण्वांपासून पाटलीपुत्रांचें राज्य हिसकून घेतलें व महाराष्ट्राची साम्राज्यसत्ता आयतीच हातांत पडल्यामुळें त्यांना पैठण येथें आपलें बलाढ्य राज्य स्थापितां आलें. ते ह्याठिकाणीं दोन तीन शतकें राज्यकारभार चालवीत होते. त्यांच्या कारकीर्दीत शक व पेल्हवी लोकांनीं महाराष्ट्रावर चाल करून तेथें वीस

वर्षे आपला ताबा चालविला. पण पुढें शातवाहन राजांनीं त्यांचा पुरा मोड करून त्यांची हकालपट्टी केली. यावरून असे दिसतें कीं शालवाहन लोक महाराष्ट्राबाहेरचे पण सिथिअन नसून आर्य व द्रविड यांच्या मिश्रणापासून झालेले होते. चालुक्यांची ही गोष्ट अशीच होती. मुखत्वेंकरून महाराष्ट्राच्या दक्षिण भागांत दक्षिणेंत मूळ वसाहती करून रहाणाऱ्या प्राचीन आर्य लोकांपैकीं जरी ते नव्हते तरी ते आर्यवंशी अयोध्येकडून आलेले होते असे ते समजत. नंतर नंतर चालुक्य आपणांस सोमवंशी समजूं लागले तरी ते मुळचे सोमवंशी नसावेत. बिल्हणानें विक्रमांकदेव चरितामध्यें त्यांची जी मूळपीठिका दिलेली आहे व कित्येक शिलालेखामध्येही जिचा उल्लेख सांपडतो त्यावरून ते मुळांत अयोध्या प्रांतांतून आले असें म्हटलें आहे; म्हणून ते सूर्यवंशी क्षत्रिय असावेत. याचा बराच सबळ पुरावा शिलालेखांवरूनही मिळतो, तो कसा तें आपण पाहूं.

चालुक्यांच्या प्राचीन दानलेखाच्या ताम्रपटांतून असें वर्णिलेलें आहे कीं (उदाहरणार्थ प्रख्यात दुसऱ्या पुलकेशीचा दानलेख पहा Ep. Ind. III p. 51) चालुक्य मानव्य गोत्रांत उत्पन्न झाले असून हारीतीचे वंशज होते. ही हारीती कोण याचा अजून कोणाला थांग लागला नाहीं. पण मानव्य म्हणजे कोणी मनूचा मुलगा असावा व यावरून चालुक्य सूर्यवंशी होते असें अनुमान निघतें. उत्तर हिंदुस्थानांतले चालुक्य किंवा सोळंखी लोक सूर्यवंशी नसून अग्निकुळांतले आहेत अशी समजूत आहे पण हाही एक मागाहूनचा चुकीचा समज आहे, असें आतां सिद्ध झालें आहे. दक्षिणेंतील चालुक्य लोक ज्ञातीनें मराठे म्हणजे महाराष्ट्र क्षत्रिय होते आणि राष्ट्रकूट व दुसऱ्या कांहीं घराण्यांमध्यें त्यांचे बेटीव्यवहार चालत हें तर उघड आहे. दन्तिदुर्गाच्या एका दानलेखामध्यें ( हा राष्ट्रकूट घराण्यांपैकीं होता J. B. R. A. S. Vol. II ) असें लिहिलें आहे कीं इन्द्र राष्ट्रकूटाची राणी आपल्या आईच्या बाजूनें सोमवंशी होती व बापाच्या बाजूनें शलुक्य वंशाची होती (राज्ञी सोमान्वयी तस्य पितृतश्च शलुक्यजा). कांहींचें असें मत आहे कीं, या ठिकाणीं सोमान्वयी शब्दांत–राष्ट्रकूट घराण्यांत ती कशी पडली असती ? म्हणून असें दिसतें कीं ती यादव किंवा अशाच दुसऱ्या एखाद्या सोमवंशी कुलाचा

या ठिकाणीं उल्लेख असावा. असो, सोमान्वय व शलुक्य यांचा एकत्र विरुद्ध-तेनें उल्लेख केला असल्यामुळें शलुक्य लोक सूर्यवंशी होते असें मानित असत असें दिसतें. चालुक्यांच्या लेखामधून मानव्यगोत्राचा नेहमीं उल्लेख आढळतो, यावरून आम्हीं जें अनुमान काढलें आहे त्याला राष्ट्रकूटांच्या लेखांतील सदरील वाक्यावरून बळकट आधार मिळतो.

जर एखादी दंतकथा पुष्कळ दिवस प्रचारांत असेल तर तिच्यांत सत्याचा बराच अंश असतो. पांचव्या व सहव्या शतकांतील शिलालेखांवरून असें दिसतें कीं, महाराष्ट्रांतील क्षत्रिय लोकांमध्यें सुद्धां ही दंतकथा त्याकाळीं प्रचलित होती. पुलकेशी राजा क्षत्रिय घराण्यांतील होता असें ह्युएनत्संग एके ठिकाणीं स्पष्ट लिहितो. त्यावरून चालुक्य राजे ह्युएनत्संगाच्या वेळीं आर्य-क्षत्रिय मानले जात असत, हे निःसंशय सिद्ध होतें; व त्यावरून या दंत-कथेला भक्कम पुरावा मिळतो.त्याचप्रमाणें ह्युएनत्संग म्हणतो,पुलकेशी राजा **महाराष्ट्रांत** राज्य करीत होता व तो जातीनें मराठा होता. चालुक्य सैन्य हें कर्नाटकांतलें होतें हें विधान राष्ट्रकूटाशीं झगडणाऱ्या अर्वाचीन चालुक्या-संबंधानें केलें तर कदाचित् चालेल. परंतु प्राचीन चालुक्य राजे प्रमुखत्वानें मराठे असून त्यांच्या देशाला महाराष्ट्र ही संज्ञा होती. हल्लीं सुद्धां त्या देशाला दक्षिणेकडील महाराष्ट्र देश असेंच नांव आहे.

असो. मराठ्यांमध्यें ज्या परंपरागत दंतकथा हल्लींहि प्रचलित आहेत त्यावरून आमच्या मताला जास्तच पुष्टि मिळते. मराठे लोकांत सोम, सूर्य व शेष असे तीन वंश मानले जातात, व या तीन वंशांतच मराठ्यांच्या सुप्रसिद्ध ९६ कुलांचा अंतर्भाव होतो. या ९६ कुळांत चालुक्य किंवा चालके घराण्याची गणना होते व ते सूर्यवंशी आहेत असें अद्यापहि मानण्यांत येतें. कोल्हापुर येथें छापलेल्या " वंशावळी व शाहाण्णवकुळी " नांवाच्या पोथींत व त्याचप्रमाणें तेथें छापलेल्या "क्षात्रवंशसागर" नांवाच्या पुस्तकांत चालके व साळुंके हीं मराठे घराणीं सूर्यवंशी असल्याबद्दलचा उल्लेख आहे. सहाव्या शतकापूर्वीच्या कदंबाच्या शिलालेखावरून असें दिसतें ( Ind. Ant. Vol. p.24) कीं कदंबही स्वतःला मानव्य-सगोत्र व हारीतीपुत्र असें म्हणवून घेत असत. किंवा दुसऱ्या शब्दांत बोलावयाचें तर ते स्वतःला क्षत्रिय सम-

जत असत. पूर्वीचे कदंब म्हणजेच हल्लींचे कदम होत, व वर सांगितलेल्या पुस्तकांत कदम सूर्यवंशी असल्याबद्दल लिहिलें आहे. चालुक्य ( शलुक्य किंवा साळुंखी ) व कदंब (कदम) लोक सूर्यवंशी मराठे होते आणि राष्ट्रकूट व यादव (जाधव=यादव) हे सोमवंशी मराठे होते. असा हा या घराण्याच्या वंशसंप्रदाय पांचव्या सहाव्या शतकापासून आज तागाईत सारखा प्रचलित आहे. ( क्षात्रवंशसागर पृ. ४५ यांत सांगितल्याप्रमाणें हल्लींच्या ९६ कुळा-मध्यें राष्ट्रकूटांचा उल्लेख भाले, खंडागळे किंवा अशाच दुसऱ्या नांवानें होत असतो ). अशा रीतीनें हुएनत्संगचें विधान व पांचव्या शतकापासून आज तागाईत चालत आलेला वंश-संप्रदाय यावरून असें सिद्ध होतें कीं पुलकेशी चालुक्य हा सूर्यवंशी क्षत्रिय ह्मणजे आर्य राजा होता; किंवा आधुनिक शब्द जर वापरावयाचा असेल तर तो मराठा क्षत्रिय राजा होता.

पूर्व चालुक्य राजे मराठे होते याबद्दल कोणास आतां संशय उरणार नाहीं असें वाटतें. पण त्याच्या जोडीला दुसरा एक प्रश्न उपस्थित होतो. पल्लव राजे कोण होते ? दक्षिण हिंदुस्थान व मराठयांचा देश यामध्यें राहणारे पल्लव घराण्यांतील लोक हेही आर्यच असले पाहिजेत असें आमचें मत आहे. या बाबतींतही शब्दसादृश्यामुळें कित्येक विद्वान् लोकांची दिशाभूल झाली आहे. ज्यांचा नेहमी शक लोकांबरोबर उल्लेख होतो असे पेल्हवी लोक व पल्लव हे एकच आहेत व त्यावरून ते सिथिअन लोक असले पाहिजेत असा निर्मूळ तर्क या विद्वानांनीं लढविला आहे. परंतु हे दोन शब्द निरनिराळे आहेत हें कोणाच्याही लक्षांत येईल. संस्कृत भाषेंतसुद्धां वरील शब्द पल्हव असाच लिहिलेला आढळतो. ( मनुस्मृति पहा ). पण चवथ्या शतकांतील पल्लवांच्या संस्कृत शिलालेखामध्येंहि पल्लव ( हकार-विरहित ) असाच नामनिर्देश आढळतो, पल्हव असा शब्द लिहिलेला आढळत नाहीं. संस्कृत मधील अक्षर-व्यवस्था अतिशय शुद्ध आहे. त्यामुळें जर पल्लव लोक स्वतःला पल्हव कुळांतले मानीत असते तर त्यांनीं संस्कृत शिलालेखांतून तेंच नांव वापरलें असतें. पल्लवचालुक्य यांचा बेटीव्यवहार होत असे ( तस्यासी द्विजयादित्यो विष्णुवर्धनभूपतेः । पल्लवान्वयजाताया महादेव्याश्च नन्दनः

Hultzsch South Ind. Ins. Vol. I p. 53 ). चोल, पांड्य, चेर केरल वगैरे जीं दक्षिण हिंदुस्थानांत सुप्रसिद्ध द्रविड राजघराणीं रहात होतीं त्यांत पल्लवांचें नांव आढळत नाहीं, कारण ते बाहेरून आले होते. यावरून ते सिथिअन होते असें मात्र सिद्ध होत नाहीं. बहुतकरून महाराष्ट्रांत वसाहती करून राहिलेल्या आर्य घराण्यांपैकींच ते असावेत. प्राचीनकाळीं महाराष्ट्रांतील लोक आजुबाजूच्या प्रदेशांत स्वाऱ्या करून महाराष्ट्राबाहेर आपलीं राज्यें वसवीत असत. हे प्रदेश म्हणजे दक्षिण हिंदुस्थान, कर्नाटक, गुजराथ, माळवा वगैरे होते. सर भांडारकर आपल्या दक्षिण हिंदुस्थानच्या इतिहासांत म्हणतात त्याप्रमाणें उत्तर हिंदुस्थान व बंगाला या प्रांतात सुद्धां यांनीं त्याचवेळीं शिरकाव केला होता. त्याचप्रमाणे अर्वाचीन काळी मराठ्यांनीं तंजावर, रामदुर्ग, बडोदे, माळवा, ग्वाल्हेर इत्यादि ठिकाणीं आपलीं राज्यें स्थापिलीं. तात्पर्य पल्लव लोक महाराष्ट्रीय आर्य लोकांची एक शाखा असावी असें वाटतें; व ९६ कुळांमध्यें पालवे या उपनांवाचा उल्लेखहि आहे, त्यावरून या मताला जास्तच पुष्टी मिळते. हल्लीं भारद्वाज गोत्री पवार जातीमध्यें पालवे लोकांची गणना करितात. आश्चर्याची गोष्ट ही कीं, पूर्वीच्या शिलालेखांत पल्लव लोकांचें हेंच गोत्र आढळून येतें. याविषयीं अधिक उल्लेख पल्लवांच्या इतिहासांत येणार आहे.

वर दिलेल्या मराठे वंशाच्या विस्तृत इतिहासावरून असें दिसून येतें कीं, मराठे लोक आर्यच होते. सिथिअन लोकांचा दक्षिणेंतील लोकाशीं संबंध असल्याचा ऐतिहासिक पुरावा थोडा सुद्धां उपलब्ध नाहीं. पहिल्या शतकाच्या सुमारास शक व पल्हव नांवाच्या सिथिअन लोकांनीं महाराष्ट्रापर्यंत स्वाऱ्या केल्या होत्या; परंतु सर भांडारकर म्हणतात “ ह्या प्रमाणें ( इतिहास सदर पान २८ ) गौतमीपुत्र व पुलमायी यांनीं त्यांचा पुरा मोड करून त्यास महाराष्ट्रांतून हांकून दिलें; त्यामुळें खगारात घराण्याचें मूळ येथें जीव धरूं शकलें नाहीं. ” ( नासिक कोरीवलेण्यांतील शिला-लेख ). यावरून असें सिद्ध होतें कीं महाराष्ट्री लोकांमध्यें सिथिअन लोकांची भेसळ मुळींच झालेली नाहीं. त्यांच्यामध्यें द्रविडी रक्ताचें मिश्रण आहे ही गोष्ट मान्य आहे. कारण इतिहासावरून असें दिसतें कीं

महाराष्ट्री लोकांचे द्रविडी लोकांशीं बेटीव्यवहार होत असत. परंतु हें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे कीं त्यांच्यामध्यें द्रविडी रक्तापेक्षां आर्यांचें रक्त जास्त आहे. सहाव्या शतकांत चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, हैहय, कदंब, नल, पल्लव वगैरे जीं आर्य क्षत्रिय घराणीं नांदत होतीं, त्यांचेच हल्लींचें वंशज सोळंखे किंवा चाळके, भालेराव, जाधव, कदम, नलवडे, पालवे वगैरे मराठे लोक होत. सारांश मराठ्यांची दक्षिणेंतील प्रसाराची जी ऐतिहासिक माहिती वर दिली आहे तिचा, त्यांच्या तोंडवळ्यावरून काढलेल्या अनुमानाशीं, चांगलाच मेळ बसतो. अशा रीतीनें ऐतिहासिक पुराव्याची व मानवजातिशास्त्राच्या प्रमाणाची जोडच मिळून मराठे हे सिथोद्रविडियन लोक नसून आर्योद्रविडियन आहेत हा सिद्धान्त दृढ होतो.

आतां आपण गुर्जर लोकांच्या इतिहासासंबंधाने विचार करूं. इसवी सन. ६४१ च्या सुमारास असलेल्या दोन गुर्जर राज्यांचा उल्लेख ह्युएनत्संग यानें केला आहे; एक भिनमाल येथें म्हणजे हल्लींच्या राजपुताना प्रांतांत व दुसरें नर्मदा नदीच्या कांठीं भडोच येथें म्हणजे हल्लींच्या गुजराथ प्रांतांत. यांतील दुसऱ्या राज्याच्या उपलब्ध असलेल्या माहिती वरून असें दिसतें कीं तें पहिल्या दद्दानें स्थापन केलें होतें. बहुतकरून हें राज्य इ. स. ५८० च्या सुमारास राजपुतान्यांतील राज्यापासूनच फुटून बाहेर पडलें असावें. या सनापूर्वी गुर्जरांचा उल्लेख असल्याबद्दलचा अद्याप कोठेंही पुरावा मिळाला नाहीं.

अय्यर यांच्या Ancient India वरून असें दिसतें कीं तिसऱ्या शतकांत लिहिलेल्या ' मणिमेखलै ' नांवाच्या तामिल काव्यांत गुर्जर लोकांचा उल्लेख आलेला आहे ( पृ. ३६९ पहा ). या काव्यांत गुर्जर लोकांच्या कारागिरीची बरीच स्तुति केलेली आढळते."पुहार येथें बांधलेल्या देवळावरून त्यांचा उत्तम कारागिरपणा दिसून येतो." ( पृ. ६७ ) यावरून गुर्जर लोकांचा उल्लेख तिसऱ्या शतकापर्यंत मागें जातो. पांचव्या शतकाच्या शेवटीं गुर्जर लोक हूण लोकांबरोबर आले असून ते परदेशी होते असें जें कोणी अनुमान काढलें आहे त्याचें यावरील विधानानें स्पष्ट निरसन होईल. पण कदाचित् यावरून अय्यंगरचेंच म्हणणें खोटें आहे असें

दिसून येईल. कारण ते म्हणतात कीं तामिल भाषेंतील काव्यांचा काळ व संगमचा भाग नवव्या शतकांत येत नसून तिसऱ्या शतकांत येतो. असो. हें एक गूढच आहे. परंतु तामिळ भाषेंतील संगमचा काळ अद्यापि निश्चित झाला नसल्यामुळें आम्ही ह्या ग्रंथांत त्याचा अधिक विचार केला नाहीं.

पांचव्या शतकाच्या शेवटीं गुर्जर लोकांविषयीं उल्लेख व हूण लोकांच्या हिंदुस्थानांतील स्वाऱ्या या दोन्ही गोष्टी समकालीन आहेत. परंतु यावरून गुर्जर लोक हिंदुस्थानांत बाहेरून आले असें मात्र सिद्ध होत नाहीं. हें सिद्ध होण्यास गुर्जर लोक हिंदुस्थानांत बाहेरून आल्याचा प्रत्यक्ष पुरावा पाहिजे. किंवा शब्दसादृश्याच्या विलक्षण मोहामुळे ज्या खझर लोकांशीं गुर्जर लोकांचें तादात्म्य करण्यांत येते त्या खझर लोकांचा तरी हिंदुस्थानांत आल्याबद्दलचा पुरावा मिळाला पाहिजे. या लोकांच्या येण्यासंबंधाचा जोंपर्यंत मुळीच पुरावा मिळाला नाहीं, तोपर्यंत गुर्जर लोक परदेशी आहेत असे कोणीही कबूल करणार नाहीं. मानवजातिशास्त्राचा पुरावा याच्या विरुद्ध पडतो व त्यामुळें गुजर आर्य असल्याबद्दलचा सिद्धांत विरुद्ध पुरावा ऐतिहासिक मिळालेला नसल्यानें निश्चित समजला पाहिजे.

मिस्तर डी. आर. भांडारकर यांनी आपल्या Foreign Elements in the Indian Population ( Ind. Ant XI ) या लेखांत या मताचा पुरस्कार केला आहे पण तें मत या बाबतीत टिकूं शकत नाहीं. खझर व गुर्जर एकच होत असें त्यांनीं प्रतिपादन केले आहे, परंतु मोठमोठया विद्वान् मानवजातिशास्त्रज्ञांच्या मतें खझर लोक जरी गौरकाय हूणांच्याच वंशातील नसले तरी त्यांच्याशीं यांचा बराच जवळचा संबंध आहे. गौरकाय हूणलोक मंगोलियनवंशाचे होते. कारण त्यांचीं तोंडें चपटी होतीं; आणि खझर लोकांचीही चेहेरेपट्टी तशीच असली पाहिजे. पण आम्ही वर दाखविलेंच आहे कीं गुजर लोकांच्या नाकाचा दांडा डोळयाच्या सपाटीपेक्षां फार उंच असल्यामुळें ते आर्य असले पाहिजेत असें अनुमान निघतें. त्याचप्रमाणें गुजर लोकांचा वर्ण काळसर असतो. परंतु खझर लोकांचा व गौरकाय हूणलोकांचा वर्ण त्यांच्या अगदीं उलट आहे " खझर लोक गौरकाय असून फार सुंदर होते आणि त्यांच्या बायकांच्या सौंदर्याबद्दल ख्याती

होती " ( एन्सायक्लोपीडिया पहा. ) हिंदुस्थानांतहि हूणस्त्रियांची त्यांच्या सौंदर्यामुळें चहा होत असे. सारांश, नाकावरून चेहऱ्यावरून किंवा दुसऱ्या कोणत्याही गोष्टीवरून खझर लोक हिंदुस्थानांतील गुजर लोकांचे पूर्वज होऊं शकत नाहींत.

एन्सायक्लोपीडियांतील खझर लोकांवरील लेखांमध्यें कांहीं आणखी महत्वाच्या गोष्टींचा उल्लेख केलेला आहे (१) शक. यूची, व हूण लोकांप्रमाणें, खजर लोक **आपला देश सोडून बाहेरदेशी गेल्याबद्दलचा ऐतिहासिक पुरावा कोठेंही उपलब्ध नाहीं**. इराण व वायझांटाईन या दरमियान त्यांचा देश आहे. त्याची दक्षिणेकडील सीमा फारशी बदलली नाहीं. **"कॉकेसस् मधून यांचें पाऊल बाहेर हाललें नाहीं** " (२) त्याचप्रमाणें त्यांचे धंदेही निराळे होते. "कास्पियनवरील व्हेनीशियन लोक म्हणजे ने आण करणारे व्यापारी खझरच होते. म्हणजे ते लोक व्यापारी असून त्यांनीं पुष्कळ शहरें स्थापन केलीं होतीं. व त्यांच्यामध्यें मोठमोठया राजकीय संस्था होत्या." आतां हिंदुस्थानच्या गुजर लोकांचा धंदा गुरेंढोरें बाळगून त्यांवर उपजीविका करणें हा होय; व गुरें चोरण्याबद्दल त्यांची सर्वत्र ख्याति आहे. (३) खझर लोकांची काराखझर नांवाची म्हणजे काळ्या रंगाची जात होती. **परंतु " ते कुरूप असून खुज होते.** " सारांश मानव जातिशास्त्रावरून व इतिहासावरून विचार करतां खझर व गुजर लोकांचा कांही सुद्धां संबंध दिसत नाहीं. गुजर लोक बाहेरून हिंदुस्थानांत आले या संबंधानें ज्याप्रमाणें मुळींच आधार मिळत नाहीं त्याचप्रमाणें हे खझर लोक आपल्या देशाच्या बाहेर पडल्याचाही उल्लेख कोठें आढळत नाहीं. केवळ नामसादृश्यावरून काढलेलें मिस्तर भांडारकरांचें हे अनुमान कोतें आहे.

मि. भांडारकरांचे दुसरे मुद्देही असेच कोते आहेत. प्रथम नांवासंबंधानें विचार करूं. डी. आर. भांडारकर म्हणतात कीं ( इंडियन-आंटिकरि व्हा० ११ पान १२१ ) गुजर शब्दाचें गुर्जर हें संस्कृत नांव बनविलें आहे. प्राकृत भाषेतील वर्णविकाराच्या नियमाप्रमाणें गुर्जर या संस्कृत शब्दाचे गूजर प्राकृत रूपांतर झालें आहे हे कोणाच्याही लक्षांत येईल. ( गुर्जर =गुज्जर=गूजर अशी ह्या शब्दाची तीन्हीं रूपें अद्याप प्रचा-

रांत आहेत.) परंतु जर मूळचें नांव गुजर असें होतें तर या शब्दाला संस्कृत पोषाख देतांना हा "र"कार मध्येंच कसा घुसला? * संस्कृत मध्यें ह्रस्व किंवा दीर्घ स्वर दोन्हीं चालतात; त्याचप्रमाणें कोणतेंही जोडाक्षर चालतें. बाण कवीला ज्याप्रमाणें गुर्जर–प्रजागर हा शब्द लिहितां आला त्याचप्रमाणें गूजर–प्रजागर हाही लिहितां आला असता. यावरून असें दिसतें कीं, मि. भांडारकर म्हणतात त्याप्रमाणें वस्तुस्थिति नसून त्याच्या उलट आहे. गुर्जर लोक पंजाबांत रहाणारे असून ढोरें गुरें बाळगून आपला उदरनिर्वाह करीत असत भागवतांत सांगितलेल्या गोकुळांतील वैश्याप्रमाणेंच त्यांना आपल्या गुरांना चारण्यासाठीं रानावनांतून हिंडावें लागत असे.

गुर्जर लोक हे हिंदुस्थानांत आलेल्या दुसऱ्या आर्यलोकांचे वंशज आहेत. असें दिसतें. या टोळीविषयीं विस्तृत माहिती आम्ही आपल्या एपिक इंडिया या पुस्तकांत दिली आहे. आतां गुर्जरामध्ये केवळ गुरांवर उदरनिर्वाह करणारे वैश्य लोकच( कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ) होते असें मात्र कोणी समजूं नये. कारण त्यांच्यांत ब्राह्मण व क्षत्रिय लोक सुद्धां होते. उदाहरणार्थ महाराष्ट्र शब्द पहा. जरी महाराष्ट्र हा शब्द दक्षिणेंतील शेतकरी लोकांनाच मुख्यत्वें करून लागू पडतो तरी त्यांच्यामध्यें ब्राह्मण व वैश्य यांचाही अंतर्भाव होतो. हूण लोकांच्या स्वाऱ्यामुळें हे पंजाबचे रहिवाशी गुर्जर पंजाबांतून राजपुतान्यांत जाऊन राहिले असले पाहिजेत. कारण अशा गोष्टी हिंदुस्थानच्या इतिहासांत पुष्कळदां घडल्या आहेत. यामुळें जरी त्यांचे मूळ वसतिस्थान पंजाब होतें तरी गुर्जर लोकांचें पहिलें राज्य पंजाबाच्या बाहेर स्थापन केलें गेलें. याच राज्याचा उल्लेख हुएनत्संग यानें केला आहे. हुएनत्संग म्हणतो त्याप्रमाणें गुर्जर राजाला त्याकाळीं क्षत्रिय मानीत असत. एखादा राजा जर वैश्य किंवा शूद्र असेल तर तो वैश्य किंवा शूद्र आहे असें म्हणावयास हुएनत्संग कोठेंही कचरला नाहीं. सम्राट् हर्ष हा जरी त्याचा आश्रयदाता होता तरी तो

---

* दुसरें असें कीं शब्दांचें रूप असें संस्कृतांत पालटून काय उपयोग झाला असेल कोणास ठाऊक? कारण गुर्जर शब्दाला संस्कृतभाषेमध्यें स्वतःचा असा कांहींच अर्थ नाहीं.

वैश्य जातीचा होता असें त्यानें स्पष्टपणें लिहून ठेविलें आहे. यामुळें गुर्जर राजा क्षत्रिय असल्याबद्दलची त्याची साक्ष फार महत्त्वाची आहे; कारण त्यावरून गुर्जर राजा आर्य होता हें निर्विवाद सिद्ध होतें. अशी वस्तुस्थिति असून सुद्धां डी. आर. भांडारकरांनीं ओढूनताणून याचा भलताच अर्थ केला आहे. ते म्हणतात "सातव्या शतकाच्या पहिल्या पन्नास वर्षांत म्हणजे हिंदुस्थानांत येऊन एक शतक उलटलें नाहीं तोंच गुर्जर लोकांना हिंदु मानण्यांत येऊं लागलें.इतकेंच नव्हे तर ते क्षत्रियही बनले." खरें म्हटलें असतां मि. भांडारकरांनीं याच्या उलट प्रतिपादन करावयास पाहिजे होतें. कारण यावरून गुर्जर लोक परदेशी नाहींत हेच सिद्ध होतें.हिंदुस्थानांत आल्यानंतर एका शतकाच्या अवधींत त्यांना क्षत्रिय मानण्यांत येईल हें मुळींच संभवत नाहीं. सहाव्या किंवा सातव्या शतकांत वर्णव्यवस्थेला धाब्यावर बसविणे फार कठिण होतें. पांचव्या, सहाव्या व सातव्या शतकांतील गुप्तराजांच्या व वर्धनांच्या शिलालेखावरून असें स्पष्ट दिसतें कीं, वर्णव्यवस्था कायम ठेवण्याविषयीं राजे लोक फार झटत असत. ( मोठमोठया राजांना "वर्णव्यवस्थापनपर" हें विशेषण सामान्यत्वेंकरून लावण्यांत येत असे. एका सुप्रसिद्ध शिलालेखामध्यें प्रतापवर्धनाच्या आजाला खालील विशेषण लावलेलें आढळतें "वर्णाश्रम–व्यवस्थापन–प्रवृत्त--चक्रः प्रभाकरवर्धनः" ( एपिग्राफिया इंडिया व्हा. ४ पाने २१० ). गुजर लोक जर बाहेरून हिंदुस्थानांत आले असते तर शंभर वर्षांच्या अवधींतच ह्युएनत्संग म्हणतो त्याप्रमाणें गुर्जर राजाला क्षत्रिय म्हणून कधींहि मानण्यांत आलें नसतें, व यावरून ते परदेशी नव्हते हेच अनुमान सिद्ध होतें.

मि. भांडारकरांनीं तिसऱ्या एका गोष्टीची अशीच ओढाताण करून एक मुद्दा पुढें आणला आहे. पण नीट विचार करतां तो मुद्दा उलट त्यांच्याच गळ्यांत येतो. ब्राह्मण लोकांची गुजर गौड म्हणून एक जात आहे. राजपुतान्यांत राजवंशाचीं जीं ३६ कुळें शुद्ध व खरीं मानलीं आहेत त्यांपैकींच बीरगुजर ही एक जात आहे. यावरून भांडारकर अनुमान काढतात तें चुकीचें आहे त्यांच्या मतें गुजर. ब्राह्मण लोक हे सुद्धां गुर्जरक्षत्रियांप्रमाणें परदेशी आहेत. सहाव्या शतकांत परदेशी लोकांनीं राज्यसत्ता बळकावल्या-

वर त्यांना क्षत्रिय मानीत हा मुद्दा जरी बाजवी नसला तरी थोडासा मान्य होईल, पण कोणता हेतु मनांत धरून कांहीं खझरांनीं ब्राह्मणत्व स्वीकारलें असेल ? बरें खझर लोकांत जाति असल्याचा पुरावा नसल्यामुळें त्यापैकीं कांहींजणांनीं ब्राह्मण कां व्हावें याचाही नीट उलगडा लागत नाहीं. गुजर लोकांमध्यें पूर्वी सांगिल्याप्रमाणें ब्राह्मण आहेत व शेतकरी आहेत, सुतार आहेत व लोहारही आहेत; जसे मराठ्यांत आहेत. गुजर नांवाचे कऱ्हाडे ब्राह्मण आहेत या गोष्टीला फारसें महत्व देतां येत नाहीं. कारण गुजराथ देशांत राहण्यानें तें नांव मिळालें असेल. कारण त्याचें पटवर्धन हे नांव शिवाय आहे. परंतु जरी हीं ब्राह्मण घराणीं गुर्जरवंशाची आहेत असे मानलें तरी त्यावरून गुजर लोक **परदेशी** आहेत असें सिद्ध होत नाही, उलट ते आर्यच आहेत या मताला जास्तच पुष्टि मिळते.

मि. भांडारकरांचा चवथा मुद्दा याहीपेक्षां विलक्षण आहे. त्यांची माहिती चुकीची असून त्यांनीं काढलेलीं अनुमानें हि चुकीचीं आहेत. (प्रतिहार शब्दाचें पढिहार हें प्राकृत रूपान्तर सरळ आहे. पण भांडारकरांचें मत याच्या उलट आहे. ते म्हणतात पढिहार शब्दाचें प्रतिहार हें संस्कृत रूप बनविलें आहे. परंतु मि. भांडारकरांना आम्ही असा सवाल करतों कीं पढिहाराचे प्रतिहार असें संस्कृतांत रूप करण्याचें कारण काय ? संस्कृतांत पढिहार उच्चार होत नाहीं कीं काय ? प्राकृतांत याच्या उलट आहे. परंतु प्रस्तुतच्या वादाचा हा मुद्दा नसल्यामुळें,आम्ही त्यांचें जास्त विवरण करूं इच्छित नाहीं. ) जोधपुर येथील शिलालेखामध्यें पढिहारांच्या उत्पत्तीसंबंधानें पुढील उल्लेख सांपडतो. एका ब्राह्मणानें ब्राह्मण व क्षत्रिय अशा दोन वर्णांच्या स्त्रियांशीं विवाह केला. ब्राह्मणस्त्रीच्या वंशजांना ब्राह्मण पढिहार असें म्हणतात व क्षत्रियस्त्रीच्या वंशजांना क्षत्रिय पढिहार असें म्हणतात. यावर मि. भांडारकर म्हणतात ‘ अशा रीतीनें ब्राह्मणाचा क्षत्रियस्त्रीशीं विवाह होणें हें मोठें चमत्कारिक आहे व त्यावरून ही चाल परदेशची असावी असा तर्क निघतो’ पहिल्या गोष्टीवरून दुसरी गोष्ट कशी निघते तें मि. भांडारकरानांच ठाउक !!! पण ब्राह्मणक्षत्रियाच्या विवाहांत चमत्कार करण्याजोगें काय वैलक्षण्य आहे तें कळत नाहीं. स्मृतिकारांनीं असल्या विवाहांना आपली संमति दिलली

आहे; इतकेंच नव्हे तर ही चाल चवथ्या पांचव्या व सहाव्या शतकांत जिवंत प्रचारांत होती. या ग्रंथांत आम्ही ज्या शिलालेखांचा ( Corp. Ind. III ) उल्लेख केलेला आहे त्यावरून ही गोष्ट सहज ध्यानांत येईल. अशा विवाहांत ब्राह्मण बायकांचे मुलगे ब्राह्मण व क्षत्रिय बायकांचे मुलगे क्षत्रिय मानले जात असत. सातव्या शतकापर्यंत ब्राह्मणक्षत्रियांचें खाणेंपिणें एकच होतें, त्यामुळें असल्या विवाहांवर बहिष्कार पडण्याचें कांहीं कारण नव्हतें. याठिकाणीं हिंदुस्थानांत जाति कशा वाढत गेल्या याचा थोडक्यांत इतिहास देणें अवश्य आहे. पूर्वी सर्व भारती लोक एकाच वंशाचे असल्या-मुळें आर्यलोकांमध्ये जाति नव्हत्याच; धंद्यावरून निराळे वर्ग होते. त्यामुळे वरच्या वर्गाचा खालच्या वर्गाशीं लग्नसंबंध होण्यास कांहीं आडकाठी नव्हती. अशी स्थिति असल्यामुळें ब्राह्मणांचे क्षत्रियस्त्रियांशीं पुष्कळदा विवाह झालेले आहेत. फार प्राचीन काळीं अशा विवाहापासून झालेली संतति ब्राह्मण म्हणून मानली जात असे. परंतु जसजशी जातीची बंधनें अधिक अधिक घट्ट होत गेलीं तसतशी ब्राम्हण क्षत्रियांच्या मधल्या वर्गात या संततीची गणना होऊं लागली. जातीबंधनें आणखी दृढ झाल्यामुळें या संततीची जात पुढें पुढें आईच्या जातीवरून ठरूं लागली. ही वस्तु-स्थिति इ. सनाच्या सहाव्यापासून नवव्या शतकापर्यंत होती. परंतु यापुढें नवव्या शतकापासून फक्त त्याच जातींत विवाह होऊं लागले. निरनिराळ्या स्मृतिशास्त्रांच्या पुराव्यावरून व शिलालेखांवरून वरील त्रोटक इतिहास सहज ध्यानांत येण्याजोगा आहे. परंतु हा प्रस्तुत वादाचा मुद्दा नसल्यामुळें जातीसंबंधाचा जास्त विचार करण्याची येथें जरूरी नाहीं. ब्राह्मण बाप व क्षत्रिय आई यांची संतति क्षत्रिय गणली जात असे, यांत कांहीं नवल नाहीं. ( स्त्रीष्वनन्तरजातासु द्विजैरुत्पादितान् सुतान् । सदृशानेव तानाहुर्मातृदोषविगर्हितान् ॥ मनु ६ अं. १० )

एखाद्या घराण्याच्या मूळपुरुषासंबंधानें ज्या दंतकथा प्रचलित असतात त्यांना मि. भांडारकरांनीं भलतेंच महत्व देऊन चुकीचीं अनुमानें काढिलीं आहेत. परंतु इतिहासदृष्ट्या असें करणे केव्हांही बरोबर होणार नाहीं. कांहीं क्षत्रिय घराण्यांचे मूळपुरुष अग्नि, लक्ष्मण, मानव्य ऋषि किंवा असेच दुसरे

दिलेले लेखांतून आढळतात.परंतु या सर्व काल्पनिक गोष्टी असून त्यावरून ऐतिहासिक अनुमानें केव्हांही निघूं शकणार नाहींत. मि. भांडारकर चालुक्यांना व कदंबांना ब्राह्मण वंशाचे समजतात. एका शिलालेखामध्यें मानव्यऋषि हा कदंबाचा मूळपुरुष म्हणून दिलेलें आहे परंतु यावरून ते ब्राह्मण होते असें सिद्ध होऊं शकत नाहीं. हिंदुस्थानांतील जातीचे किंवा लोकांचे मूळ पुरुष ऋषीच होते, विशेषतः सात ऋषि होते असें मानण्यांत येतें. एके ठिकाणीं मनु हा क्षत्रिय सर्व मनुष्यजातीचा आदिपुरुष होता असें लिहिलें आहे. मग यावरून सर्व मनुष्यजात क्षत्रिय आहे असें जर कोणी अनुमान काढूं लागला तर कितीसें बरोबर होईल ? याशिवाय ब्रह्मर्षि, राजर्षि व देवर्षि असे ऋषींमध्यें भेदही आहेत. सारांश या काल्पनिक दंतकथांवरून मि. भांडारकर ऐतिहासिक अनुमाने काढूं पाहतात हें मोठें विलक्षण होय. या दंतकथा जर परंपरागत असतील तर त्यांना एवढेंच महत्व देणें योग्य होईल,कीं अशा परंपरागत कथांवरून घराण्याची मूळपीठिका ठरवितां येते. दक्षिणेतील चालुक्य स्वतःला मानव्य गोत्राचे समजत असत असें त्यांच्या प्राचीन लेखांवरून दिसतें, म्हणून त्यांना आर्यवंशी समजण्यास कांहीं हरकत नाहीं. कदंबही स्वतःला त्याच गोत्राचे समजत असल्यामुळें ते क्षत्रिय असून चालुक्यांच्याच वंशाचे होते असें म्हणतां येईल. शिंदे स्वतःला शेषाचे वंशज समजतात म्हणून ते द्राविडी वंशाचे मानतां येतील. शिंदे घराणें नाग वंशाचे होते हे भांडारकरांना कबूल आहे. असें असूनही एका कलमाच्या (पा. २७) आरंभीं त्यांनीं असें वाक्य घातले आहे "सिंदे नांवाची दुसरी एक **परदेशी** जात **उत्तरेकडून दक्षिणेकडे** आली." या ठिकाणीं परदेशी हा शब्द हिंदुस्थानच्या बाहेरील लोकांनाच अनुलक्षून वापरला आहे हें उघड आहे. मग तो शब्द सिंदेवंशाला कसा लागू पडतो कोणास ठाऊक? हिंदुस्थानांतील मुख्य मुख्य जातीचे लोक परदेशीं आहेत अशा भ्रान्त कल्पनेनें मि. भांडारकारांची इतकी दिशाभूल झाली आहे कीं अहिच्छत्राहून दक्षिणेकडे आलेल्या ब्राह्मण लोकांना सुद्धां परदेशी म्हणावयास ते मागें पुढें पाहात नाहींत. चाहूमान, पढिहार, परमार व चालुक्य हे लोक अहिच्छत्राहून आले एवढें मि. भांडारकरांना कोठें

आढळलें ? झालें तात्काळ हे लोक परदेशी असा त्यांच्यावर त्यांनीं शिक्का मारलाच. परंतु या गडबडींत मि. भांडारकर विसरतात कीं अहिछत्रनगरींत आर्यांची मोठी वसाहत होती असें म्हणावयास हरकत नाहीं. पाञ्चाल म्हणजे आर्य वसाहतीचें केंद्र अहिच्छत्रच होय. मग ब्राह्मण व क्षत्रिय यांनीं आह्मी अहिच्छत्राहून आलों असें जर सांगितलें तर त्यांत विलक्षण तें काय आहे ? एवढया सांगण्यानें ते परदेशी कसे होऊं शकतात तें आम्हांला तरी समजत नाहीं.

सारांश, मानवजातीशास्त्राच्या प्रमाणावरून किंवा ऐतिहासिक प्रमाणावरून गुर्जर लोक खझर अर्थात् परदेशी आहेत असें सिद्ध करतां यावयाचें नाहीं. तेव्हां गुर्जर लोक हिंदुस्थानचेच मूळचे आलेले आर्य असले पाहिजेत, हे उघड आहे.

शेवटीं जाट लोकासंबंधानें विचार करूं. आम्ही वर दाखविलेच आहे कीं, त्यांच्या शरीराच्या व तोंडाच्या स्वरूपावरून ते निःसंशय आर्यच आहेत. कारण त्यांचा वर्ण गौर, बांधा उंच, व नाकें वर आलेली आहेत व त्यांचीं डोकींही लांबट असतात. या सिद्धान्ताला विरुद्ध इतिहासाची कोणतीच गोष्ट नाहीं. हल्लींच्या जाट लोकांची संयुक्तप्रांतांत व पंजाबांत हिंदु व शीख राज्यें स्थापन होईपर्यंत जाट लोकांचा इतिहासांत फारसा उल्लेख नाहीं हें खरें. परंतु जाट लोकांचा फार प्राचीन काळीं उल्लेख झालेला आहे. कारण महाभारतांतील कर्णपर्वांत जर्ट असें त्यांचें नांव आलें आहे. नंतर इ. स. पांचव्या शतकांत लिहिल्या गेलेल्या चंद्राच्या व्याकरणांत " अजयज्जर्टो हूणान् " असें एक वाक्य आलें आहे. यांत जाट लोकांचा उल्लेख आला आहे. यावरून असेंही दिसतें कीं जाट व हूण लोकांचें वैर होतें व जाट लोकांनीं हूणांचा पराभव केलेला होता. यावरून कोणाच्याही लक्षांत येईल कीं जाट लोक हिंदुस्थानावर स्वारी करणारे किंवा अशाच स्वारी करणाऱ्या लोकांबरोबर घुसणारे बाहेरचे नसून पंजाब मधलेच रहाणारे होते. मंदसोर शिलालेखांत लिहिल्याप्रमाणें यशोधर्मानें हूणांचा पूर्ण पराभव केला. हा यशोधर्मा जाट जातीचा कदाचित् असूं शकेल. कारण यावेळीं सिंधप्रांतांत व माळव्यांत म्हणजे मध्य हिंदुस्थानांत जाट लोकांनीं आपल्या वसाहती केल्या होत्या. परंतु आम्हांला

या गोष्टीशीं कांहीं करावयाचें नाहीं. वर दिलेल्या वाक्यावरून एवढें निःसंशय सिद्ध होतें कीं जाट लोक हूणलोकांबरोबर आलेले नसून त्यांचे शत्रु होते

तिसरी गोष्ट ही कीं जाट वेदकालीन विश् होते असे दिसतें. हल्लींसुद्धां प्राय ते शेतीभातीवर आपला उदरनिर्वाह करितात. वेदकाळीं शेतकरी लोक आर असून त्यांना वैश्य समजण्यांत येत असे. लढवय्ये लोकांचे म्हणजे क्षत्रियांचे वैश्यस्त्रीशीं पुष्कळदां विवाह होत असत. ही चाल पूर्वी सर्वत्र चालू होती इतकेंच नव्हे तर ती अद्याप तशीच चालू आहे. कारण पंजाबांतील रजपुत लोक जाट बायका अजून करतात. जातिव्यवस्था कायम ठेवण्याची हिंदु लोकांची जणूंकाय उपजत प्रवृत्ति आहे, आणि त्यामुळेंच वर्णसंकर होण्याचा टळतो. पण रजपुत व जाट लोक एकाच आर्यजातीचे आहेत. जाट लोकांनी आपली जात अद्याप शुद्ध ठेविली आहे. ते शेतीभाती करीत असल्यामुळे व त्यांच्यामध्ये विधवा-विवाह होत असल्यामुळें हल्लीं हिंदुलोक त्यांना शूद्र समजतात. परंतु खरा विचार करतां त्यांनीं आपलें आर्यत्व सर्वांपेक्षां जास्त चांगलें राखलें आहे. हे जाट लोक सूर्यवंशीं असा वेत कारण हिंदुस्थानांत प्रथम आलेल्या आर्यांपैकींच हे होत. इंडो-आर्यन लोकांच्या अतिप्राचीन वसाहतीचा प्रांत जो पंजाब, त्यांतच हे आर्य लोक प्रथम राहूं लागले होते.

आर. जी. लीथेम साहेब आपल्या " Ethnology of India पान २५४ मध्यें काय म्हणतात ते येथें देऊं " बहुतकरून रजपुत लोक हिंदु, व जाट लोक मुसलमान असतात. बहुतकरून जाट शेतीभाती करून शांततेनें रहाणारे आहेत. यावरून जाट लोक हे बाटलेले रजपुत असूं शकतील व रजपुत लोक पूर्वींचे जाट असूं शकतील. धार्मिक श्रद्धेमुळें दुसरे कांहीं फेरफार झाले असतील, नाहीं असें नाहीं. लढाऊ पेशा व शेतीभातीचा धंदा यामुळें मनोवृत्तींवर व चेहेऱ्यावर निरनिराळे फेरबदल होतात. त्याचप्रमाणें अरेरावीपणाचें स्वातंत्र्य व निमुटपणें छळ सोसून घेण्याचें पारतंत्र्य यामुळेंही मनावर तसाच परिणाम होतो." जरी कित्येक जाट लोकांनी हिंदुधर्म सोडून दिला आहे तरी त्यांच्यांत जातीचें बंड पूर्वीप्रमाणेंच कायम आहे हें सांगितलें पाहिजे. हिंदुजाट लोकांमध्यें व मुसलमानी जाट लोकांमध्यें पूर्वींप्रमाणें लग्नाचीं बंधनें कायम आहेत.

शेवटीं जाट व गुजर लोकांसंबंधानें सर डी.इबेट्सन आपल्या "Punjab Castes" नामक ग्रंथांत काय म्हणतात ते आणखी पाहूं. "मूळचे रजपूत आणि मूळचे जाट लोक हिंदुस्थानांत निरनिराळ्या वेळीं आले असतील, पण माझ्या मतें रजपुत धंद्यावरून पडला असावा. त्याचा मानवजाति-शास्त्राशीं संबंध नाहीं. परंतु ते निरनिराळ्या वेळीं हिंदुस्थानांत आले असें जरी धरलें, तरी त्यांच्या **शरीराच्या व चेहऱ्याच्या साम्यावरून** व आपआपसांत असणाऱ्या त्यांच्या निरंतरच्या संबंधावरून ते एकाच वंशाचे असावेत असें वाटतें" ( पृ. १०० ) गुजर लोकांसंबंधें इबेटसन साहेबांचें असें मत आहे. "पंजाबांत गुजर लोक ही एक मोठी **आठवी** जात आहे. वरच्या जातीपैकीं जाट, रजपुत, पठाण व ब्राह्मण आणि खालच्या जातीपैकीं चांभार व चुहरा हेच लोकसंख्येनें त्यांच्यापेक्षां जास्त आहेत. त्यांचा बांधा उच असून **त्यांचें जाट लोकांशीं फारच साम्य आहे.** त्यांचा सामाजिक दर्जा बहुतेक एकच आहे, कदाचित् गुजर लोक थोडेसे कमी दर्जाचे ठरतील. व दोघांचा रोटीव्यवहार बिनदिक्कत चालत असतो" ( पृ. ६०४ ) सारांश ज्यांचा ज्यांचा पंजाबच्या लोकांशीं चांगला परिचय झाला त्यांनीं जाट, गुजर व रजपुत हे सिथियन नसून आर्यच आहेत असें आपलें मत दिलें आहे. तरी सुद्धां कांहीं विद्वानांनीं या लोकांना यूची-खझर-जीटीच्या वंशाचे ठरवून हे लोक सिथियन आहेत व ऐतिहासिक काळांत, इतकेंच नव्हे तर, **ख्रिस्तीसनानंतर** ते हिंदुस्थानांत आले असा आपला अभिप्राय दिला आहे. हे लोक हिंदुस्थानांत बाहेरून आल्या-बद्दलचा पुरावा काडीमात्र मिळत नाहीं. ते हिंदुस्थानांत आल्याचा उल्लेख **परदेशांत** कोठेंही उपलब्ध नाहीं. किंवा या गोष्टीसंबंधानें त्या लोकांत परंपरागत कथाही नाहींत. इतकेंच नव्हे तर या गोष्टीसंबंधानें ऐतिहासिक पुरावा, किंवा शिलालेख किंवा दुसऱ्या कांहीं सूचक गोष्टी यांचा पूर्ण अभाव आहे. मग अशीं चुकीचीं विधानें कां करण्यांत येतात? आमच्या मतें त्याला एकच कारण आहे. तें हें कीं बहुतेक युरोपीयन विद्वान् लोकांची व आमच्यांतील कांहीं विद्वान् मंडळीची अशी खोड आहे कीं हिंदुस्थानां-तील एकादी जात सुस्वरूप व कार्यक्षम दिसली कीं तिच्यावर "परदेशी" म्हणून शिक्का मारावयाचा.

# प्रकरण ५ वें.



## समाजस्थिति.

मागील प्रकरणांत हर्षकालीन विविध लोकांचें वर्णन केलें. आतां प्रस्तुत प्रकरणांत त्यांच्या सामाजिक चाली रीती म्हणजे त्यांचे पोषाक, आभरणें, विशिष्ट वहिवाटी, इत्यादिकांकडे वळूं. या सामाजिक बाबतींतहि हर्षाचा काळ म्हणजे प्राचीन व अर्वाचीन काळांचा भेद दाखविणारा मर्यादा काळच होय; म्हणजे प्राचीन काळच्या गोष्टीच्या साखळींतील तो शेवटचाच दुवा आहे. येथून पूर्वींची साखळी संपून नवीन परिस्थितीला सुरवात झाली आहे. आपण पाहिलेल्या लोकांच्या वस्त्रप्रावरणाचें वर्णन ह्युएन-त्संग असें करतो; "या लोकांचे आंतले किंवा बाहेरचे असे कोणतेच कपडे शिवून तयार केलेले नसतात. त्यांचा रंग स्वच्छ पांढरा असून छिटकावाचा किंवा मिश्र रंग त्यांना आवडत नाहीं. पुरुष मंडळी कमरेभोंवतीं एक लांब वस्त्र गुंडाळतात आणि तसेंच दुसरें खाकांपर्यंत घेऊन उजवा खांदा उघडा ठेवितात. त्यांच्या स्त्रिया लांबच लांब झगेवजा वस्त्र नेसतात व तें दोन्ही खांद्यांवरून जाऊन खालीं मोकळे सुटलेलें असतें. त्यांच्या डोक्याचा वरच्या भागावरील केसांची गांठ बांधलेली असते व बाकीचे तसेच मोकळे रहातात. पुरुष कांहीं आपल्या मिशा कातरतात व कांहीं त्यांच्या निरनिराळ्या तऱ्हा करतात. ते डोक्यावर फुलांच्या माळा गुंडाळून गळ्यांत हार घालितात." (वाटर्स.ह्यु.१.पा.१५१). या वर्णनावरून प्रथम असें दिसतें कीं हर्षाच्या काळापर्यंत कपडे शिवून घालण्याची रीत इकडे सुरू झाली नव्हती. पुरुष व स्त्रिया या उभयतांचीं वस्त्रें प्राचीन काळाप्रमाणेंच (महाभारत उपसंहार पहा) एकेरी व लांब असून पुरुषांत तीं कमरें

भोवतीं व एका खाकेंखालून गुंडाळीत, आणि स्त्रियांत दोन्ही खांद्यावरून घेत. उत्तरीय किंवा वरचें वस्त्र हेंहि कधीं कधीं स्त्रिया व पुरुष घेत असत. पण त्याचा उल्लेख ह्युएनत्संगानें केलेला नसल्यामुळें त्याचा प्रचार त्यावेळीं कमी झालेला असावा. अशा या पोषाखाचा निर्देश मनुस्मृतींत तसाच ग्रीक ग्रंथकारांच्या लेखांतहि केलेला आहे. प्राचीन काळचे ग्रीक व रोमन लोकहि अशाच प्रकारचीं दोन लांब चादरवजा वस्त्रें अंगावर घेऊन खांद्यावरून खालीं सोडीत. आज मितीसहि बंगाल, मद्रास व थोड्या फार प्रमाणांत मुंबई या प्रांतांत म्हणजे हिंदुस्थानाच्या पूर्व, पश्चिम व दक्षिण या भागांत स्त्रियांचा पोषाक बहुतांशीं एकवस्त्री असून, उत्तरहिंदुस्थानांत मात्र त्याच्या जागीं शिवलेले घागरे आले आहेत. पण तेथेंहि घरांतल्या घरांत असतांना त्या एक वस्त्राच असतात. पुरुषांच्या बाबतींत कमरेखालीं असलेलें धोतर हाच काय तो घरगुती नित्य व्यवहारांतील पोषाक असून, मद्रास व मुंबई, मलबार, कोचीन इकडले प्रांतखेरीज एकंदर हिंदुस्थानांत बाह्यव्यवहाराचा पोषाक मात्र शिवलेल्या विजारीतुमानींचा झालेला आहे. कमरेवरील जें उत्तरीय त्याबद्दल तर आतां सर्वच ठिकाणीं शिवलेले सद्रे कोट आलेले आहेत. कपडे शिवण्याची कला प्रथमतः हर्षाच्या नंतर आठव्या शतकांत अरब लोकांनीं केव्हां तरी या देशांत आणिली असावी, किंवा कदाचित् त्याच्याहि पुढें अकराव्या शतकांत महंमुदाच्या तुर्कांबरोबर ती आली असेल.

पोषाकाविषयीं ह्युएनत्संगानें केलेलें वर्णन किती सत्य आहे हें पहाणें असेल, तर बाणभट्टानें लिहिलेल्या वर्णनाशीं तें ताडून पहावें. हर्ष आपल्या दिग्विजयाच्या स्वारीवर निघाला, तेव्हां त्याचें वर्णन करतांना बाण म्हणतो 'परिधाय राजहंसमिथुन-

लक्ष्मणी सदृशे दुकूले परमेश्वरचिन्हभूतां शशिकलामिव कल्पयित्वा सितकुसुममुंडमालिकाम्' (ह. च. उच्छ्वास ७) म्हणजे त्यानें निघले वेळीं राजहंस छापाचीं दोन सारखीं वस्त्रें परिधान केलीं, व चक्रवर्तित्वाची खूण म्हणून (शंकराच्या मस्तकावरील शशिकलेप्रमाणें) "चंद्रकोरे सारखी पांढऱ्या फुलांची माळ मस्तकावर बांधिली." आतां हर्षासारख्या चक्रवर्तिपदाकांक्षी राजाच्या मंगल पोषाखांत जर दोन पांढरीं रेशमी वस्त्रें व पांढऱ्या फुलांची माळ एवढींच येतात, तर सामान्य माणसाचीं वस्त्रें म्हणजे दोन कापसाच्या वस्त्रांशिवाय काय असणार? अद्यापि सुद्धां अगदीं जुन्या पद्धतीच्या वृद्ध गृहस्थास दोन सारखीं धोतरें एक नेसावयाचें धोतर व एक पांघरावयाचें अंगवस्त्र एवढाच काय तो पोषाक असतो. धोतर शब्दहि धू. म्ह. हलविणें, धुणें यापासून झालेला असून जें रोज धुवून स्वच्छ पांढरें ठेविलेलें असतें तें असा त्याचा अर्थ आहे. मस्तकावर पुष्पमाळा बांधण्याची चाल मात्र आतां नित्य व्यवहारांतून अजीबात गेली आहे व लग्न, मुंज वगैरे प्रसंगीं बांधावयाच्या मुंडावलीच्या रूपानें मात्र ती अविशष्ट राहिली असून व्यवहारांत तिची जागा पागोटीं, फेटे व टोप्या यांनीं पटकाविली आहे. तथापि हर्ष-चरितांत उष्णीष म्हणजे पागोट्यासारखें कांहीं शिरस्त्राण सांगितलें असून महाभारतांतहि त्याचा उल्लेख आहे.परंतु मेगॅस्थेनिसनें चंद्रगुप्तकालीन लोकांच्या वर्णनांत जें लिहिलें आहे त्यावरून उत्तरीय वस्त्राचेंच एकटोंक डोक्याला गुंडाळीत,असें अनुमान होतें.म्हणजे डोक्यासाठीं तिसरें वस्त्र लागत नसे असें आम्हाला वाटतें. तत्कालीन सर्व पोषाकच मुळीं एवढा असल्यामुळें मनुष्याचा समाजांतील दर्जा ओळखण्याचें साधन त्या वस्त्रांचा तलमपणा किंवा रंगाचा स्वच्छपणा हाच असला पाहिजे. म्हणजे श्रीमंतांचीं वस्त्रें तलम पोताचीं व स्वच्छ असून

गरिबांचीं ओबडधोबड व काळसर असत. ह्युएनत्संगानें लोंकर, रेशीम, कापूस यांच्या वस्त्रांचीं नांवें दिलीं आहेत तीं अशीं; "कौशेय म्हणजे रेशमाचें वस्त्र, क्षौम म्हणजे तागाचें वस्त्र, कंबल म्हणजे बारीक लोंकरीचें वस्त्र आणि होलल अथवा होरल म्हणजे कोणा रानटी पशूच्या लोंकरीचें वस्त्र." ह्युएनत्संगानें सांगितलेली शेवटची जात आमच्या मतें कापसाच्या वस्त्राची असावी. रेशीम, लोंकर, कापूस इत्यादिकांचीं अति तलम वस्त्रें करण्याची कला त्यावेळीं हिंदुस्थानांत पूर्णत्वास पोंचली होती व आज ज्याप्रमाणें कांहीं ठिकाणीं विलायती तलम कापडाहूनहि बारिक कापड डाक्का वगैरे ठिकाणीं होतें त्याप्रमाणें तेव्हांहि होत असें. राज्यश्रीच्या विवाहप्रसंगीं आणिलेल्या वस्त्रांचें बाणानें केलेलें वणन पाहिलें ह्मणजे कापड विणण्याची कला हर्षकाळीं किती पूर्णतेस गेली होती, याची कल्पना होईल. बाणभट्ट म्हणतो " क्षौमैश्च बादरैश्च दुकूलैश्च लालातंतुजैश्चांशुकैश्च नैत्रैश्च निर्मोकनिभैः निश्वासहार्यैःस्पर्शानुमेयैर्वासोभिस्सर्वतः स्फुरदिन्द्रायुधसहस्रैरिव संच्छादितम् ( ह०च० उच्छ्वास ४ था ) राजवाड्यांत जिकडे तिकडे क्षौमें ( तागाचीं वस्त्रें ) बादरें ( कापसाचीं, बदर—कापूस ), दुकूलें ( रेशमाचीं ), लालातंतुजें ( कोळ्याच्या धाग्यांचीं वस्त्रें ) अंशुकें, नैत्रें ( हें वस्त्र काय असावें हें समजत नाहीं ) इत्यादि प्रकारचीं वस्त्रें पसरलीं असून तीं सापाच्या कांतीसारखीं तेजस्वी, श्वासाच्या वाऱ्यानेंहि उडणारीं, हाताच्या स्पर्शानें मात्र उमगणारीं व इंद्रधनुष्याप्रमाणें चित्रविचित्र रंगांचीं होतीं." या वर्णनांत ज्या पदार्थांचीं वस्त्रें सांगितलीं आहेत, ते सर्व कांहीं आज ओळखतां येत नाहींत. पण पदार्थ कोणताहि असला तरी त्याचें वस्त्र मात्र फार भारी प्रतीचें असलें पाहिजे हें उघड आहे. शुभ्र रंग हा पुरुषांत विशेष मान्य असून स्त्रियांना नाना रंग व

त्यांतहि चित्रविचित्र आकृति काढलेल्या अधिक प्रिय असणें साहजिक आहे. ह्युएनत्संगानें वर्णिलेल्या हर्षाच्या दुकूलांवर हंसांचीं चित्रें होतीं हें वर सांगितलेंच आहे. बिन कांठांची शुभ्र व साधीं वस्त्रें आतांच्या प्रमाणें तेव्हांच्याहि स्त्रियांना पसंत नसत; तशीं वस्त्रें केवळ *विधवा मात्र वापरीत. बौद्ध भिक्षु व भिक्षुणी यांचीं वस्त्रें साधीं पण तांबडीं असत, पण त्या धर्माच्या निरनिराळ्या शाखांत तांबड्या रंगाच्या छटा मात्र वेगवेगळ्या असत असें ह्युएनत्संगानें लिहिलें आहे (वाटर्स-पु. १ पा. १५०). जैन भिक्षूंना पिंवळ्या रंगाचीं वस्त्रें आवडत, व हिंदु संन्याशांना भगव्या रंगाचीं आवड असे. या तीन धर्मांनीं हे तीन रंग आपापल्या धर्ममताची विशिष्ट खूण म्हणूनच बहुधा निवडले होते.

विधवा स्त्रियांनीं परिधान करावयाच्या साध्या शुभ्र वस्त्रांचा उल्लेख महाभारताच्या आश्रमवासिक पर्वांतदेखील धृतराष्ट्राच्या विधवा झालेल्या सुनांच्या वर्णनांत आलेला आहे. पण विधवा-वाणांच्या वर्णाचें हें वैशिष्ट्य आतां बहुतेक नष्ट झालें असून त्याच्या जागीं दक्षिणेंत तांबडा रंग आला आहे व तो बहुधा बौद्ध भिक्षुणीच्या वस्त्रांच्या वर्णाची नक्कल आहे. उत्तर व पश्चिम या हिंदुस्थानाच्या भागांत विधवांच्या वस्त्रांचा रंग प्रायः निळा काळा असतो. आणखी आश्चर्याची गोष्ट अशी कीं, पूर्वीचा विधवा वाणांचा शुभ्र वर्ण आतां वेश्यावर्गानें आपली खूण म्हणून उचलिला आहे.

---

* प्रभाकरवर्धन मृत्यु पावला असतां हर्षानें केलेल्या शोकाच्या वर्णनांत ' परिधत्तां धवले वाससी वसुमती ' ही ( राजाच्या मृत्यूमुळें वैधव्याप्रत प्राप्त झालेली ) पृथ्वी पांढरीं वस्त्रें ( पातळें ) परिधान करो—असे शब्द आले आहेत ( ह. च. उच्छ्वास ५ वा ).

पण तत्कालीन लोकांचीं वस्त्रें जरी वर सांगितल्याप्रमाणें अगदीं साधीं होतीं, तरी त्यांना दागिन्यांची मात्र फार आवड असे. खरोखर पहातां याविषयीं हिंदीलोकांची अभिरुचि, दागिन्यापेक्षां वस्त्रांची अधिक छानछोकी करणाऱ्या पाश्चात्याच्या अभिरुचीच्या अगदींच उलट दिसते. वस्त्रांच्या साधेपणाचा दागिन्यांच्या भपक्याशीं विरोध दाखवितांना ह्युएनत्संग म्हणतो, 'राजे व सरदार लोक यांचे दागिने कांहीं विलक्षणच असतात. ते डोक्यावर हिरे-माणिकांचे किरीट चढवीत असून बोटांत अंगठ्या, मनगटांत कडीं आणि गळ्यांत रत्नांचे हार घालितात.' ( वाटर्स. पु. पा. ५१ ) आजहि दागिन्यांचा सोस या देशांत कांहीं कमी नाहीं. पण सोनें व माणकेंच नाहींशीं झाल्यामुळें दागिन्यांशिवायच पुष्कळांना हिंडावें लागतें तो भाग निराळा. अजूनहि श्रीमंत व्यापारी, अमीरउमराव, राजेरजवाडे इत्यादि आपापल्या वैभवाच्या मानानें दागिने घालतातच. डोक्यांत घालण्याचे रत्नखचित किरीट मात्र आतां नाहींसे झालेले आहेत व तें एकाप्रकारें योग्यच आहे. कारण मुसलमानांच्या अमदानीपासून आतांपर्यंत किरीट घालण्यासारखे मूर्धाभिषिक्त राजेच मुळीं या देशांत शिवाजीखेरीज दिसत नाहींत. हर्षानें चक्रवर्तित्वाची खूण म्हणून मुकुट किंवा किरीट न घालतां फक्त एक वलय ( कडें ) मात्र मनगटांत घातलें होतें; असें बाणाच्या वर्णनावरून दिसतें. ( दूर्वापल्लवं विन्यस्य सह शासनवलयेन प्रकोष्ठे उच्छ्वास ७ ). पुढें दिवाकरमित्राची गांठ पडल्यावर त्यानें हर्षाला एक भारी मोत्यांचा हार ( एकावली ) असलें मूल्यवान् आभरण घालावयास तोच योग्य असें समजून नजर केला. ( ह. च. उच्छ्वास ८ वा ). या दागिन्यांशिवाय अंगद नांवाचीं बाहुभूषणें आणि कुंडलें व केयूर नांवाचीं कर्णभूषणें बाणानें

सांगितलीं आहेत. पण ह्युएनत्संगानें त्यांचा उल्लेख केला नाहीं. हर्षचरितांत कुमारगुप्त व माधवगुप्त यांचे वर्णन करतांना ( उच्छ्वास ४ था. ) त्यांच्या डोक्यावर फुलांच्या माळा होत्या, कुमारगुप्ताच्या हातांत कडें व कानांत केयूर हीं होतीं आणि माधवाच्या गळ्यांत हार होता असें सांगितलेलें आहे. ही पुरुषांच्या दागिन्यांची गोष्ट झाली. बायकांची गोष्ट याहून अगदीं वेगळी आहे. प्रत्येक स्त्री मग ती कितीहि गरीब असो कांहीं तरी दागिने अंगावर घातल्याशिवाय रहाणारच नाहीं व श्रीमंत असल्यास सोन्यामोत्यांनीं व हिरेमाणकांनीं ती मढविलेली असणार.

पोषाक वगैरे संबंधानें ह्युएत्संगानें आणखीहि कांहीं माहिती दिली आहे. तो लिहितो 'बहुतेक लोक अनवाणीं चालत असतात व पादत्राणें फारच थोडीं दृष्टीस पडतात.' आजकाल देखील आपल्या स्त्रिया सामर्थ्य असतांनाहि बहुधा अनवाणींच बाहेर जातात व गांवढळ आणि गरीब लोकांना तर नाइलाजास्तव पायांत कांहीं घालतां येत नाहीं. ह्युएनत्संग आणखी ह्मणतो " ते आपल्या दांतांना लाल किंवा काळा रंग देतात, केंस छाटून सारखे ठेवितात व कानांना छिद्रें पाडितात. त्यांचीं नाकें लांब व डोळे मोठे असतात. अशा प्रकारचें त्यांचें एकंदर बाह्यस्वरूप आहे". ( वाटर्स पु. १ पा. १५), कानांना भोंकें पाडण्याची चाल येथें अजन सार्वत्रिक आहे व हर्षकाळीं देखील ती तशीच असावी. कारण हिंदुधर्माच्या शास्त्रांत तो विधि सांगितला असून हिंदुधर्माबाहेरील लोकांना याच कारणास्तव अविंध असें नांव पडलें आहे. केसांसंबंधें पाहतां ब्राह्मण लोक डोक्याचे व दाढीचे केस आजच्यासारखेच काढीत असावे; परंतु ह्युएनत्संगाच्या वर्णनावरून मात्र तसें दिसत नाहीं. पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्यानें डोक्यावरील केस मोकळे सोडीत असत असें म्हटलें आहे.

त्यावरून ते कापीत असणें जुळत नाहीं. कदाचित् केंस कापिल्याचें वर्णन क्षत्रियांना व राजेलोकांना लागू असेल. लष्करी अधिकारी दाढी वाढवीत आणि कल्लेहि राखीत. याविषयीं ठाणेश्वरच्या सेनापतीचें बाणानें केलेलें वर्णन मोठें सूचक आहे. तो म्हणतो " शिरोरुहसटाल:..........धवल-स्थूल-गुंजापिच्छ-प्रच्छादित-कपोल भागभास्वरेण........मृतमपि हृदयस्थितं स्वामिनमिव सितचामरेण वीजयन्नाभिलंबेन कूर्चकलापेन " त्याचे डोक्यावरील केंस गुंतिलेले असून त्याचे पांढरे कल्ले गालांवर पसरले होते; त्याची पांढरी शुभ्र लांब दाढी छातीवर बेंबीपर्यंत लोंबत असून जणूं काय स्मृतिशेष होऊन आपल्या हृदयांत वास करणाऱ्या आपल्या स्वामीला तो ( त्या कूर्चरूपी ) शुभ्र चामरानें वाराच घालीत आहे असें पहाणाराला वाटे. ( ह. च. उच्छ्वास ६ ).

आतां हर्षकालीन लोकांच्या चालीरीतीकडे वळूं व प्रथम त्यांच्यांतील विवाहाच्या प्रकाराचा विचार करूं. या बाबतींत आद्य महत्वाची गोष्ट म्हणजे त्याकाळीं या देशांत बालविवाहाची पद्धत चालू नव्हती ही होय. जर कदाचित् ती रूढ असती, तर स्त्रियांच्या पुनर्विवाहाच्या निषेधाचा जसा ह्युएनत्संगानें उल्लेख केला आहे, तसा या देखील रीतीचा केला असता. राज्यश्रीच्या विवाहाचें जें वर्णन बाणानें केलें आहे (उच्छ्वास ४) त्यावरूनहि हेंच अनुमान दृढ होतें. राज्यश्रीचा विवाह ती शरीरदृष्ट्या उपवर झाल्यावरच घडलेला आहे, आणि विवाह झाल्यावर त्याच दिवशीं लगेच तिचा गर्भाधान-संस्कार झाला असें सुद्धां त्यांत वर्णिलें आहे. आतां यावर कोणी असें ह्मणेल कीं, हे प्रौढ विवाह क्षत्रियांपुरतेच होत; इतरत्र नव्हते. परंतु विवाहाच्या बाबतींत ब्राह्मण, वैश्य आणि क्षत्रिय यांत फरक होता असें मानावयास कांहीं कारण दिसत नाहीं. स्वत: बाणानेंहि मयूरकवीच्या प्रौढ

बहिणीशींच विवाह केला अशी कथा आहे. तात्पर्य विवाहाच्या बाबतींत सुद्धां प्राचीन अर्वाचीन काळांना जोडणारा दुवा ह्मणजे हर्षाचा काळ होय असें ह्मणावें लागतें. यानंतर मात्र या देशांत बालविवाहाची पद्धति हळू हळू प्रचारांत आली; त्याचें वर्णन पुढें योग्य ठिकाणीं येईलच.

बाणानें हर्षचरितांत केलेलें राज्यश्रीच्या विवाहाचें वर्णन हें खरोखरच फार सरसकाव्यमय असूनहि वस्तुस्थितीचा त्यांत मुळींच विपर्यास केलेला नाहीं. त्यांत वर्णिलेली उपवर कन्येच्या मातापितरांची चिंता वस्तुस्थितीचेंच हुबेहूब चित्र आहे. ही चिंता मातापितरांचें सामर्थ्य कितीहि असलें तरी त्यांना सोडीत नाहीं. विवाहापूर्वींच्या प्रचंड तयारीचें बाणाचें वर्णन देखील वस्तुस्थितीचेंच निदर्शक आहे. त्यांतील एका भागावरून असें दिसतें कीं, हर्षकाळीं विवाहेच्छु वर उपवर असणाऱ्या कन्येसाठीं मागणी घालीत असत ( शोभनेच दिवसे **ग्रहवर्मणा कन्यां प्रार्थयितुं** प्रेषितस्य प्रधानदूत पुरुषस्य करे दुहितृ दानजलमपातयत् । ह. च. उच्छ्वास ४ ). सांप्रत तरी हिंदुस्थानांत उच्च जातींत याच्या अगदीं उलट चाल आहे. असो.* या मागणी घालणाऱ्यांपैकीं ज्याला मुलीचा बाप किंवा पालक त्याच्या कुलशीलादि गुणांवरून पसंत करी त्याच्या कडून मागणी घालावयासाठीं आलेल्या दूताचे हातावर तो मग दानाचें उदक सोडी. एवढें झाल्यावर वर आपल्या मंडळीसह वधूचे गांवीं येई आणि मग ज्योतिष्यांनीं सांगितलेल्या शुभ मुहूर्तावर ( ज्योतिषाचें बंड त्यावेळींहि आजच्यासारखेंच जोरांत होतें ) तो वधूगृहीं

---

* विवाह प्रयोगांत अद्यापहि बाणानें वर्णिलेली कन्या प्रार्थनेचीच चाल कायम ठेविली आहे व व्यवहार कसाहि असला तरी शास्त्र म्हणून लग्नाचे पूर्वी वराचा पिता वधूला मागणी घालण्याचा बहाणा करतोच.

समारंभानें आल्यावर वधूचा पिता त्याचें शक्य तितक्या उत्तम रीतीनें स्वागत करी, आणि नंतर शास्त्रोक्त व रूढीच्या नियमांना अनुसरून विवाहविधि साजरा करण्यांत येई. हल्लीं क्षत्रिय जातींत जशी पडद्याची चाल आहे तशी ती तेव्हांहि होती व तिला अनुसरून प्रत्यक्ष विवाहविधि पडद्यांतच स्त्रियांचे समूहांत होई व तेथें पुरोहितांचा मात्र प्रवेश असे. कवि-श्रेष्ठ बाणभट्टानें राज्यश्रीच्या विवाहप्रसंगीं ती आपल्या सख्या समवेत वेदीपाशीं खालीं मान घालून पण उत्कंठेनें कशी वाट पहात उभी राहिली होती व नवरा अंतःपुरांत येण्याचे वेळीं त्या सख्या तिला जरा मान वर करून त्याच्याकडे पहावयास सांगत असतांना ती एकीकडून त्यांना व एकीकडून आपल्या हृदयाला कशी दटावीत होती याचें मार्मिक वर्णन केलें आहे. आतांच्याप्रमाणेंच तेव्हां-च्याहि वधू वरासमोर असतां मान खालीं घालीत असत. मुहूर्ताची वेळ बरोबर भरतांच वधूवरें एकमेकांच्या गळ्यांत हार घालून, होमाग्नि प्रदीप्त करीत व त्यांत लाजांच्या आहुति देऊन त्याभोंवतीं सात प्रदक्षिणा करीत. हा सप्तपदीचा विधि विवाहापैकीं अत्यंत महत्वाचा भाग होय असें स्मृतींतहि सांगितलें आहे. याप्रमाणें शास्त्रोक्त विवाहविधि झाल्यावर वधूवरें सर्व वडील माणसांना व ब्राह्मणांना नमस्कार करीत. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, विवाहानंतर होणाऱ्या भोजन समारंभाचा मात्र उल्लेख राज्यश्रीच्या विवाहवर्णनांत बाणानें केलेला नाहीं. नवोढ वधूवरांसाठीं मुद्दाम शृंगारून तयार केलेल्या आवास-गृहामध्यें विवाहाची पहिली सौख्याची रात्र त्यांनीं घालविली हें मात्र त्यानें वर्णन केलें आहे. विवाहानंतर ग्रहवर्मा दहा दिवस श्वशुरगृहीं राहिला व तितक्या अवधींत त्यानें आपल्या सासूबाईस संतोष देण्याचा आटोकाट प्रयत्न केला, आणि मग सासऱ्याकडून मिळालेल्या मूल्यवान्

वस्तु दासदासी वगैरे घेऊन तो आपल्या नगरीं परत गेला, हेंही शेवटीं बाणभट्टानें सांगून ठेविलें आहे.

सदरील सविस्तर वर्णनावरून असें दिसून येईल कीं, विवाह-विधीचा शास्त्रोक्त भाग तेव्हां होता तसाच आतांहि बहुतांशीं राहिला आहे, तरी दोन महत्वाच्या गोष्टींत मात्र त्यांच्यांत भेद दिसून येतो. त्यापैकीं पहिली गोष्ट म्हणजे वर वधूला मागणी घाली, व दुसरी विवाहाचे दिवशींच वधूचा गर्भाधान-संस्कार होई. आतां या दुसऱ्या गोष्टीवरून विवाहकाळीं मुली चांगल्या प्रौढ असल्या पाहिजेत हें उघड होतें. या बाबतींत आणखी सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे पूर्वीं उल्लेख केल्याप्रमाणें एकदां विवाह झालेल्या स्त्रीचा वरच्या तीन जातींत तरी पुनः विवाह होत नसे, ही होय. या गोष्टींतहि हर्षकाळ व आजचा काळ यांत साम्य आहे. पण याच्यापुढें विधवांचें वपन जें आज दृष्टीस पडतें तें मात्र त्याकाळीं नव्हतें. एकाठिकाणीं बाणाने विधवा स्त्रीच्या वेणीचा उल्लेख केला आहे व त्याचे शब्द ( ह. च. उच्छ्वास ५ वा ) ' बध्नातु वैधव्य वेणीं वरमनुष्यता ' असे आहेत. आतां विधवाची विशिष्ट वेणी कशी असे हें समजण्याला मार्ग नाहीं. रामायणांत सीता पतीपासून दूर रावणगृहीं असतांना तिला ' एकवेणीधरा ' असें विशेषण लाविलें आहे व अशा एक-वणीचा उल्लेख प्रोषितभर्तृका स्त्रियांसंबंधानें पुढील कवींनींहि वारंवार केलेला आहे. भाग्यवती स्त्रियांच्या वर्णनांत तीन-पेडी वेणीचा उल्लेख येतो. पण पति दूर असतांना घालावयाची एकवेणी व विधवा स्त्रियांची विशिष्ट वेणी यांत कोणत्या बाततींत फरक असे हें समजत नाहीं. पूर्वी सांगितल्याप्रमाणें विधवांच्या वस्त्रांचा वर्ण विशिष्ट म्हणजे शुभ्र असून सौभाग्यवती स्त्रियांचीं वस्त्रें रंगीत व चित्रविचित्र कांठांचीं असत.

वैधव्य स्थितींत जन्म घालावा लागण्याची तेव्हांची चाल बालविवाहाच्या अभावीं फारशी जाचक होत नसावी, तथापि मधून

मधून राज्यश्रीप्रमाणें अकाल वैधव्याचे हृदयद्रावक प्रसंग तेव्हांहि येत असलेच पाहिजेत. अशा दुर्दैवी स्त्रियांना बौद्ध धर्मांत आश्रय मिळे व बौद्धभिक्षुणींचा वर्ग बहुतेक अशाच स्त्रियांचा बनलेला असावा. जुलमाचें वैधव्य त्याकाळीं जरी समाजांत आपलें उग्र रूप वर सांगितल्याप्रमाणें प्रकट करीत नव्हतें, तथापि विधवांसंबंधाची जी एक अति दुष्ट चाल कवींनीं व हर्षचरितांत स्वतः बाणानेंहि वर्णिली आहे तिचा येथें निर्देश करणें अवश्य आहे. ती अशी कीं, युद्धांत पराभूत होऊन मृत्युमुखीं पडलेल्या राजाच्या विधवा स्त्रियांना जेता राजा आपल्या कुटुंबांत दास्य करावयास लावीत असे. त्यामुळें अशा स्त्रिया प्रसंगीं मृत्युहि पत्करीत यांत आश्चर्य नाहीं. पण आश्चर्य वाटतें तें हेंच कीं, पराभूत झालेल्या राजांच्या विधवा स्त्रियांची दुर्दशा कविप्रतिभेला मोठा वर्ण्यविषय म्हणून प्रिय वाटतो. विधवा विवाहाच्या अभावीं जेत्या राजाच्या घरीं दास्यांत सांपडलेल्या अशा राजविधवांना प्रसंगीं नाटकशाळांची देखील अवस्था प्राप्त होणें अपरिहार्य होतें. त्याकाळीं राजाच्या अन्तःपुरांत अनेक विवाहित स्त्रियांबरोबर नाटकशाळा व वेश्या यांचाहि मोठा भरणा असे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. नाटकशाळा व वेश्या यांना एक राजा टाकून दुसऱ्या बलिष्ठ राजाचा आश्रय मिळाल्यास दुःख वाटण्याचें कारण नव्हतें.* परंतु मृत राजाच्या विवाहित स्त्रियांवर दास्य करण्याचा किंवा प्रसंगीं त्याच्याही पत्नीकडे जाऊन नाटकशाळा बनण्याचा प्रसंग यावा ही गोष्ट मात्र अनुचित व क्रूरपणाची दिसते. इतर गोष्टींत सुव्यवस्थित व नीति-

* उदाहरणार्थ राज्यवर्धनानें मालवराजाला पराभूत करून ठार मारिल्यावर भंडीनें त्याच्या वारयोषिद्गणाला हर्षाचे हवाली केल्याचे वर्णन बाणानें केलें आहे. ‘अप्सरस इव बहुसमर-रस साहसानुरागावतीर्णा वारविलासिनीः’ ( ह. च. ७ वा उच्छ्वास ).

धर्मानें वागणाऱ्या तत्कालीन हिंदुसमाजांत अशा प्रकारची दुष्ट चाल अस्तित्वांत असावी हें आम्हाला खरें देखील वाटलें नसतें. पण बाणभट्टासारख्या प्रत्यक्ष पाहिलेल्या गोष्टी वर्णन करणाऱ्या लेखकाच्या लेखांमुळें तसें मानिल्याशिवाय गत्यंतर मात्र नाहीं. प्रभाकरवर्धन मृत्युपंथास लागला असतांना त्याची राणी यशोमती अग्निप्रवेश करण्यास सिद्ध झाली व तेव्हां तिचा पुत्र हर्ष तिला तसें न करण्याविषयीं विनवीत असतां तिनें जे उद्गार काढले त्यांत 'आपीतौ युष्मद्विधैः पुत्रैरमित्रकलत्र-बन्दिवृन्द-विधूयमान चामर मरुच्चलच्चीनांशुकधरौ पयोधरौ ( ह. च. उ० ५ वा ) ' असे शब्द आहेत व त्यांत शत्रूच्या स्त्रियांना दासी केल्याची प्रौढी मिरविली आहे. असो.

वरील राजे लोकांतच असणारा अपवाद वगळतां एरवीं त्या काळीं स्त्रियांची स्थिति फार चांगली होती. त्यांना शिक्षण मिळत असून वागणूकहि चांगली होती. हर्षाची बहीण राज्यश्री चांगली शिक्षित असून पुष्कळ कला व शास्त्रें तिला परिचित होतीं. नृत्य व गायन हे विषयसुद्धां तिला शिकविलेले होते असें बाणानें लिहिलें आहे ( राज्यश्रीरपि नृत्यगीतादिषु विदग्धासु कलासु उपचीयमानपरिचया यौवनमारुरोह हर्ष च. उच्छ्वास ४ था ). पण आतां शिष्ट कुटुंबांतील स्त्रियांमध्यें या कला निषिद्ध मानिल्या गेल्या आहेत. हर्ष जन्मप्रसंगीं सरदारांच्या व राजेरजवाड्यांच्याहि स्त्रियांनीं आनंदानें नृत्य केल्याचें जें वर्णन बाणानें केलें आहे, तेंसुद्धां लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या स्त्रियांचें नृत्य अर्थात् कलावतिणीच्या नृत्याहून भिन्न असून त्या ठिकाणीं पुरुषांचा प्रवशहि नव्हता. पुरुष व स्त्रिया यांचें एकत्र नृत्य असण्याचा पाश्चात्य देशाप्रमाणें संभवच नव्हता. पडद्याच्या प्रघातामुळें स्त्रीपुरुषांचा समाज मिश्र होण्याची त्याकाळीं शक्यता नव्हती हें उघड आहे.

सतीची चाल त्या वेळीं अस्तित्वांत होती हें सांगावयास नकोच. हर्षाच्या आईनें पति आसन्नमरण झाला असतांच निराशेनें अग्निप्रवेश केला असें बाणानें सांगितलें आहे. मृत स्वामीविषयींचें दुःख अनावर झाल्यामुळें केव्हां केव्हां पुरुषदेखील अग्निप्रवेशाचा अवलंब करीत. तसेंच असें करण्यापासून पुण्य लागतें अशी कांहीं ठिकाणीं समजूत असून, कांहींजण पुढील आपत्ति किंवा शारीर-दुःख टाळण्यासाठींहि अग्निप्रवेश करून देहत्याग करीत. ग्रहवर्मा मालवराजाकडून मारला गेल्यावर राज्यश्री कनोजहून निसटली व पुढील दुर्दशा टाळण्यासाठीं अग्निप्रवेश करीत होती, तसेंच प्रभाकरवर्धनाच्या मृत्युसमयीं त्याचा राजवैद्य रसायन आणि विश्वासु मंत्रि आणि दुसरे कांहीं सेवक यांनीं अग्निप्रवेश केला, असें हर्षचरितांत वर्णन आलेलें आहे. जपानांत आज मितीसहि ही पद्धत असून थोड्या दिवसांपूर्वी माजी मिकाडो मृत्यु पावला तेव्हां जपानी प्रधानानें आपल्याला स्वतःला गोळी घालून घेतली; हें सुप्रसिद्धच आहे. बाणाचीं हीं वर्णनें म्हणजे कविकल्पनेची अतिशयोक्ति आहे असें कदाचित् म्हणतां आलें असतें. परंतु प्राचीन लेखांतून त्याला प्रत्यंतर मिळत असल्यामुळें तसें मानणें शक्य नाहीं. उदाहरणार्थ,अफसद शिलालेखांत कुमारगुप्त नांवाच्या राजानें प्रयाग येथें अग्निप्रवेश केल्याबद्दल उल्लेख आहे.* असें करण्यांत त्याचा काय हेतु होता हें समजत नाहीं,तथापि हा प्रकार प्रयोग येथें झालेला असल्यामुळें त्यांत परमार्थबुद्धि असावी असें म्हणण्यास हरकत नाहीं. या स्वात्मनिरपेक्षतेच्या कृत्यांवरून त्या लोकांची दिसून येणारी मृत्युविषयक बेपर्वाई खरोखरच अवर्णनीय आहे. अग्निप्रवेशाशिवाय आणखीहि जीविताचा अन्त करून

* शौर्य सत्यव्रत धरो यः प्रयाग गतो धने । अम्मसीव करीषाग्नौ मग्नःसः पुष्पपूजितः ।

घेण्याचे दुसरे प्रकार त्या वेळीं अस्तित्वांत होते. भृगुपतन म्हणजे पर्वताच्या कडयावरून खालीं उडी घेणें, विषप्राशन करणें इत्यादि इत्यादि उपायांचाहि कोणी अवलंब करीत.* या गोष्टींचीं वर्णनें महाभारतांत आलीं असून अनेक कारणास्तव जीविताचा अन्त करून घेण्याची चाल फार प्राचीन काळापासून चालत आली आहे असें दिसतें.

आतां शेवटीं तत्कालीन अन्त्यविधीचें वर्णन करून हें प्रकरण पुरें करूं. संन्यासी खेरीज करून इतर मनुष्यांच्या प्रेतांना त्यावेळीं आजच्या प्रमाणें अग्निसंस्कारच करीत असत. संन्याशांचीं प्रेतें मात्र पुरीत असत. प्रेतदहनानंतर तिसरे दिवशीं किंवा दहावे दिवशीं चितेंत सांपडणाऱ्या अस्थि गोळा करून त्या एखाद्या पवित्र मानिलेल्या नदींत किंवा सरोवरांत बहुधा नेऊन टाकीत. मृतांची श्राद्धें करून ब्राह्मणांना भोजन आणि दक्षिणा वस्त्रें इत्यादि वस्तु अर्पण करीत. पण या वस्तु म्हणजे आज पुराण ग्रंथांतून किंवा अलीकडील दुसऱ्या ग्रंथांतून ज्या दृष्टीस पडतात त्या त्यावेळीं देण्याचा प्रचार नव्हता. प्रभाकरवर्धनाच्या मृत्यूनंतर काय काय व्यवस्था झाली याचें जें बाणानें वर्णन केलें आहे त्यावरून वरील विधानाचा खुलासा होईल. बाणानें लिहिलें आहे.

" अथ भुक्ते प्रथम-प्रेत-पिंड-भुजि द्विजन्मनि, गतेषूद्वेजनीयेष्वाशौचदिवसेषु, चक्षुर्दोहदायिनि दीयमाने द्विजेभ्यः शयनासनचामरातपत्रामत्रपत्रशस्त्रादिके नृपतिनिकटोपकरणकलापे,

* उदाहरणार्थ जयद्रथाला मारण्याची प्रतिज्ञा करून ती पुरी न झाल्यामुळें अर्जुनानें अग्निप्रवेश करण्याची सिद्धता केली. भूरिश्रव्यानें प्रायोपवेशन केलें (प्राण कोंडला). कोणी अन्नपाणी वर्ज करून प्राण देत. प्रयाग क्षेत्रीं प्राण देण्याच्या चालीचा युएनत्सगानें सुद्धां उल्लेख केला आहे.

नीतेषु तीर्थस्थानानि सह जनहृदयैः कीकसेषु,.........वनाय विसर्जिते महाजिति राजगजेन्द्रे देवो हर्षः महाजनैरऽस्मानं वेष्ट्य मानमद्राक्षीत्" (सहावा उच्छ्वास प्रारंभ) "प्रथम पिंड भक्षक एका ब्राम्हणांस भोजन देऊन झालें असतां, आशौचाचे उद्वेगकारक दिवस संपवून मृत राजानें पूर्वी उपभोगिलेल्या शयन, आसन, चामरें, छत्री, पात्रें, रथ, शस्त्रें इत्यादि दर्शनानेंच दुःख देणाऱ्या वस्तु ब्राह्मणार्पण केल्यावर, राजाच्या अस्थि तीर्थास नेऊन झाल्यावर व ज्या राजगजेंद्रानें पुष्कळ लढाया जिंकिल्या होत्या, त्याला वनांत सोडून दिल्यावर हर्षाच्या भोंवतीं लोक गोळा झालेले त्याला दिसले." या वर्णनांत प्रथम पिंडदान प्रसंगीं एकाच ब्राह्मणाला जेवावयास घातल्याचें सांगितलें आहे. तसेंच राजाचा हत्ती ब्राह्मणाला दिला नसून त्याला रानांत सोडून दिलें. राजाच्या उपयुक्त वस्तु ब्राह्मणांना दिल्या,पण त्या त्याला यमलोकीं वैतरिणी नदी ओलांडितांना सुख व्हावें ह्मणून नसून मागें राहिलेल्यांना त्यांच्या दर्शनानें दुःख होत होतें म्हणून दिल्या. प्रभाकरवर्धना-सारख्या महाराजाच्या या अन्त्यविधिवर्णनावरून एवढें दिसून येईल कीं, मृताच्या आत्म्याला परलोकीं सुख व्हावें ह्मणून ज्या अनेक वस्तूंचें दान गरुड-पुराणांत सांगितलें आहे त्याची कल्पना हर्षकाळीं नव्हती. वर दिलेल्या अवतरणांत " सुधानिचयचिते चिता चैत्यचिन्हे " असे बाणाचे शब्द असून ते आम्हीं गाळले आहेत. त्यांचा अर्थ चांगलासा समजत नाहीं. तथापि मृतराजांच्या दहन-भूमीवर समाधि किंवा छत्री बांधण्याची आतांच्या प्रमाणेंच तेव्हांहि चाल असावी आणि त्यासाठीं ती जागा नीट लक्षांत रहावी म्हणून तावडतोब चितेच्या जाग्यावर चुन्याची रास करून ठेवीत, व पुढें सवडीप्रमाणें त्या जागेवर स्मारक उभारीत असें त्यावरून अनुमान होतें. साधारण लोकांच्या

चितास्थानावर अर्थातच अशीं स्मारकें होत नसत, हें ह्युएनत्सं-गाच्या पुढील लिहिण्यावरून दिसून येतें.

ह्युएनत्संग म्हणतो 'मृत मनुष्याच्या अन्त्यविधीचे प्रसंगीं त्याचे नातेवाईक रडून शोक करतात, केंस तोडतात, कपडे फाडतात, व ऊर बडवितात. सुतकाचा पोषाक कांहीं विशिष्ट ठरलेला नसून आशौचाचे दिवस देखील ठराविक नाहींत. मृतशरीराची व्यवस्था लावण्याचे सामान्य प्रकार तीन म्हणजे चितेवर तें दहन करणें, किंवा पाण्यांत टाकून देणें, किंवा दूर रानांत पुरून किंवा टाकून पशूंच्या हवालीं करणें असें होते. बहुमानाच्या पदव्या काय त्या जीवंत माणसांसच देत, मृतांना अशा पदव्या नसत. ज्या घरांत मृत्यु झाला असेल, तेथें कांहीं दिवस इतर लोक अन्न ग्रहण करीत नाहींत; परंतु सर्व अंत्यविधि उरकल्यावर सर्व गोष्टी पूर्ववत् चालू होतात. मृतशरीराबरोबर स्मशानांत जाणारे सर्व अपवित्र झाल्याकारणानें नगराच्या किंवा गांवाच्या वेशीच्या आंत येण्यापूर्वी त्यांना स्नान करावें लागतें.

जे अगदीं जराग्रस्त किंवा असाध्य रोगानें पछाडल्यामुळें जीवि-ताला कंटाळले असतात अशांना त्यांचे मित्र व सोयरेधायरे होडींत घालून वाजत गाजत गंगेच्या प्रवाहांत मध्यावर नेतात आणि तेथें ते 'आतां आम्हीं स्वर्गलोकीं जन्म घेणार' असें म्हणून नदींत उडी घेतात.

"पण बौद्धसंघाला मृताबद्दल मोठ्यानें शोक करण्याचा निषेध केलेला आहे. त्यांच्यांत कोणाचा बाप मरण पावल्यास त्याचें कृतज्ञतादर्शक स्तोत्र ते म्हणतात व मृताच्या कृत्यांचें अनुकरण करणें हाच परलोकीं सुख प्राप्त करून घेण्याचा उपाय होय असें ते समजतात."

# प्रकरण ६ वें.

## धार्मिक स्थिति.

हर्षकाळीं भरतखंडाच्या धार्मिक स्थितींतील अत्यन्त महत्वाची बाब म्हणजे ज्या दोन किंवा तीन धर्मांमध्यें सर्व देशांतील प्रजा वाटून गेली होती त्या धर्मांत आढळून येणारी पराकाष्टेची परस्पर-सहिष्णुता ही होय. प्राचीन हिंदुधर्म आणि त्याचें जोडीदार बौद्ध व जैन हे नवे धर्म जणूं काय हातांत हात घालून चालत होते. एकाच राज्यांत किंवा एकाच शहरांत किंबहुना एका कुटुं-बांत देखील हिंदु, बौद्ध व जैन या धर्मांचे अनुयायी गुण्यागोविं-दानें राहून धर्माच्या गहन तत्वांवर अत्यन्त सहनशीलतेनें वाद-विवाद करीत. त्यावेळीं असा चमत्कार पहावयास सांपडे कीं, एकाच कुटुंबांत बाप शैव, तर मुलगा बौद्ध असून तोहि पुढील आयुष्यांत मत पालटल्यास धर्मान्तर करी व हें धर्मान्तर त्याच्या कौटुंबिक किंवा सामाजिक नात्याच्या आड येत नसे. अशा प्रकारच्या धार्मिक सहिष्णुतेचें कारण बहुशः असें होतें कीं, या धर्मांचे अनुयायी लोक प्रायः एकाच वंशाचे असल्यामुळें त्यांचे सामाजिक आचारविचार सारखेच असून अन्नोदक—व्यवहार सुद्धां एकाच प्रकारचा होता. शिवाय जातिबंधनांना चिकटून रहाण्याची येथील लोकांची जी उपजत प्रवृत्ति दिसून येते ती या नव्या म्हणजे बौद्ध व जैन धर्मांनीं हाणून पाडली नाहीं उलट तिनेंच त्यांच्यावर पगडा बसविला, आणि बौद्ध व जैनधर्मीय लोक देखील जातिबंधनें पाळूं लागले. त्यांतील मठवासी व भिक्षु हे मात्र जातिबंधनें झुगारून देत, पण इतर गृहस्थ लोक जातिबंधनें

पाळीत, या कारणामुळें त्या तिन्ही धर्मांची सहिष्णुता अबाधित राहिली होती.

हिंदुस्थानांतील त्या काळच्या अनेक राज्याचें जें वर्णन ह्युएनत्संगानें केलें आहे, त्यावरून त्यांतील लोक जितके जुन्या धर्माचे होते तितके नव्याधर्मांचेहि होते असें दिसतें. जैनधर्म त्यांतले त्यांत अद्यापि इतका महत्वास पोंचला नसून त्याचे अनुयायी पंजाब, बंगाल आणि दक्षिण यांतच काय ते थोडया ठिकाणीं दृष्टीस पडत होते. या पुस्तकास जोडिलेल्या नकाशांत हर्षकाळीं चालू असलेल्या या प्रमुख धर्मांची संख्येच्या दृष्टीनें स्थिति कशी होती हें दाखविण्यासाठीं ते धर्म निरनिराळ्या रंगांनीं दर्शविले आहेत. त्यांवरून असें दिसून येईल कीं, अगदीं वायव्य सरहद्दीवरील कपिश किंवा काफिरिस्थान या मुलखांत केवळ बौद्धांचीच सरशी होती तर अगदीं ईशान्येकडील आसाम वगैरे प्रांतांत हिंदूंचाच बहुतेक भरणा होता; आणि इतर प्रांतांत या दोन्ही धर्मांच्या अनुयायांची संख्या सामान्य लोक किंवा राजेरजवाडे या दोन्ही वर्गांत साधारणतः समसमानच होती. राजे आणि प्रजा या दोहोंतहि या दोन्ही धर्मांचें सारखेंच प्राबल्य असल्यामुळें याहि कारणास्तव आणखी त्या परस्परांमध्यें फारसा द्वैधीभाव न होतां सलोखाच नांदत होता.

या सलोख्याचें आणखी देखील एक कारण असावें असें दिसतें. त्या वेळचे हिंदु झाले काय व बौद्ध झाले काय दोघेहि सारखेच मूर्तिपूजेचे भक्त होते; आणि जर कांहीं फरक असलाच तर उलट बौद्धांमध्येंच ती अधिक जोरांत चालू होती. बौद्धधर्माचा आरंभ पाहिला तर मुळीं ईश्वराचेंच अस्तित्व न मानण्यांत झाला; पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, त्याचें पर्यवसान मात्र बुद्धालाच प्रत्यक्ष परमेश्वर मानण्यांत झालें, व या कल्पनेची पुढं वाढ झाल्यावर त्यांत आणखीहि बोधिसत्वादि देवांची भर पडली व

एकंदरींत त्या धर्मांत व विशेषतः त्याच्या महायान पंथांत मूर्ति-पूजा कायमची स्थानापन्न झाली. पुढें तिचा या देशांत तसाच बाहेर देखील इतका प्रसार झाला कीं, बुध हा शब्दच आरबी भाषेंत मूर्ति या अर्थानें रूढ झाला. बौद्ध धर्मांतच काय, खरें म्हटलें तर साहव्या शतकाच्या सुमारास मूर्तिपूजेचें साम्राज्य सर्व जगभरच पसरलें होतें. अतलांतिक महासागराच्या पश्चिम किनाऱ्यापासून तों थेट पूर्वेस पासिफिक महासागरापर्यंत जगाचा सर्व भाग–मग त्यांत ख्रिस्ती धर्म असो, सेमिटिक धर्म असो, हिंदु धर्म असो कीं बौद्ध असो,–मूर्तिपूजेंत मग्न झालेला असून हे सर्व धर्म मूर्तींची पूजा करण्यांत एकमेकांशीं जणूं स्पर्धाच करीत होते.* या सर्व परिस्थितीचा स्वाभाविक परिणाम असा झाला कीं, त्या सुमारास मूर्तिनिषेधक व मूर्तिभंजक अशा एका नवीन धर्माची प्राणप्रतिष्ठा होणें अपरिहार्य होतें. पण ह्युएनत्संगाच्या वेळे-पर्यंत तो हिंदुस्थानांत येऊन पोंचला नव्हता. त्यावेळीं सर्व हिंदुस्थानभर जिकडे तिकडे हजारों देवळें व स्तूप यांची गर्दी उसळली असून त्यांत सर्व धर्मांचा वांटा होता. बुद्ध व बोधिसत्व यांचे किंवा जैन तीर्थंकराचे प्रचंड पुतळे देवळांत स्थापून त्यांची हजारों भक्त पूजा करीत, त्याप्रमाणें हिंदूच्या देवालयांतहि हिंदुधर्मी-यांकडून त्यांच्या देवांच्या मूर्तींची व विशेषतः शिव, विष्णु व सूर्य यांची पूजा होई. कल्हणाचा ऐतिहासिक ग्रंथ जो राजतरंगिणी त्यांत त्यानें हिंदु व बौद्ध अशा दोन्ही धर्मांच्या अनुयायी राजांनीं काश्मिरांत शिवाचीं व बुद्धाचीं शेंकडों मंदिरें बांधिल्याचें वर्णन केलें आहे. इतर प्रांतांत देखील शिव, विष्णु, सूर्य आणि बुद्ध यांचीं

---

* जैन धर्मांत देखील मूर्तिपूजेचें बंड फार झालें होतें व त्यांच्या मूर्ति म्हणजे जिन अथवा तीर्थंकर यांचे नग्न उभे पुतळे असत. बौद्धांमध्यें बुद्धाची ध्यानस्थ बसलेली मूर्ति प्रिय होती तर जैनांना उभ्या मूर्तींची आवड होती.

मन्दिरें त्या त्या देवतेच्या भक्त राजांनीं व बड्या अधिकाऱ्यांनी व श्रीमंत व्यापाऱ्यांनीं बांधिली होतीं असें तत्कालीन लेखांवरून दिसून येतें. या हिंदूंच्या व बौद्धांच्या सगळ्या मोठमोठ्या मंदिरांचें वर्णन येथें देणें शक्य नाहीं. त्यांपैकीं ह्युएनत्संगानें बऱ्याच मंदिरांचें वर्णन केलें आहे, पण त्यांपैकीं दोन विशेष प्रसिद्ध असलेल्यांचा मात्र येथें निर्देश करूं. मूलस्थानपुर म्हणजे हल्लींचे मुलतान, येथें एक सूर्याचें प्रचंड व भव्य मंदीर होतें. ह्युएनत्संग म्हणतो, 'त्यांतील मूर्ति सुवर्णाची असून तिजवर रत्नजडित अलंकार होते. तिचें सामर्थ्य कांहीं अद्भुत होतें. मूर्तिसमोर गाणाऱ्या स्त्रियांचे ताफे एकामागून एक येऊन गायन करीत. मंदिरांत नित्य नंदादीप पेटत असून धूप व फुलें मूर्तीवर नित्य वाहिलीं जात. त्या मंदिराला हिंदुस्थानांतील सर्व ठिकाणच्या राजेराजवाड्यांनीं मोठमोठ्या मूल्यवान् देणग्या दिलेल्या असून गरीब लोकांची जेथें अन्नवस्त्राची व औषधपाण्याची व्यवस्था होईल अशा धर्मशाळा बांधून ठेविल्या होत्या. या मंदिरांत नित्यशः दूरदूरच्या ठिकाणाहून आलेले हजार भक्त तरी स्तोत्रपाठ करीत असलेले आढळून येत. मंदिराच्या सभोंवार पाण्याच्या टांक्या व फुलांचे बगीचे असून त्यामुळें तें स्थान एकंदरींत फार रमणीय झालें होतें." ( वाटर्स पु. २ पा २५४ ). मुलतानच्या सूर्यमंदिराबरोबर काशीच्या शिवमंदिराचाहि उल्लेख केला पाहिजे. "या मंदिरांत दररोज १०००० शिवभक्त दर्शनास येत असून त्यांतील देवाची ( शिवाची ) पुरुषाकार मूर्ति जवळ जवळ सत्तर हात उंचीची असून फार सुबक व भव्य असल्यामुळें हुबेहुब सजीव माणसासारखी वाटे."

या दोन उदाहरणांवरून राजेरजवाड्यांच्या दातृत्वामुळें हिंदूंच्या तसेंच बौद्धांच्या देवालयांची संपत्ति कशी संचित होत

होती व त्यामुळें ती पुढील काळांत अत्याचारी व अधार्मिक अशा लुटारूंच्या लोभाचा विषय कशी होऊन बसली हें सहज समजून येईल. वस्तुतः मूर्ति म्हणजे मूळ उच्च प्रकारच्या ईश्वरविषयक कल्पनेचें केवळ प्रतीक होय. पण जेव्हां तिचें केवळ प्रतीकत्व जाऊन ती म्हणजेच देव असें होतें, तेव्हां तिजविषयीं अज्ञानामुळें नानाप्रकारच्या विलक्षण समजुती उत्पन्न होणें अपरिहार्य होतें. मूर्तीच्या शृंगारार्थ मिळालेल्या दागदागिन्यामुळें मंदिरांत अपरिमित संपत्ति तर सांचतेच; पण शिवाय त्या मूर्तीच्या अद्भुत सामर्थ्याविषयीं सुद्धां कित्येक वेडगळ कल्पना उद्भवतात. हर्ष-काळीं हिंदु व बौद्ध असे दोन्ही धर्मांचे लोक आपापल्या मंदिरां-तील मूर्तींच्या विलक्षण सामर्थ्याबद्दल नानाप्रकारच्या भोळ्या कल्पना करण्यांत एकमेकांवर कडी करीत होते. धर्मविषयक वेड्या समजुती म्हणजे **धर्मावर गुदरलेला अनर्थच** होय व या नियमाला बौद्धधर्म कांहीं अपवाद ठरला नाहीं. बौद्ध धर्माचा उदय जसा ईश्वर नाहीं असें मानण्यापासून झाला तसाच तो वेडगळ समजुतींचा निषेध करीतच सुरू झाला होता. पण जेव्हां त्याची प्रगति होऊन बुद्धालाच स्वतः ईश्वर बनविण्यांत आलें तेव्हां त्याच्या व्यक्तीच्या पूजेचें वेड इतक्या कळसास चढलें कीं, त्याचीं हाडें, त्याच्या मांसाचे तुकडे, त्याचीं काढिलेलीं नखें, केसांच्या बटा, हीं जशीं ज्याला सांपडलीं, तशीं त्यानें अत्यादरानें मिळवून त्यांची मंदिरांत व स्तूपांत स्थापना केली व त्यांना पुढें अद्भुत सामर्थ्याच्या कल्पनेचीहि जोड देण्यांत आली. मंदिरांत स्थापन केलेल्या बुद्धाच्या मूर्तीचें किंवा असल्या अवशेषांचें कसें विलक्षण सामर्थ्य असतें याच्या अनेक गोष्टी ह्युएनत्संगानें आपल्या प्रवासवर्णनांत लिहून ठेविल्या आहेत. त्या वाचतांना वाचकाला असें आश्चर्य वाटतें कीं,*

* हिंदू लोकांच्या धर्मविषयक वेडगळ समजुतीची एक गोष्ट ह्युएनत्संगानें

जो ह्युएनत्संग हिंदुलोक हरिद्वार येथें गंगेच्या पाण्यांत लाटा उत्पन्न करून किंवा मृतांच्या अस्थि त्या पाण्यांत टाकून त्यांच्या आत्म्याला पापमुक्त करतां येतें असें मानतात म्हणून त्यांच्या भोळपणाबद्दल थट्टा करतो, ( वाटर्स पु. १ पा. ३१९ ) तोच ह्युएनत्संग स्वतः असें ह्मणतो, कीं, 'मगध देशांतील नालंदा मठाजवळच्या भव्य स्तूपांत स्थापिलेल्या बुद्धाच्या शारिरांतून ( शरीर-भागांतून ) रात्रौ तेजस्वी प्रकाश निघत असतो.' हा प्रकार आपण स्वतः पाहिल्याचें नमूद करतांना तो लिहितो 'हा शारीर-स्तूप सूर्याप्रमाणें लखलखीत व तेजस्वी असून त्याच्या शिख-रांतून पंचरंगी थरथरणारी ज्योत निघून ती आकाशाला मिळते; तेव्हां चंद्र व तारे दिसेनासे होऊन तो प्रदेश एका सूक्ष्म गंधानें व्याप्त होऊन जातो." परदोषाविष्करणाची इच्छा व स्वमत-व्यक्तिविषयक आदरभाव याहून अधिक कोठें आढळेल काय ?

याप्रमाणें बुद्धाचे शरीर-अवशेष व त्याच्या मूर्ति यांनांच तेवढें अद्भुत सामर्थ्य होतें असें नाहीं, तर कित्येक बौद्ध भिक्षूंच्याहि वांट्यास

---

सांगितली आहे; ती अशी की, "देवपुरुष हा एकदां सिंहलद्वीपाहून इकडे आला असतां कांही भोळे लोक पाण्यांत हात हालवून त्यांत लाटा उत्पन्न करीत असलेले त्याला दिसले. तेव्हां त्याने स्वतः खालीं ओणवून पाण्याला आडवून धरण्याचा प्रयत्न चालविला. तेव्हां तीर्थिकांनीं त्याला 'हें तूं काय करतोस ' असें विचारितां त्याने उत्तर केलें "माझ्या सिंहलांतील तृषाक्रान्त सोयऱ्यांना हें पाणी पाठवीत आहें.' हा वेडया असें त्यांनी उलट बोलतांच, तो ह्मणाला 'येथें पाणी हालवून जर परलोकीं असलेला पापी जनांचा उद्धार होतो, तर येथल्याच लोकीं असलेल्या सिंहलांत माझ्या नातेवाईकांना हे पाणी नद्या पर्वत इत्यादि मध्यें असतांहि कां पोंचणार नाहीं ?' हें ऐकून आपल्या वेडेपणाबद्दल तीर्थिकाची खात्री झाली व लगेच त्यांनीं बौद्ध धर्माचा स्वीकार केला.'' ( वाटर्स पु. १. पा. ३२१ ).

तें आलें होतें. हिंदु तपस्वी सुद्धां असल्या कल्पनांत मागें होते असें नाहीं. असल्या अतिमानुष शक्ति म्हणजे सिद्धि, योगाभ्यासानें साध्य होतात असा त्यांचा समज होता; व म्हणून बौद्ध भिक्षु व हिंदु तपस्वी अशा दोन्ही वर्गांनीं त्याच्या मागें लागून त्याचें फारच स्तोम माजविलें होतें. तथापि असल्या योगाभ्यासाचे मार्ग हिडिस स्वरूपाचे नव्हते; परंतु शैव पंथांतील कित्येक शिवभक्तांचे वाममार्ग फारच भयंकर व त्यांच्या कल्पना अति विलक्षण असत. शिवाचे गण म्हणून कोणी राक्षसच व पिशाच्च असतात व त्यांना संतुष्ट करावयाचें तर मनुष्याचे बळी अथवा प्रेतमांसाच्या आहुति दिल्या पाहिजेत असें ते मानीत. या लोकांना पाशुपत असें नांव असून गळयांत ते नररुंडाच्या माळा घालीत असें ह्युएनत्संगानें वर्णन केलें आहे-( वाटर्स पु. १ ) या पंथाचा मुख्य देव म्हणजे उज्जनीचा महाकाळ व त्याचा साथीदार म्हणजे पिशाचांचा नायक वेताळ. श्मशानभूमींत प्रेताच्या तोंडांत अग्नि प्रदीप्त करून व त्यांत आहुति देऊन या देवांना संतुष्ट करावयाचें असे. या सर्व खटाटोपाचा उद्देश शिवसान्निध्यांत रहाणाऱ्या विद्याधर नांवाच्या भाग्यशाली देवकोटीच्या स्थितीला जाऊन पोंचावयाचें असा होता. ठाणेश्वरच्या वर्धन घराण्याचा मूळ पुरुष जो पुष्यभूति त्यानें भैरवाचार्य नांवाच्या एका पाशुपताला वर सांगितल्या प्रकारचें हिडिस स्वरूपाचें व्रत करून विद्याधर पद प्राप्त करून घेण्यांत साहाय्य केलें व आपलाहि राजा या नात्यानें उत्कर्ष साधून घेतला असें हर्षचरिताच्या तिसऱ्या उच्छ्वासांत बाणभट्टानें वर्णन केलें आहे. आतां या गोष्टी कितीहि काल्पनिक मानिल्या तरी त्यांवरून शैव पंथांत कशा विलक्षण भोळ्या समजुती रूढ होत्या व त्यांचा पगडा सर्व देशभर कसा बसला होता याची साक्ष पटते. ही जी तंत्रोक्त शिव

पूजा ती दक्षिणेंतून उत्तरेकडे गेली असें दिसतें; कारण असल्या विधींत पुरोहित म्हणून ज्याचें नांव येतें ते द्राविड व आंध्र असत.*

शिव पूजेसारखीच जो दुसरी अघोरी पद्धतीची चंडिका-पूजा तींतहि द्रविड व आंध्र हेच पुरोहित असत. हे पंथ मूळ दक्षिणेंतून आलेले असोत वा नसोत, एवढी एक गोष्ट निश्चित आहे कीं, हे तंत्रोक्त पूजाविधि व त्यांत रूढ असलेल्या भोळ्या पण अघोरी कल्पना यांचें साम्राज त्या काळीं काश्मीर व काबूलपासून तों पूर्वेकडे बंगालपर्यंत आणि दक्षिणेकडे कन्याकुमारीपर्यंत सर्वत्र पसरलें होतें. ह्युएनत्संगाच्या वर्णनावरून व तत्कालीन लेखांवरून असें सिद्ध होतें कीं, त्यावेळीं आदित्य व विष्णु यांपेक्षां शिवाचीच भक्त-मंडळी सामान्य प्रजेंत काय व राजे लोकांत काय पुष्कळ अधिक होती. शिव, विष्णु व आदित्य हे प्रमुख देव सोडून दिले तर हिंदूच्या इतर देवतांपैकीं कुमार म्हणजे कार्तिकस्वामी आणि चंडिका किंवा कालीमाता यांचें विशेष महात्म्य दिसून येतें व क्वचित् कोठें गणपतीचेहि भक्त आढळतात.+

या देवांच्या पूजेबरोबरच जुनी वैदिक अग्निपूजाहि कोठें कोठें होत असे. ब्राह्मण लोक साधारणतः अग्निहोत्र पाळीत आणि क्षत्रिय

* क्वचिन्मुण्डोपहारणोद्यत द्रविड प्रार्थ्यमानामदर्कं क्वचिदान्ध्रोपध्रियमाण बाहुवप्रोपयाच्यमानचांडिकम् १ इ. ( ह. च. ५ वा उच्छ्वास- ) ठाणेश्वर नगराचें हें वर्णन आहे, व प्रभाकरवर्धन मृत्युपंथास लागला तेव्हांची स्थिति यांत वर्णिली आहे. कोठें द्रविड मुंड वहाण्यास तयार होऊन वेताळाची ( आमदर्क ) प्रार्थना करीत आहे, कोठें आंध्र बाहु उभारून चंडिकेला नवस करीत आहे. इ.

+ आज ज्याप्रमाणें गणपतीचें नांव कोणत्याहि प्रसंगीं आरंभीं येतें, तसें तें प्राचीन ताम्रपटांतून वगैरे आलेलें दिसत नाहीं.

त्तर कांहीं मोठे श्रौत यज्ञहि करीत. अनेक ठिकाणच्या राजांनीं अश्वमेध केल्याचें प्राचीन लेखांवरून दिसून येतें. या कारणास्तव अश्वमेधाचा कलियुगांतील निषेध हर्षाच्या काळानंतर प्रचारांत आला असें म्हणणें गैर होणार नाहीं. आम्हाला असें वाटतें कीं, कलिवर्ज्यांचें सगळेंच प्रकरण या काळानंतर उत्पन्न झालेलें आहे; असें अनुमान करण्याचीं कारणें आम्हीं पुढें देणारच आहों. तात्पर्य असें कांहीं मोठे यज्ञहि त्या काळीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य* राजांकडून होत असत, परंतु शूद्र राजे व हूणादि परकी राजे हे मात्र त्या भानगडींत पडलेले दिसत नाहींत. यावरून असें उघड होतें कीं, बौद्ध धर्माचा विशेष प्रसार या शूद्र व परजातीय लोकांतच झालेला होता. त्यांना श्रौतस्मार्त यज्ञांचा निषेध असल्यामुळें यज्ञाविरुद्ध असलेल्या बौद्धधर्माकडे त्यांचा ओढा सहज वळला.

तथापि या यज्ञांत गाई, घोडे व इतर प्राणी यांची हत्या होत असल्यामुळें हर्षाच्या अमदानींत ते बंद झालेले असावेत

* इ. स. ५७८ तील बदामीच्या कीर्तिवर्म्याच्या कोरीव लेण्यांतील लेखांत चालुक्य राजांनी अग्निष्टोम, वाजपेय, पौंडरीक, अश्वमेध, इत्यादि केल्याचें सांगितलें आहे ( इंडियन अँटिक्वरी. पु. ६ पा. ३६३ ). कॉर्पस इन्स्क्रिपशन पु. ३ यांतील २२ नंबरच्या मगधांतील स्कंदगुप्ताच्या स्तंभ–लेखांत म्हटलें आहे की ' समुद्रगुप्तानें पुष्कळ काळ लुप्त झालेला अश्वमेध केला " ( चिरोत्सन्नाश्वमेधाहर्ता ). पा. ५० याच लेख मालेंतील ३६ नं. च्या लेखांत ( पा. १५९ ) एका इंद्रविष्णु नांवाच्या ब्राम्हण राजाला अनेक यज्ञांचा कर्ता ( क्रतुयाजी ) असें म्हटलें आहे. तसें ३५ नं. च्या लेखांत दुसऱ्या प्रवरसेनाच्या वाकाटकांच्या ताम्रपटांत ' दशाश्वमेधावभृथ–स्नातानां भारशिवानां महाराज श्री भवनाग दौहित्र, असे शब्द आहेत. यांत भारशिवानें दहा अश्वमेध केले होते असें सांगितलें आहे.

व त्यामुळें जुन्या मताच्या क्षत्रिय घराण्यांत असमाधान उत्पन्न होऊन त्या योगानें पुढील शतकांत जी हिंदुत्व बौद्ध धर्माच्या लोकांमध्यें धुमश्चक्री सुरू झाली तिचें एक कारण उत्पन्न होऊन बसलें. वैदिक यज्ञमार्गांत झालें तरी भोळी समजूत होतीच. यज्ञाच्या साहाय्यानें इहलोकीं अथवा परलोकीं जी कांहीं इच्छित गोष्ट असेल ती प्राप्त होते;आणि पृथ्वीवरील व स्वर्गांतील देवताहि त्यामुळें आपल्या अंकित होतात अशी यज्ञमार्गीयाची श्रद्धा होती. पण हर्षाचा बलिष्ठ राजदंड जिकडे तिकडे वावरत होता तोंपर्यंत ह्युएनत्संगानें सांगितल्याप्रमाणें सर्वप्रकारचे हिंसाप्रधान यज्ञ बंद झाले. यज्ञांचा भर होऊन बौद्धधर्माच्या पहिल्या भरभराटीच्या काळांत कुशान राजांच्या अमलाखालींहि ते यज्ञ असेच बराच काळ बंद होते. पण पुढें समुद्रगुप्तानें अश्वमेध करून त्याचें पुनरुज्जीवन केलें. यानंतर तीन शतकें जो या यज्ञांचा भर पुनः सुरू झाला तो हर्षकाळापर्यंत चालू होता व वर सांगितल्या प्रमाणें हर्षानें पुनः त्यांना बंदी केली.

पण हे मोठे यज्ञ बाजूस ठेविले तर नेहमींचें जें अग्निहोत्र तें मात्र ब्राह्मणांमध्यें हर्ष काळींसुद्धां जारीनें सुरू असून आहिताग्नि गृहस्थांच्या वृत्तीनें राहणारे बहुतेक ब्राह्मण अग्निहोत्री असत. या ब्राह्मणांच्या धार्मिक क्रमांत प्राचीन वैदिक यज्ञ आणि नंतरची मूर्तिपूजा याचें कसें मिश्रण झालें होतें याचें स्पष्ट पण मजेदार वर्णन बाणाच्या हर्षचरितांत आलें आहे. चक्रवर्ती हर्षाला भेटावयास जाण्याचें जेव्हां बाणानें ठरविलें तेव्हां या महत्त्वाच्या प्रवासास निघण्यापूर्वी त्यानें जे धार्मिक विधि व उपचार केले ते सांगतांना तो म्हणतो ‘ अथान्यस्मिन्नहन्युत्थाय, प्रातरेव स्नात्वा, धृतधौतधवलदुकूलवासाः, गृहीताक्षमालः, प्रास्थानिकानि

सूक्तानि मंत्रपदानि च बहुशः समावर्त्य, देवदेवस्य विरूपाक्षस्य क्षीरस्नपनपुरःसरां सुरभिकुसुमधूपगंधध्वजबलिविलेपनप्रदीपदान बहुलां विधाय पूजां परमया भक्त्या,....प्राज्याज्याहुति प्रवर्धित दक्षिणार्चिषं भगवन्तमाशुशुक्षणिं हुत्वा, दत्वा द्युम्नं यथाविद्यमानं ब्राह्मणेभ्यः, प्रदक्षिणीकृत्य प्राङ्मुखीं नैचिकिम्, शुक्लांगरागः, शुक्लमाल्यः, शुक्लवासाः,....शिखा–सक्त–सिद्धार्थकः....आघ्रातः शिरसि कुलवृद्धैः,....मौहूर्तिकमतेन कृतनक्षत्र–दोहदः....प्रणम्य कुलदेवताभ्यः, कुसुमफल–पाणिभिरप्रतिरथं जयद्भिर्निजद्विजै रनुगम्यमानः, प्रथमचलित–दक्षिण–चरणः, प्रीतिकूटान्निरगात् ।"

"त्यानें ( बाणानें ) दुसरे दिवशीं प्रातःकाळीं लवकर उठून स्नान केलें, धुतलेलें स्वच्छ पांढरें वस्त्र परिधान केलें, हातांत रुद्राक्षमाला घेतली, प्रस्थानप्रसंगीं म्हणावयाच्या वेदमंत्राचा वारंवार जप केला, देवदेव शंकराची पयः स्नानपूर्वक पूजा करून त्याला सुवासिक पुष्पें, धूप, गंध, दीप, नैवेद्य भक्तिपुरःसर अर्पण केले;...मग घृताच्या आहुतींनीं प्रज्वलित झालेल्या अग्नींत हवन केलें, ब्राह्मणांना यथाशक्ति द्रव्य दान केलें, पूर्वाभिमुख उभी असलेल्या यज्ञ-धेनूला प्रदक्षिणा घातली. नंतर त्यानें स्वतःला पांढऱ्या चंदनाची उटी लाविली, पांढऱ्या फुलांच्या माळा घातल्या, पांढरें वस्त्र परिधान केलें,....व शेंडींत पांढऱ्या मोहऱ्या ( सिद्धार्थक) घातल्या. त्याच्या वडील माणसांनीं त्याचें मस्तक हुंगिलें, त्यानें ज्योतिष्यांनीं सांगितल्याप्रमाणें नक्षत्रांचें दान केलें, कुलदेवतांना प्रणाम केला, उजवा पाय पुढें टाकिला आणि हातांत फुलें, फळें घेऊन वेदमंत्र पठन करणाऱ्या ब्राह्मणांना पाठीशीं घेऊन तो आपल्या प्रीतिकूट गांवाहून निघाला." (ह. च. उच्छ्वास२रा)

सातव्या शतकांतील एका नामांकित ब्राह्मण पंडिताच्या (पुरोहिताचा धंदा न करणाऱ्या ) आयुःक्रमापैकीं धर्माच्या बाजूचें

हें असें हुबेहुब चित्र आहे. प्राचीन गृह्यसूत्रांवरून दिसून येणाऱ्या धार्मिक वर्तनाच्या मानानें पहातां सदरील क्रम बहुतांशीं वैदिकच आहे असें म्हणावें लागतें.* दोन्ही प्रकारांत वेदमंत्रांचें पठण व अग्नि समिद्ध करून त्याला आहुति देणें या गोष्टी आहेतच. पण बाणाच्या वर्णनांत शिवादि देवतांच्या मूर्तींची पूजा व फलज्योतिषावर बसविलेल्या कांहीं इतर चाली वगैरे ज्या गोष्टी आढळतात. त्या पूर्वकाळीं नव्हत्या, त्या हर्षकाळांत पूर्वींहून अधिक दिसतात. अलीकडे तर वरील विधींपैकीं वैदिक भाग बहुतेक गळला असून मूर्तींची पूजा व ज्योतिष–विषयक विधि या गोष्टी मात्र उरल्या आहेत. म्हणजे धार्मिक दृष्ट्या देखील हर्षाचा काळ प्राचीन व अर्वाचिन काळांना जोडणारा सांखळीचा दुवाच होय.

प्राचीन वैदिक कर्ममार्गाचा अवशेष म्हणून त्याकाळीं बहुतेक ब्राह्मणांच्या घरांत जसें अग्निहोत्र होतें, तसा उत्तरवेदकालीन मार्गाचा भाग जो संन्यासाश्रम त्याचे देखील भक्त व अनुयायी या हर्षकाळीं पहावयास सांपडत होते. प्रत्येक नगरांत व देवळांत असले संन्यासी वास करीत असून ते आपला उदरनिर्वाह भिक्षेवर करीत व सर्व वेळ शांतपणें ब्रह्मचिंतन करण्यांत किंवा बाणानें म्हटल्याप्रमाणें देवालयांतील मूर्तीपुढें प्रार्थना व ध्यान करण्यांत घालवीत. त्यांना पाराशरि असें नांव हर्षचरितांत व इतर ग्रंथांत देखील दिलेलें आढळतें; कारण त्यांचा वर्तनक्रम बहुतकरून पराशर सूत्रांत घालून दिल्याप्रमाणें

* घराहून महत्वाच्या प्रवासास निघण्यापूर्वी धार्मिक विधि काय करीत असत याचें दुसरें प्राचीन उदाहरण कालिदासाच्या शाकुंतलांत आहे. शकुन्तला सासरीं जावयास निघाली तेव्हांचा प्रकार बहुतांशीं वैदिक वर्णिलेला आहे.

होता. त्यांनीं जरी संसाराचा त्याग केलेला अस तरी त केवळ रानांत न रहातां नगरांतच रहात; कारण उदरनिर्वाहाचें साधन नगरांतील गृहस्थांचे घरांतून त्यांना मिळावयाचें होतें. या संन्याशांपैकीं कित्येक खरोखर फार सच्छील व विद्वान् असत. पण त्यांच्यांत बहुतेक भरणा बाणाच्या वेळीं तरी उदरंभरी अधार्मिक लोकांचाच असून शिक्षणाच्या नांवानें शून्य असल्यामुळें त्यांनीं आपल्या या आश्रमाला तिरस्कारार्ह करून सोडलें होतें. त्यामुळें संन्यासी वर्गाची बहुमान्य पदवी नष्ट होऊन पाराशरि हा शब्द हर्षकाळीं लफंग्या भोंदू माणसाचा वाचक झाला होता. तरुणपणींच्या स्वच्छंदी वर्तनांत बाणाचे देखील या पाराशरी व बौद्ध भिक्षूंपैकीं कांहीं जण संवगडी होते व त्यांसंबंधानें लिहितांना पुढें एके प्रसंगीं (ह० च० उच्छ्वास ६) तत्कालीन समाजस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करणारा बाणभट्ट म्हणतो कीं, या पाराशरीमध्यें अधार्मिक नाहीं असा माणूस विरळा. असें असतांहि या वर्गाला अद्यापि थोडाबहुत मान असून त्यांना राजेरजवाड्यांचा आश्रय असे. हर्षाच्या दरबारांतहि जैन, पाशुपत, पाराशरि, भिक्षु इत्यादिकांचा सत्कार होत असे असें बाणानें लिहिलें आहे ( ह. च. उच्छ्वास २. एकान्तोपविष्टैश्च जैनैरार्हतैः पाशुपतैः पाराशरिभिर्वर्णिभिश्च....उपास्यमानं...राजद्वारम् । )

---

* कमण्डलु जल शुचिशय चरणेषु चैत्य–प्रणतिपरेषु पाराशरिषु, यज्ञपात्रा पवित्रपाणी प्रकीर्णबाहृष्युत्तेजसि जातवेदसि हवींषि वषट्कुर्वति यायजूक जने ( ह. च. उछवास २ रा; हर्षाच्या नगरांतील संध्याकाळचें वर्णन ); कमंडलूंतील पाण्यानें हात पाय धुवून पाराशरी नमस्कार चैत्यापुढें करीत असतां हातांत यज्ञपात्र घेऊन प्रदीप्त अग्नीत अग्निहोत्री सायं आहुति देत असतां इत्यादि.

प्राचीन काळापासूनच प्रव्रज्या म्हणजे संसार-त्याग करण्याची उत्कंठा हिंदुधर्मीय लोकांच्या मनांत दृढमूल झालेली दिसते.* हें जग दुःखमय आहे व आत्मा 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' च्या चक्रांत आपल्या कर्मानुसार पडला असून त्यांतून मुक्त होण्याचा मार्ग म्हणजे संसार व तदन्तर्भूत सर्व कर्मांचा सर्वथा त्याग करणें हाच होय, अशा कल्पनेमुळें व श्रद्धेमुळें ही प्रव्रज्या उत्पन्न झालेली आहे. या श्रद्धेमुळें प्राचीन उपनिषत्कालीन ऋषि नगरवास सोडून अरण्याचा आश्रय करीत. बुद्धानें देखील याच विचाराला अग्रस्थान दिलें, व त्यांत मठांची भर घातली. ब्राह्मणधर्मीय संन्याशांना एक एकटेंच रहाण्याची शास्त्राची आज्ञा होती; परंतु बुद्धानें सर्व जातीच्या स्त्रीपुरुषांना मठवासी होण्याची अनुज्ञा दिली; इतकेंच नव्हे तर शांततेंत राहून त्यांचा उदरनिर्वाहहि चालावा एतदर्थ त्यानें गृहस्थाश्रमी धर्मनिष्ठांना त्यांचा परामर्श घेण्याची आज्ञाच दिली. त्यामुळें संघाराम ऊर्फ बौद्ध मठ ठिकठिकाणीं स्थापन होऊन बौद्धधर्माच्या प्रसाराबरोबर त्यांचाहि प्रसार झाला आणि अशा धर्मनिष्ठ लोकांच्या आश्रयावर संपन्न स्थितीला आलेल्या या संघारामांत सर्व जातींचे हजारों भिक्षु व भिक्षुणी निश्चितीनें व चैनीनें आयुष्यकाळ घालवीत असत. कित्येक धार्मिक राजे लोक या भिक्षु भिक्षुणीसाठीं मोठमोठ्या सुंदर इमारती, मंदिरें व स्तूप बांधून देत असत. या बौद्धधर्मीय मठ-संस्थांच्यापासूनच पुढें ख्रिस्ति धर्मांतील मठ-संस्था निःसंशय उत्पन्न झाल्या असून यूरोपांत ज्या कारणास्तव त्यांचा लय झाला, याच कारणास्तव पुढें इकडेहि त्यांचा नायनाट झाला. पण हर्षाच्या काळीं मठसंस्थांच्या ऱ्हासाला अजून सुरवात झालेली नव्हती. ह्युएनत्संग व बाणभट्ट

* अखिल-मनोज्वर-शमन-कारणं हि भगवती प्रव्रज्या। ह.च. उछ्वास ८वा

या दोघांच्या साक्षीवरून त्यांच्या काळीं सर्व हिंदुस्थानभर बौद्धमठ पसरले असून त्यांत हजारों भिक्षु व भिक्षुणी यांना आश्रय मिळे. व हीं संसार सोडलेलीं माणसें या काळीं बहुतेक सच्छील असून त्याविषयीं अजून तरी जुन्या ब्राह्मणधर्मीय पाराशरीसारखा प्रवाद सुरू झाला नव्हता. बौद्धांसारखे जैनधर्मांतहि संन्यासी व मठ होते, परंतु ह्युएनत्संगाच्या वर्णनावरून त्याकाळीं त्यांची संख्या फारशी वाढलेली नव्हती असें दिसतें. शैवपंथांत देखील असेच संन्यासी होते व ते बहुधा शिवालयांत किंवा स्मशानांत बांधलेल्या धर्मशाळेंत रहात असत.

वर दिलेल्या हर्षचरितांतील उताऱ्यांत जे निरनिराळ्या धर्मांचे संन्यासी, म्हणजे जैन, आर्हत, पाशुपत, पाराशरी, वर्णि (ब्रह्मचारी) इत्यादि, सांगितले आहेत त्यांतील कित्येक जण आपापल्या पंथाच्या तत्वज्ञान विषयांत चांगले पारंगत असून अशा निरनिराळ्या धर्मांच्या विद्वानांमध्यें तात्विक विषयांवर होणारे वादविवाद ऐकण्याची तत्कालीन लोकांना व राजांना मोठी आवड असे ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. हिंदुधर्मांत अत्युच्च तत्वज्ञानापासून तों अत्यन्त बालिश समजुतीपर्यंत सर्वांचा संग्रह झालेला आहे हें मोठें आश्चर्यकारक दिसतें. भारतीय आर्यांनीं प्राचीन काळीं परमेश्वर व आत्मा या विषयींच्या अत्यन्त गूढ प्रश्नांचा उलगडा करण्यासाठीं अतोनात प्रयत्न केले व त्यांच्या विचारसरणींतून निष्पन्न झालेलें सार उपनिषद्रूपानें आपल्याला आज मिळालें असून त्यांच्या पलीकडे अजून कोणत्याहि दुसऱ्या तत्वज्ञांची मजल गेलेली नाहीं. संसार–तापाच्या तीव्र सवेदनेमुळें भारतीय आर्यांचें लक्ष सहजच परलोकविषयाकड वळलें व त्यांच्या उलट त्यांच्या पाश्चात्य बंधूंचें लक्ष ऐहिक विषयांकडे वळलें. आतां ज्यांना जो विषय पसंत पडला

त्याचा सूक्ष्म विचार करतांना सरळ जें अनुमान निघेल त्याचा स्वीकार करावयास, मॅक्स मुल्लरनें म्हटल्याप्रमाणें, भारती आर्यांपैकीं कोणीहि मागें पुढें पाहिलें नाहीं. यामुळें हिंदुधर्मांत निरनिराळे अनेक पंथ व तत्वदर्शनें उत्पन्न होऊनहि धर्मवेड किंवा परमतासहिष्णुता यांचा प्रादुर्भाव झाला नाहीं. विविध धर्मतत्वांचें तर्कशास्त्राच्या नियमानुसार उद्घाटन करण्याची भारतीय आर्यांना नेहमींच आवड असे; व बौद्ध धर्माला तर असे विवाद फार प्रिय असत. न्यायशास्त्राची प्रगति होऊन बौद्धांनीं त्याचा स्वीकार केल्यावर असल्या धर्मतत्वाच्या वादविवादांना खरोखरच मोठ्या गंभीर पांडित्याचें स्वरूप आलें व सत्यनिर्णयाचा मार्ग ह्मणजे वादांत प्रतिपक्ष्याला निरुत्तर करणें हाच होऊन बसला. तथापि असल्या वादांतहि तर्काला उच्च स्थान दिलेलें असल्यामुळें त्यांत एक प्रकारचा भारदस्तपणा व मौज उत्पन्न झाली आहे. बौद्ध लोक वेद-प्रामाण्य मानीत नसल्यामुळें त्यांच्याशीं वाद करतांना हिंदुपंडितांना केवळ तर्काचाच अवलंब करावा लागे. असले वादविवाद बाणाच्या काळीं फार लोक-प्रिय असल्याचें त्यानें नमूद केलें आहे; व हर्षाच्या कारकीर्दींत प्रयाग येथें जे पंचवार्षिक जंगी दानसमारंभ होत व ज्यापैकीं शेवटच्या समारंभांत ह्युएनत्संगाकडे सभापतित्व आलें होतें त्यांतहि मोठे मोठे विद्वान लोक येत असत असें ह्युएनत्संगानें लिहिलें आहे. अशा समारंभांत जे वादविवाद होत त्यांत प्रथम एकाद्या पंडितानें आपल्या धर्ममताचें प्रतिपादन करून अन्यधर्मीयांना त्यावर उत्तर देण्यास आव्हांन करावें असा क्रम असे. कित्येक वेळां मठाच्या भिंतीला असा लेखी पूर्वपक्ष चिकटवून ज्याला त्याचें खंडन करतां येईल त्यानें तो फाडून टाकावा असेंहि आव्हान केलेलें असे. नालंदायेथील मठाच्या दरवाज्यावर असा एक पूर्वपक्ष एका ब्राह्मणानें चिकटविला होता, व त्याला

फाडून टाकावयास कोणीहि न भेटलेला पाहून ह्युएनत्संगनें स्वतःच तो फाटून टाकिला आणि जो वादांत हरेल त्यानें दुसऱ्याचा दास व्हावें असें ठरवून ते दोघे वादास प्रवृत्त झाले. ह्युएनत्संगानें वाद जिंकिला, पण ब्राह्मणाला त्यानें आपलें दास्य करावयास न लावतां बौद्धधर्माची दीक्षा देऊन सोडून दिलें. ही गोष्ट ह्युएनत्संगानें स्वतःच सांगितली आहे. बौद्धमठांतून असले वाद वारंवार होत; कारण त्यांतील भिक्षूंना पोटाची चिंता मुळींच नसे व नित्यविधि किंवा योगाभ्यास वगैरे आटोपून तत्वचिंतन करावयास पुष्कळ वेळ मिळत असे. बौद्धमठांतील भिक्षूंच्या वर्तनक्रमांतील या गोष्टींचा हि ह्युएनत्संगानें उल्लेख केला आहे. स्वतः बौद्धधर्मांतच अठरा पंथ असून इतरांबरोबर ते जसा वाद करीत तसा आपणांतहि करीत. "हे लोक वादासाठीं सभा करीत त्यांत बुद्धिसामर्थ्याची पारख आणि नीतिवर्तनाच्या श्रेष्ठत्वाची स्थापना होई. तत्वज्ञानांतील नाजुक मुद्द्यांचें जे सप्रमाण उद्घाटन करीत, अथवा सूक्ष्मतत्वांचें योग्य तें महत्व सिद्ध करीत, ज्यांची भाषाशैली अलंकार-प्रचुर व विषयाचें पृथक्करण करण्यांत जे कुशल असत ते उत्तम शृंगारलेल्या हत्तींवरून मिरवत आणि त्यांच्या मागें व पुढें अनुयायांचा घोळका असे." हर्षचरितांतील बाणकृत वर्णनांत सुद्धां बौद्धभिक्षूंच्या मठांत विरुद्ध धर्ममतांचे विद्वान पंडित वादासाठीं जमत असल्याचें नमूद असून तें वर्णन एकंदरींत वादक्षेत्रांत कोण कोणत्या मतांचा समावेश होत असे याची यादीच देत असल्यामुळें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आठव्या उच्छ्वासांत हर्ष दिवाकरमित्र नांवाच्या भिक्षूच्या मठांत गेला असतां तेथें दिवाकरमित्र त्याला कसा दिसला याचें वर्णन करतांना बाण लिहितो "अथ....नानादेशीयैः....वीतरागैरार्हतैर्मस्करिभिः श्वेतपटैः पाण्डुरभिक्षुभिर्भागवतैर्वर्णिभिः केशलुञ्चकैः

कापिलैर्जैनैर्लोकायतिकैः काणादैरौपनिषदैरैश्वरकारणिकैः कारन्धमिभिर्धर्मशास्त्रिभिः पौराणिकैः साप्ततन्तवैः शैवैः शाब्दैः पाञ्चरात्रिकैरन्यैश्च स्वान् स्वान् सिद्धान्ताञ्शृण्वद्भिः....व्युत्पादयद्भिश्च विवदमानैश्च....दूरादेवावेद्यमानं....दिवाकरमित्रमद्राक्षीत् ” “ त्याच्याजवळ निरनिराळ्या ठिकाणाहून आपापले सिद्धान्त स्थापन करण्यासाठीं किंवा तद्विषयक वाद एकण्यासाठीं आलेले जैन, संन्यासी, श्वेतांबर जैन, श्वेतवस्त्री भिक्षु, भागवत, ब्रह्मचारी, केशलुञ्चक ( डोक्यावरील केश उपटून काढणारे ), सांख्य, चार्वाक, वैशेषिक, वेदान्ती, नैय्यायिक, धातुवादी, धर्मशास्त्री, पौराणिक, साप्ततंतु ( पूर्वमीमांसक यज्ञवादी ), शैव, वैयाकरण, पाञ्चरात्र ( वैष्णव ) आणि दुसरे लोक जमलेले असल्यामुळें दुरूनहि ओळखूं येणारा दिवाकरमित्र त्याला दिसला. ” ही विविध सिद्धान्तवाल्यांची यादी इतिहासदृष्ट्या महत्वाची आहे; कारण तीवरून सातव्या शतकांतील तत्वज्ञानीयांत कसे कसे भिन्नवाद होते हें दिसून येतें. यांत जैन शब्द बौद्धवाचक असून हल्लीं आपण ज्यांना जैन म्हणतों त्यांना आर्हत म्हटलें आहे. जिन हें बुद्धाचेंहि नांव होतें, व म्हणून जैन म्हणजे बौद्ध हाहि अर्थ होतो. भक्तिमार्गीयांचेहि भागवत व पांचरात्र असे दोन पृथक् वर्ग यांत सांगितले आहेत. धर्मशास्त्री आपला सर्व कोटिक्रम वेदप्रामाण्यावर उभारीत असल्यामुळें त्या शब्दावरून मीमांसकांचा बोध होत असावा. तसेंच ब्रह्मचारी, औपनिषद व मस्करी असा जो पृथक्पणा दाखविला त्याचेंहि तथ्य नीट समजत नाहीं, म्हणून त्यांचा नामनिर्देश करूनच स्वस्थ राहिलें पाहिजे.

आतां हे निरनिराळे मतवादी आपआपसांत कितीहि निकरानें विवादले तरी त्या सर्वांचें एक दोन मुद्यांवर एकच मत होतें. त्यांतील लोकायतिक म्हणजे नास्तिकवादी चार्वाक सोडून इतर सर्व

आत्म्याचें अस्तित्व व कर्मानुसार त्याचें अनेक योनींत परिभ्रमण मानणारे होते. हा कर्मवाद आणि आत्मपुनर्जन्मवाद पौरस्त्य तत्वज्ञानाचें पाश्चात्य ज्ञानापासून वैशिष्टय दाखवीत आहे. ह वाद खरे कीं खोटे हें ठरविण्याचें किंवा त्यांच्या उत्पत्तीचा इतिहास सांगण्याचें आमचें काम नाहीं. पण एवढें सांगणें अवश्य आहे कीं ज्या काळाचा प्रस्तुत आपण विचार करीत आहों त्या काळीं कर्मवाद व पुनर्जन्मवाद लोकांत चैतन्य उत्पन्न करणाऱ्या जबरदस्त व जिवंत शक्ति होत्या यांत संशय नाहीं. नीतिमत्ता उच्च स्थितींत राखण्यास त्या शक्तींचा चांगलाच उपयोग होई. या प्रकरणीं निःपक्षपाती व पूर्वग्रहानें दूषित न झालेल्या अशा तिऱ्हाईत ह्युएनत्संगाचे म्हणणें ऐकण्यासारखें आहे. ' हे लोक उतावळया व अनिश्चित स्वभावाचे असूनहि नीतिदृष्टया शुद्ध आहेत. ते कोणाची वस्तु अन्यायानें घेत नाहींत, व न्यायानें द्यावें लागावयाचें त्याहूनहि अधिक देतात. पापाचें प्रायश्चित्त अन्य जन्मीं भोगिलें पाहिजे अशी त्यांची खात्री असल्यामुळें ते पापाला भितात व या जन्मीं नीतीनें वागण्याचा प्रयत्न करतात.' ( वाटर्स पु. १, पा १७१ ). तसेंच आणखी तो म्हणतो ' राज्यकारभार प्रामाणिकपणें चालविला जात असून लोक गुण्यागोविंदानें एकत्र रहात असल्यामुळें गुन्हेगारीचें प्रमाण अल्प आहे, ' आजकालच्या हिंदी समाजासंबंधानें हें विधान करतां येईल कीं नाहीं याची शंका वाटते. तत्कालीन लोकांची ही उच्च नीतिमत्ता बौद्धधर्माच्या शिकवणीमुळें उत्पन्न झालेली होती. पुनर्जन्माचें तत्व बौद्धधर्मानें हिंदुधर्मांतूनच घेतलें असून त्यावर व त्यामुळें अवश्य ठरणाऱ्या व्यवहारांतील उत्कट नीतिमत्तेवर बौद्धधर्माचा फारच भर असल्यामुळें त्याच्या भरभराटीच्या काळीं सामाजिक नीतिमत्ता उच्च असल्यास त्यांत नवल नाहीं.

या मतांखेरीज दुसऱ्याहि एका गोष्टींत म्हणजे अहिंसा-वादांत देखील वर सांगितलेल्या भिन्न पंथांत हर्ष काळीं एक मत दिसून येतें. अहिंसेचे विरोधी म्हणजे मुख्यतः यज्ञवादी मीमांसक (नास्तिकवादी चार्वाकांना कसलाच निषेध नव्हता व पाशुपतानाहि हिंसा अवश्य होती ); पण त्यांनींहि सातव्या शतकांत यज्ञाखेरीज इतर कारणीं होणारी हिंसा त्याज्य ठरविली होती. महाभारतावरूनच असें दिसून येतें कीं अहिंसेच्या बाबतींत त्या वेळींच तडजोड होऊन यज्ञार्थ हिंसा ही हिंसा नव्हे; पण इतर कोणत्याहि कारणास्तव ती करूं नये असें ठरलें होतें. महाभारताच्या उपसंहारांत आम्हीं दाखविलेंच आहे कीं अहिंसेचें तत्व मूळ हिंदु धर्मानेंच पशु-यज्ञाविरुद्ध सुरू केलें व ही गोष्ट बृहदारण्यकादि उपनिषदांतून स्पष्ट दृष्टीस पडते. पण जेव्हां बौद्ध व जैन धर्मांनीं त्याचा अंगिकार केला तेव्हां त्यांनीं याच तत्वाला प्राधान्य दिल्यामुळें जेव्हां या. धर्मांचा उत्कर्ष झाला तेव्हां पशुयज्ञ व त्याबरोबर मांसाहार हे साहजिकच मागें पडले. कृष्णभक्तीनें हिंदुलोकांमध्यें गाई व बैल यांबद्दल उत्कट प्रेम व पूज्य बुद्धि उत्पन्न झाल्यामुळें तर गोवध व त्याबरोबर दुसऱ्याहि मोठया प्राण्यांचा वध हे भरतखंडांतून अजीबात नाहींसे झाले होते. ह्युएनत्संग या देशांत सर्वत्र फिरून गेला तेव्हां गोवध-निषेध इतका तीव्र झाला होता कीं 'बैल, गाढव, हत्ती, घोडे, डुकरें, कुत्रे, कोल्हे, लांडगे सिंह, वानर व माकडें यांचे मांस लोकांत सर्वस्वी वर्ज आहे, व जे कोणी या मांसाचें सेवन करीत ते अंत्यज वर्गांत जातात' ( वाटर्स पु. १ पा. १७८ ), असे लोक मानीत.

परंतु यांखेरीज इतर कांहीं प्राण्यांचें मांस निषिद्ध नसून तत्कालीन क्षत्रिय, बहुधा ब्राह्मण सुद्धां, बोकड व हरिण यांचें मास खात असत. मासे तर सर्वांनाच चालत ( वाटर्स. पु. १ ). शिवाय गुप्तांच्या

साम्राज्यांत अश्वमेधाचें पुनरुज्जीवन झाल्यामुळें त्यांत बैल व घोडे यांचा वध होत असला पाहिजे. “ यज्ञार्थ हिंसा म्हणजे हिंसाच नव्हे ” या तडजोडीच्या न्यायामागें या यज्ञ-प्रवर्तकांना लपावयास जागा सांपडे. पण अशा हिंसांमुळें बौद्धधर्मीय प्रबलराजांना वैषम्य वाटे व ते आपल्या राजसत्तेच्या जोरावर सर्व प्रकारची हिंसा बंद करीत. पूर्वीच्या एका प्रकारणांत सांगितल्याप्रमाणें मोलापोच्या ( माळव्याच्या ) शिलादित्य राजानें साहव्या शतकांत आपल्या राज्यांत मांसाहाराला निषेध केला असून तो स्वतः घोड्यांना व हत्तींना गाळलेलेंच पाणी पाजावयास सांगत असे, ही गोष्ट ह्युएनत्संगानें नमूद केलेली आहे. राजतरंगिणींतसुद्धां मेघवाहन राजानें काश्मीर प्रान्तांत हिंसा बंद करण्यासाठीं कसे प्रयत्न केले हें सांगितलें आहे. पण हर्षकाळीं हर्षानें स्वतः केलेल्या पद्धतशीर मोठ्या प्रयत्नापुढें हे किरकोळ प्रयत्न अगदींच फिक्के दिसतात. त्यानें आपल्या सर्व साम्राज्यांत प्राणिहत्या व मांसाहार बंद करून हा हुकूम मोडणाराला जबर शासन ठेविलें होतें हें पूर्वी सांगिलेंच आहे. हर्षाचीही आज्ञा हिंदुस्थानाच्या पांची भागांत लागू होती असें ह्युएनत्संगानें म्हटलें आहे. त्याच्या स्वतःच्या अमलाखालीं जरी मध्यदेश, पूर्व, पश्चिम व उत्तर इतके चारच भाग होते, तरी पांचव्या दक्षिण भागांतहि तेथील राजांनीं त्याच्या विनंतीचा आदर करून आधींच मांसाहार अप्रिय असलेल्या आपल्या प्रजेंत तो निषेध अधिकच पसरविला. हर्षाचे प्रयत्न बऱ्याच अंशीं सफल झाले; व जरी पुनः पुढील शतकांत हिंसा-प्रियतेनें उचल केली, तरी एकंदरींत हिंदुलोकांच्या मनावर अहिंसेचें तत्व ठाम बिंबलें व उत्तर हिंदुस्थानापेक्षां दक्षिणेंत हा परिणाम अधिक झाला. हल्लीं दक्षिणेकडील ब्राह्मण सर्वथा मांसाहारापासून अलिप्त असून

उत्तरेकडील ब्राह्मण अंशतः मात्र आहेत. क्षत्रिय लोक पुराण मताला सर्वांत अधिक चिकटून रहाणारे असून ते हिंदुस्थानांत सर्वत्र मांसाहार करितात, पण त्यांनींसुद्धां वर सांगितलेल्या ह्युएन-त्संगाच्या निषिद्ध यादींतील मांस वर्ज केलेलें आहे. तिसरा वर्ग जो वैश्य तो पुनः बहुतेक सर्व ठिकाणीं मांसाहार-विवर्जितच आहे; आणि उरलेले इतर वर्ग क्षत्रियांचे अनुकरण करीत आहेत, तथापि शेकडों वर्षांच्या संवईनें व ब्राह्मणांचें उदाहरण पुढें असल्यामुळें त्यांच्यांतहि मांसवर्जन इष्ट मानण्याचीच साधारण प्रवृत्ति आहे. गोवध-निषेध तर प्रत्येक हिंदुधर्मीयाच्या अंतःकरणांत आतां इतका खिळून गेला आहे कीं त्या विरुद्ध बोलणें म्हणजे त्याला डंवचून त्याचें धार्मिक वेड जागें करण्यासारखेंच आहे, याचा अनुभव हल्लीं सुद्धां कधीं कधीं येतो.

चक्रवर्ती हर्षाच्या वैभवशाली कारकीर्दीत पशुहिंसेविपर्यींच्या लोकांच्या धार्मिक प्रवृत्तींत झालेल्या या प्रचंड उलथापालथीचें स्वरूप एकंदरींत अशा प्रकारचें आहे. धर्मासाठीं मांसाहाराचा त्याग करणाऱ्या इतक्या प्रचंड लोकसमाजाचें दुसरें उदाहरण इतिहासांत नाहीं. या अहिंसा तत्वानें हिंदुधर्माला खरोखरच आध्यात्मिक वैभवाच्या उन्नतशिखरावर नेऊन बसविलें आहे. परंतु अध्यात्मदृष्ट्या उच्च पदवी प्राप्त करून देणाऱ्या या तत्वामुळें हिंदुस्थान देशाला राजकीय दृष्ट्या मृत्युपंथास जावें लागलें असें जें मॅक्समुल्लरनें विधान केलें आहे, तें मात्र इतिहास-लेखक या नात्यानें मान्य केल्याशिवाय आम्हांस गत्यन्तर नाहीं. कारण पुढील शतकांत दुर्दैवाने उघड दिसून आल्याप्रमाणें निवळ शाकाहारी लाकांनीं जगांतील मांसाहारी लोकांशीं जीवनार्थ कल-हांत टिकाव धरण्याची आशा करणें व्यर्थ आहे असेंच बहुतेक हिंदुस्थानाच्या प्रत्ययास आलें.

# प्रकरण ७ वें.

## राजकीय स्थिति.

सर व्हिन्सेन्ट स्मिथ या इतिहासकारानें हर्षकालीन राजकीय परिस्थितीविषयीं विचार करतांना असे उद्गार काढिले आहेत कीं, ' हर्षराजा मृत्यु पावल्यावर त्याचा उदार थोरपणाचा पण एकतंत्री अंमल संपल्याबरोबर लगेच हिंदुस्थानांत नित्य दिसून येणारी जी अराजक स्वयंशासनाची स्थिति ती पुनः चालू झाली, म्हणजे मध्यवर्ती सत्तेच्या अभावीं जो तो आपआपल्या ठिकाणीं स्वतंत्र होऊन कोणास कोणी विचारीनासा झाला. ' पण व्हिन्सेन्ट स्मिथचें हें म्हणणें आमच्या मतें चुकीचें व बिनआधारी आहे. जे लोक सर्व हिंदुस्थानाला एक देश समजून त्याच्या राजकीय दुःस्थितीवरील उत्तम तोडगा म्हणजे एकतंत्री साम्राज्य सत्ताच होय असें म्हणूं लागतात, त्यांच्या दृष्टीनें प्राचीन हिंदुस्थानची राजकीय स्थिति म्हणजे वर वर्णिलेली सांवळ्या गोंधळाची अराजक स्थिति असेल. परंतु ब्रिटिशांच्या अमदानींत जो येथें सर्वत्र एकछत्री अंमल सुरू झाला आहे तो सोडला तर त्यापूर्वी सर्व भरतखंडांत मिळून एकछत्री राज्य कधींच नव्हतें, ही गोष्ट विसरतां कामा नये. वर्ण, धर्म व परंपरा यांच्या दृष्टीनें विचार केल्यास एका रीतीनें हिंदुस्थानाला एक देश म्हणतां येईल. परंतु राजकीय दृष्टीनें पाहिल्यास तो यापूर्वी एक देश म्हणून केव्हांहि मानलेला नव्हता हें नाकबूल करून भागणार नाहीं. प्राचीन इतिहासांतील त्याचें नांव जें **भरतखंड** त्यावरून हीच गोष्ट सिद्ध होते. त्यांत बहुशः अनेक लहान लहान राज्यें असून त्यांच्यांत नित्य युद्धें चालू असत. अशा स्थितीला बेबंदशाही नांव देणें केव्हांही योग्य होणार नाहीं.

आतां यूरोपखंडाचा विचार केल्यास, साहव्या, सातव्या शतकांत फार कशाला—कोणत्याहि शतकांत तें कोणत्या राजकीय स्थितींत असलेलें दिसून येतें बरें? यूरोपखंडाचें हिंदुस्तानाशीं हरएक बाबतींत फारच साम्य आहे असें ह्मणतां येईल. त्यांतील रशियाचा भाग वगळल्यास त्याचा विस्तार व लोकसंख्या हीं बहुतेक हिंदुस्थानच्या इतकींच आहेत, व या भागांतील बहुतेक लोकांचा धर्महि एक सारखाच म्हणजे रोमन ख्रिश्चानिटि हा आहे. आतां ह्युएनत्संगानें ह्मटल्याप्रमाणें इ. स. ७ व्या शतकांत हिंदुस्थानांत सुमारें सत्तर राज्यें होतीं ( वाटर्स ह्युएनत्संग पु. १ पा. १४० ). सातव्या शतकाचाच विचार केला तर यूरोपखंडांतहि याहून कमी राज्यें नसावीं. खुद्द इंलंग्डांतहि पाहिले तर या यावेळीं पांच राज्यें होतीं. फ्रान्स, जर्मनी, इटली या देशांत तर त्याहूनहि अधिक होतीं. खरें पहिल्यास त्या वेळची समाजस्थिति, सुधारणा व दळणवळणांचीं साधनें यांच्या मानानें दिसतात याहून मोठीं राज्यें हिंदुस्थानांत काय व यूरोपांत काय त्यावेळीं असणें शक्यच नव्हतें. हिंदुस्थानांतील राज्यांप्रमाणें यूरोपांतील गतकालीन राज्येंहि एकमेकांशीं नित्य लढण्यांत चूर झालेलीं असत असें इतिहास सांगतो. त्या वेळचा यूरोपचा इतिहास ह्मणजे अनेक राज्यांच्या परस्परांशीं चाललेल्या भयंकर रक्तपाताच्या लढायांची सविस्तर कहाणीच होय. पण असें असलें ह्मणून यूरोपखंडांत त्यावेळीं केवळ बेबंदशाही असून जो तो आपापल्या पुरता मालक होता असें ह्मणणें, अथवा साम्य पुरेंच दाखवावयाचें तर, शार्लमेन बादशाहाच्या मृत्यूनंतर यूरोपखंडाचे जेव्हां तुकडे पडले, तेव्हां पुनःतें आपल्या बेबंदशाहीला येऊन मिळालें असें ह्मणणें युक्त होइल काय ? रेलवे व तारायंत्रें यांनीं आज दळणवळण सुलभ झालें असूनहि यरोपखंडांत अजून अशीं किती तरी लहान राज्यें आहेत कीं तीं ह्युएनत्संगानें वर्णि-

लेल्या हिंदुस्थानांतील राज्यांपेक्षां फारशीं मोठीं नाहींत. ह्युएन-त्संगनें महाराष्ट्रासारख्या मोठ्या राज्याचा परिघ ६००० ली ह्मणजे १२०० मैल होता असें सांगितलें आहे, ह्मणजे त्याचें क्षेत्रफळ सुमारें १,२०,००० चौरस मैल झालें. थोड्या निराळ्या तऱ्हेनें हाच हिशोब केल्यास म्हणजे हिंदुस्थानाच्या सांप्रतच्या क्षेत्रफळाला ७०नीं ( राज्यांच्या संख्येनें ) भागिल्यास हर्ष-कालीन राज्यांपैकीं प्रत्येकाच्या सरासरी क्षेत्राला २५,७५२ चौरस मैल पडतात. आतां यूरोपकडे दृष्टि फेंकल्यास तेथे आज जीं बेलजम ( ११,३७३ चौ. मै. ), हालंड ( १२,५८२ चौ. मै. ), पोर्तुगाल ( ३२,००० चौ. मै. ), इटली ( १,१०,६३२ चौ. मै. ), बल्गे-रिया ( ३३,६४५ चौ. मै. ), रूमानिया ( ५३,४८९ चौ. मै. ) व ग्रीस ( २५,०१४ चौ. मै. ) हीं लहान राज्यें आहेत तीं हर्ष-कालीन राज्यांपेक्षां मोठीं भरत नाहींत, मग त्याहून लहान लहान जीं इतर संस्थानें जर्मन साम्राज्यांत आहेत त्यांची तर गोष्टच बोला-वयास नको. हीं यूरोपीय राष्ट्रें हि वारंवार युद्धांत मग्न झालेलीं दिसतात. अशीं दहा वर्षें जात नाहींत कीं, ज्यांत त्यांच्यामध्यें चकमक झडली नाहीं; आणि असें असूनहि तीं सजीव व भरभ-राटीच्या स्थितींत आहेत; व इतिहासांत या असल्या स्थितीला कोणी बेबंदशाही हें नांवहि दिलेलें नाहीं. तेव्हां हिंदुस्थानाच्या बाबतींत जी ही चूक होत आहे तिचें कारण वर सांगितल्याप्रमाणें हा देश एकच होता किंवा तो एकछत्री अमलाखालीं असला पाहिजे असें मानणें हें होय असें म्हणावें लागतें.

यूरोप व हिंदुस्थान यांच्या साम्याचा विचार करितां इतिहास-कारापुढें असा प्रश्न पडतो कीं, हिंदुस्थानांतील हीं लहान लहान राज्यें पुढें १२ व्या शतकांत मुसलमानांच्या तडाख्याला बळी कां पडलीं? यूरोपखंडांतील राज्यांप्रमाणें त्यांची वाढ होऊन

बलाढ्य राष्ट्रें कां बनलीं नाहींत ? कांहींचें असें म्हणणें आहे कीं, स. ५२८ त हूण लोकांच्या मिहिरकुल राजाचा पराभव झाल्यापासून हिंदुस्थानाला स. १००० च्या सुमारास गिझ-नीच्या महमदाच्या अमदानीपर्यंत परकीय स्वारीची बाधा झाली नव्हती; म्हणून या काळांत त्याला आपलें नशीब काढून आपली स्थिति सुधारून घ्यावयाला पूर्ण मोकळीक असून ही संधि त्यांनें व्यर्थ घालविली. पण या म्हणण्याच्या मूळाशीं एक चुकीची कल्पना आहे. या लोकांनीं सर्व हिंदुस्थान एक देश होता असें गृहीत धरून वरती पुढें होणाऱ्या परकीय स्वाऱ्यांचें आगाऊ स्वप्नही पडतें असें मानिलें आहे; पण तें युक्त नाहीं. हे लोक २० व्या शतकांत आढळणाऱ्या गोष्टींवरून सातव्या शतकांतील परिस्थितीविषयीं अनुमानें काढितात. पण विचार केल्यास सातव्या शतकांतील कोणत्या अतिसुज्ञ माणसालाहि महंमदाच्या स्वाऱ्यांची आगाऊ खबर लागली असती बरें ? नवीन धर्माच्या वेडानें व नवीन स्वारी करणाऱ्यांच्या क्रूरपणानें भरून जाऊन तुर्कलोकांनीं ११ व्या व बाराव्या शतकांत जो हा देश उद्ध्वस्त करून टाकिला त्याचें आगाऊ ज्ञान तेव्हांच काय पण पुढेंहि कोणास झालें असतें असें म्हणणें धाडसाचेंच आहे. फार काय ? अरबलोकांनीं सिंध प्रांत काबीज केल्यावरहि पुढील अन-र्थाची कल्पना कोणाला होण्यासारखी नव्हती. सिंधप्रांत आरब-लोकांनीं काबीज करणें ही गोष्ट यूरोपखंडांतील कान्स्टँटिनोपल शहर तुर्कांनीं काबीज केलें या सारखीच आहे. हे तुर्क लोक आज पांच शतकांच्यावर यूरोपांतील लोकांच्या डोळ्यांत सलत आहेत, तसेच अरब लोक या प्रांतांत ८ व्या शतकापासून १३ व्या शतकां-पर्यंत होते. सिंध प्रान्तांत राहून हे अरब लोक हिंदूना सर्व बाजूंनीं नको नकोसें करीत, तसेंच तुर्कांनीहि यूरोपखंडांत कास्टँन्टिनोपल-

मध्यें राहून केलें होतें. तथापि यूरोपांतील राष्ट्रांना सुद्धां आपलीं खानगी भांडणें बाजूला ठेवून तुर्कांविरुद्ध संगतमत करण्याची बुद्धि झाली नाहीं. मग हिंदीराजांनींच तेव्हढें तसें करावयास पाहिजे होतें असें म्हणण्यांत काय अर्थ? हें दोघांतील साम्य आणखीही पुढें नेतां येण्यासारखें आहे. राष्ट्रकूट राजांनीं गुर्जरांविरुद्ध अरबांचें साह्य घेतलें याबद्दल रा. सरदेसाई यांनीं त्यांना दोष दिला आहे. पण युरोपमध्येंहि हीच स्थिति आढळून येत होती व अजूनहि येते हें विसरतां कामा नये. फ्रान्सचा राजा पहिला फ्रॅन्सिस यानें १६ व्या शतकांत जर्मन बादशहा पांचवा चार्लस याच्या विरुद्ध तुर्कांना उठविल्याचें इतिहासांत नमूद आहे. आश्चर्य असें कीं त्या वेळचा सूड म्हणूनच कीं काय शेवटच्या जर्मन बादशहानें आपले सधर्मीय सजातीय व समानसुधारणावाले जे फ्रान्स, इंग्लंड वगैरे देश त्यांच्या विरुद्ध तुर्कांची उठावणी केली होती. या सर्व प्रकाराचें खरें कारण असें आहे कीं राजकीय लढ्यामध्यें धर्म व सुधारणा यांचा विचार कोणी करीत नाहींत. उदाहरण, रशिया व बल्गेरिया येथील लोक सजातीय व सधर्मीय असून आज एकमेकांचे शत्रु बनले आहेत. तरी राष्ट्रकूटांनीं आपल्या सधर्मीय गुर्जर बांधवांविरुद्ध अरबाचें साहाय्य घेतलें यांत आश्चर्य कसलें? या दोन लोकांचा धर्म एक होता तरी त्यांचे राजकीय हितसंबंध भिन्नच होते, म्हणून त्यांनीं धर्माला बाजूला सारून स्वहितासाठीं आरबांना आपल्या पक्षाला ओढिलें. येथपर्यंत हिंदुस्थान व युरोप यांत साम्य झालें. आतां त्यांत जो भेद आहे तो खरोखर असा कीं, राष्ट्रकूट व गुर्जर हे दोघेहि शेवटीं यवनांच्या कचाटींत सांपडून हतवीर्य झाले, व याच्या उलट युरोपांतील जर्मनी, फ्रान्स इत्यादि राष्ट्रांनीं तुर्कापुढें कायमची मान वाकविली नाहीं, व पुढें वाकवितील अशीं चिन्हें दिसत

नाहींत. म्हणून इतिहासकारापुढें खरा प्रश्न आहे तो असा कीं पाश्चात्य राष्ट्रांप्रमाणें राष्ट्रकूट गुर्जर इत्यादि हिंदी राष्ट्रें किंवा राज्यें वाढत वाढत बलाढय कां झालीं नाहींत ! सातव्या शतकांत व तत्पूर्वीची येथील अशी काय परिस्थिति होती कीं जेणेंकरून येथील राष्ट्रांचा उत्कर्ष न होतां उत्तरोत्तर र्‍हासच होत गेला ? जो प्रश्न आपल्याला आतां सोडावयाचा आहे तो हाच व त्याचे नीट उद्घाटन करावयाचें तर पाश्चात्य व पौरस्त्य अशा दोन्हीं देशांच्या प्राचीन व अर्वाचीन इतिहासांच्या निरिक्षणांनींच तें केलें पाहिजे.

प्राच्य आणि पाश्चात्य राष्ट्रांच्या जीवनशक्तीमध्यें हा जो मोठा भेद दिसून येतो त्याचें कारण आमच्या मतें त्या दोघांच्या राजकीय बाबतींतील मूलभूत कल्पनाच भिन्न होत्या हें होय. यूरोपांतील ग्रीस देशांत फार प्राचीन काळीं राजकीय उच्च ध्येयांचा विकास होत असतां, इकडे हिंदुस्थानांतील आर्यलोकांच्या बुद्धीला तसल्या कल्पनांचा स्पर्शहि न होतां त्याच्या अगदीं उलट कल्पनांची वाढ होत होती. असेंहि म्हणतां येईल कीं भारतीय आर्यांच्या बुद्धीला ऐहिक वैभवाचा तात्विक फोलपणा पूर्ण पटल्यामुळें, तिनें अध्यात्मिक विचारांचीच कास धरून आकुंचित स्वरूपाच्या राजकीय कल्पनांचा धिक्कार केला आणि आपली सर्व शक्ति आपिपीलिकाब्रह्मपर्यंत चराचर सृष्टीच्या कल्याणार्थ खर्च करण्याचें ठरविलें. याच्या उलट यूरोपांत ग्रीस देशांतील शहरवजा लहान लहान राज्यें आपल्या बुद्धिबलावर बऱ्याच उत्कर्षास पोंचलीं व रोमनलोकांनीं आपल्या कायदेबाज मनोभूमिकेच्या जोरावर तर त्यास उत्कर्षाच्या शिखरास नेलें. रोमनसाम्राज्याचा नागरिक या शब्दालाच तिकडे जें महत्व आहे त्यावरून त्या साम्राज्यान्तर्गत लहान राज्यांची उन्नति किती झाली होती याची साक्ष पटते. त्या साम्रा-

ज्याच्या काळीं नागरिकांचीं कर्तव्यें व त्यांची योग्यता यांची कल्पना व जाणीव लोकांत स्पष्ट झालेली असून त्यामुळें पुढें जर्मन राष्ट्रांच्या राजकीय कल्पनानाहि तसेंच वळण लागलें; व त्यांत आणखी जर्मन लोकांच्या स्वतःच्या बुद्धीची व कल्पनांची भर पडून राज्य-संस्थांचीं ध्येयें ठरविण्यांत आलीं. ग्रीक व रोमन साम्राज्यांतील राज्यांप्रमाणें जुनीं जर्मन संस्थानें प्रजासत्ताक नव्हतीं हें खरें, तरी त्यांच्या राजांची सत्ता प्रतिनिधिसंस्थांनीं मर्यादित झालेली होतीं, व त्यांचीच पुढें वाढ होऊन आजची यूरोपांतील नियंत्रित-राजसत्ताक राज्यें निर्माण झालेलीं आहेत. फ्रेंच राज्यक्रान्तीच्या वेळीं त्या देशांतील राजनीतिशास्त्रकारांनीं नागरिकांचे हक्क व कर्तव्यें यांचें अधिक उद्घाटन केलें व त्यांच्या कल्पना तेथील सर्व समाजांच्या अगदीं कनिष्ठ वर्गांपर्यंतहि आज मितीस जाऊन पोंहचल्या आहेत. या नवीन कल्पनांच्या अमला-मुळें पाश्चात्य समाजांतील प्रत्येक सज्ञान व्यक्तीला राज्यकारभारांत आपली भागी आहे असें वाटत असून आपण आपल्या परीनें राज्याचे धनी व चाकर असे दोन्ही आहों ही जाणीव सदैव जागृत असते. तसेंच त्या राष्ट्रांतील नागरिकांना असेंहि वाटत असतें कीं, राष्ट्राशीं आपला संबंध केवळ प्रेमाचा किंवा भक्तीचा नसून स्वहिताचाहि आहे, व ज्या मानानें राष्ट्राची उन्नत्ति किंवा अवनति होईल तीप्रमाणें आपल्यालाहि तिचे भागीदार व्हावें लागेल. तात्पर्य ते देशभक्ति व स्वार्थ या दोन्ही हेतूंनीं प्रेरित होऊन राष्ट्रप्रीत्यर्थ स्वार्थाचा त्याग करण्यास प्रवृत्त होतात. अशा कल्प-नांचा ज्या राष्ट्रांत प्रसार झालेला आहे तें राष्ट्र अर्थातच व्यव-स्थित व बलाढ्य असतें, व तसाच कोणी अचाट शत्रु भेटल्या-शिवाय त्याला चिरडणें किंवा नष्ट करणें कोणाला शक्य नसतें. इतकेंच नव्हे, तर पाश्चात्य राजनीतिशास्त्रवेत्यामध्यें अशी

म्हणच पडून गेली आहे कीं, राष्ट्रांतील लोकसंख्या कितीहि अल्प असो, जर त्याच्यांत खऱ्या नागरिकत्वाच्या कल्पना नीट मुरल्या असतील, तर त्या राष्ट्राला निवळ शक्तीच्या जोरावर केव्हांहि चिरडतां येणार नाहीं.

ही पाश्चात्य राष्ट्रांची स्थिति झाली. पण आमच्या इकडील राजकीय कल्पनांची वाढ अगदींच उलट दिशेनें होत होती. भारतीय आर्यांमध्यें देखील प्रथमतः पाश्चात्य आर्यांप्रमाणेंच जात्यभिमान प्रखर असे. त्यावेळीं खरी राजसत्ता लोकांकडेच असून राजा म्हणजे त्यांचा पुढारी व प्रतिनिधि एवढयाच स्वरूपाचा असे, व सर्व महत्वाच्या बाबतींत त्याला सल्ला मसलत देण्यासाठीं लोकसभांची योजना केलेली असे. कर वगैरे बसविणें तेहि लोकांच्या अनुमतीनेंच बसवीत असत. मनूला राज्यकारभार करण्याबद्दल लोकांनीं आपल्या जमिनीच्या उत्पन्नाचा षष्ठांश देण्याचें मान्य केल्याविषयीं जी पुढें कथा प्रचलित झाली, तींत वरील तत्वच बीजरूपानें अन्तर्भूत झालेलें आहे. त्या काळीं राजाची केव्हां केव्हां निवडणूकहि होई, व कांहीं समाजांत तर राजा ही संस्थाच नसून लोकच स्वतः सुज्ञ व वयस्कर प्रतिनिधींचें मंडळ नेमून त्यांच्या द्वारा राज्याचा गाडा चालवीत असत. सारांश भारतीय इतिहासकाळाच्या आरंभीं लोकांच्या राजकीय कल्पनांचें स्वरूप पाश्चात्य आर्यांच्या कल्पनांप्रमाणेंच होतें. खरोखर त्या वेळीं राष्ट्र व राजा यांशीं लोकांचा इतका मिलाफ झालेला होता कीं, हे तीन्ही अर्थ जवळ जवळ एकाच शब्दाचे वाच्य बनले होते. राष्ट्राची व्याप्ति जाति पुरतीच आरंभीं असून एकच नांवावरून वरील तिन्ही अर्थांचा बोध होई. म्हणजे ते नांव अनेकवचनीं असल्यास त्यावरून देश अथवा लोक असा बोध होऊन, एकवचनीं असल्यास तोच राजाचा वाचक होई. बौद्धकाळीं, त्याचप्रमाणें रामायण-भारतकाळींहि हा नियम

सामान्यपणें आढळून येत होता. उदाहरणार्थ, कुरु, मद्र, पांचाल, कोसल इत्यादि नांवावरून अनेकवचनांत लोक व त्यांचा देश असे दोन्ही अर्थ होत, व एकवचनांत त्यांचाच त्या त्या देशाचा राजा असा अर्थ होई. पाश्चत्य राष्ट्रांतहि हीच स्थिति आढळून येई. तिकडेहि देशाला लोकांवरूनच नांव मिळत असून राजालाहि तेंच लावीत असत. उदाहरण, फ्रांक लोकांचा देश तो फ्रान्स, आंग्लांचा देश तो इंग्लंड, सॅक्सनाचा देश तो सॅक्सनी. तसेंच फ्रान्स इंग्लंड व सॅक्सनी म्हणज त्या त्या देशांचे राजे असाहि अर्थ होत असे. म्हणजे पौरस्त्य देशांत तसेंच पाश्चात्य देशांतहि लोकांच्या नांवावरून देशाला व राजाला नांव मिळत असे.

वर वर्णिलेली राजे लोकांची स्थिति बुद्धाच्या काळापर्यंत या देशांत चालू होती. पण पुढील काळांत तींत पालट होत गेला. हळू हळू लोकांचा अधिकार कमी कमी होत जाऊन राजांकडेच तो जाऊं लागला. असें होण्याचें कारण कदाचित् पुढें पुढें जनतेमध्यें शूद्रांचा म्हणजे अनार्यांचा भरणा अधिक होऊन आर्यांचा भाग कमी झाला असेंहि असेल. यानंतर तर जेव्हां कांहीं अनार्य जातीचे लोक राजपद पावले व परकीय लोकांनीं स्वाऱ्या करून इकडे आपला अंमल बसविण्यास सुरवात केली, तेव्हां प्रजेकडून सर्वच अधिकार निघून राजसत्ता अनियंत्रित झाली. हळू हळू लोकहि क्षत्रिय जाती बाहेरच्या राजांच्या तसेंच परकी राजांच्या सुद्धां अमलाखालीं रहावयास शिकले, व राजकारणांत राजे लोक त्यांचा सल्ला मुळींच घेईनातसे झाल्यामुळें क्रमा क्रमानें राजकारण हें आपलें कामच नव्हे असाच जनतेचा समज झाला. त्यांतले त्यांत ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या जाती लष्करी व मुलकी खात्यांतून मोठाल्या अधिकारावर असल्यामुळें त्या कांहीं तरी राजकारणांत लक्ष घालीत; पण शूद्रप्रधान सामान्य जनतेला मात्र राजकीय

चळवळींतून अजिबात वगळण्यांत आलें. याचा परिणाम पुढें असा झाला कीं आपल्या देशाच्या राज्यकारभारांत आपला भागीदारीचा हक्क आहे ही कल्पना देखील लोकांतून नष्ट झाली.

वर सांगितलेल्या प्रकारानें प्राच्य व पाश्चात्य राष्ट्रांमध्यें राजकीय गोष्टींतील प्रजेच्या अधिकारविषयक कल्पनांची अगदीं निरनिराळ्या मार्गानें वाढ झाली असें आम्हांला वाटतें. पौरस्त्य देशांप्रमाणें पाश्चात्यांत कनिष्ठ वर्ग उद्भवलाच नाहीं असें मात्र नाहीं. ग्रीस देशांत या कनिष्ठ वर्गाला हीलाट म्हणत; रोमनराज्यांत प्लीबियन म्हणत; फ्रान्सांत गाल लोकांचा हा वर्ग बनला होता आणि इंग्लंडांत जुन्या ब्रिटन लोकांचा होता. एकट्या जर्मनींत मात्र लोक एकजातीय होते. पण वरील सर्व राष्ट्रांत उच्च वर्ग व कनिष्ठ वर्ग यांत वंशदृष्टया म्हणण्यासारखा फरक नसून कनिष्ठ वर्ग शारीरिक व मानसिक शक्तीनेहि उच्च वर्गाच्या फारसा मागें राहिलेला नव्हता. म्हणून त्यांची राजकीय हक्क मिळविण्यासाठीं सारखी धडपड चालू होती. रोमन लोकांशीं तेथील प्लीबियन लोकांनीं राजकीय व समाजिक हक्कांसाठीं केलेला नेटाचा झगडा सुप्रसिद्ध असून त्या झगडयांतच त्यांना राजकीय शिक्षण मिळालें. पण हिंदुस्थानांत याच्या उलट प्रकार झाला. विशेषतः उत्तरहिंदुस्थानांत कनिष्ठ द्राविड जाती आर्यांच्या मानानें फार कमी प्रतीच्या असन त्यांचा वर्ण, तोंडवळा, चालीरीति सर्वच निराळीं असल्यामुळें राजकीय किंवा सामाजिक हक्कांसाठीं भांडण्यांचें त्यांच्या मनांतच कधीं आलें नाहीं. त्यामुळें वरिष्ठ आर्यजातींतच व विशेषत; क्षत्रियांत सर्व राजकीय सत्ता केन्द्रीभूत होऊन पुढें त्याच रीतीनें ती शेवटीं सर्वस्वीं राजांच्या हातांत येऊन बसली. नंतर राजा हा ईश्वरांश आहे अशी कल्पना कांहीं अंशीं बहुजनमान्यतेमुळें व

कांहीं अंशीं राजेलोकांच्या शिकवणीमुळें रूढ होऊन बौद्धकाळीं लोकांच्या हातून राजसत्ता सर्वस्वी निघून राजे लोक सर्वथा अनियंत्रित बनले.

तात्पर्य सातव्या शतकांत हिंदुस्थानची राजकीय स्थिति वर वर्णिल्याप्रमाणें होती. राजांच्या हातीं अनियंत्रित सत्ता असून लोकसमाजाचा त्यांवर कोणत्याहि प्रकारचा दाब नव्हता. एकंदर राज्य व प्रजा म्हणजे जणूंकाय राजांची खासगी जिंदगीच होती. अशी स्थिति झाल्यावर अर्थातच राज्यांना लोकांवरून नांव देण्याचा प्रघात बंद झाला. ह्युएनत्संगानें सांगितलेल्या सत्तर राज्यांपैकीं फारच थोड्यांची नावें लोकांवरून पडलेलीं आहेत. कुरु, पांचाल, अंग, वंग इत्यादि प्राचीन नांवे जाऊन त्याऐवजीं आतां ठाणेश्वर, कनोज, कर्णसुवर्ण, ताम्रलिप्ति इत्यादि सुरू झालीं. हीं नांवें त्या त्या राज्यांच्या मुख्य नगरांवरून अथवा दुसऱ्या कांहीं विशिष्ट लक्षणावरून पडलेलीं होतीं. यानंतर राजांचीं नांवेदेखील लोकांच्या नांवावरून न पडतां त्या त्या कुलावरून अथवा वंशावरून पडूं लागलीं, व वर्धन, मौखरि, गुप्त इत्यादि नांवें प्रचारांत आलीं.

वरील विवेचनावरून सहजच दिसून येईल कीं, या वर्धनादि कुलांना जें राजपद प्राप्त झालें, तें वंशपरंपरा हक्कानें किंवा प्रजेच्या संमतीनें मिळालेलें नव्हे; तर त्यासंबंधानें भोळ्या लोकांची अशी कल्पना झाली किंवा करून देण्यांत आली कीं, पूर्वजन्मार्जित तपश्चर्येच्या पुण्यामुळेंच कांहीं पुरुषांना तें पद प्राप्त झालें. या कल्पनेचा एकदां प्रसार झाल्यावर जो कोणी योग्य अयोग्य मार्गांनीं गादी बळकावून बसला, त्याचा तसा दैवी हक्कच होता असें लोकांना वाटूं लागलें. कारण राजाला राजपद देण्यांत आपला प्रजेचा कांहीं हात असला पाहिजे अशी त्यांची कल्पनाच नाहींशी

झाली होती. लोकांच्या या भोळया समजुतीचें उदाहरण पाहिजे असल्यास कल्हणानें राजतरंगिणींत ( तरं. ३ ) सांगितलेली रणादित्याची कथा पहावी. हर्षचरितांतहि तिसऱ्या उच्छ्वासांत वर्धन घराण्याचा मूळ पुरुष जो पुष्यभूति त्यानें भैरवाचार्य नांवाच्या एका शैवाला पाशुपत व्रताच्या सिध्यर्थ साहाय्य केल्यामुळें त्याला लक्ष्मी देवतेनें प्रसन्न होऊन तुझ्या वंशांत चक्रवर्ती राजा जन्मास येईल असा आशीर्वाद दिला असें वर्णन आहे. तसेंच चच नांवाच्या ब्राम्हणानें सिंधची गादी बळकावतांना असे उद्गार काढल्याचें चचनामा ग्रंथांत सांगितलें आहे कीं ' ज्यानें तपश्चर्या करून देह कष्टविला असेल असा पुरुष पुढें आपल्या या पुण्य प्रभावानें राजकुलांत अथवा दुसऱ्या कांहीं थोर कुलांत जन्मास येतो असें हिंदुधर्मग्रंथांत म्हणतात. ' या कल्पनेनुसार सामान्य जनतेला राजकीय बाबतींत कांहीं बोलावयाचा अधिकार नव्हता इतकेंच नव्हे, तर अमुक राजा आपल्याला हवा कीं नको हें म्हणण्याचादेखील त्यांचा कांहीं अखत्यार नव्हता; कारण राजा म्हटला म्हणजे तो आपल्या पूर्व पुण्याईमुळेंच राजपद पावत असतो. राष्ट्राच्या सामर्थ्याला अवश्य असलेली राष्ट्रीय भावना उत्पन्न होण्याला असल्या कल्पनासाम्राज्यांत वावच नसतो. त्यामुळें राष्ट्रभक्ति उर्फ स्वदेशाभिमान हा जो सद्गुण पाश्चात्य देशांत इतका वाखाणण्यांत येतो त्याचा या देशांत उदय झाला नाहीं तर त्यांत नवल कसलें ? ग्रीस, रोम किंवा अलीकडच्या पाश्चात्य राष्ट्रांच्या इतिहासांत जशीं उदात्त राष्ट्रभक्तीचीं उदाहरणें सांपडतात तशीं हिंदी राष्ट्राच्या प्राचीन इतिहासांत सांपडत नाहींत. राष्ट्र हीच भावना जेव्हां अस्तित्वांत नसते, तेव्हां स्वदेशप्रेम किंवा राष्ट्रभक्ति तरी कोठें उद्भवणार ? अशा ठिकाणीं राष्ट्रभक्तीबद्दल राजभक्ति हीच भावना उत्पन्न होते. राजा म्हणजे ईश्वरेच्छेनें

नियोजित असा देशाचा अनियंत्रित धनी असल्यामुळें असल्या ईश्वरांशभूत राजाच्या भक्तीशिवाय दुसरी कोणतीच प्रेरक भावना त्याच्या प्रजेच्या अन्तःकरणांत प्रादुर्भूत होत नाहीं. म्हणूनच हिंदी प्रजेमध्यें राजनिष्ठेचाच शुद्ध गुण प्रामुख्यानें दृष्टीस पडतो. हर्षचरितांत असलीं राजभक्तीचीं अनेक उदाहरणें बाणभट्टानें दिलीं असून त्यांत राजाच्या मृत्यूमुळें झालेल्या अनिवार दुःखानें त्याच्या सेवकांनीं किंवा अधिकाऱ्यांना पटापट आपल्या जिवाचा अन्त करून घेतला आहे (ह. च. प्रभाकरवर्धनाच्या मृत्यूचें वर्णन पहा उच्छ्वास ५ वा). या कारणास्तव जेव्हां जेव्हां एखादें राजघराणें आपल्या वैभवाचा अनेक पिढ्यांपर्यंत अविच्छिन्न उपभोग घेत असल्याचें आढळून येतें तेव्हां तें प्रजेच्या राष्ट्राभिमानामुळें नसून त्याच्या सेवकांच्या व अधिकाऱ्यांच्या राजनिष्ठेमुळेंच होय असें समजावें. सेवक व अधिकारी यांशिवाय इतर प्रजाहि सामान्यतः तत्कालीन राजाशीं एकनिष्ठ असेच. पण ती निष्ठा बुद्धिपुरःसर नसून जो कोणी राजा गादीवर असेल त्याच्या पुरती ती असे, व एक राजा जाऊन दुसरा कोणी आला तरी प्रजेला त्यांत फारशी भिति वाटत नसे.

लहानसहान राज्यांत जी ही स्थिति आढळते तीच मोठ्या साम्राज्यांतहि दिसून येते. हिंदुस्थानाच्या इतिहासांतील बौद्ध कालाच्या पूर्ण भरभराटीची अमदानी म्हणजे हर्षाचें साम्राज्य होय. गुप्त साम्राज्यासारखें बलाढ्य साम्राज्य स्थापून हर्षानें तें चालविलें; त्याच्या पुढील शतकांत तितक्या विस्ताराचें किंवा तितपत सामर्थ्यवान् साम्राज्य दुसरें झालेंच नाहीं. स्वतः हर्षराजा अतिशय श्रद्धाळू व सद्वर्तनी असून प्रजेच्या हिताविषयीं नित्य दक्ष असे. तथापि लोकांच्या राजकीय कल्पना कायमच असल्यामुळें त्याच्याकडून राष्ट्रीयत्वाचें वारें प्रजेंत उत्पन्न करण्याचें काम होऊं शकलें

नाहीं. उलट चुन्याच्या मदतीशिवाय नुसत्या एकावरएक रचलेल्या दगडांच्या राशीप्रमाणें केवळ सामर्थ्याच्या जोरावर एकत्र केलेले प्रांत लहानशा धक्क्यानेंहि कोलमडून पडावयाच्या बेतांत होते. याचा दोष अर्थात् आम्ही हर्षाकडे लावीत नाहीं. कारण हिंदीलोकांत प्रातिनिधिकसंस्थाचा अद्यापि उदयच झाला नसून योग्य प्रकारच्या राजकीय कल्पनांचाहि विकास प्रजेच्या मनांत झालेला नव्हता. त्यामुळें राज्याच्या अधिकारांतील कांहीं अंश लोकांच्या हातीं देण्याचें हर्षाच्या मनांत येणेंच शक्य नव्हतें. उलट केवळ सामर्थ्याच्या जोरावर त्यानें राज्यांत शांतता राखिल्यामुळें राजाच्या अनियंत्रित सत्ताधारीपणाची व तदनुसार त्याच्या ईश्वरांशित्वाची रूढ कल्पना त्याच्या अमदानींत अधिकच दृढमूल झाली.

अशा कल्पनांचा जोर असतां राज्यांतच काय पण साम्राज्यांतहि फारशी जीवनशक्ति असणें शक्य नाहीं. म्हणून हर्षाचा सबल दंड साम्राज्यांतून नाहींसा झाल्याबरोबर त्याचे तुकडे तुकडे होऊन गेले. मांडलिक राजे ताबडतोब स्वतंत्र झाले व हर्षाच्या खुद राज्यांतहि बखेडा झाला. कारण हर्षाला पुत्रसंतति नव्हती. वर सांगितलेल्या राजकीय कल्पनाच जेथें रूढ असतात त्या देशांत राष्ट्रप्रेमाची वाढ होणें तर शक्यच नाहीं, पण उलट देशद्रोहाला फार वाव मिळण्याचा पुष्कळ संभव असतो. जो कोणी बऱ्याबुऱ्या उपायानें गादी बळकावूं शकेल त्याची अशी खातरी असणार कीं, आपल्याला राजपद मिळालें कीं लोकांची भक्ति साहजिकच आपलेकडे ओढ घेणार. राजाला राज्याधिकार देण्यांत लोकांचा कांहीं संबंध नसल्यामुळें किंबहुना त्यांनी तशी कल्पना नसल्यामुळें त्यांना कोणत्याच राजक्रांतींत कोणी जुमानीत नसे व गादी बळकावून बसलेल्या मनुष्याचा प्रजेकडून बिनबोभाट

स्वीकार होई. त्यामुळें राजद्रोही व देशद्रोही लोकांची त्याकाळीं फारशी वाण नव्हती. अयशस्वी झालेल्या राजद्रोह्यांना किंवा बंडखोरांना शिक्षा म्हटली तर फार भयंकर होत असे हें खरें. म्हणजे आजच्याप्रमाणेंच त्याकाळीं सुद्धां अशा लोकांना "जन्मभर कारागृहवास प्राप्त होऊन ते जिते कीं मेले याची कोणी वास्तपुस्तदेखील घेत नसे", असें ह्युएनत्संगानें लिहिलें आहे. पण बंडखोरपणाला भयंकर शिक्षा मिळत असली तरी तिला धीट व महत्वाकांक्षी लोक फारशी भीक घालीत नसत; कारण योग्यसंधि सांपडली असतां विजय प्राप्तीबद्दल त्यांना फारसा वानवा नसे. तत्कालीन राजक्रान्त्या लोकांच्या नसून व्यक्तींच्या असत. त्यांत बहुधा प्रधान किंवा सेनापति हेच गादी बळकावणारे असून जेव्हां राजा संततिहीन किंवा दुर्बल असे, तेव्हां क्रान्तिकारकांना यश हें बहुधा ठेवलेलेंच असे. शुंग राजापासून तो थेट पेशवे व त्यांचे हस्तक यांच्या काळापर्यंत आणि सर्व मुसलमानी अमदानींत हिंदी राजकारणाच्या इतिहासाचा प्रवाह हा असा वहात आहे. राष्ट्रांतील प्रजेला आपल्या नागरिकत्वाची यथायोग्य कल्पना असल्यावर अशा राजक्रान्त्या कोण सहन करता? अथवा प्रधानासारख्या माणसांना गादी बळकावण्याचें तरी धैर्य काय म्हणून झालें असतें? प्रधानांनीं राजपदाची आकांक्षा कधीं धरली नाहीं असा देखावा या देशांत ब्रिटिश अमदानींत काय तो दृष्टीस पडूं लागला आहे.

येथपर्यंत हिंदी राष्ट्रांच्या दुर्बलतेचीं जीं कारणें आमच्या मतें प्रमुख दिसलीं त्यांचा उहापोह झाला. त्याचें तात्पर्य एवढेंच कीं, प्रातिनिधिक तत्वावर उभारलेल्या राजकीय संस्थांच्या अभावीं राष्ट्राच्या सुखदुःखांबरोबर आपलें स्वतःचेंहि सुखदुःख गुंतलें आहे अशी प्रजेची भावना न झाल्यामुळें राष्ट्रसंरक्षणाची जबाबदारी

लोकांना वाटनाशी झाली व राजसत्ता ही ईश्वर-सत्ता आहे व ती पूर्वजन्मार्जित पुण्यकर्मानें प्राप्त होते या कल्पनेमुळें राजकीय उलाढालींत प्रजेचें कांहीं अंग असावें ही जाणीव उत्पन्न न होऊन आपल्यावर कोणी कां राज्य करीना? आपल्याला त्याचें काय? असें मानण्याची लोकांत सार्वत्रिक प्रवृत्ति झाली. राजाचा अधिकार अगदीं पूर्णपणें अनियंत्रित असून राज्य म्हणजे जणूं काय त्याची खासगी मिळकतच समजली जात असून त्यामुळें साहाजिकच राष्ट्राभिमान या सद्गुणाला फारसा वाव उरत नसे. राष्ट्रभक्तीची जागा जरी राजभक्तीनें अंशतः भरून काढिली तरी राजद्रोही माणसें कांहीं कांहीं उत्पन्न होतच; व अशा क्रान्तिकारकांना यश मिळाल्यावर त्यांचाहि सर्व लोक बिनबोभाट राजा म्हणून अंगीकार करीत. हा प्रकार थेट पेशवाईच्या अखेरपर्यंत चालून राघोबादादानें जेव्हां पेशवाईची गादी बळकाविली तेव्हां त्याचे मंडन करावयासहि हजारों मंडळी पुढें आलीच. मराठी साम्राज्याचे नागरिक या नात्यानें आपल्या योग्य कर्तव्यांची जर तत्कालीन लोकांना चांगली जाणीव असती, तर पुढें दुर्दैवानें मराठेशाहींत जी शोचनीय फूट पडली तिला कारणीभूत झालेल्या मूर्ख माथेफिरू राघोबाचा पक्ष उचलून धरण्यास कोणता मराठा म्हणविणारा पुरुष पुढें आला असता? हिंदुस्थानाला ब्रिटिश राज्यापासून जे कांहीं फायदे झाले आहेत असें दिसतें, त्यांत राष्ट्रघटक या नात्यानें आपल्याला असलेल्या नैसर्गिक हक्कांची व तदनुसार आपल्यावर पडणाऱ्या कर्तव्याच्या जबाबदारीची लोकांमध्यें जाणीव जागृत झाली हा होय. या लोकजागृतीकडे लक्ष देऊन देशाच्या कारभाराचा योग्य हिस्सा लोकप्रतिनिधींकडे सोंपविण्याचा जो सरकारानें विचार ठरविला आहे तो निःसंशय सुज्ञपणाचाच आहे. कारण ब्रिटिश

राज्य झालें तरी प्रजेच्या सक्रिय सहकार्यतेच्या अभावीं केवळ मानसिक राजनिष्ठेवरच त्याला विसंबून राहतां येईल असें नाहीं; व सक्रिय सहकार्यता आणि साम्राज्याच्या हिताहिताशीं एकतानता म्हटली म्हणजे प्रातिनिधिक संस्थांच्या द्वारा स्वतः चालविलेल्या राजकारभाराच्या योगानेंच उत्पन्न होत असते.

राष्ट्रांचें पतन कां होतें हा प्रश्न सोडविणें मोठें दुर्घट काम आहे. तथापि राष्ट्रांच्या प्राणांचा प्राण, जी राष्ट्रहित म्हणजेच स्वहित असें मानण्याची लोकांची प्रवृत्ति ती प्रातिनिधिक-संस्थांच्या योगानेंच उत्पन्न होत असते यांत कांहीं शंका नाहीं. असल्या उदात्त राष्ट्रीय विचारांनीं प्रेरित झालेलीं ग्रीसमधील नगरवजा लोकसत्ताक-राज्यें व रोमचें साम्राज्य हीं सुद्धां नष्ट झालीं असें इतिहास सांगत आहे ही गोष्ट खरी. पण त्याबरोबर हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, त्या राष्ट्रांतील राष्ट्रीय भावना नीतिभ्रष्टता व चैनबाजी या दुर्गुणांना प्रथम बळी पडल्या आणि मगच त्या राष्ट्रांचा ऱ्हास होऊन तीं पतन पावलीं. तथापि जेव्हां पुनः सदर सद्गुणांचा तेथें परिपोष होऊं लागला, तेव्हां तींहि पुनः उत्कर्षास चढूं लागलीं. याच्या उलट हिंदी राष्ट्रांत राष्ट्रीय भावनाच कधीं उत्पन्न झाल्या नाहींत व त्यामुळें त्यांच्यांत खरें सामर्थ्यहि उद्भवलें नाहीं. तेव्हां पुढील शतकांत त्यांची बलिष्ठ राष्ट्रें बनणें शक्यच नव्हतें उलट पुढें एका ठिकाणीं ज्यांचें विवेचन करावयाचें आहे अशा कारणामुळें त्यांचें दौर्बल्य क्रमशः वाढत जाऊन तीं शेवटीं मुसलमान स्वाऱ्यांच्या पुरांत वाहून गेलीं.

पण शेवटीं एका गोष्टीचा मात्र अवश्य निर्देश केला पाहिजे. ती अशी कीं, सातव्या शतकांतील हिंदी अनियंत्रित राज्यें आशियांतील त्या वेळच्या इतर राष्ट्रांच्या मानानें बलिष्ठ होतीं;

आणि म्हणूनच ज्या हूण लोकांनीं यूरोपांत दंगल उडवून दिली व ज्यांच्या पुढें तेथील लोकांना हात टेकावे लागले त्या हूणांची येथें फारशी डाळ शिजली नाहीं. लोकांच्या शारीरिक व नैतिक सामर्थ्यानें राष्ट्राच्या जीवनांत जोम येत असतो. लढाऊ बाण्याचे व आहारादि व्यवहार मित ठेवणारे निवळ शाकाहारी लोक-सुद्धां राष्ट्राराष्ट्रांच्या झगडयांत उत्तम टिकाव धरूं शकतात. सातव्या शतकांत येथील निरनिराळ्या प्रांतांच्या राजांमध्यें नित्य युद्ध-प्रसंग होत असल्यामुळें लोकांचा लढाऊ बाणा सदैव जागृत असे. तसेंच ह्युएनत्संगानें म्हटल्याप्रमाणें त्यांची रहाणी साधी व व्यस-नातीत असल्यामुळें सातव्या शतकांतील हिंदी राष्ट्रें अनियंत्रित राजांच्या अमलाखालीं होतीं तरी तीं चांगलीं बलिष्ठ राहून चैनबाजी किंवा अविच्छिन्न शांततेमुळें उत्पन्न होणाऱ्या दौर्बल्याच्या तडाख्यांत सांपडलीं नाहींत. राष्ट्रांतील प्रजेच्या दौर्बल्याचें ठळक लक्षण म्हटलें म्हणजे भाडोत्री सैन्य ठेवण्याचा प्रसंग येणें हें होय; पण ह्युएनत्संग किंवा बाण यांनीं केलेल्या वर्णनावरून पहातां हर्षाच्या सैन्यांत असले भाडोत्री शिपाई असलेले दिसत नाहींत.

# प्रकरण ८ वें.



## राज्यव्यवस्था.

सातव्या शतकांतील एतद्देशीय राज्यें जरी तत्वतः जुलमी म्हणजे एकतंत्री होतीं, तथापि तत्कालीन पाश्चात्य राज्यांपेक्षां त्यांची व्यवस्था अधिक ठाकठिकीची असल्यामुळें ती सुखी असून त्यांचीं प्रजा समाधानांत रहात असे. 'नाविष्णुः पृथिवीपतिः' असा न्याय ठरविणाऱ्या भारतीय आर्यांनीं राजाच्या अनियंत्रित सत्तेला आळा घालण्यासाठीं व्यवहारधर्म व राजांचीं कर्तव्यें सुद्धां ईश्वरप्रणीत अतएव अनुल्लंघनीय आहेत असें ठरविलें होतें. राजव्यवहारांतील प्रत्येक लहान मोठी बाब म्हणजे त्याच्या खासगी वर्तनापासून तों करवसुली व गुन्हेगारांचें शासन इत्यादिकांपर्यंत सर्वच गोष्टी स्मृत्युक्त दैवी नियमांनीं बांधून टाकिलेल्या आहेत असाच खरोखर प्राचीन आर्यांचा समज होता. पण याच्या उलट पाश्चात्य देशांत सर्व ऐहिक सत्तेचें उगमस्थान राजा होय असें मानीत. हें उगमस्थान भारती-आर्यांच्या दृष्टीनें श्रुतिस्मृतींतच असून त्यांत हात घालण्याचा मानवी सत्तेला अधिकारच दिलेला नव्हता. लोकांच्या अनुमतीनें देखील कायद्यांत फेरफार करणें राजाच्या अधिकाराबाहेरचें होतें. राजाचें कर्तव्य म्हटलें म्हणजे स्मृत्युक्त नियमान्वयें राज्यकारभार चालवून प्रजेला न्याय द्यावयाचा आणि गुन्हेगारांचें शासन करून राज्यांत शांतता व सुव्यवस्था राखावयाची.ही प्रजेची कामगिरी करण्याबद्दल प्रजेकडून त्याला जमिनीच्या पिकापैकीं त्याचप्रमाणें व्यापार उदी-माच्या उत्पन्नापैकीं ठराविक कर मिळत असे. जमिनीवरील कराचें प्रमाण उत्पन्नाचा षष्ठांश ठरलें असून व्यापारावरील कर मालाच्या किंमतीवर शेंकडा दोन या प्रमाणांत असे. प्रसंगविशेषीं जमि-

नीच्या उत्पन्नाचा चौथा हिस्साहि द्यावया असे. तत्कालीन राज्यव्यवस्था भानगडीची नसल्यामुळें ह्युएनत्संगानें वर्णिल्याप्रमाणें, तिला खर्चहि फार लागत नसे, आणि म्हणून स्मृतींत सांगितलेल्या करांच्या बाहेर कर वसूल करण्याची बहुधा अवश्यकताच राजे लोकांना भासत नव्हती. लोकांच्या बाजूचा विचार करितांहि बहुजनसमाजाची स्वाभाविक प्रवृत्ति धर्माला आणि नीतीला धरून असल्यामुळें गुन्ह्यांचें प्रमाण फार कमी असे व त्यामुळें तत्कालीन राज्यांत सुखासमाधानाची स्थिति सामान्यपणें नांदत असून तिचें अवलोकन करणाऱ्या ह्युएनत्संगासारख्या भिन्न परिस्थितींत वाढलेल्या परकीय गृहस्थाला मोठें कौतुक* वाटे. एवढी प्रस्तावना करून आपण हर्षकालीन राज्यव्यवस्थेकडे वळूं. हा विचार पूर्वींप्रमाणें हर्षचरित आणि तत्कालीन ताम्रलेख व शिलालेख यांत आढळून येणाऱ्या प्रमाणांवरूनच करावयाचा आहे. त्यांबरोबर स्मृति ग्रंथांचाहि या बाबतींत पुष्कळ उपयोग होईल.

त्यावेळीं एका राज्यांत मोडणाऱ्या सर्व प्रदेशाला **देश** असें नांव असून त्या शब्दाचा वराहमिहिर आणि दुसरे ग्रंथकार यांनींहि याच अर्थानें उपयोग केलेला आहे. या अर्थाचा पूर्वीचा शब्द **जनपद** हा असून, या शब्दभेदावरून बदललेल्या परिस्थितीचाहि

---

* ह्युएनत्संगानें याविषयीं म्हटलें आहे:—" राज्यकारभार उदार धोरणाचा व बिन भानगडीचा असल्यामुळें राज्यांतील कुळांची नोंद करण्याचें कारण पडत नाहीं; आणि वेठीचें काम व जादा करवसूली यांचीहि आवश्यकता कोणाला वाटत नाहीं. करांचें प्रमाण हलकें आणि वेठीचा उपयोग क्वचित् होत असल्यामुळें जो तो आपला वडिलार्जित धंदा व संपत्ति सांभाळून रहात असे. शेतकरी लोक शेती उत्पन्नाचा षष्ठांश राजाला कराबद्दल देतात आणि व्यापारी लोक नद्यांचे उतार आणि रस्त्यांची नाकी या ठिकाणीं थोडाबहुत कर देऊन अपला धंदा चालवितात. ( वाटर्स १ पु. पा. )

**बोध** होतो. म्हणजे पूर्वीचीं राज्यें जशीं एकाच जातीच्या व एकाच सांप्रदायाच्या **लोकांचीं** बनलेलीं असत तशीं आतां नसून त्यांत **भिन्न** जाती व भिन्न सांप्रदायांचा समावेश होऊं लागल्यामुळें त्याच्या **लोकवाचक** नांवांत आतां अन्वर्यकता नाहींशी होऊन त्यांच्या जागीं **देश** हा भूमिवाचक सार्थ शब्द योजण्यांत आला. तथापि दक्षिणेकडे **देश** शब्दाबद्दल अजूनहि **मंडळ** शब्दाचाच या अर्थी अधिक प्रचार असून तत्कालीन दक्षिणेकडील लेखांत चोलमंडल, तोंडमंडल, कोंगमंडल असे प्रयोग आढळून येतात व याशब्दांतील पहिल्या भागावरून विशिष्ट लोकजातीचाच बोध होतो. याशिवाय मंडल शब्दाचा लोकांच्या जातीवरून झालेला देशाचा भाग या अर्थीहि अनेक वार प्रयोग आलेला असून याच अर्थी पुनः राष्ट्र किंवा राज्य या शब्दांचाहि उपयोग केलेला आढळतो.

राज्यकारभाराचे सोईसाठीं जे देशाचे भाग केलेले असत, त्यांस उत्तरहिंदुस्थानांत **भुक्ति** आणि दक्षिणहिंदुस्थानांत **नाड** किंवा **मंडल** म्हणत. आजच्या भाषेंत बोलावयाचें तर या विभागाला जिल्हा असें म्हणतां येईल. **भुक्ति** शब्दावरून मूळ वसूल होणाऱ्या कराच्या प्रमाणाचा बोध होत असून इंग्रजी **कलेक्टोरेट** म्हणजे कलेक्टरच्या हाताखालील मुलूख असा त्याचा अर्थ घेतां येईल. या भुक्तींचे आणखी पोटभाग केलेले असून त्यांना सर्वत्र **विषय** ही संज्ञा असे. हे **विषय** म्हणजे आजकालच्या तहशिली किंवा तालुके होत. अगदीं दक्षिणेकडील तामिळ वगैरे प्रदेशांत **विषयाबद्दल नाड** शब्द प्रचारांत असून गुजराथेंत त्याला **अहार** म्हणत. विषयाचे आणखी पोटविभाग केलेले आढळत नाहींत; तरी क्वचित् उत्तर, दक्षिण, पूर्व, पश्चिम, असे दिशांच्या अनुरोधानें त्याचेहि विभाग कोठें कोठें दिसतात. **विषयाचे शेवटचे**

घटक ग्राम असून कित्येक ग्राम मिळून विषय होत असे. म्हणजे राज्यकारभारासंबंधानें पाहतां देशाचा सर्वांत लहान घटक म्हणजे ग्राम असून ग्रामाविषयीं बोलतांना तो अमुक भुक्ति किंवा मंडलाच्या अमुक विषयांतर्गत आहे असा निर्देश होत असे. विषयाला नांव द्यावयाचें तें बहुधा त्यांतील प्रमुख नगरावरून देत असून भुक्तीचें नांव केव्हां केव्हां लोकवाचक असे. उदाहरणार्थ, खेटक अहार म्हणजे हल्लींच्या भाषेंत खेड तालुका, व जेजाक भुक्ति किंवा चीन भुक्ति म्हणजे जेजाक किंवा चीन जिल्हा असें समजावें. भुक्तींचेंहि नांव क्वचित् प्रमुख नगरावरून पडल्याचें दिसतें. हर्षवर्धनाच्या बांसखेडा येथील ताम्रपटांत अहिच्छत्र भुक्ति असा प्रयोग आलेला आहे.

देशाच्या राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें ग्राम हा त्याचा मुख्य महत्त्वाचा भाग असून त्याच्या मर्यादा व स्थान नक्की केलेलें असे; व राज्याराज्यांमधील युद्धाचीं वावटळें वरून कितीहि गेलीं, तरी ग्रामसंस्था जशीच्या तशी राहून नवीन राजाच्या सत्तेपुढें मान वाकवावयाला नित्य तयारच असे. असल्या युद्धामध्यें मोठमोठ्या शहरांचा विध्वंस पुष्कळ वेळ होई व कित्येक तर पूर्णपणें नामशेष होत. पण लहान ग्राम मात्र होते तसे राहून आपला कारभार पूर्ववत् चालवीत असत. त्यांचे कारभारी बहुधा आजच्या पाटीलकुळकर्ण्यांप्रमाणें पिढीजात असल्यामुळें त्यांच्या कारभारांत व्यत्यय येत नसे. हर्षचरितावरून असें दिसून येतें कीं, हल्लींच्या पाटलाचें व कुळकर्ण्याचें काम करणाऱ्या तत्कालीन ग्रामाधिकाऱ्यांना अक्षपटलिक आणि करणिक अशीं अनुक्रमें नांवें होतीं. करण म्हणजे गांवांतील शेतकरी कुळांच्या नोंदणीची वही. अद्यापिहि मद्रासेकडे कुळकर्ण्याबद्दल करणम् किंवा करणिक असे शब्द

उपयोगांत आहत. हल्लींचा पाटिल शब्द माझ्या मतें **अक्षपटल** शब्दापासूनच निघाला असावा. हा शब्द कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत-देखील आलेला असून त्याठिकाणीं त्याचा अर्थ नोंदणी पुस्तकें ठेवण्याची कचेरी असा उघड आहे.* आणि त्यावरून त्याकाळीं नोंदणीपुस्तकें ठेवण्याच्या सरकारी कचेऱ्या होत्या हें स्पष्ट दिसतें. **ग्रामाक्षपटल** या शब्दाचा अर्थ हल्लींची चावडी असा एकंदरींत असून तीवरील अधिकाऱ्याला **ग्रामाक्षपटलिक** असें म्हणत. हा गांवचा मुख्य अधिकारी असून राजांच्या दौऱ्याचे वेळीं त्याला नजरनजराणा अर्पण करण्याचा अधिकार त्यास असे, ही गोष्ट बाणानें केलेल्या हर्षचरितांतील वर्णनावरून उघड दिसून येते.† इ. स. ५१२ तील धरसेनाच्या ताम्रपटांत **महाक्षपटलिक** असा शब्द आला असून ( हिंदी ताम्रपट ३. पा. १८० ) त्यावरून सर्व राज्याच्या वसुलावरील एक मुख्य अधिकारी असे, असें दिसून येतें. याप्रमाणें प्रत्येक गांव व प्रत्येक नगर यांतील कुळांची नोंद असून तीवरून राज्यकारभाराचें गाडें त्यावेळीं चांगलें सुरळीत चालत असे असें सिद्ध होतें. अशा नोंदी सर्व राज्यांत ठेवलेल्या असत असें ह्युएनत्संगानेंहि सांगितलें आहे. असो, ग्रामाक्षपटलिक म्हणजे हल्लींच्या पाटलाचें मूळ असून तोच प्रत्येक ग्रामांतील मुख्य सरकारी अधिकारी असे. या अधिकाऱ्याचा उल्लेख दुसऱ्या एका ताम्रपटांत आलेला असून तेथें 'अन्यग्रामाक्षपटलाधिकृत' असे शब्द आहेत व त्यावरून असा अधिकारी प्रत्येक गांवांत नेमिलेला असे हें सिद्ध होतें.

---

* अक्षपटलमध्यक्षः प्रत्यङ्मुखमुदङ्मुखं वा विभक्तोस्थापनं निबंधपुस्तकस्थाने कारयेत्। कौटिल्य.

† 'तत्रस्थस्यचास्य ग्रामाक्षपटलिकः—......मुद्रां समुपनिन्ये' ( ह. च. ७ वा उच्छ्वास ) या वर्णनाचा मागें उल्लेख आला आहे.

हर्षचरितांतील वर उल्लेखिलेल्या वर्णनांत ग्रामाक्षपटलिकाबरोबर ‘ सकल-करणि-परिकरः ’ असा शब्द आला आहे. म्हणजे मुख्य ग्रामाधिकाऱ्याच्या हाताखालीं दुसरेहि नोकर किंवा उपाधिकारी असत असें यावरून दिसतें. हे पाटील, पटवारी, इतरहि सर्व ग्रामाधिकारी पिढीजाद* असून त्या सर्वांमिळून राज्यव्यवस्थेचा सर्वांगपूर्ण घटक बनलेला असे. हे अधिकारी जमिनीच्या उत्पन्नावरील षष्टांश कर व तसेच दुसरेहि बारीकसारीक पुष्कळ कर वसूल करण्याचें काम करीत. दान दिलेल्या गांवावर असले अधिकारी नसत; व हें दाखविण्यासाठीं दानलेखांत त्या काळीं विशेष शब्द योजना केलेली असे. उदाहरणार्थ, महाराज हस्ती यांच्या खोह येथील ताम्रपटांत (हिंदी ताम्रपट पु.३ पा.९६) ‘सोद्रंगः सोपरिकरः अचाटभटप्रवेशः’ असे शब्द आहेत. तसेंच इ. स.५७१ तील धरसेनाच्या दानपत्रांत ‘सोद्रंगं सोपरिकरं सवातभूत–धान्यहिरण्यादेयं सोत्पद्यमानविष्टिकम् ’ असे शब्द असून शिलादित्याच्या लेखांत ( सदर पा. १७९ ) ’ सोद्रंगः सोपरिकरः सोत्पद्यमानविष्टिकः सभूतवातप्रत्यादेयः ’ इत्यादि शब्द आहेत. आतां त्यांचा अर्थ काय तो पाहूं. या सर्व ठिकाणीं उद्रंग म्हणजे सर्वांत मुख्य कर जमिनीवर घ्यावयाचा असेंच समजलें पाहिजे. हा शब्द अद्यापि आम्हांला कोठल्या प्राचीन ग्रंथांत आढळलेला नाहीं. पण सदर ताम्रपट प्रसिद्ध करणाऱ्या डा०फ्लीटनें सुचविल्याप्रमाणें गांवांतील मुख्य सरकारी उत्पन्नाची बाब असाच त्याचा अर्थ असला पाहिजे. उपरिकर याचा अर्थ डॅा. फ्लीट म्हणतात त्याप्रमाणें जादा शेतकऱ्यांवरील कर नसून नुसते जादा कर असावे असें आम्हाला

* या अर्थी ध्रुव हा शब्द गुजराथेंतील ताम्रपटांत आढळत असून अजूनहि गुजराथी भाषेत तो रूढ आहे.

वाटतें. हे जादा कर कोणते असावे याचा निर्णय स्मृतिग्रंथ व सदर ताम्रपटसंग्रह यावरून करतां येण्यासारखा आहे. धान्याशिवाय इतर करासंबंधानें विचार करतांना मनु म्हणतो ' आददीताथ षड्-भागं द्रुमांसमधुसर्पिषाम्। गंधौषधिरसानांच पुष्पमूलफलस्य च। पत्र-शाक-तृणानांच चर्मणां वैदलस्यच। मृण्मयानांच भाण्डानां सर्वस्याश्ममयस्य च ॥' (७–१३१,१३२). हे जे सतरा पदार्थ सांगितले आहेत त्यांच्या विक्रीवर कर घ्यावयाचा असून कोणी स्वतःच्या उपभोगासाठींच ते संग्रहकेल्यास तो कर घ्यावयाचा नसे. मनुकालानंतर सातव्या शतकांतहि वरील पदार्थांच्या विक्रीवर कर घेत असत ही गोष्ट तत्कालीन लेखावरूनहि स्पष्ट होते. या बाबतींत चम्मक येथील ताम्रलेख पहाण्यासारखा आहे (ताम्रलेख, पु. ३. पा. २३८). त्यांत ज्या ग्रामाचें दान केलें आहे त्याला " अकरादायि अभटछात्रप्रवेश्यः अपारंपरगोबलीवर्दः अपुष्पक्षीरसंदोहः अचारासनचर्माङ्गः अलवणक्लिन्नक्रेणिखनकः सर्वविष्टिपरिहारपरिहृतः सनिधिः सोपनिधिः सक्लृप्तोऽसोपक्लृप्तः " इत्यादि प्रकारें अटी घातल्या आहेत. त्यांचा अर्थ असाः—'या गांवानें कर द्यावयाचा नाहीं, त्यांत पोलीस किंवा फौजी अधिकाऱ्यांचा शिरकाव व्हावयाचा नाहीं. गाईबैलांच्या वृद्धीचा भाग त्यानें कर म्हणून द्यावयाचा नाहीं. फुलें, दूध, कुरणें, कातडीं, कोळसा यांवरील कर त्याला द्यावयाला नको. तसाच मीठ, खरेदी विक्री आणि खनिज पदार्थ यांवरचाहि कर द्यावयास नको. त्यापासून कोणत्याहि प्रकारची वेठ घ्यावयाची नाहीं. त्यांतील निधिनिक्षेप आणि इतर वस्तु, क्लृप्त आणि उपक्लृप्त यांसह उपभागासाठीं तो दिलेला आहे.' यांत निधि आणि क्लृप्त यांच्यापुढें त्यांच्याच जातीचे पण कमी महत्त्वाचे पदार्थ दर्शविण्यासाठीं

जे **उपनिधि आणि** उपक्लृप्त असे शब्द आहेत त्यांच्या अनुरोधानें विचार करतां **उद्रंग** आणि **उपरिकर** यांवरूनहि एकाच जातीच्या म्हणजे जमिनीच्या मुख्य उत्पन्नावरील कराचा व दुसऱ्या फुलें, फळें वगैरे किरकोळ वस्तूंच्या विक्रीवरील कराचा बोध होत असला पाहिजे असें म्हणावें लागतें. हा उद्रंग म्हणजे जमीन महसूल दरसाल प्रत्यक्ष पिकाच्या पहाणीवरून ठरवीत असत किंवा कित्येक वर्षांच्या सरासरीवरून ठरवीत असत हें निश्चित समजत नाहीं. जमिनीची त्यावेळीं मोजणी होत होती हें तत्कालीन लेखांवरून स्पष्ट दिसतें. उदाहरणार्थ, धरासेनाच्या ताम्रलेखांत ( भार. ताम्र. पु. ३ नं. २८ पा. १६६ ) कित्येक गांवांतील शेतांचीं विशिष्ट नांवें दिलेलीं असून त्याचें क्षेत्रफळ सांगतांना **पदावर्तशतम्**, **पदावर्तनवति**, पदावर्त **अष्टाविंशति** असे शब्द घातले आहेत. यांत पद म्हणजे पाय असा अर्थ नसून पाऊल म्हणजे सुमारें दीड हात व त्यावरून **पदावर्त** ह्मणजे एक चौरस पाऊल असा अर्थ धरिला पाहिजे. हीं क्षेत्रें अर्थात् फार लहान दिसतात; पण गुजराथच्या सुपीक जमिनीपैकीं तीं आहेत हें लक्षांत ठेविलें पाहिजे. कमी सुपीक जमिनीचीं मापें निराळीं होतीं. वऱ्हाडांतील ( भोजकटराज्य ) एका गांवासंबंधीं प्रवरसेनाच्या दानपत्रांत ( पु. ३ पा. २४१ ) जमीन मोजण्याचें माप **राजमान** म्हणून सांगितलें आहे. हें राजमान केव्हढें होतें हें मात्र त्यांत आढळत नाहीं. 'राजमानिकभूमिसहस्त्रैरष्टाभिः' असे शब्द त्यांत आलेले आहेत. डॉ. फ्लीटच्या मतें यांतील मापाचें नांव भूमि हें होय. पण भूमि शब्द केवळ सामान्य जमिनीचा वाचक आहे हें उघड आहे. वरील गांव ८००० मापें असून तो १००० ब्राह्मणांना दिलेला आहे. यावरून

तें माप हल्लींच्या बिघ्याएवढें जवळजवळ असून तो गांवहि बराच मोठा असला पाहिजे. या लेखमालेंत **निवर्तन** हा शब्द कोठें आलेला नाहीं. पण त्याहून प्राचीन लेखांत आलेला असल्यामुळें तो बराचा जुना आहे यांत संशय नाहीं. विशेषतः दक्षिणेंतील प्राचीन लेख आणि नाशिक येथील लेण्यांतील लेख यांतहि तो येतो. म्हणजे दक्षिण देशांत तो चालू असून उत्तरेकडे मात्र त्याबद्दल दुसरे शब्द प्रचारांत आले असावे असें दिसतें. कौटिल्याच्या अर्थशास्त्रांतहि तो आलेला असून त्याचें कोष्टक असें दिलें आहेः--

४ हात = दंड  १० दंड = रज्जु

३ रज्जु = निवर्तन

यावरून एका निवर्तनाची लांबी १२० हात म्हणजे ६० वार ठरते. म्हणून एक चौरस निवर्तनाचें क्षेत्र म्हणजे ३६०० चौरस वाराचें झालें. हल्लींच्या एकराचे ४८४० चौरस वार होतात; व त्या मानानें एका एकरांत जवळजवळ १$\frac{1}{3}$ निवर्तनें बसतात. मुसलमानांचा बिघा देखील दंडानेंच मोजीत. वीस चौरस दंडाइतकें त्याचें क्षेत्र होतें; म्हणजे तो $\frac{1}{2}$ निवर्तनाइतका जवळ जवळ होता. वरील ८००० मापांच्या गांवांचें क्षेत्र या प्राचीन निवर्तनानेंच कदाचित् सांगितलें असेल. असो, जमिनीवरील उद्रंग कराचें प्रमाण कोणत्याहि रीतीनें ठरविलें असलें तरी तो धान्य रूपानेंच घेत असत, व **उपरिकर**सुद्धां तशाच रीतीनें म्हणजे त्या त्या पदार्थांच्या रूपानेंच घेत असत. हा पदार्थरूपानें वसूल केलेला दोन्ही प्रकारचा कर **कोष्ठागाराध्यक्ष** नांवाचा अधिकारी सरकारासाठीं कोठ्यांत सांठवून ठेवीत असे व त्यावर देखरेख करीत असे. त्या पदार्थांच्या टिकाऊपणाच्या मानानें पुढें तो लगेच विकून टाकीत किंवा पुढील उपयोगासाठीं तसेच ठेवून देत. याविषयीं बारिकसारीकदेखील मजेची माहिती कौटिल्यानें आपल्या अर्थशास्त्रांत दिलेली आहे.

## टीप.

हर्षचरित आणि ताम्रपत्रादि तत्कालीन इतर लेख यांवरून ग्रामसंस्थाचा कारभार आणि त्यांतील रहाणी यांविषयीं आणखीहि कांहीं माहिती मिळण्यासारखी आहे. ग्रामसंबंधीं दानलेख गांवांतील लोक किंवा अधिकारी यांनाहि उद्देशून पुष्कळ वेळां लिहिलेले आढळतात. उदाहरणार्थ डॉ. फ्लीट कृत हिंदी ताम्रपट मालेच्या ३ ऱ्या पुस्तकांतील ( पा. १९३–१९५ ) एका लेखांत ' प्रतिवासिकुटुंबिनः समाज्ञापयति ' असे शब्द असून त्यांत त्या ग्रामस्थांना आपले कर वगैरे अतःपर ग्रामदान घेणाऱ्या ब्राह्मणाला देण्याबद्दल आज्ञा केलेली आहे. या ग्रामस्थांत सर्व जातींच्या लोकांबरोबर ब्राह्मण आणि पाटील यांचा प्रामुख्यानें उल्लेख केलेला असतो. डॉ. फ्लीटकृत सदर पुस्तकांतील पा. २१६ वरील लेखांत ' प्रतिवासिनश्च ब्राह्मणोत्तरान्महत्तरान् ' इत्यादि शब्दांवरून ही गोष्ट दिसून येईल. ज्या दानलेखांत अधिकाऱ्यांचा उल्लेख असतो त्यांत दानविषक गांवांत त्यांनीं कोणत्याहि प्रकारची ढवळाढवळ न करतां तो घेणाऱ्या ब्राह्मणाला त्याचा सुखानें उपयोग घेऊं द्यावा अशी त्यांना आज्ञा केलेली असते. त्याचप्रमाणे ग्रामस्थांनीं आणि दानोत्तर स्वामी बनलेल्या ब्राह्मणानीं देखील न्यायानें व सलोख्यानें वागण्याविषयीं दानपत्रांत उल्लेख असतो. चम्मकच्या दानलेखांत ( सदर पा. २३९ ) यांसंबंधानें पुढील महत्वाचे शब्द आहेतः–' अद्रोहप्रवृत्तानां अब्रह्मघ्न–चौर–पारदारिक–राजापथ्यकारि–प्रभृतीनां असंग्राम कुर्वतां अन्यग्रामेष्वनपराधानामाचन्दार्ककालीयः । याचा अर्थ असा आहे कीं ' जोंवर दान घेणारे गृहस्थ लोकांचा द्रोह, ब्रह्महत्या, चोरी, व्यभिचार, राजद्रोह, इत्यादि गुन्ह्यांपासून अलिप्त राहून युद्धाच्या भानगडींत न पडतां इतर गांवांशीं कांहीं आगळीक करीत नाहींत तों वर आचन्द्रार्क म्हणजे अनंतकाल पिढयानुपिढया या गांवाचा त्यांनीं उपभोग घ्यावा, तो त्याजकडून काढून घेतला जाणार नाहीं. दानलेखांत समाविष्ट केलेल्या या अटीवरून ग्रामसंस्थांची व्यवस्था किती न्यायाची व सरळ होती आणि एकंदर राज्ययंत्रहि किती सावधगिरीनें चालविलें जात असे हें दिसून येईल.

खेड्या गांवांतील लोकांच्या नित्योपयोगी अवश्य पदार्थांत मीठ, जळवण आणि गवत यांची प्रामुख्याने गणना करावी लागते. यांपैकीं सर्व वस्तूंचा पुरवठा त्या काळीं मुबलक असून लोकांना त्या बहुधा फुकट मिळत असत. मात्र विक्रीसाठीं त्यांना बाजरांत आणिल्यावर त्या षष्ठांश कराला पात्र होत. पूर्वी सांगितलेंच आहे कीं, इनाम दिलेल्या गांवाला सुकें ( खाणींतील ) व ओलें ( समुद्राच्या पाण्याचें ) मीठ आणि गवत यांवरील कर द्यावा लागत नसे. म्हणजे याचा अर्थ असा होतो कीं त्या काळीं मीठ उत्पन्न करण्याचा सर्व हक्क केवळ सरकाराकडेच नसून वाटेल त्याला तें करण्याची मुभा होती. त्याकाळीं बऱ्याच गावांत खाऱ्या विहिरी असून त्यांचा मिठासाठीं उपयोग करीत; तसेंच कित्येक ठिकाणीं मिठाच्या खाणीहि असत. पण त्यांतून निघणारें मीठ अर्थातच मर्यादित प्रमाणांत असणार, म्हणून समुद्राच्या पाण्यापासून मोठ्या प्रमाणावर विक्रीसाठीं मीठ तयार करण्याचा तेव्हां प्रघात होता, आणि त्याच्या विक्रीवरील कर ही एक उत्पन्नाची चांगलीच बाब असल्यामुळें तत्कालीन राजे त्याकडे दुर्लक्ष करीत नसत. मिठानंतर दुसरी वस्तु ह्मणजे गुरांचा चारा या संबंधानें असें आढळून येतें कीं, गुरांना चरण्यासाठीं म्हणून प्रत्येक गांवाची गुरचराईची समाईक जमीन त्याकाळीं राखून ठेविलेली असे. सभोंवतीं आवार घातलेल्या आणि उत्तम प्रकारचें गवत उत्पन्न करणाऱ्या कुरणांचा उल्लेख स्मृति ग्रंथांत केलेला असून त्यांना "विवीत" अशी संज्ञा दिलेली आहे. या कुरणांतील गवत स्वतःच्या गुरांनाच पाहिजे असल्यास तें मोफत मिळे, पण तें का विक्रीसाठीं बाजारांत गेल्यास त्यावर ठराविक कर द्यावा लागे. तिसरी महत्वाची गोष्ट जी जळवण तीहि ग्रामस्थ लोकांना गांवच्या जंगलांतून फुकट मिळत असे, व त्यासाठीं प्रत्येक गांवाचीं जंगलेंहि स्वतंत्र असत. याशिवाय प्रत्येक राज्याच्या सरहद्दीवर मोठीं जंगलें असून त्यांतूनहि लोकांना सरपण मिळत असे. या जंगलांचा धनी ह्मणून कोणी नाहीं असे स्मृति ग्रंथांत ह्मटलें आहे. तथापि त्यांचें कांहीं भाग नागवन म्हणजे हत्तीचें रान या नांवानें प्रसिद्ध असून तें राजानें राखून ठेविलेले असत; याशिवाय

उरलेलीं जंगलें व गांव जंगलें हीं मात्र लोकांच्या सार्वत्रिक उपयोगी पडण्यासारखीं होतीं. सविस्तर व हुबेहुब देखावा उठवून देणारें वर्णन करण्याची जी बाणभट्टाची अजब शैली त्याच्या ग्रंथांत दिसून येते ती या दोन्ही प्रकारच्या जंगलांच्या हर्षचरितांतील वर्णनांत चांगलीच दृग्गोचर होते. त्यांतील कांहीं भागांचा निर्देश येथें अवश्य करण्यासारखा आहे व त्यावरून तत्कालीन जंगलव्यवस्था व आजची व्यवस्था यांची तुलना करतां येईल. बाणभट्ट म्हणतो "अनियंत्रित असें जंगल अधिकारी जवळच्या दुसऱ्या गांवांतून लांकूडफांटे तोडण्यासाठीं आलेल्या लोकांच्या कुऱ्हाडी जबरीनें त्यांच्यापासून हिसकून घेत आहेत. (अनियंत्रितवनपालहठह्रियमाणपरग्रामीणकाष्ठिककुठारैः । उच्छ्वास ४ ह. च.) या जंगलांत कोठें कोठें लहान लहान शेतें असून त्यांचें नांगरण्याचें काम बैलांकडून न करतां शेतकरी हात कुदळानेंच करीत. ज्या जंगलांत पाणी मिळण्यासारखें नसे, त्यांच्या तोंडाशीं लहानशी झोपडी बांधून त्यांत पाणपोई ठेवलेली असे. कित्येक जंगलांत लोणारी लोक कोळसे पाडीत असल्यामुळें प्रखर उष्णता उत्पन्न होई. तेथें फिरतांना कित्येक ठिकाणी लांकडे तोडण्याच्या नित्य व्यवसायामुळें शरीरानें मजबूत बनलेल्या लांकुडतोड्यांच्या टोळ्या खांद्यावर कुऱ्हाडी टाकून व त्यांच्या टोकाला न्याहारीच्या टोपल्या अडकवून जातांना दृष्टीस पडत. कांहीं ठिकाणीं मध गोळा करणारे लोक मध काढून त्यांचीं भांडीं डोक्यावरून नेतांना दिसत; कोणी मोराचीं पिसें तर कोणी मधाचीं पोळीं, कोणी खैराच्या साली तर कोणी दुसरा कांहीं जंगली पदार्थ विकण्यासाठीं गांवांत घेऊन जात. कित्येक ठिकाणीं जंगली लोकांच्या बायका तेथील फुलें व फळें गोळा करून टोपल्यांतून गांवांत विक्रीसाठीं नेत" या बारीकसारीक गोष्टींवरून असें उघड होतें कीं, त्याकाळीं लोकांना जंगलांतील पदार्थ आणण्याची पूर्ण मोकळीक असून जंगली लोक तसले पदार्थ जवळच्या गांवांत विकावयास आणून त्यावर आपला निर्वाह करीत.

येथपर्यंत केलेल्या विवेचनांवरून हर्षकालीन ग्रामव्यवस्था कशी सुरळीत होती, त्यांतील समाज सर्वांगपूर्ण व आपल्या सर्व गरजा आपल्या येथेंच भागविण्याला समर्थ कसा होता, तसेंच त्या लोकांचा आयुष्यक्रम किती साधा व सुयंत्रित होता याची बरीच चांगली कल्पना येईल. पण एवढ्यावरून त्या लोकांना अडचणी मुळींच नव्हत्या असें मात्र नाहीं. आजच्याप्रमाणेंच तेव्हांहि लोकांचीं बारीकसारीक गाऱ्हाणीं पुष्कळ असत. उदाहरणार्थ, दानपत्रांत ज्यांना **चाट** आणि **भाट** असें ह्मटले आहे ते मुलकी आणि लष्करी शिपाई ह्मणजे गांवांतील लोकांचे नेहमींचेच जाचक*होत. यासाठीं इनाम गांवाच्या इनामदारांना त्यांपासून इनामाच्या लेखांत स्पष्ट निर्देश करून मुक्त केलेलें असे व त्यामुळें असल्या गांवांत या शिपायांचा जाच होत नसे. ही मुक्तता दर्शविणारा "अचाटभटप्रवेशः" हा शब्द बहुतेक दानलेखांत आलेला असून त्यावरून इनामदारांना मिळालेल्या या महत्वाच्या हक्काचा बोध होतो. मुलकी किंवा लष्करी शिपायांचा प्रवेश होऊं न देण्याच्या हक्काला अपवाद म्हणून प्रसंगोपात्त 'चोर-वर्जम्' हा शब्द कित्येक लेखांत योजिलेला आढळतो. डॉ. फ्लीटनें या शब्दाचा अर्थ 'चोरांना केलेला दंड खेरीज करून' असा केला आहे. पण आमच्या मतें त्यावरून, 'सदर शिपायांचा त्या गांवांत प्रवेश फक्त चोरांचा पत्ता लावून त्याला पकडण्यासाठीं मात्र व्हावा' इतरत्र होऊं नये असा अर्थ होतो; कारण या अपवादाचा संबंध या शिपायांच्या गांवांतील प्रवेशाशीं आहे हें उघड आहे. कांहीं

* चाट किंवा कोठे कोठे ज्याला छात्र असेंहि ह्मटलें आहे तो समाजरक्षक ह्मणजे पोलीस शिपाईच होय. हा शब्द हर्षचरितांत आलेला आहे, व त्याचा उल्लेख पुढें येणार आहे. याज्ञवल्क्य स्मृतींतहि तो आलेला आहे, पण आमच्या मतें विज्ञानेश्वराच्या (बारावें शतक) टीकेंत त्याचा अर्थ चुकीचा केलेला आहे.

दानलेखांत ' चोर ' शब्दाच्या जोडीला ' द्रोहक ' शब्द घातलेला असतो. उदाहरण संक्षोभाच्या कोह येथील लेखांत 'चोरद्रोहक वर्जः' असा शब्द आहे. (डॉ. फ्लीटकृत ता. ले. पु. ३, पा. ११५); व त्यावरून चोरांप्रमाणेंच बंडखोरांचा पाठलाग करून त्यांना पकडण्यासाठीं देखील मुलकी व फौजी शिपायांना इनाम गांवांत येण्यास परवानगी ठेवलेली होती असे दिसतें. चाट-भटांचा प्रवेश न होऊं देण्याचा हक्क इनाम गांवाला मिळाला म्हणजे त्यांनीं दरवडेखोर, बंडखोर इत्यादि गुन्हेगारांनासुद्धां त्यांत बेलाशक आश्रय द्यावा, ही गोष्ट कोणत्याहि राजाला कबूल असणें संभवनीय नाहीं. अर्थात् या हक्काला वरील अपवाद घालून ठेवणे स्वाभाविकच आहे. इनाम गांवाशिवाय इतर गांवांना मात्र या शिपायांचा त्रास सहन करावा लागे. त्यांत लष्करी शिपायांचा त्रास अर्थातच नित्याचा नसून लष्करच्या हालचाली किंवा युद्ध असल्या प्रसंगींच तो होत असे.

या किरकोळ त्रासाच्या बाबती सोडून दिल्या तर साधारणतः हर्षकालीन गांवांची स्थिति समाधानाची व भरभराटीची होती असेंच आढळतें. प्रत्येक गांवाला कांहीं विशिष्ट धार्मिक संस्था चालवाव्या लागत. त्यांतील महत्वाच्या संस्था म्हणजे सदावर्त आणि प्रपा किंवा पाणपोई या होत. या संस्थांतून गरीब प्रवासी व गरजू लोकांना नित्य धान्य व पाणी हीं मिळत असत. तसेंच दर गांवांत एक सभा म्हणजे धर्मशाळा आणि प्राग्वंश म्हणजे यज्ञशाळा ह्याही ठेवाव्या लागत. प्रभाकरवर्धनाच्या अमलाखालीं उत्कर्षास चढलेल्या श्रीकंठच्या म्हणजे ठाणेश्वर राज्याच्या भरभराटीचें वर्णन करतांना बाणभट्टानें या सर्व गोष्टींचा उल्लेख केला आहे. 'बहिरुपरचित विकटसभात्रप्रपाप्राग्वंश मण्डपैः प्रसुतमिव ग्रामैः (ह. च. उच्छ्वास ३) असे त्याचे शब्द असून त्यांवरून असा बोध होतो कीं, दरगां-

वाच्या बाहेर सभा ( वाटसरूंसाठीं विश्रांति-गृह ), सत्र ( अन्नछात्र ), प्रपा ( पाणपोई ) आणि प्राग्वंश ( यज्ञशाळा ) इत्यादिकांसाठीं विस्तीर्ण मंडप उभारले असत. हे मंडप अर्थात् तात्पुरते उभारलेले असून त्यांचा उपयोग उन्हाळा व हिंवाळा एवढ्यापुरताच असे, व पावसाळ्याचे चार महिने प्रवास बहुधा बंदच असल्यामुळें त्यांची आवश्यकताहि तेव्हां नव्हती.

ग्रामसंस्थांची हर्षकालीन स्थिति ही अशी वर दर्शविल्याप्रमाणें आढळून येते. ग्रामाहून मोठा असा राज्यकारभाराचे सोईसाठीं केलेला देशविभाग जो विषय त्याकडे आतां वळूं. गांवांत जसा पाटील ( अक्षपटलिक ) हा मुख्य अधिकारी असे तसा विषयाचाही एक मुख्य राजाधिकारी असून त्याला विषयपति म्हणत व त्याचा उल्लेख अनेक प्राचीन लेखांत आलेला आहे. ( उदा. डॉ. फ्लीट. ता. ले. मा. पु. ३ पान ७० पहा—विषयपति सर्वनागस्यान्तर्वेद्यां इ० ). प्रत्येक ग्रामाला, त्यापुढें प्रत्येक दहा गांवामिळून, पुढें वीस गांवामिळून, त्यापुढें शंभर गांवामिळून, पुढें हजार गांवाच्या समूहाला याप्रमाणें उत्तरोत्तर मोठमोठ्या देशविभागांना एक एक मुख्य अधिकारी असावा असें मनुस्मृतींत ( अ. ७, श्लो. ११५ ) सांगितलें आहे. ' ग्रामस्याधिपतिं कुर्याद् दशग्रामपतिं तथा । विंशतीशं शतेशंच सहस्रपतिमेवच ।' हे गांवचे आंकडे गणिताच्या प्रमाणांत असल्यामुळें वास्तविक नसून पुस्तकी असण्याचा जरी संभव आहे तथापि विषयांतील ग्रामांची संख्या साधारण मानानें शंभर असून त्यावरील अधिकारी जो विषयपति त्याविषयींचे स्पष्ट उल्लेख प्राचीन लेखांत अनेकवार आढळतात. विषयाच्या पुढचा मोठा देशभाग जो भुक्ति किंवा मंडळ ( म्हणजे अलीकडच्या जिल्ह्याएवढा ) त्यांत कमीअधिक मानानें हजार ग्राम असावे असें मानण्यास हरकत नाहीं. या

भागांवरील अधिकाऱ्याला मंडलेश्वर किंवा राष्ट्रपति अशी संज्ञा असून तो राजप्रतिनिधि म्हणून समजला जाई व त्या अर्थाचें त्याचें ' राजस्थानीय ' असें नांव ताम्रलेखादि जुन्या लेखांत आढळून येतें (उदा० ता. ले. मा. पु. ३, पा. १५४ पहा—राजस्थानीय वृत्त्या इ० ). या मंडलेश्वराच्या हाताखालीं दुसरे कित्येक अधिकारी असून त्यांचीं कामें मुख्यतः हल्लींच्या पोलीस सुपरिंटेण्डन्ट आणि डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटांप्रमाणें असत. चोर आणि दरवडेखोर यांना पकडून त्यांचा नायनाट करणें हें राजाचें प्रधान कर्तव्य मानिलेलें असल्यामुळें दर दहा पांच गांव मिळून एकेक पो. चौकी ठेविलेली असे. अशा चौक्या ठेवून बंदोबस्त करण्याबद्दल मनुस्मृतींतहि सांगितलेलें आहे ( द्वयो स्त्रयाणां पंचानां मध्ये गुल्ममधिष्ठितम् । तथा ग्रामशतानांच कुर्याद्राष्ट्रस्य संग्रहम् ॥ ७, ११४ ) सरासरीनें शंभर ग्रामांमिळून बनलेल्या **विषयावरील** ( हल्लींच्या तहशील किंवा तालुक्याएवढ्या मुलखावरील ) रक्षणाधिकाऱ्याला **चौरोद्धरणिक** असें नांव असून, पकडून आणलेल्या गुन्हेगारांस चौकशी करून योग्य तो दंड करणाऱ्या ( हल्लींच्या मॅजिस्ट्रेटासारख्या ) अधिकाऱ्याला **दंडनायक** अशी संज्ञा असे. हीं दोन्हीं नांवें तत्कालीन बऱ्याच लेखांतून दृष्टीस पडतात. हीं नांवें प्रांतभेदानें व राज्यभेदानें अर्थात् भिन्न भिन्न असतील, तथापि त्यांचीं कामें व तीं करण्याची पद्धति हीं साधारणतः एकाच प्रकारचीं होतीं. बंगाल्यांतील देवबरनाक येथील ताम्रलेखांत ( फ्लीटकृत ता. ले. मा. पु. ३. पा. २१६ ) असल्या अधिकाऱ्यांचीं नांवें आलीं आहेत; तीं अशीं—' नगरभुक्तौ वालवीवैषयिक श्रीवापद्रलिक्षान्तःपाति वारुणिकाग्रामः........दूतसीमकर्मकरमध्य राजपुत्र राजामात्य महादण्डनायक महाप्रतीहार........( पुढें लागलेला नाहीं )........प्रमाता कुमारामात्य राजस्थानीयोपरिक....धिक

चौरोद्धरणिकदाण्डिक दण्डयाशिक ' इत्यादि. यांतील ज्या अधिकाऱ्यांच्या नांवांचा आपल्याला चांगला बोध होण्यासारखा आहे ते अधिकारी दूत, सीमकर्मकर; राजपुत्र, राजामात्य, महादण्डनायक, महाप्रतिहारी, प्रमाता, कुमारामात्य, राजस्थानीय, चौरोद्धरणिक, दण्डिक आणि दण्डपाशिक हे होत. यांत दूत म्हणजे परराज्यांत पाठविलेला वकील, सीमकर्मकर म्हणजे हद्दी ठरविणारा, राजपुत्र म्हणजे राजाचा वडील मुलगा किंवा गादीचा वारस, राजामात्य म्हणजे राजमंत्री, महादण्डनायक गुन्हेगारांची चौकशी करून पारिपत्य करणारा सर्व राज्यावरील मुख्य अधिकारी, महाप्रतिहारी म्हणजे राजाच्या दरवाजावरील मुख्य अधिकारी, **प्रमाता** म्हणजे ( मोजणारा ) जमीन मोजणी खात्यावरील मुख्य अधिकारी, कुमारामात्य म्हणजे राजपुत्रांवर देखरेख करणारा प्रधान, राजस्थानीय म्हणजे भुक्तिमण्डलावरील राजप्रतिनिधि ( कलेक्टर किंवा मामलतदार ), चौरोद्धरणिक म्हणजे चोरांना पकडणारा (पोलीस सुपरिंटेण्डण्ट ), दंडिक म्हणजे चोरादिक गुन्हेगारांना दंड करणारा ( मॅजिस्ट्रेट) आणि दंण्डपाशिक म्हणजे दंड किंवा शिक्षा अमलांत आणणारा ( जेलर किंवा तुरंगावरील अधिकारी ). या नांवाचा विचार केल्यास असें उघड दिसेल कीं, सुधारलेल्या सुयंत्रित राज्यकारभारासाठीं जितक्या खात्यांची साधारणतः आवश्यकता आहे तितकीं सर्व खातीं हर्षकालीन राज्यांत चालू होतीं. जमिनीची मोजणी करणारे, हद्दी ठरविणारे, वसूल गोळा करणारे, गुन्हेगारांचा बंदोबस्त करणारे, गुन्हेगारांना न्यायाधिशानें दिलेली शिक्षा अमलांत आणणारे कारागृहावरील अधिकारी, इत्यादिकांचा या वरील यादींत समावेश झालेला असून राज्यव्यवस्थेंतील निरनिराळीं अनेक भानगडीचीं खातीं ते चालवीत होते.

या देशांत प्राचीनकाळीं दिवाणी आणि फौजदारी असा न्याय-खात्याच्या कामांत भेद करीत असत असें दिसत नाहीं. त्याकाळीं बहुधा दिवाणी दावे फार क्वचितच प्रसंगीं न्यायाधीशाकडे जात. साधारपणें त्यांचा निकाल गांवांतल्या गांवांत पंचाइतींकडूनच होई. जेव्हां तेथें बरोबर निकाल न मिळाल्यामुळें किंवा दुसऱ्या कांहीं कारणाने ते राजदरबारीं नेण्याचा प्रसंग येई, मग ते प्रत्यक्ष राज-सभेंत राजापुढे असोत अथवा मुख्य न्यायाधीशाकडे असोत, तेव्हां त्यांना फौजदारी खटल्याचें स्वरूप मिळून हरणाऱ्या पक्षाला दंड द्यावा लागे. असले दावे बहुत करून राजस्थानीय किंवा महाद-ण्डनायकाकडे येऊन तो अधिकारी तोंडी किंवा कागदोपत्रीं लेखी पुराव्यांवरून परिषदेच्या म्हणजे हल्लींच्या भाषेंत असेसरांच्या सल्ल्याने त्यांचा निवाडा करी. या परिषदा स्मृतिग्रंथांत सांगि-तल्या आहेत व जरी ताम्रपत्रादि प्राचीन लेखांत त्यांचा स्पष्ट उल्लेख दिसत नाहीं, तरी स्मृत्युक्त नियमाला अनुसरूनच हें न्याय-दान इतर गोष्टींप्रमाणेंच चाललेलें असलें पाहिजे. न्यायदानासंबं-धानें लिहितांना ह्युएनत्संगानें लिहिले आहे, "स्पष्ट पुराव्याच्या अभावीं न्यायाधीशाला शंका उत्पन्न झाल्यास निवाडा देणें तो आरोपिताकडून कांहीं दिव्य करवून त्यावरून देण्यांत येई. हीं दिव्यें विशेषतः चार प्रकारचीं होतीं. जलदिव्य, अग्निदिव्य, तुला-दिव्य आणि विषदिव्य. जलदिव्यांत आरोपीला एका पोत्यांत घालून आणि दुसऱ्या एका पोत्यांत जड धोंडा बांधून दोन्हीं पोतीं एकत्र जुळवीत आणि खोल नदीच्या प्रवाहांत फेंकून देत. धोंड्याचें पोतें तरंगत राहून आरोपीचें जर बुडूं लागलें तर आरोपी-वर आरोप शाबीत झाला असें समजत. अग्निदिव्यांत आरोपीला गुढगे टेंकून तापलेल्या लोखंडावरून चालवीत, त्याच्या हातांत तापलेली सळई देत किंवा तापलेलें लोखंड त्याला चाटावयास

लावीत. आरोपित मनुष्य निरपराधी असल्यास त्याला कांहीं इजा व्हावयाची नाहीं, पण इजा झाल्यास तो अपराधी होय असें मानीत. तुलादिव्य म्हणणें आरोपीला तराजूच्या एका पारड्यांत बसवून दुसऱ्यांत धोंडा ठेवावयाचा; आणि जर धोंडा कमी भरला तर आरोप खोटा नाहीं तर खरा, असें ठरवावयाचें. विषदिव्यांत असें करीत कीं, मेंढ्याची मागची एक तंगडी कापून व तींत विष भरून ती आरोपीला खावयास सांगत, जर तो खरा अपराधी असेल तर विषाचा परिणाम होईल व निरपराधी असल्यास तो जीवंत राहील असें समजत." (ह्युएनत्संग, पु. १. पा. १७२ ).

वर सांगितल्याप्रमाणें विविध खात्यांवरील लहान मोठे अधिकारी नेमून व न्याय-सभा ( कोर्टें ) सारख्या संस्था स्थापून चालविलेल्या राज्ययंत्रांत त्या त्या खात्यांसंबंधीं वर्षानुवर्ष होणाऱ्या नोंदी, निवाडे इत्यादिकांसंबंधाचे लेख राखून ठेवणें हि अवश्य होतें; व त्याप्रमाणें ते राखून ठेविलेले असत ही गोष्ट ह्युएनत्संगाच्या साक्षीवरून सिद्ध होते. त्यानें म्हटलें आहे ( त्याचे वाटर्सकृत चरित्र, पु.१.पा. १५४):—"सरकारी लेख व ते ठेवण्याचीं लेखसंग्रहालयें ( पीठें ) यांची काळजी घेण्यासाठीं स्वतंत्र अधिकारी नेमलेले आहेत. सरकारी कामाचीं वार्षिक पत्रकें आणि इतर कागदपत्रें यांना '**नीलपीठ**' अशी संज्ञा आहे. त्यांत चांगल्या वाईटाची नोंद असून सार्वत्रिक आपत्ति किंवा भाग्योदय यांच्या प्रसंगांचें सविस्तर वर्णन लिहून ठेवण्यांत येई." यांतील '**नीलपीठ**' शब्दावरून, प्रस्तुत ब्रिटिश राज्यव्यवस्थेंतील सरकारी '**ब्ल्यू बुकांची**' वाचकांस आठवण झाल्यावांचून रहाणार नाहीं. राजतरंगिणी नामक काश्मीरच्या इतिहास ग्रंथाचा कर्ता जो कल्हण पंडित त्यानें आपला ग्रंथ **नीलपीठांच्या** आधारानें लिहिला असल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. हिंदुस्थानांत प्राचीन काळीं

ऐतिहासिक लेख ठेवण्याची पद्धतच नव्हती असें म्हणणाऱ्या कांहीं आधुनिक विद्वानांचीं तोंडें बंद करण्यास वरील प्रमाणें पुरीं होतील. दुर्दैवाची गोष्ट अशी आहे कीं, प्राचीन ऐतिहासिक लेख मध्यंतरीं मुसलमानांच्या स्वाऱ्यांनीं उत्पन्न केलेल्या दंगलींत नष्ट झाले व वरील प्रमाणें उपलब्ध होईपर्यंत पाश्चात्य पंडितांचा एतद्विषयक परिवाद हिंदी लोकांस ऐकून घ्यावा लागला. असो, आपण प्रस्तुत विषयाकडे वळूं.

**विषय** किंवा गुजराथेंतील **आहार** अथवा मद्रासकडील **नाड** हा देशविभाग ग्रामाप्रमाणेंच नित्य असून मोठ्या राज्यांच्या घडामोडींत त्याच्यावर कांहीं परिणाम होत नसे. त्याच्या हद्दी निसर्गसिद्ध असल्यामुळें ते देशाचे राजकीय भाग नसून केवळ नैसर्गिक भाग असत असें म्हणावयास हरकत नाहीं. हे विभाग आजच्या तालुका किंवा तहशिलीएवढें असून साधारणतः ते सातव्या शतकांत जसे व जेवढे होते तसे व तेवढेच आजहि आहेत असें आम्हांला वाटतें. विषयांतील ग्रामसंख्या याप्रमाणें निसर्गानें ठरलेली असल्यामुळें भुक्ति किंवा मंडल यांतील ग्रामांची संख्याहि सामान्यतः ठरलेली असे. सामान्यतः म्हणण्याचें कारण असें कीं, राज्यक्रान्तीबरोबर भुक्तीचा विस्तार कमी अधिक होण्याचा थोडा बहुत संभव असे पण विषयांत तसा फारसा नसे. हल्लींच्या जिल्ह्यांएवढें हें मंडल किंवा भुक्तिनामक कित्येक विभाग मिळून देश, राष्ट्र किंवा राज्य बनत असल्यामुळें एकंदरींत त्यांतील ग्रामसंख्या देखील स्थूलमानानें ठरलेलीच असे. म्हणून प्राचीन लेखांत देशाचें वर्णन करतांना त्यांच्या नांवापुढें अमुक हजार किंवा अमुकशें अशी ग्रामसंख्या दिलेली आढळून येते आणि काळानें ही संख्या कायम बनून ती देशांच्या नांवापुढें लिहिण्याचा संप्रदायच पडला. उदाहरणार्थ, ऐहोळे येथील लेखांत महाराष्ट्राला

'नव्याण्णव हजारांचा* असें म्हटलें असून त्यांत तीन महाराष्ट्रांचा समावेश होत असल्याचें सांगितलें आहे. हे तीन महाराष्ट्र कोणते हें मात्र त्यांत स्पष्ट सांगितलेलें नाहीं. पण तिन्ही देश मिळून होणारा बडा महाराष्ट्र म्हणजे चालुक्यवंशांतील सम्राट जो पुलकेशी त्याच्या अमलाखालील सर्व मुलूख असे मानिल्यास त्यांत हल्लींच्या मध्यप्रान्तांतील नागपूर व वऱ्हाड, मुंबई इलाख्यांतील मध्यभाग आणि दक्षिणभाग, व उत्तरभागापैकीं ठाणें आणि सुरत हे जिल्हे, आणि शेवटीं मोंगलाईपैकीं औरंगाबाद वगैरे मराठी जिल्हे इतक्यांचा समावेश होतो. एवढ्या प्रदेशांतील ग्रामसंख्येचा विचार केल्यास आज ती अशी आहे:—नागपूर वऱ्हाड १६५६५, मुंबईइलाख्यापैकीं दक्षिण व मध्यभाग १७६९९, मोंगलाईंतील जिल्हे सुमारें १७००० व ठाणें, सुरत ४०००, यांची एकंदर बेरीज ५५२६४ भरते व ती पुलकेशीच्या साम्राज्यांतील ग्रामसंख्या जी ९९००० तिच्याहून फारच कमी येते. याचें कारण कदाचित् असें असेल कीं, तत्कालीन चालुक्यांच्या साम्राज्यांत आजच्या मोंगलाईचा बराच भाग मोडत असावा;† व तसें मानिल्यास वरील दोन संख्यांतील विरोध बराच कमी होतो. राष्ट्र किंवा देश यांच्या नांवाला जोडलेल्या असल्या संख्यांवरून नेहमीं म्हणजे त्यांतील ग्रामसंख्येचाच बोध होतो असें मात्र नाहीं. ती संख्या ग्रामांची आहे असा स्पष्ट निर्देश असल्याशिवाय तसें नेहमीं धरतां येत नाहीं; कारण तिचा संबंध दुसऱ्याहि कांहीं गोष्टींशीं असतो ( विषेश विवेचनासाठीं प्रकरणाचे शेवटीं जोडलेली टीप पहा )

---

* अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणां नवनवति सहस्रग्रामभाजां त्रयाणाम्॥

† पुलकेशी नंतरच्या चालुक्यांच्या राज्याचें वर्णन करतांना जुन्या लेखांत 'सप्तार्ध लक्ष रट्टपाडि' असे शब्द येतात, व त्यांत आंध्र मंडलाचा समावेश केलेला असतो. या विषयाचा विशेष विचार एका स्वातंत्र्य टीपेंत करूं.

येणेंप्रमाणें सातव्या शतकांत भरतखंडांतील राज्यांचा नित्याचा कारभार कसा चालत असे हें दाखविण्याचा आम्हीं प्रयत्न केला आहे. त्याचा थोडक्यांत गोषवारा सांगावयाचा तर असा कीं, तत्कालीन राज्ययंत्रांतील मूलघटक म्हणजे ग्राम असून त्यावरील अधिकाऱ्याला अक्षपटलिक किंवा महत्तर म्हणत व त्यांतील नोंदणी कामगाराला करणिक म्हणत. कांहीं ग्रामांमिळून एक विषय ( म्हणजे तालुका ) होई व त्यावर विषयपति, चौरोद्धरणिक आणि दंडनायक असे अधिकारी असत. विषयाहून मोठा प्रदेश म्हणजे भुक्ति, व तीवर देखील विषयाप्रमाणेंच पण अधिक दर्जाचे कामदार असत. याच अनुरोधानें पुढें सर्व राज्याचीं खातीं असून त्यांवरहि मुख्य अधिकारी नेमलेले असत व त्यांना महाक्षपटलिक, महादण्डनायक इत्यादि संज्ञा होत्या.

या अधिकाऱ्यांना वेतनासाठीं जमिनी तोडून दिलेल्या असत, व त्यांचा विस्तार अधिकाराच्या प्रमाणानें कांहीं शेतांपासून, तों गांव, किंवा नगरापर्यंत वाढता असे. यासंबंधानें मनुस्मृतींत सांगितलें आहे कीं, राजाला जी मिळकत गांवांत रोजची असते तितकी गांवपाटलाला वर्षाची असावी, शंभर गांवावरील अधिकाऱ्याला एका ग्रामाचें उत्पन्न असावें व सहस्रग्रामाधिपतीला एका नगराचें उत्पन्न* असावें. हें मनुवचन सातव्या शतकांतहि पाळिलें जात होतें; कारण "राज्यांतील प्रधानादि अधिकारी व इतर कामगार या सर्वांना वेतनासाठीं जमिनी दिलेल्या असत व जो तो अधिकारी आपल्या वांट्यास आलेल्या गांवाच्या किंवा नगराच्या उत्पन्नावर आपला चरितार्थ चालवी " असें ह्युएनत्संगानें लिहिलें आहे.

* यानि राजप्रदेयानि प्रत्यहं ग्रामवासिभिः । अन्नपानेन्धनादीनि ग्रामिकस्तानवाप्नुयात् । ग्रामं ग्रामशताध्यक्षः सहस्राधिपतिः पुरम् ॥ मनु. ७–११८, ११९.

# प्रकरण ९ वें.

## सेना, सामन्त, सभा इत्यादि.

आतां सैन्याच्या स्थितीचा विचार करूं. हर्षकालीन सैन्यांत पायदळ, घोडेस्वार आणि हत्ती अशीं तीन प्रमुख अंगें होतीं. प्राचीन काळापासून सुप्रसिद्ध असलेल्या चतुरंगदलापैकीं चतुर्थ अंग जे रथ त्याचा ह्युएनत्संगानें नामनिर्देश केला आहे. परंतु तें अंग तेव्हां वहिवाटींत नसून इतराबरोबर तेंहि पूर्वसंकेतानुसार त्यानें सांगून टाकिलें इतकेंच. कारण बाणानें हर्षाच्या सैन्याचें जें बारकाईचें वर्णन दिलें आहे त्यांत त्यानें रथांचा उल्लेख केलेला नाहीं. स्वतः ह्युएनत्संगानेंहि हर्षाच्या सेनेची पृथक् पृथक् माहिती सांगतांना पुनः त्यांचा निर्देश केलेला नाहीं. असो, फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत हत्तींच्या पथकाला सैन्याचा अतिमहत्वाचा भाग मानीत आलेले आहेत. परकीय लोक त्याकाळीं हिंदीसैन्याला जे घाबरून जात त्याचेंहि कारण हत्तींचें दळच होय. आज तोफखान्यांचें जें महत्व युरोपांत आहे तेंच पूर्वी हस्तिसैन्याला ह्या देशांत होतें. आज ज्याप्रमाणें सैन्याचें सामर्थ्य तोफांच्या पल्लेदारीवर व संख्येवर बरेंच अवलंबून असतें, तसें त्यावेळीं तें हत्तींच्या संख्येवर अवलंबून असे. हे शेंकडों हजारों हत्ती हिमालय व विंध्यपर्वताच्या आसमंतात् असलेल्या प्रचंड अरण्यांतूनच पैदा होत. रानटी हत्तींना पकडणें, व त्यांना माणसाळवून युद्धोपयोगी शिक्षण देणें ही कला हिंदुस्थानांत ह्या काळीं बहुतेक पूर्णत्वाला गेलेली असून या विषयांवर अनुभविक वाङ्मय देखील तयार झालें होतें. हत्तींशीं लढावें लागत असल्यामुळें लढवय्यामध्येंसुद्धां शारीरिक सामर्थ्य, धैर्य,

आणि चपलता यांची उत्तम वाढ होत असे. तत्कालीन हिंदी सैनिक व घोडेस्वार हत्तीशीं अनेकवार झुंज करून यश मिळवीत असत. हें हत्तींचें सैन्य जसें मालकाला उपयोगी पडे तसेंच उलट खाल्यास त्यालाच तें प्रसंगीं अनर्थावह होई. हत्तीचें दळ मागें पळावयास लागल्यामुळें स्वतःच्याच सैन्यांत दाणादाण उडाल्याचीं उदाहरणें हिंदी इतिहासांत नमूद आहेत. सेनापति बहुधा हत्तींच्या पथकाची हालचाल अशाच रीतीनें करीत असत कीं, तेणेंकरून त्यांना पळावयाची वेळ आल्यास सैन्याच्या इतर अंगांला त्यापासून उपद्रव होऊं नये. सैन्य कूच करीत असतांना देखील हत्तींच्या रांगा बऱ्याच दुरून चालवीत असत, असें बाणानें वर्णन केलें आहे. ( उच्छ्वास ८ )

हत्तींच्या खालोखाल घोडेस्वाराचें महत्व असे. या सेनांगाला लागणारे घोडे याच देशांत बहुधा पैदा होत; परंतु ते पारसीक अरबस्थान, अफगाणिस्थान या देशांतून येणाऱ्या घोड्यांइतके चांगले नसत. बाणानें हर्षाच्या मंदुरेचें ( अश्व-शाळेचें ) वर्णन करतांना त्यांत वनायुज, आरट्टज, काम्बोज, भारतद्वाज, सिन्दुदेशज, आणि पारसीक ( उच्छ्वास २ ) अशा सहा देशचे घोडे त्यांत होते असें सांगितलें आहे. यांपैकीं काम्बोज म्हणजे अफगाणिस्तानांतील, पारसीक म्हणजे इराणी, व सिंधु देशज म्हणजे आरबी घोडे असावेत; कारण अरबस्तानांतून येणारे घोडे बहुधा समुद्रमार्गानेंच इकडे येत होते. बाकी उरलेले वनायु, आरट्ट व भारद्वाज हे देश कोणते हें सांगतां येत नाहीं. हलायुध व विश्व या कोशांत वनायुज व पारसीक हे शब्द सामानार्थक म्हणून दिले आहेत, पण या वर्णनांत पारसीक शब्द पुढें स्पष्ट आलेला असल्यामुळें तें जुळत नाहीं. आरट्ट हा बहुधा पंजाबचा देश असावा. कारण ' पर्वतावरून निघणाऱ्या या पांच नद्या

ज्यांत वाहतात तो आरट्ट देश होय; त्यांत आर्यानें दोन दिवससुद्धां राहूं नये ' असें वर्णन * आहे. वराहमिहिरानें दिलेल्या लोकांच्या नांवांत भारद्वाज हें नांव आलेलें आहे, व त्यावरून तो कोणता तरी हिमालयाच्या लगतचा प्रांत असावा असें वाटतें. पण या नांवाविषयीं अजून पक्कें समजलें नाहीं हीच गोष्ट खरी. असो, हत्ती पकडून त्यांना शिकविण्याच्या कसबाप्रमाणें घोडे शिकवून तयार करण्याची कलाहि या देशांत त्याकाळीं पूर्णत्वास पोंचली असून त्या विषयावर चांगले ग्रंथहि निर्माण झाले होते. उत्तम घोड्यांचीं लक्षणें, त्यांचे निरनिराळे रोग बरे करण्याचे उपाय, इत्यादि अश्वसंबंधीं अनेक विषयांचा शालिहोत्र ग्रंथांत सविस्तर विचार असून बाणानें या शास्त्राशीं असलेला आपला परिचय हर्षचरितांत ( उच्छ्वास २ हर्षाच्या अश्वशालेचें वर्णन ) थोडा बहुत व्यक्त केला आहे. पण सांगण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, त्या घोड्यांचे रक्षक ऊर्फ मोतद्दार हे सगळे चांडाळ जातीचे असत असें तो ह्मणतो ( प्रकुपित-चण्डचण्डाल-हुंकारकातरतर-तरल-तारकैः......भूपाल-वल्लभैस्तुरंगैः )

सैन्याचें शेवटचें अंग म्हणजे पायदळ. त्याकाळीं याची फारशी मातब्बरी नसे. पायदळांतील शिपायांच्या हातांत ढाल व तरवार असे. त्यांच्यांत तिरंदाज लोक होते असें दिसत नाहीं. पण हत्तींवरून लढणारे लोक बहुतेक धनुष्य बाणाचा उपयोग करीत. बाणानें हर्ष, राज्य, कुमार, माधव इत्यादि राजपुत्रांचें जें वर्णन केलें आहे त्यावरून तत्कालीन सर्व राजपुत्रांना तिरंदाजीचें शिक्षण मिळे असे दिसून येतें. कारण त्या सर्व राजपुत्रांची मणगटें व दंड यांवर धनुष्य ओढल्यानें घट्टे पडले होते असें म्हटलें आहे.

---

* पञ्चनद्यो वहन्त्येता यत्र निःसृत्य पर्वतात् । आरट्टा नाम बाहिका न तेष्वार्यो द्व्यहं वसेत् । अर्थात् पंजाब देश होय.

दिग्विजयासाठीं निघालेल्या हर्षाच्या फिरत्या सैन्याचें बाणानें केलेलें वर्णन अगदीं सविस्तर व हुबेहुब असून त्यांत वस्तुस्थितीला सोडून एकहि गोष्ट त्यानें सांगितलेली नाहीं. त्या वर्णनापैकीं कांहीं उतारे देणें येथें अप्रस्तुत होणार नाहीं. त्यांत हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, त्यांतील बराच भाग आज पूर्णपणें लक्षांत उतरण्यासारखा नाहीं; कारण एकतर तत्कालीन रीति आज पुष्कळच पालटलेल्या आहेत व दुसरें त्या वेळच्या सैन्यविषयक संस्कृत शब्दांचे अर्थ निश्चित कळण्यालाहि आज पुरेसें साधन नाहीं. तथापि त्यावरून तत्कालीन सैन्याच्या हालचालीची थोडीबहुत तरी कल्पना येईल.

" मग (रात्रीचा) तिसरा प्रहर संपत आला असतां प्रयाणाची सूचना देणारा भेरीचा गंभीर ध्वनि सुरू झाला, व तो झाल्या-वर थोड्या वेळानें पुनः, त्या दिवशीं करावयाच्या आठ कोसांच्या मजलीचे दर्शक असे आठ टोले त्यावर जोरानें व स्पष्ट रीतीनें देण्यांत आले. नंतर नान्दी (विजयभेरी), कुंज ऊर्फ गुञ्जा, काहल, शंख इत्यादि दुसरीं रणवाद्यें सुरू होऊन छावणींत जिकडे तिकडे निघण्याची गडबड उडाली. कोणी आपल्या राहुट्या आवरण्या-साठीं त्यांच्या खुंट्या उपटूं लागले, कोणी आपापलें सामान पेट्यांत भरूं लागले, कोणी हत्तींना जागें करून त्यांवर हौदे बांधू लागले, तर कोणी घोड्यांवर खोगीर चढवून त्यांना सज्ज केलें; कोणाचे नवे ठेवलेले नोकर चुकल्यामुळें ते त्यांना हाका मारताहेत, तर कोणी इकडे मत्त हत्तींना लोखंडी सांखळदंडानें बांधून वाटेंतून दूर करीत आहेत. इकडे कुलपुत्र ( राजाचे आप्त संबंधीं ) आणि सामन्त आपापल्या कुटुंबांना हत्तींवर किंवा बैलगाड्यांत बसवून निघावयास तयार झाले. तर इकडे राजाचे स्वयंपाकी आपलें सामान, भक्ष्य पशूंचा समूह,* दुधाचीं पात्रें व इतर तयार केलेले

* हर्ष आरंभी तरी मांसाहार करीत असावा असें दिसतें.

पदार्थ नीट बंदोबस्तानें बांधून घेऊन लोकांना बाजूला सारीत व मारीत निघूं लागले. याप्रमाणें तयारी होऊन सूर्योदय होण्यापूर्वी राजाचे सरदार मानकरी इत्यादि मंडळी पोषाख करून व हत्तिणींवर बसून आपापल्या हातांखालील सैनिकांसह राजद्वाराशीं येऊन उभे राहिले.

“ सूर्योदय होतांच हर्षमहाराजांची स्वारी प्रयाणास निघण्यासाठीं पोषाख चढवीत आहे असें सुचविणारा शंख वाजूं लागला. थोड्या वेळानें उत्तम शृंगारलेल्या करिणीवर* बसून हर्षराजा आपल्या तंबूच्या दरवाजांतून बाहेर आला. त्याच्या डोक्यावर छत्र धरिलेलें असून त्याच्या मुखांत विडा होता ( त्याचें स्नान व प्रातःकालचा अल्पोपहार पूर्वीच झाला होता ). त्यानें अंगावर अतिशय नाजूक असें नैत्रवस्त्र धारण केलें होतें. सरदारांचे मुजरे घेत घेत व कोणाला कुशल प्रश्न करीत, तर कोणाला पाहून मंद हास्य करीत तो पुढें आला. तेथें शेंकडों सुवर्णदंडधारी भालदार लोकांना दूर ढकलून त्याच्यासाठीं जागा करीत होते; तेथें तो उभा राहिला, व तेथून आपल्या जणूंकाय क्षीरसागरांतून उत्तीर्ण झालेल्या विश्वाप्रमाणें अफाट पसरलेल्या सैन्याचें प्रयाण त्यानें अवलोकन केलें. याप्रमाणें सैन्य कूच करूं लागून आठ कोसांवर ठरविलेल्या दुसऱ्या मुक्कामावर त्वरेनें येऊन दाखल झालें.” तेथें येऊन पोंचण्यापूर्वी वाटेंत झालेल्या प्रकाराचेंहि हुबेहुब व मजेचें वर्णन बाणानें केलें आहे. “ कांहीं गांवातील लोक आपल्या महत्तरांना ( हल्लीचे म्हात्रे पाटलांना ) पुढें करून राजदर्शनार्थ रस्त्यावर येऊन उभे रहात. कोठें कोठें उदकाचे

* प्रयाणाच्या वेळीं राजे लोक बहुधा हत्तिणींवर बसूनच जात असत असें दिसतें.

कुंभ डोक्यावर घेऊन गांवांतील स्त्रिया राजाला पहाण्यासाठीं रस्त्याकडे येत, व राजसेवकांनीं त्यांना तेथून हुसकून लाविलें म्हणजे धडपडत मागें पळत वळून राजास पहात. कांहीं ठिकाणीं लोक आपल्याला छळून अधिक वसूल करणाऱ्या भोगपती विरुद्ध ( कर वसूली करणारा ) तक्रार करण्यासाठीं ओरडा करीत, कोणी नगर रक्षक ( चाट उर्फ पोलिस ) लोकांबद्दलचीं गाऱ्हाणीं राजाला कळविण्यासाठीं एकत्र होत. दुसऱ्या ठिकाणीं राजाच्या लोकांनीं आपल्या शेतांतील धान्य व गवत नेल्यामुळें सतावलेले लोक रागारागानें राजालाच शिव्या शाप देत. कोणी ह्मणे ‘ आहे कोठें तो राजा, कोठून आला आहे तो ? असला कसला आहे तो राजा’ तर कोणी अधिकाऱ्यांच्या चांगल्या वर्तणुकीनें संतुष्ट होऊन ‘ राजा प्रत्यक्ष धर्मराज आहे ’ अशी त्याची स्तुति करीत. एका ठिकाणीं तर गाऱ्हाणीं करण्याकरितां आलेले दोन ब्राह्मण राजसेवकांच्या भीतीनें झाडावर उंच चढून बसले, व तेथूनच आपल्या तक्रारींची आरडाओरड करूं लागले. ” असले प्रकार आजहि कित्येक प्रसंगीं अधिकारी दौऱ्यावर निघाले असतां अडाणी लोकांत जसे दृष्टीस पडतात, तसेच ते पूर्वींहि पडत असत हें पाहून मौज वाटते.

हर्षाच्या सैन्यांत आपल्या स्वतःच्या अधिकाराखालीं घोडेस्वारांच्या तुकडया बाळगणारेहि कांहीं सरदार असत. या सैन्याच्या वर्णनांत पुढील काळांतील मोंगल सैन्याबरोबर मिरवत असलेल्या राजाच्या जनानखान्याचा उल्लेख कोठें नाहीं. जनाना म्हणजे मोंगल सैन्याचा मोठा महत्वाचा भाग होय असें वर्णन मनुची यानें केलें आहे. हर्षाबरोबर तो नसल्याचें कारण या सुमारास त्याचा विवाह झालेला नसावा हें असेल; व त्यामुळेंच त्याच्या हालचालीला कोठें व्यत्यय आलेला दिसत नाहीं. पुढच्या मुक्कामावर पोचतांक्षणीं त्याकरितां तयार केलेल्या शिबिराशीं

हर्षानें आपल्या परिवारांतील सरदारांना आपल्या शिबिरांत जावयास रजा दिली व स्वतः एकट्यानेंच आपल्या स्थानांत प्रवेश केला.

हर्षाच्या सैन्यांत भाडोत्री* सैनिक बहुधा नव्हते. कुलपुत्र म्हणजे राजघराण्यांशीं कांहीं संबंध असलेले लोक, मांडलिक राजे व त्यांचे संबंधीं, राजाच्या जातीपैकीं इतर लोक आणि प्रजेपैकीं कनिष्ठ वर्गाचे लोक यांचेंच बहुधा सैन्य बनलेलें होतें. कुलपुत्र म्हणजे खरोखर कोण होत हें मात्र आज निश्चित सांगतां येण्यासारखें नाहीं. कदाचित् आज ज्यांना रजपुतांमध्यें भाइबंद म्हणतात तशांसारखे ते कोणी असावेत. असो, सैन्याच्या प्रत्येक अंगाचा एक मुख्य अधिकारी असून सर्वांवर मुख्य सेनापतीची योजना असे. हर्षाच्या मुख्य सेनापतीचें जें सविस्तर व पूर्ण वर्णन बाणानें दिलें आहे त्याहून अधिक कांहीं आधुनिक ऐतिहासिक कादंबरीकार खास देणार नाहीं. त्या सेनापतीचें नांव सिंहनाद असून तो प्रभाकरवर्धनाचा अत्यंत विश्वासू मित्र होता. ( उच्छ्वास ६ वा ). त्याचा बांधा उंच, वर्ण पीतगौर, व शरीराची ठेवण मांसल असून, त्याचा आवाज खडा, आणि दाढी व कल्ले भलेभक्कम होते. त्याचें वय ऐशीं वर्षांचें असून त्याच्या शरीराच्या उघड्या भागावर पुष्कळ जखमांचे वण पडलेले दिसत होते. या पुष्कळ वणांचा निर्देश जरा चमत्कारिक दिसतो; कारण त्याच्यासारख्या बड्या लष्करी अंमलदारांच्या अंगांत युद्धाचे वेळीं बहुधा चिलखत असलें पाहिजे, व तें असल्यावर बारीकसारीक जखमा होऊन वण रहाण्याचा संभव कमी असतो. बाणानें

---

* तथापि कांहीं दक्षिणी घोडेस्वार (दाक्षिणात्य सादिनः ) त्याच्या सैन्यांत असल्याचें बाणानें सांगितलें आहे. ते असले तरी थोडे असावे; पण त्यांच्या निर्देशावरून दाक्षिणात्यांच्या प्राचीन घोडेस्वारीच्या कर्तबगारीची साक्ष पटते.

आपल्या सैन्य-वर्णनांत कवचांचा फारसा उल्लेख केला नाहीं; तरी राज्यवर्धनाला कवचधर* स्थितींत हूणांवर पाठविल्याचें त्यानें सांगितलें आहे; व महाभारत रामायणकालापासून तीं चालत असल्यामुळें यावेळीं देखील त्यांचा प्रचार असलाच पाहिजे.

या सैन्याचा खर्च राजा आपल्या स्वतःच्या उत्पन्नांतून करीत असे. शिपायांचा पगार वार्षिक असून तो द्रव्य व धान्य या दोन्ही रूपांनीं त्यांना मिळत असे. शेतकऱ्यांकडून वसूल केलेल्या षष्ठांश धान्यांचीं पेवें ठिकठिकाणीं ठेविलेलीं असत व त्यांतील धान्य सैन्याला पगारादाखल मिळत असे. वेतनाचा हा प्रकार मनुस्मृतींत सांगितला आहे. पण त्याचा स्पष्ट निर्देश बाण किंवा ह्युएनत्संग यांपैकीं कोणीच केलेला नाहीं. सैन्याचें मुख्य अंग ज्या गजघटा ( हत्तींचीं पथकें ) त्यांचें रक्षण व पोषण म्हणजे मात्र अतिशय खर्चाची बाब होती. याचा नीट विचार केल्यास हर्षाच्या पदरीं ६०००० हत्ती होते असें जें ह्युएनत्संगानें लिहिलें आहे त्यांत कांहीं अतिशयोक्ति असावी असें वाटूं लागतें. निदान हे सर्व हत्ती केवळ एकाच ठिकाणीं न ठेवतां सर्व साम्राज्यभर सोईस्कर ठिकाणीं वांटून वांटून ठेविलेले असावे. त्यांच्या घाणेची व्यवस्था व पोषण हीं कशीं होत असतील याची आज कल्पना देखील करतां येत नाहीं. एवढें हत्तींचें सैन्य नित्य तयार ठेवणें ही गोष्ट आज कित्येकांस कल्पनासृष्टींतील वाटण्याचाहि संभव आहे. बाणानें हर्षचरितांत (उच्छ्वास ६ वा) हर्षाच्या गजशालेचें तिच्या सर्व इतमामासह सविस्तर वर्णन केलें आहे. हें वर्णन ठाणेश्वरचें असून तेव्हां हर्ष चक्रवर्ती झालेला नव्हता; तरी तेव्हांचीहि त्याची गजशाला बरीच मोठी होती. तिच्यावरील मुख्य अधिकारी

* उच्छ्वास ५ वा आरंभ.

स्कंधगुप्त नांवाचा असून त्याच्या वर्णनांत बाणानें त्याचें नाक त्याच्या राजाच्या वंशाइतकें* लांब असल्याचें सांगितलें आहे. या गजशालेच्या वर्णनांतून थोडें अवतरण येथें घेण्यासारखें आहे. "त्या गजशाळेवर गजवैद्य नेमिलेले असून ते प्रत्यहीं मोठया हत्तींच्या प्रकृतीबद्दल अध्यक्षाला खबर देत. त्यांच्या महातांचीं शिरस्त्राणें मयूरपिच्छांनीं सुशोभित केलेलीं असत. नवीन हत्तींना हिरव्या गवताच्या साहाय्यानें रिझवून माणसाळविणारे लोकहि त्यानें ठेविले होते. हत्तींना नवीन मद येऊं लागला कीं, त्याची बातमी कांहींजण देत व उन्मत झालेल्या हत्तींवर डिण्डिम चढवावयाची कांहीं परवानगी मागत. रानांत नवीन पकडलेल्या हत्तींची वार्ता कोणी सांगावयास येत. नवीन रानटी हत्तींना पकडण्यासाठीं गणिका नांवाच्या हत्तिणी शिकवून ठेवीत, व त्या हत्तींना फुसलावून मनुष्यांच्या ताब्यांत आणीत. हत्तींना झुंज शिकविण्यासाठीं हत्तींसारख्या चामड्याच्या आकृति करीत व त्यांवर हत्तींना टक्कर द्यावयास लावीत. त्यांना लागणारी धान्यसामुग्री खेड्यापाड्यांतून व मोठ्या बाजारांतून खरेदी करण्यासाठीं देखील स्वतंत्र अधिकारी नेमिलेले होते." हत्तीच्या पथकांचा हिंदी सैन्यांत आतां अगदीं अस्त झाल्यामुळें वरील वर्णनांतील बारीकसारीक गोष्टी देखील आजकाल मोठ्या मौजेच्या वाटतात.

यापुढील विषयभागाकडे वळण्यापूर्वी सैन्यासंबंधीं ह्युएनत्संगानें काय लिहून ठेविलें आहे हें पहाणें तुलनेच्या व पूर्ततेच्या दृष्टीनें अवश्य असल्यामुळें तेंहि थोडेंसें येथें देऊं. तो म्हणतो "राष्ट्रीय सैनिक म्हणजे निवडक वीर असून त्यांची क्षात्रवृत्ति आनुवंशिक असल्यामुळें युद्धकलेमध्यें ते पूर्ण निष्णात असतात.

*निजनृपवंशदीर्घं नासावंशं दधानः ।

शांततेच्या काळीं ते राजधानीचें रक्षण करितात व युद्ध उद्भवलें कीं, त्याची अघाडी संभाळण्याचें काम त्याजकडे येतें.

सैन्याचीं हत्ती, रथ, घोडे व पायदळ अशीं चार अंगें असतात. लढाऊ हत्तींच्या अंगावर एक प्रकारचें चिलखत घालून त्यांच्या सुळ्यांवर लोखंडी कांटे जडवीत. सेनाध्यक्ष अशा हत्तीवर बसून त्याच्या प्रत्येक बाजूला हत्तीचें नियमन करण्यासाठीं एकेक सैनिक राही. लढाऊ रथांना चार घोडे जोडलेले असत व त्याच्याहि दोन्हीं बाजूंना पायदळ सैनिक रक्षणार्थ उभें असे. पायदळांतील लोक अतुल धैर्यशाली व शूर असून बेफिकीरपणें ते युद्धांत प्रवेश करीत. त्यांचीं शस्त्रें म्हणजे तरवारी असून युद्ध सुरू होतांच ते अघाडीशीं तुटून पडत. सर्व शस्त्रांचा उपयोग करण्यांत ते वाकबगार असून पिढ्यानपिढ्या हाच धंदा ते करीत असत." ( वाटर्स ह्युएनत्संग पु. १, पा. १७१ ).

## सामन्त ऊर्फ सरदार लोक.

सामन्त किंवा मांडलिक राजे म्हणजे ज्यांना अलीकडच्या भाषेंत सरदार किंवा अमीर उमराव म्हणतात ते कोणत्याहि राजसत्ताक देशांत राज्ययंत्राचे अवश्यक भाग समजले जातात. सामन्त शब्द समन्त ( म्हणजे समीप भाग ) या शब्दावरून निघालेला असून राजाच्या सन्निध असणारे बडे लोक असा त्यावरून बोध होतो. हे सामन्त म्हणजे राजाचे जातभाई, नातेवाईक किंवा ज्या घराण्यांतील पुरुषांनीं राज्याला पूर्वी केव्हां युद्धामध्यें किंवा इतर बिकट प्रसंगीं साह्य केलेलें असतें अशा घराण्यांतील किंवा जिंकिलेल्या प्रान्तांच्या राजघराण्यांतील लोक असत. त्यांना थोडी बहुत तरी जहागिरी सरंजामी असे, व तेवढ्यापुरते ते लहानसे राजेच असत. त्यांना आपल्या ताब्यां-

तील प्रदेशांपकीं जमिनी इनाम किंवा धर्मादाय देण्याचा हक्क असे व अशा सामन्तदत्त अग्रहारांचा प्राचीन लेखांत अनेक ठिकाणीं निर्देश आहे. ते आपल्या पदरीं थोडेंबहुत सैन्यहि बाळगीत, त्यासह जरूर पडेल तेव्हां त्यांस राजाबरोबर युद्धास जावें लागे. युद्धाशिवाय इतर प्रसंगींदेखील गरज पडल्यास राजा त्यांना सहाय्यास बोलावीत असे.अशा एका * आटविक सामन्ताला हर्षानें राज्यश्रीच्या शोधासाठीं बरोबर घेतल्याविषयीं बाणानें सांगितलें आहे. पण हे सामन्त ऊर्फ सरदार बहुधा राजधानीच्या नगरांतच राहून महत्वाच्या प्रसंगीं भरणाऱ्या सर्व दरबारांना हजर असत. सामन्तांप्रमाणें त्यांच्या स्त्रियादेखील महाराणीच्या सेवेला हजर असत. हर्षाच्या जन्माच्यावेळीं शेंकडों सामन्त स्त्रिया प्रभाकरवर्धनाच्या अन्तःपुरांत जमून आनन्दोत्सवांत नाचल्या, असें हर्षचरितांत वर्णन आलें आहे ( उच्छ्वास ३ चरणानि कुट्टनरणितमणिनूपुरमुखरितदिङ्मुखानि नृत्यन्ति राजकुलमागच्छन्ति समन्तात्सामन्तान्तःपुरसहस्राण्यदृश्यन्त । ). पाश्चात्य देशांत ड्यूक वगैरे उमराव व त्यांच्या स्त्रिया यांना राजवाडयांत जीं कामें सांप्रत करावीं लागतात तशाच प्रकारचीं हुबेहुब कामें हे सामन्त व त्यांच्या स्त्रिया पूर्वकाळीं इकडे करीत असत. राजा व महाराणी यांच्या सेवेशिवाय इतर राज्यकारभारविषयक कामगिरीसुद्धां कित्येक सामन्तांच्या वांटयास येत असे. उदाहरणार्थ, हर्षाचा अश्वाध्यक्ष भंडी हा एक सामन्तच होता. तसाच त्याचा गजाध्यक्ष स्कन्दगुप्त हाही सामन्त होता. बहुतेक सामन्तांना लष्करांतील कांहींना कांहींतरी कामगिरी सांगितलेली असे व कित्येकांची मंत्रिपदावर देखील योजना होत असे. या मंत्रिमंडळाचा आतां विचार करूं.

---

* उच्छ्वास ८ आरंभ.

सामन्तांप्रमाणेंच राज्ययंत्राचा दुसरा अवश्य भाग ह्मणजे हे मंत्री होत. यांना सचिव, अमात्य इत्यादि दुसरींहि नांवें अधिकाराप्रमाणें असत. सचिव ह्मणजे सहायक व अमात्य ह्मणजे नित्य जवळ असणारा ( अमा–एकत्र, अगदीं जवळ ). मंत्रिमंडळाची संख्या नियमित ठरलेली नव्हती, पण त्यांपैकीं प्रत्येकाचीं खातीं किंवा कामगिरी वेगवेगळाली असे. मंत्रिमंडळापैकीं 'सान्धिविग्रहिक' म्हणजे तह किंवा युद्ध खात्याचा मंत्रि किंवा हल्लींच्या भाषेंत म्हणावयाचें तर परराष्ट्रीय मंत्रि महत्वाचा असून त्याचा उल्लेख अनेक ठिकाणीं येतो. दिग्विजयाला निघण्यापूर्वी हर्षानें आपल्या या परराष्ट्रीय प्रधानाकडून इतर राजांना निर्वाणीचे खलिते लिहविले होते ( महासन्धिविग्रहाधिकृतमवन्तिकमन्तिकस्थमादिदेश–लिख्यताम्:–सर्वेषां राज्ञां सज्जीक्रियन्तां कराः करदानाय शस्त्रग्रहणाय वा. इ. ) या मंत्र्यांचा संबंध प्रत्यक्ष दरबाराशीं असून नित्य राजसन्निधींत असल्यामुळें त्यांना **महा** म्हणजे मोठा अशी संज्ञा असे. ते बहुधा वंशपरंपरेनें नेमिलेले असत. कारण डॉ. फ्लीटनें प्रसिद्ध केलेल्या ताम्रपट लेखमालेंतील तिसऱ्या मालेंत एका लेखांत '**अन्वयप्राप्तसाचिव्यो**' व्यापृत संधिविग्रहः' । असे शब्द आहेत. इनाम गांवांसंबंधीं ताम्रलेखांत अशा सचिवांचीं नांवें पुष्कळदां आढळतात. हीं शासनपत्रें म्हणजे सनदा चांगल्या जबाबदार अधिकाऱ्यांकडून लिहिविलेल्या व प्रसिद्ध केलेल्या असत. हा अधिकारी बहुधा भोगिक म्हणजे जमीन महसुलाचा मंत्रि असे किंवा एकादे वेळीं परराष्ट्रीय प्रधानहि असे. लेख लिहिणाऱ्याच्या नांवाबरोबर त्याच्या बापाचें व आजोबाचें देखील नांव लेखांत घालण्याचा साधारणतः प्रघात होता. याचीं उदाहरणें सदर ताम्रलेखमालेंत कित्येक आहेत. एकांत 'लिखितं वक्रामात्य प्रणप्त्रा भोगिकनरदत्तनप्त्रा

भोगिक-रविदत्त-पुत्रेण महासांधि-विग्रहिक सूर्यदत्तेन' असे शब्द आहेत. दुसऱ्यांत, 'लिखितं मया भोगिक राज्य कामात्यनप्त्रा भोगिक ध्रुवदत्त पुत्रेण भोगिक गुंजकीर्तिना' असे शब्द आहेत. या शिवाय दुसरीं अशीं अनेक उदाहरणें आहेत. डॉ फ्लीटनें त्यांतील भोगिक शब्दाच्या अर्थाचा खुलासा केलेला नाहीं. पण आमच्या मतें 'भोग' म्हणजे जमीनमहसूल या शब्दावरून तो झाला असून त्याचा अर्थ महसुली खात्याचा प्रधान असा * असावा. या इनामाच्या सनदांतून 'दूतक' हा शब्द देखील नेहमीं येतो, व तो दूतदेखील फार महत्वाचा असे. दान दिलेली जमीन किंवा गांव ब्राह्मणाच्या ताब्यांत देण्यासाठीं राजा प्रधानासारख्या एकाद्या मोठ्या विश्वासू अधिकाऱ्याला मुद्दाम त्या ठिकाणीं पाठवीत असे व त्याच्या मार्फत तेथील सर्व लोकांना व अधिकाऱ्यांना त्या दानाची हकीकत कळवीत असे. सदरील लेखमालेंतील एका लेखांत ( पा. ११९ ) हा दूतक 'उपरिक दीक्षित गृहपति स्थपति सम्राट्शर्वदत्तः' म्हणजे दीक्षित, गृहस्थ, स्थपति (? बृहस्पतीष्टि करणारा) यांचा मुख्य अधिकारी होता असें म्हटलें आहे; यावरून तो धर्मखात्याचा प्रधान असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं. कित्येक वेळां दानलेख स्वतः राजानें सांगितलेल्या शब्दावरून लिहीत असत, व या गोष्टीचा दर्शक 'स्वमुखाज्ञया' असा शब्द सदरील एका लेखांत ( पा. ११९ ) आला आहे. असल्या कित्येक दानपत्रांवर प्रत्यक्ष राजाचें शिक्कामोर्तब व सही असे. उदाहरणार्थ बासखेडायेथील हर्षाच्या दानपत्रावर ( एपीग्रॅफिका इंडिका. पु. ४, पा. २०८ ) उत्कीर्णमीश्वरेणेदमिति सबंत् २०२ कार्तिवदि १ '**स्वहस्तो मम**

---

* हर्षचरितांतहि **भोगपतीच्या** म्हणजे धारा वसूल करणाऱ्या अधिकाऱ्याविरुद्ध खोट्या तक्रारीचा उल्लेख आला आहे. 'असतोऽपि पूर्वं भोगपतिदोषानुद्भावयद्भिः' ( सातवा उच्छ्वास ).

महाजाधिराज श्रीहर्षस्य'। अशी त्याची सही आहे. तसेंच धरसेन व शिलादित्य यांनींहि आपल्या कांहीं दानपत्रांवर आपल्या सह्या घातल्या आहेत ( पहा–डॉ. फ्लीटकृत भारतीय ताम्रपट लेखमाला पु. ३, पा. १६७, १८० ). बहुधा हें मूळ दानपत्र ताडपत्रावर असून त्यावर राजा सही करी व नंतर कोरणारा मनुष्य ताम्रपट कोरतांना त्यावर ती हुबेहुब कोरून काढी. वरील सह्यांपैकीं हर्षाची सहि सुंदर फांटे फोडलेल्या अक्षरांत आहे. त्या वेळचे लेख बहुतेक अशा चित्राक्षरांनींच लिहिलेले असत. आणि त्यांत विशेष मौजेची गोष्ट अशी कीं, सही या शब्दावद्दल इंग्रजींत जसें 'अंडर माय ओन हँड' किंवा आपलेकडे "आमच्या सहीशिक्यानिशीं" असे शब्द असतात तसेच हुबेहुब त्या लेखांतहि आहेत ( वरील हर्षाची सही पहा ); व नांवाबरोबर शिक्कामोर्तबहि त्यांत अलीकडील पद्धतीप्रमाणेंच केलेलें आहे. या कारणास्तव हर्षाची मुद्रा· देखील ताम्रपटावर कोरलेली आज उपलब्ध आहे. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी आहे कीं, मध्यंतरींच्या मुसलमानी अमदानींत आम्ही आपल्या प्राचीन परंपरेला इतके पारखे झालों कीं, मुद्रा व स्वहस्त हे शब्ददेखील आम्हांला अपरिचित होऊन त्यांची जागा मुसलमानी 'मोहोर' व 'सही' या शब्दांनीं पटकावून टाकिली. या राजांच्या स्वहस्तीकरणाच्या पद्धतीवरून जमिनीचें दानपत्र कायदेशीर व्हावयाचें तर तें प्रधानाला करतां येत नव्हतें, तर त्याचा या बाबतींतील अधिकार मर्यादित असे असें दिसतें.

मंत्र्याशिवाय दुसरे महत्वाचे अधिकारी म्हणजे ज्यांना इंग्रजींत 'सुपरिंटेंडंट' म्हणतात ते होत. त्यांना अध्यक्ष म्हणत. उदाहरणार्थ, शुल्काध्यक्ष अथवा कस्टम सुपरिंटेंडंट, कोष्टगाराध्यक्ष म्ह० कोठीवाला, दुर्गाध्यक्ष म्ह. किल्यावरील अधिकारी, इत्यादि. हे अधिकारी अमात्याच्या योग्यतेचे नसत तथापि त्याचेंहि विशिष्ट

महत्व होतेंच. प्रांताधिकाऱ्यांचा मागें उल्लेख केलाच आहे, पण हे अध्यक्ष त्यांच्या वरचे म्हणजे सर्व राज्यावरचे असत. हे जरी वंशपरंपरागत असावे असा नियम नव्हता, तरी हिंदुस्थानांत कोणताहि अधिकार क्रमशः परंपरागतच होऊं लागतो. वाकटिक वंशाच्या प्रवरसेनाच्या ताम्रलेखांतील ( डॉ. फ्लीटकृत माला पु. ३, पा. २३७) 'यतोत्स्मत्सन्तका सर्वाध्यक्षाधियोगनियुक्ताः आज्ञा संचारिकृतपुत्रका भटाश्च छात्राश्च विश्रुतपूर्वाज्ञयाज्ञापितव्याः' या शब्दांत आला आहे. त्याचा अर्थ असा—सामान्य अध्यक्ष स्वपदावर नियुक्त केलेले आमचे आज्ञाधारक व कुलीन अधिकारी, सैनिक इत्यादि. यांना आज्ञा देण्यांत येत आहे वगैरे.

## राजसभा.

आतां शेवटीं राजसभेचा म्हणजे दरबाराचा विचार करावयाचा. या सभेचा नायक अर्थात् राजा असून त्याचा अधिकार सर्वस्वीं अनियंत्रित असे. तथापि, त्यांना स्मृत्युक्त म्हणजे सामान्य माणसाहून श्रेष्ठ मानलेल्या शक्तीनें घालून दिलेल्या अतएव दुर्लंघ्य अशा नियमांचें बंधन असे. त्याला प्रजेचा पिताच समजत असत व स्मृतिनियमानुसार सर्वांना न्यायदान देण्याचें त्याचें काम असे. यामुळें राजाची सत्ता अनियंत्रित असली, तरी कांहीं थोडया गोष्टी खेरीज करून त्याला सामान्यतः न्यायानें व प्रेमानेंच राज्य करावें लागे व त्यामुळें सामान्यपणें लोकांचेंहि प्रेम त्याच्यावर असे. पूर्व जन्मीं केलेल्या पुण्याईमुळें राजपद प्राप्त होतें अशा समजुतीमुळें राजाचा जन्म म्हणजे सुखोपभोगार्थच होय अशी त्यावेळीं कल्पना होती. त्यामुळें राजाजवळ नित्य तरुण व सुंदर स्त्रियांचा परिवार असे व त्या त्याच्यावर चवरी धरून, त्याचा विडयाचा डबा संभाळून ( ताम्बूल—करंक—वाहिनी ) व

इतर मार्गांनीं त्याच्या सेवेंत नित्य तत्पर असत. भर सभेंत देखील त्याच्या तैनातीला त्या असत. प्राचीन राजांच्या संबंधाचा हा प्रकार आज आपल्याला चमत्कारिक व बीभत्सहि वाटेल. तथापि तसा तो प्राचीन काळापासून चालत आलेला होता असें दिसतें व मनूनें देखील (७, २४) राजा नेहमीं स्त्रीवृत असावा व त्यांनीं त्याची व्यजनोदकधूपनांनीं नित्य सेवा करावी (७ २९) असें सांगितलें आहे. पण महाभारतावरून पहातां मात्र चन्द्रगुप्तापूर्वीच्या राजांच्या अशा स्त्रिया परिचारिका नव्हत्या असें दिसतें. तथापि पुढें मेगॅस्थेनिसच्या वर्णनांत, तसेंच कालिदासाच्या नाटकांत व शेवटीं बाणाच्या लिहिण्यांत या परिचारिकांचा उल्लेख येतो. दुष्यन्ताच्या यावनी परिचारिका कालिदासानें शंकुतलेंत सांगितल्या आहेत, व बाण हर्षाचे दरबारीं गेला तेव्हां त्या सच्छील राजाच्या भोंवतीदेखील तरुण सुंदर स्त्रियांचा परिवार त्याला आढळला. (ह. च. उच्छ्वास २-आसन्नवारविलासिनी–प्रतियातनाभिः–प्रणम्यमानम्). राजा हत्तीवर बसून स्वारीवर निघालेला असला किंवा युद्ध करीत असला तरी देखील त्याचीं शस्त्रें संभाळणाऱ्या स्त्रिया जवळ असत. हा प्रघात कदाचित् हिंदी राजांनीं चंद्रगुप्ताच्या कालीं इराणी लोकांच्या दरबारापासून उचलला असेल. चंद्रगुप्तकाळीं इराणी राजदरबार म्हणजे सर्व जगांत भपकेदार व अनियंत्रित सत्ताधारी दरबार होता. या कल्पनेवरच कालिदासानें सांगितलेल्या राजाच्या यावनी परिचारिकांविषयींचा उलगडा करितां येतो. हर्षकाळीं या परिचारिका यावनी नसत; कारण तसें कोठें वर्णन आलें नाहीं. त्यांची निवड व्हावयाची ती त्यांची सुदृढ व निकोप प्रकृति, सौंदर्य इत्यादि गुणांवरच होई. अशा स्त्रियांच्या सतत निकटच्या सानिध्यामुळें राजे लोकांची नैतिक अवनति होणें अपरिहार्य होतें. हर्षासारख्या लढवय्या व नैतिक

दृष्टया उदात्त* राजाची गोष्ट निराळी, पण इतरांवर बहुधा अनिष्ट परिणाम झाल्याशिवाय रहात नस.

राजाची पट्टाभिषिक्त अशी एक महाराणी असून त्याला इतरहि विवाहित स्त्रिया असत. पण त्यांना महाराणीपेक्षां खालच्या दर्जाच्या समजत. पट्टाभिषिक्त राणीच्या कपाळावर पट्टबंध नांवाचा सोन्याचा रत्नखचित पट्टा अलंकार म्हणून लावण्याचा प्रघात होता. हर्षचरितांत त्याचा निर्देश बाणानें केलेला आहे. मही महादेवीपट्टबंधेनेव महिमानमारोपयत्तम् । उच्छ्वास २ रा लब्धो मनोरथदुर्लभो महादेवीपट्टबंधसत्कारलाभो ललाटेन । उच्छ्वास ३ रा† राजवाडयाला अन्तःपुराशिवाय तीन किंवा त्याहून अधिक अशा कक्षा किंवा चौक असत; त्यांपैकीं सर्वांत जो बाहेरचा त्यांत दरबार भरणें, राजकीय पाहुण्यांचा सत्कार करणें, व लोकांच्या तक्रारी ऐकून न्याय देणें इत्यादि राजकीय कामें चालत. त्याच्या अलीकडच्या दालनांत सरदार, मानकरी आणि राजाचे खास स्नेही मंडळ यांचा मात्र प्रवेश असे. आणि तिसऱ्या कक्षेंत अतिथि, शास्त्री, वगैरे असून त्याच्या आंत अंतःपुर असे. राजवाडयांच्या इमारती दगडी नसल्या तरी भव्य असून आंतील जमीनीवर चकचकीत पाषाणांची फरसबंदी केलेली असे (शिला–कुट्टिम स्फटिक–कुट्टिम इ.) त्यांच्या खांबावर आणि भिंतीवर सुंदर वेली व चित्रें कोरलेलीं किंवा रंगविलेलीं असत किंवा

---

* 'गृहीतब्रह्मचर्य...प्रतिपन्नासिधाराधारणव्रतम्–सुलभं धर्मे...सर्वात्मना सत्येन सेव्यमानम्' इत्यादि त्याला बाणानें दिलेलीं विशेषणें पहा (ह. च. उच्छ्वास २ रा).

† या पट्टबंधाच्या ऐवजीं हल्लींच्या नाटकांतून महाराणींच्या डोक्यावर इंग्रजी तऱ्हेचा भलताच मुकुट घालतात तो बेढब दिसतो होय.

सोनें माणकें इत्यादि मूल्यवान् वस्तूंनीं त्या सुशोभित केलेल्या असत. या वाडयांना अनेक मजले असून मध्यें मोकळ्या चौकांत फुलांच्या बागा व मोठीं फळझाडेंहि लाविलेलीं असत. ठाणेश्वर येथील प्रभाकरवर्धनाच्या राजवाडयाच्या वर्णनांत बाणानें ही गोष्ट सांगितलेली आहे. ( उच्छ्वास ४ था ).

रणांगणांत सेनेचें नेतृत्व करणें व दरबारांत न्यायदान करणें हीं दोन्हीं कामें शास्त्रानें आणि बहुशः व्यवहारांतहि राजाकडेसच असत. सिंहासनाचा चौक म्हणजे राजाचें न्यायमंदिर असून तेथें प्रत्यही सकाळीं राजानें येऊन लोकांना न्याय दिला पाहिजे असें मनूनें व इतर स्मृतींतहि सांगितलें आहे (७,१४५;८, १). या सभेंत प्रवेश करण्याचा कोणालाहि हक्क असे. केव्हां केव्हां फिर्यादी लोकांना आपली कांहीं तक्रार आहे हें राजाला कळविण्यासाठीं सभेंत ठेविलेली न्याय-घंटा वाजविण्याचीहि अनुज्ञा असे. ( ऐयंगार कृत प्राचीन भारत वर्ष, पा. ३४६ ) व्यवहारनिर्णय करतांना राजा पहिल्या तीन वर्गांतील पंचांचें मत घेत असे.

राज्याची आपलीं विविध कामें नीटपणें व्हावीं म्हणून राजांनीं दिवसाचे तीन भाग करावे, व त्यांपैकीं एकांत व्यवहार निर्णय, दुसऱ्यांत राज्यकारभार, आणि तिसऱ्यांत स्वतःचीं वैयक्तिक म्हणजे स्नानभोजनादि व क्रीडाविलासादि कामें करावीं असा स्मृतींचा आदेश आहे. हर्षराजा या स्मृत्याज्ञेप्रमाणें काळजीपूर्वक वागत असे व हें ह्युएनत्संगानें लिहिलें आहे. तत्कालीन वेलाज्ञापक साधन म्हणजे पाण्याचें घडयाळ असून ( अथ गलति तृतीये यामे या शब्दावरून पाणी गळल्यामुळें प्रहरज्ञान होई असें दिसतें ), त्याच्या अनुरोधानें भेरी व शंख हीं वाद्यें प्रहराप्रहराला वाजविण्यांत येत व त्यावरून त्या त्या वेळीं राजा काय करीत आहे ह लोकांस समजत असे. हीं वाद्य राजवाडयाशिवाय

इतरांना बाळगिण्याचा अधिकार नसे. तीं पांच प्रकारचीं होतीं, असें 'समधिगतपंचमहाशब्दः' या राजांना व सामन्तांना लाविलेल्या प्राचीन लेखांतील विशेषणांवरून उघड होतें. हीं वाद्यें कोणतीं असावीं याची चर्चा प्रो. पाठकांनीं इंडियन अँटिक्करीच्या १२ व्या पुस्तकांत (पा. ९५) एके ठिकाणीं केली असून त्यांचीं नांवें शृंग (शिंग), राम्मट (नौबत), शंख, भेरी (नगारा) व जयघंटा (तास) हीं होत असें म्हटलें आहे. कदाचित् बाणानें सांगितलेलीं पटह, नान्दी, कुंज, काहल आणि शंख हींसुद्धां तीं पांच वाद्यें असण्याचा संभव आहे. (पूर्वीं दिलेलें सैन्य-प्रयाण-वर्णन पहा) यांतील पटह म्हणजे नौबत व शंख हीं प्रमुख असून आज तीं माहीतहि आहेत. ह्युएनत्संगानें असें वर्णन केलेलें आहे कीं, हर्ष राजाच्या प्रत्येक पावला बरोबर सोन्याच्या टिपरीनें नौबतीवर एकेक ठोका देण्यांत येई, व हा बहुमान दुसऱ्या कोणत्याहि राजाला देत नसत. कदाचित् हर्ष हा राजाधिराज चक्रवर्ति असल्यामुळें हा विशेष मान त्याला मिळाला असेल. जेव्हां तोफांचा शोध लागला नव्हता, अशा वेळीं राजवाड्यांतील नौबदी व शंख यांचें फार महत्व असलें पाहिजे हें उघड आहे.

राजाचे अंगरक्षक निवडक शूर व विश्वासू असे पिढीजाद शिपाई असून ते नित्य त्याच्या निकट असत. हर्षाच्या अंगरक्षकाचें बाणानें वर्णन केलें आहे, त्यांत तो म्हणतो 'दूरादूर्ध्वस्थितेन प्रांशुना कर्णिकारगौरेन व्यायामव्यायतवपुषा शस्त्रिना मौलेन शरीर-परिचारक-लोकेन पंक्ति-स्थितेन कार्तस्वरस्तंभमण्डलेनेव परिवृतम्' म्हणजे "ते थोड्या अंतरावर रांगेनें उभे होते; त्यांची शरीरकाठीं उंच, वर्ण गौर, व्यायामामुळें मजबूत अगलट, व हातांत शस्त्रें धारण केलेले व ते पिढीजाद नोकर होते; (उच्छ्वास २ रा.) त्यांच्यामुळें राजाच्या भोंवतीं जणूं काय सुवर्णस्तंभांची रांगच

उभी आहे असें वाटलें." राजाचें सिंहासन चार खुरांचें असून त्यांत हस्तिदंताचें काम केलेलें असे, व त्यावर चंदनाचें गंध सारविलेला पाषाणाचा पाट बसविलेला असे. याशिवाय इकडून तिकडे नेतां येण्यासारखें आसन्दी नांवाचें दुसरेंहि एक राजाचें आसन असे. मालवराजाचा पराभव होऊन तो मारला गेल्यावर त्याच्या लुटलेल्या सामानांत सिंहासन आणि आसन्दी अशीं दोन्ही असल्याबद्दल बाणानें वर्णन केलें आहे. सिंहासनावर बसल्यावर खालीं पायांना आधार म्हणून एक रत्नखचित पादपीठ ठेविलेलें असे.

राजाच्या परिचारकांत प्रतिहारी म्हणजे देवडीवाला हा विशेष महत्वाचा असे. त्यांत एक मुख्य प्रतिहारी व त्याच्या हाताखालीं आणखी दुसरे असत. बाणानें हर्षाच्या मुख्य प्रतिहारीचें वर्णन सविस्तर देतांना म्हटलें आहे ' तो उंच, वर्णानें गौर, अंगांत कंचुक ( अंगरखा ) घातलेला, व रुंद छातीचा होता. त्याच्या गळ्यांत हार, व कमरेस सोन्याचा पट्टा असून त्याला रत्नजडित पदक अडकविलें होतें. त्याच्या कानांत कुंडलें, डाव्या हातांत मोतीं जडविलेली तरवार व उजव्यांत सोन्याचा राजदंड होता.' ( उच्छ्वास २ रा ). प्रतिहारीला कंचुकी असें नांव होतें व त्यावरून तो मात्र कंचुक घाली, इतर कोणी घालीत नसत असें अनुमान होतें. त्याच्या डोकींत असलेलें पांढरें पागोटें किंवा फेंटा त्याचें विशिष्ट लक्षण असून इतरांच्या डोक्यावर शेंडीच्या भोवतीं बहुधा फुलांची माळ अडकविलेली असे. या गोष्टीवरून हे कंचुकीदेखील यवनीप्रमाणेंच इराणी दरबारांतून येथें आणिलेले असावे असें दिसतें.

इराणी दरबारापासून उचललेली एक विशिष्ट बाब मात्र सातव्या शतकांतील हिंदी दरबारांनी सोडून दिलेली दिसते; ती

म्हणजे वर्षवर किंवा खोजे लोकांची राजवाड्याच्या अंतःपुरावर योजना करण्याची चाल होय. बाणाच्या हर्षचरितांतील राजवाड्यां-विषयींच्या वर्णनांत किंवा तत्कालीन दुसऱ्या लेखांत या वर्षवरांचा संबंध आलेला आम्हांला कोठें आढळला नाहीं. पण पूर्वी चंद्रगुप्ताच्या काळीं दरबारांत यांचें अस्तित्व होतें. कौटिल्यानें अर्थ-शास्त्रांत कंचुक व उष्णीप घालणाऱ्या दौवारिक किंवा प्रतिहारी-बरोबर त्यांचा उल्लेख केलेला आहे. पाटलिपुत्र येथील राजांकडे असले लोक असल्याबद्दल बृहत्कथेंत उल्लेख आहेत. राजे रज-वाड्यांच्या अंतःपुरांतील कामें करण्यासाठीं पुरुषांना पुरुषत्वहीन करण्याची ही अमानुष चाल मूळ सेमेटिक लोकांनी काढिली. पुढें बाबिलोन आणि निनेव्ही येथील राजदरबारांतून ती इराणांत आली व तेथून पुढें तिचा प्रवेश चंद्रगुप्ताच्या दरबा-रापर्यंत झाला. चंद्रगुप्ताचे पूर्वज नंद आणि वंशज मौर्य या दोघांच्या दरबारांत वर्षवरांची योजना असे. पण पुढें असले लोक इकडे येण्याचे बंद झाल्यामुळें गुप्तराजांपासून ही चाल मोडली, व हा दरबारांची इष्ट दिशेची सुधारणा मुसलमानी अमलापर्यंत टिकल्यावर मुसलमानांच्या अमदानींत तिचा इकडे पुनः प्रवेश झाला; आणि पुनः ब्रिटिश अंमल व त्याबरोबर ब्रिटिश सुधारणा यांच्या येथील स्थापनेबरोबर तिचें पुनः हिंदीदरबारांतून उच्चाटन होऊं लागलें; व त्यांना अधिक मंगल स्वरूप प्राप्त झालें. असो.

लहान मोठ्या राजांच्या बिरुदावलीचा विचार करतां प्राचीन लेखांवरून असें दिसतें कीं, त्या काळीं मांडलिक राजांना महाराज, स्वतंत्र परंतु लहान राजांना महाराजाधिराज आणि परम भट्टारक, व चक्रवर्ती राजांना यांच्या जोडीला आणखी परमेश्वर अशीं उपपदें लावण्याची पद्धत असे. दक्षिणेंतील चालुक्य घराण्याच्या पुलकेशी राजानें ही शेवटची पदवी हर्षाचा पराभव

केल्यावर आपल्याला घेतली असे स्पष्ट एका शिलालेखांत म्हटलेले आहे. याशिवाय निरनिराळे राजे आपापल्या अभिरुचीप्रमाणे विशिष्ट बिरुदें धारण करीत. उदाहरणार्थ चालुक्य राजे आपल्याला पृथ्वीवल्लभ म्हणवीत, तर वलभीचे राजे सेनापति म्हणवीत, आणि गुप्त राजे आपल्या नाण्यांवर विजितावनि अवनीपति अशीं विशेषणें घालीत. तसेंच वाकाटक वंशाचे ब्राम्हणराजे आपल्या ब्राह्मण्याची दर्शक अशी परिव्राजक ही पदवी आपल्याला लावून घेत.

उपपदाप्रमाणेंच प्रत्येक राजघराण्याचें निशाण म्हणजे ध्वज आणि लांछन म्हणजे विशिष्टत्वदर्शक खूण हींदेखील वेगवेगळी असत. हें लांछन नाणीं व मुद्रा यांवर तर असेच, पण ध्वजावरहि आणखी तें असें कीं काय हें निश्चित सांगतां येत नाहीं. हें लांछन म्हणजे कोणत्या तरी प्राण्याचें चित्र असे. अलीकडे पाश्चात्य राष्ट्रांतहि कांहीं प्राण्यांचीं चित्रेंच लांछन म्हणून योजीत असतात हेंसुद्धां लक्षांत ठेवण्यासारखें आहे. हर्षकालीन राज्यांपैकीं गुप्तांचें लांछन मयूर होतें, व ठाणेश्वराच्या वर्धन राजांचें वृषभ होतें. हर्षाच्या दिग्विजयाच्या स्वारींत पहिल्याच मुक्कामावर त्या गांवच्या अक्षपटलिकानें ( पाटलानें ) वृषभांकित मुद्रा त्याला नजर केल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे ( उच्छ्वास ७ वा ). त्याप्रमाणेंच चालुक्य घराण्यांत तें वराह असून चक्रवर्ती यशोवर्माच्या मंदसोर येथील शिलालेखांत तें 'औलिकर' असल्याबद्दल उल्लेख आहे (डॉ. फ्लीटकृत प्राचीन उत्कीर्ण लेखमाला, पृ. ३ पा. १५१-१५३). वरील उदाहरणांच्या सादृश्यावरून पहातां औलिकर * हा कोणता

* अथर्ववेदांत सांगितलेला उल हा प्राणी म्हणजेच औलिकर होय असें कांहीं कोशांत दिलें आहे. पण उल म्हणजे तरी कोणता पशु ?

तरी पशुच असला पाहिजे असें दिसतें. पण तो नक्की कोणता होता हें अजून समजलें नाहीं. लांछनाप्रमाणेंच ध्वजांवरदेखील सिंह, कपि इत्यादि पशूंच्याच आकृति काढिलेल्या असत, व ध्वजांच्या रंगामध्येंहि विशिष्टत्व द्योतक भेद करीत असत, आणि हा निरनिराळेपणा अद्यापिसुद्धां हिंदीराजाच्या ध्वजांत कायम ठेविलेला दिसतो.

राजाचें छत्र नेहमीं श्वेतवर्णाचें असे. छत्र, चामर, इत्यादि राजचिन्हें भागवतांतील एका श्लोकांत* आलीं आहेत तीं अशीं:—

१ चामर, २ चवरी, ३ शंङ्ख, ४ पांढरें छत्र, ५ मुकुट, ६ सिंहासन, ७ शय्या म्हणजे गादी. हीं वाचकांच्या परिचयाचीं आहेतच त्याजबद्दल जास्त खुलासा करणें अवश्य नाहीं.

---

*चामरव्यजने शङ्खमातपत्रं च पाण्डुरम् । किरीटमासनं शय्या भुञ्जंत्य स्मदुपेक्षया ॥ द० २६।६८

# टिप्पणी.

## १. वलभीची राज्यपद्धति इ. स. ५०० ते ७००.

वलभीच्या राज्यकारभाराविषयींची पुढील माहिती बांबे गॅझीटिअर मधील गुजराथच्या इतिहासावरून घेतली आहे; व तिजविषयीं आमचे स्वतःचे मतभेदहि यथास्थळीं प्रकट केले आहेत.

वलभीच्या दानलेखांत मुख्य राजाधिकारी, वसुली करणारे कामगार, ग्रामरक्षक अधिकारी व गांवाची इतर व्यवस्था पहाणारे यांचीं नांवे पुढील प्रमाणें आढळतातः—

१ **आयुक्तक** } या शब्दांचा अर्थ नेमिलेले असा असून त्यांवरून
२ **विनियुक्तक** } वरिष्ठ दर्जाचे कोणतेही अधिकारी असा बोध होतो.

३ **द्रांघिक**—द्रंघ म्हणजे नगर त्यावरून दांघिक म्हणजे नगराधिकारी.

४ **महत्तर**—याचा शब्दार्थ "फार मोठा" असा आहे. मराठी म्हातारा शब्द याचाच अपभ्रंश होय. वलभीच्या प्राचीन लेखांत महत्तर म्हणजे लोक आणि राजा किंवा सरकार या दोघांनाहि मान्य असलेला ग्रामाध्यक्ष असा सामान्य अर्थ दिसतो. ( याचें उत्तर कोकणांत म्हात्रे असे रूप अद्याप आहे ).

५ **चाटभट**—चाट म्हणजे ठक, चोर इत्यादिकांचा बंदोबस्त करणारे शिपाई म्हणजे चाटभट.* हे घोड्यावर बसत किंवा पादचारी असत. हल्लींच्या भाषेंत बोलावयाचे तर पोलीस जमादार, हवालदार व शिपाई यांचा चाटभटांत समावेश होतो. कुमारपालचरितांत सिद्धराजानें कुमारपालाला पकडण्यासाठीं चाटभट पाठविले असें म्हटलें आहे. एका दानलेखांत दानविषयक गांवाला 'अचाटभटप्रवेश्य' म्हणजे चाटभटांना प्रवेश करण्यास अशक्य असे म्हटलेलें आहे.

६ **ध्रुव**—हा गांवासंबंधीं कागदपत्र व हिशोब ठेवणारा पिढीजाद कामगार. हल्लींच्या भाषेंत तलाठी किंवा कुळकर्णी म्हणतां येईल. ध्रुवांचें

---

* आमच्यामते चाट म्हणजे नगररक्षक अथवा हल्लींचे पोलीस, व भट म्हणजे लष्करी शिपाई.

मुख्य काम हें असें कीं, त्यांनीं जमीन महसुलाचे मक्तेदार शेतकऱ्यांकडून योग्य तोच आकार वसूल करितात कीं नाहीं हें पहावयाचें. ध्रुव हा शब्द या अर्थी अद्यापिहि कच्छ प्रान्तांत चालू असून तेथील तलाठ्यांना ध्रु किंवा ध्रुव असें म्हणतात. ध्रु किंवा ध्रुव हें आडनांव कच्छ, गुजरात, व काठेवाड येथील नागर ब्राह्मण, मोड वैश्य इत्यादि लोकांत परिपाठाचें आहे.

७ **आधिकरणिक**—हा नगराचा मुख्य न्यायाधीश असे व फौजदारी आणि दिवाणी अशा दोन्ही गोष्टींचा न्याय करी.

८ **दंडपाशिक**—या शब्दाचा मूळ अर्थ पाश किंवा फांस व दंड, घेऊन शिक्षेची अमलबजावणी करणारा असा आहे व त्याचा पोलिस फौजदार आणि जेलराखणारा अथवा मांग या दोन्ही अर्थी उपयोग केलेला आहे.

९ **चौरोद्धरणिक**—चोर पकडणारा. पूर्वी इकडे चोर पकडण्याचे दोन मार्ग असत. एक चोराला दुसऱ्या चोराकडून पकडावयाचे हा एक, व दुसरा पगीचा म्हणजे खुणावरून माग काढावयाचा. यांपैकीं दुसरा मार्ग काटेवाड व गुजराथ या प्रान्तांत चांगला उपयुक्त ठरला आहे. कारण तेथे वालुकायुक्त जमीन असल्यामुळें माग काढणे सोपे पडतें, व त्यामुळें माग काढण्याचा धंदा करणारा पगी गांवांतील बारा बलुत्यांतील एक बलुतेदार बनलेला आहे.

१० **राजस्थानीय**—हा परराष्ट्रीय मंत्री होय; त्याचा संबंध राजस्थानांशीं म्हणजे संस्थानांशीं असे. कांहींच्या मते जिंकलेल्या प्रांतावरील राजप्रतिनिधि म्हणजे राजस्थानीय होय. ( आमच्या मते हा प्रान्ताधिकारी हल्लींचा कलेक्टरच होय. )

११ **अमात्य**—याला दिवाण म्हणतां येईल किंवा मंत्रीहि म्हणतां येईल. हा शब्द बहुधा कुमार किंवा राजा शब्दांशीं जोडलेला असतो. कुमारामात्य व राजामात्य निरनिराळे होते. ( आमच्या मतें राजपुत्रावर तैनात केलेले ते कुमारामात्य होत. )

१२ **अनुत्पन्नधनसमुद्ग्राहक**--थकलेल्या धान्याची बाकी वसूल करणारा अधिकारी.

१३ **शौल्किक**--जकातखात्याचा अध्यक्ष.

१४ **भोगिक किंवा भोगोघरणिक**--शेतकऱ्यांपासून राजभाग ( हा बहुधा उत्पन्नाचा $\frac{1}{6}$ असे ) वसूल करणारा अधिकारी. हल्लींहि काठेवाडांत जमीनदार कुळांपासून जो हिस्सा घेतात त्याला भोग म्हणतात.

१५ **वर्त्मपाल**--रस्त्यावरील चौकीदार; रस्त्याच्या बाजूला लहान छपरें घालून त्यांत हे ठेविलेले असत. त्यांतील कांहीं घोडाहि बाळगीत.

१६ **प्रतिसारक**--गस्तवाले-हे रात्रीं गांवांतून व शेतावरून गस्त घालून त्यांची राखण करीत.

१७ **विषयपति**--प्रांताधिकारी किंवा हल्लींच्या व्यवस्थेवरील अधिकारी सुभा. ( आमच्या मते तहसीलदार )

१८ **राष्ट्रपति**--जिल्ह्यासारख्या प्रदेशावरील अधिकारी.

१९ **ग्रामकूट**--गांवचा पाटील.

ही माहिती गॅझिटिअरकाराच्या मतावरून दिली आहे. त्यांत आमच्या मतें चौरोद्धरणिक हा अधिकारी म्हणजे पगी नसून कोणी वरिष्ठ पोलिस अधिकारी असला पाहिजे. उत्तरहिंदुस्थानांतील लेखांतहि हा शब्द येतो. तसेंच राजस्थानीय म्हणजे हल्लींच्या तहशील किंवा तालुक्यासारख्या प्रदेशावरील राजानें नेमिलेला अधिकारी असा अर्थ असून त्याचा राजस्थान ह्मणजे संस्थान या शब्दाशीं कांहीं संबंध नाहीं. पर्वी सांगितलेंच आहे कीं, हा शब्द मन्दसोरच्या लेखांतहि आलेला असून त्याचा अर्थ तेथें सुभा किंवा राजप्रतिनिधि असा आहे. विषय ह्मणजे हल्लींच्या तालुक्यासारखा मुलूख व त्यावरून विषयपति म्हणजे तहशीलदार किंवा मामलतदार होय. त्याचा अर्थ सुभा नव्हे. त्याच्यावरचा अधिकारी राष्ट्रपति हा सुभा होय.

निरनिराळ्या अधिकाऱ्यांचीं हीं नांवें बहुतेक अशींच्या अशींच उत्तरेकडील प्राचीन लेखांत देखील येतात व देवबरनाकच्या लेखांतील पूर्वी दिलेल्या उताऱ्यावरून ही गोष्ट दृष्टोत्पत्तीस आलीच आहे.

## प्रांतिक विभाग.

या कामगारांच्या नांवाप्रमाणें प्रांतिक विभागांचींहि नांवें प्राचीन लेखां-तून येतात. प्रस्तुत वलभी लेखांतील नांवांचा विचार करावयाचा आहे. त्यांत चार विभागांचीं नांवें आढळतात.

१ **विषय**—हल्लीं कमिशनरच्या ताब्यांत असलेल्या इलाख्याच्या भागा-सारखा देशाचा मोठा भाग.

२ **आहार किंवा आहारणी**--( आहार म्हणजे समूह ) हल्लीं कले-क्टर किंवा डेप्युटिकमिशनरच्या हाताखालीं असलेल्या मुलखासारखा मुलुख म्हणजे जिल्हा.

३ **पथक**--( मूलार्थ-पथ म्हणजे रस्ता, तत्संबंधीं ) एकादें विशिष्ट ठिकाण व त्याच्या भोंवतालचा प्रदेश मिळून होणारा मुलुख.

४ **स्थली**—पथकाहूनहि लहान प्रदेश ( यांत सभोंवतालच्या मुल-खाचा समावेश होत नाहीं.

गुजरातेंतील खेडा जिल्हा आणि काठेवाड प्रांत यांचाच विशेषतः वलभी राजांचे ताम्रपटांत संबंध आलेला आहे व त्यावरून त्या ठिकाणीं जमीन महसूल गोळा करण्याचे प्रकार भिन्न होते असें दिसतें. म्हणजे खेडा जिल्ह्यांत प्रत्यक्ष पिकावरून त्याची आकारणी करीत तर काठेवाडांत जमि-नीच्या क्षेत्रफळावरून करीत. काठेवाडांतील पद्धतींत जमिनीची मोजणी पदावर्त म्हणजे हल्लींच्या कदमावरून ( किंवा दोन पावलांमधील सरासरी अंतर ) होत असे, ज्या कदमाचा किंवा पाऊलाचा उपयोग भुपृष्ठमापनांत करावयाचा तो अर्थात रोजच्यापेक्षां निराळा असे. तेथील बऱ्याच दान-पत्रांत जमीन मोजावयाच्या कदमाला भूपदावर्त म्हटलेलें आढळतें. खेडा जिल्ह्यांतील प्रदेशांत आकारणी उत्पन्नावरून होत असून त्याचें माप पिटक म्हणजे पांटी ( टोपली ) हें होतें. दानपत्रांत जमिनीचें वर्णन देतांना अमुक एक पिटक धान्य जींत पिकेल अशी जमीन असें म्हटलेलें असतें ( अथवा पिटकांची संख्या अमुक जमिनीला इतकें बीं लागतें असेंहि दर्शवित असेल) तसेंच खेडा प्रांतांतील टोपलीचा किंवा पिटकाचा विशेष निर्देश केला अस-

त्यामुळें देशाच्या इतर भागांत कांहीं निराळ्या मापांच्या टोपल्यांचा प्रघात असावा असेंहि म्हणावें लागतें. या दानलेखांत आणखी एका बारीक बाबतीचा निर्देश असतो. आज ज्याप्रमाणें निरनिराळ्या शेतांना जवळचें प्रसिद्ध झाड, देऊळ, किंवा दुसऱ्या कांहीं खुणांवरून नांवें दिलेलीं असतात तशींच तत्कालीन क्षेत्रांनाहि दिलेलीं होतीं. कोटिलक, अतिमान केदार, खंडकेदार ( आजचें खंड शेत ) गुर्जरक्षेत्र, भीमक्षेत्र हीं त्यांपैकीं कांहीं नांवें आहेत.

## २–सप्तार्धलक्ष म्हणजे साडेसात लाख रट्टपाडि.

सु. कृष्णस्वामी ऐयंगार यांनीं आपल्या प्राचीन भारतवर्षाच्या इतिहासांत सप्तार्धलक्ष रट्टपाडि या शब्दाचे निरनिराळे विरोधी अर्थ दिले आहेत. या संख्येचा संबंध जमिनीच्या वसुलाशीं अथवा गांवांच्या संख्येशी असावा असें त्याचें म्हणणें आहे ( पान ४०, टीप ). गंगवाडी ९६०००, नोलेबवाडी ३६०००, आणि वनवासी १२००० यांचा अर्थ देतांना ( पा. ७८, टीप ) हे आंकडे वसुलाचे अगर जमिनीच्या उत्पन्नाचे असावे असें म्हणून त्यांपैकीं पहिल्याचा पुष्टयर्थ त्यानी राइससाहेबांचा हवाला दिला आहे. तसेच त्यांवरून त्या प्रदेशांतील ग्रामसंख्येचा बोध होत असावा व डॉ. फ्लीटच्या मताचाही त्यांनीं निर्देश केला आहे. पण ग्रामसंख्येचे हे आंकडे असणे शक्य दिसत नाहीं; कारण तसे असल्यास ते फारच फुगविलेले आहेत; व प्रांताचा उल्लेख करतांना त्यांतील ग्रामसंख्येचा निर्देश करण्याची चाल आज कोठेंहि नसल्यामुळें ते आंकडे गांवाचे नव्हत; तर ते सरकारी वसुलाचे, एकंदर जमिनीच्या उत्पन्नाचे, अगर त्या प्रदेशांत शेतीला लागणाऱ्या बियाच्या मापाचे असले पाहिजेत असे पुढें त्यांनीं म्हटलें आहे. असो, हे आंकडे कसले आहेत हें एक गूढच आहे. पण ते गांवांच्या संख्येचे नव्हत हें मात्र आम्हांस अगदी स्पष्ट दिसतें. कारण रट्टपाडींत अंतर्भूत होणाऱ्या तीन महाराष्ट्रांतील ग्रामसंख्या ९९००० अशी संख्या स्पष्टच एका शिलालेखांत दिलेली आहे आतां या खऱ्या ग्रामसंख्येचा ७॥ लक्षांशीं काय संबंध असावा हें पाहूं जातां दर गांवास या संख्येचें प्रमाण ७॥ वर थोडेसें येतें. अर्थात् ७॥ हा गांवचा वसूलहि नव्हे व उत्पन्नहि नव्हे; किंवा गांवच्या शेतीला लागणाऱ्या नांगरांची संख्या देखील नव्हे. नांगराची संख्या

सरासरीनें दर गांवास २५ ही पडते. तथापि स. १९०४ सालच्या शेतकी खात्याच्या आंकडयांत मुंबई इलाख्यांतील नांगरांचीं संख्या ९,३४,०८१ अशी दिली आहे. म्हणून हल्लींच्या मुंबई इलाख्यापेक्षां चालुक्याचे साम्राज्य थोडें कमी होते असें धरिल्यास ७॥ लक्ष ही संख्या नांगरांची असणें शक्य होतें. पण पुढें एका ठिकाणीं या प्रश्नाचा विचार करावयाचा असल्यामुळें तो इतकाच येथें सोडून देऊं, व रट्टपाडी संबंधानें योजिलेल्या सप्तार्ध शब्दावरून ग्रामसंख्येचा बोध होणें शक्य आहे काय तें पाहूं. नर्मदेच्या दक्षिणेकडील सर्व देश घेतला तरी देखील त्यांतीळ गांवें ७,५०,००० होत नाहींत. फार काय सांगावें सबंध ह्रिंदुस्थानांनील गांवांची संख्या देखील आज मितीला ७,३०,८०६ एवढीच आहे. असें म्हणतांना अर्थातच आजची ग्रामसंख्या व सातव्या शतकांतील ग्रामसंख्या साधारण कोणत्याहि भागासंबंधाने विचार करतां फारशी कमी जास्त झाली नसावी, निदान तींत शेकडा ९० हून ग्राम पूर्वापार नियत आहेत हे आम्हीं पूर्वी सांगितलेच आहे. अधिक फेर झालेला नाहीं असे धरून आम्हीं चाललों आहों. नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेशांत आज गावांच्या संख्या पाहता मुंबई इलाखा ३६,५९३, मद्रास इलाखा ५९,८५८, हैदराबाद संस्थान २०,०८९, म्हैसूर संस्थान १७,०१२ अशा असून एकूण ग्राम संख्या १,३३,५५२ आहे—पण रट्टपाडि या प्रदेशांत खरोखर पाहतां मुंबई इलाख्यापैकीं मध्यभाग व दक्षिणभाग, मध्यप्रांत (वऱ्हाड व नागपूर), निजामचें राज्य आणि म्हैसूर संस्थानाचा थोडा भाग एवढयाचा समावेश होत असावा व तो मुलुख चालुक्यांच्या साम्राज्यांत मोडत असे. एहोळेच्या लेखांत या मुलखांतील गांवांची संख्या ९९००० अशी दिलेली असून ती बहुधा बरोबर आहे—चालुक्यांच्या पूर्वी सातवाहनांचें राज्य देखील जवळ जवळ एवढयाच मुलखावर होतें. आणि म्हणूनच इ. स. ४२० च्या सुमाराच्या एका बाण-लेखांत देखील ‘ आघ्रमंडल द्वादश सहस्र ग्राम संपादित सप्तार्ध लक्ष विषयाधिपतिः’इत्यादिवर्णनांत **सप्तार्ध लक्ष** हा शब्द आलेला आहे. यावरून हा शब्द प्राचीन असून सप्तार्ध लक्ष या संख्येंत आंध्रदेशाचा सुद्धां समावेश होत होता. बाणाच्या काळीं देखील दक्षिणापथ शब्दावरून

कावेरीच्या दक्षिण प्रदेशाचा बोध होत नसून नर्मदेच्या दक्षिणेकडील मलय पर्वतापर्यंतचा प्रदेश त्यावरून समजत असत. हर्षचरितांतील (उच्छ्वास ७ वा ) पुढील उतारा या दृष्टीनें महत्वाचा आहे. " उत्साहिनः किष्कुस्तुरुष्कविषयः प्रादेशःपारसीकदेशः शशपदं शकस्थानम् । अदृश्यमानप्रतिप्रहारे पारियात्रे यात्रैव शिथिला । शौर्यशुल्कः सुलभो दक्षिणापथः। दक्षिणार्णवकल्लोलानिलचलितचंदनलतासौरभसुंदरी-कृतदरीमन्दिराद्दर्दुराद्रेर्नेदियसि मलयः मलयलग्न एव च महेन्द्रः । या वर्णनांत आलेला दक्षिणापथ वर आम्ही दिलेल्या रट्टपाडीच्या विस्ताराशी जुळता असून त्यांत मलयपर्वताच्या दक्षिणेकडील प्रदेशाचा अन्तर्भाव होत नाहीं. या प्रदेशाला नहमींच सप्तार्धलक्ष असे प्राचीन लेखांत ह्मटलेले असून त्या संख्येचा संबंध ग्रामसंख्या किंवा नागरांची संख्या यांशीं जुळत नाहीं हें पूर्वी दाखविलेच आहे.

तर मग सप्तार्धलक्ष यावरून समजावयाचे तरी काय ? हें पूर्वी ह्मटल्याप्रमाणे खरोखरच गूढ आहे. जमिनीच्या उत्पन्नाच्या राजाला मिळणाऱ्या हिश्शाचा बोध त्यावरून होतो असेहि ठासून म्हणणें कठीण वाटतें. कारण त्यावेळी जमिनीचा कर धान्यरूपानेंच वसूल करीत, नाण्यांच्या रूपांत आजच्याप्रमाणें करीत नसत. शिवाय तत्कालीन कराचे प्रमाणदेखील नक्की आजचेंच आहे असें म्हणतां येत नाहीं ( आमच्या मतें ब्रिटिश सरकार आज स्मृत्युक्त षष्ठांशापेक्षां फारसा अधिक कर जमिनीच्या उत्पन्नावर घेत नाहीं ). आणखी आज धान्याच्या किमतींत तेव्हांच्या पेक्षां कल्पनेच्या बाहेर फरक पडलेला असल्यामुळें देखील आजच्या नाण्यांच्या रूपांतील करावरून तत्कालीन कराच्या प्रमाणाचा निर्णय करतां येणार नाहीं. तथापि तेव्हांपेक्षां जमिनीच्या उत्पादक शक्तींत, शेतीच्या आमच्या पद्धतींत किंवा निरनिराळ्या प्रांतांतील ग्रामसंख्येंत फारसा फरक पडलेला नसल्यामुळें तत्कालीन सरकारसारा धान्यरूपानें किती वसूल होत होता हें काढतां आलें असतें. एका गांवांतील सर्व लागवडीखालील जमीन सरासरीनें एक हजार एकर, व दर एकरीं सरासरीनें दहा मण धान्य असा उत्पन्नाचा अंदाज धरिल्यास एका गांवचा सरकारसारा सरासरीने $\frac{१००००}{६}$ मण होतो.

पण आतां येथें दुसरी अडचण येऊन उभी रहाते. आजकाल चालत असलेलीं वजनी व कैली मापें मुसलमानी अमलांत सुरू झालेलीं असून प्राचीन नव्हत. प्राचीन कैली व वजनी मापें प्रस्थ, आढक आणि द्रोण अशीं होती. पण आजच्या मणाच्या मानानें आढक किंवा द्रोण म्हणजे किती हें तरी निश्चितपणें कोणी सांगावे ? एका मनुष्याची महिन्याची पोटगी म्हणजे एक द्रोण धान्य असे असे, वेतनाचें प्रमाण सांगतांना मनुस्मृतींत (अ. ७ श्लोक १२६) म्हटले आहे. कुल्लूक भट्टानें या श्लोकावरील टीकेत द्रोणाचें प्रमाण दिलें आहे ते असें:—

८ मुष्टि = १ किंचित्     ८ किंचित् = १ पुष्कल

४ पुष्कल = १ आढक     ४ आढक = १ द्रोण

आजचें मनुष्याच्या मासिक पोटगीचे प्रमाण सव्वामण धरितात. एवढें सांगून हा विषय येथेंच अनिश्चित रूपांत सोडूं.

## ३. वराह मिहिरानें दिलेली देशांची यादी.

महाभारतांतील भारतवर्षीय देशांची नामावली जशी इ. सनापूर्वी ३०० वर्षांच्या सुमाराच्या प्राचीन इतिहासाला महत्वाची आहे, तशी वराहमिहिराने दिलेली इ. स ५०० च्या सुमाराची भरतखंडस्थ देशांचीं कवा खरे म्हटले तर लोकांची नामावली मध्ययुगीन इतिहासाला महत्वाची आहे. दोन्ही नामावल्या ऐतिहासिक असून आपआपल्या काळच्या भरतखंडाच्या वस्तुस्थितीच्या दर्शक आहेत. त्यांतहि वराहमिहिर कोणत्या दिशेला कोणते लोक आहेत हें सांगत असल्यामुळें त्याची यादी अधिकच उपयुक्त आहे. ती आतां खालीं देऊन तिच्यापैकीं देश किंवा लोक आज ओळखतां येण्यासारखें कोणते आहेत,व कोणतीं नांवें काल्पनिक असून केवळ परंपरागत म्हणून त्या यादींत आलेलीं आहेत हें सांगण्याचा प्रयत्न करूं. या काल्पनिक दिसणाऱ्या नांवाचे लोकहि खरे खुरे लोक असण्याचा संभव आहे. उदाहारणार्थ, एकपाद नांवाचे कोणी लोक या यादींत आले आहेत; त्यांचा अर्थ जरी एका पायाचे असा असला, तथापि तोच खरा

समजून तसे लोक असणें शक्य नाहीं असें म्हणण्याचें कारण नाहीं. तें केवळ नांव असून कोणा खऱ्या दोन पायांच्या लोकांचे तें असलें पाहिजे.

## मध्य भागांतील लोकांचीं नांवें.

१ भद्रारि, २ मेद, ३ माण्डव्य, ४ साल्य, ५ नीप, ६ उज्जिहान, ७ मरु, ८ वत्स, ९ घोष, १० यामुन, ११ सारस्वत, १२ मत्स्य, १३ माध्यमिक, १४ माथुरक, १५ उपज्योतिष, १६ धर्मारण्य, १७ शूरसेन, १८ गौरग्रीव, १९ उद्देहिक, २० पाण्डु, २१ गुड, २२ अश्वत्थ, २३ पांचाल, २४ साकेत, २५ कंक, २६ कुरु, २७ कालकोटि, २८ कुकुर, २९ पारियात्रनग, ३० औदुम्बर, ३१ कापिष्ठल (कपिस्थल, ? ) ३२ गजाव्हय ऊर्फ हस्तिनापुर,

एकूण, ३२

## पूर्वभागांतील नांवें.

१ अञ्जन, २ वृषभध्वज, ३ पद्म, ४ माल्यवान्, ५ व्याघ्रमुख, ६ सुह्म, ७ कर्वट, ८ चांद्रपुर, ९ शूर्पकर्ण, १० खस, ११ मगध, १२ शिबिरगिरि, १३ मिथिल, १४ समतट, १५ ओड्र, १६ अश्ववदन, १७ दन्तुरक, १८ प्राग्ज्योतिष, १९ लौहित्य, २० क्षीरोद समुद्र, २१ पुरुषाद, २२ उदयगिरि, २३ भद्र, २४ गोडक, २५ पौंड्र, २६ उत्कल, २७ काशी, २८ मेकल, २९ अम्बष्ठ, ३० एकपद, ३१ ताम्रलिप्ति, ३२ कोशलक, ३३ वर्धमान.

एकूण ३३

## आग्नेय भागांतील नांवें.

१ कोशल, २ कलिंग, ३ वंग, ४ उपवंग, ५ जठर, ६ अंग, ७ शौलिक, ८ विदर्भ, ९ वत्स, १० आन्ध्र, ११ चेदि, १२ ऊर्ध्वकण्ठ, १३ वृष, १४ नालिकेर १५ चर्मदीप, १६ विन्ध्यान्तवासी, १७ त्रिपुर, १८ श्मश्रुधर, १९ हेमकूटय, २० व्यालग्रीव, २१ महाग्रीव, २२ किष्किन्ध, २३ कण्टकस्थल, २४ निषाद, २५ पुरिक, २६ दाशार्ण, २७ नग्न, २८ पर्णशबर,

एकूण २८

## दक्षिणेकडील देश

१ लंका, २ कालाजिन, ३ सौरिकीर्ण, ४ तालिकट, ५ गिरिनगर, ६ मलय, ७ दर्दुर, ८ महेन्द्र, ९ मालिन्ध, १० भरुकच्छ ११ कुक्कुट, १२ टंकण, १३ वनवासी, १४ .शिबिक, १५ फणिकार, १६ कोङ्कण,१७ आभीर, १८ आकर, १९ वेण, २०गवन्तक, २१ देशपुर, २२ गोनन्द, २३ केरलक, २४ कर्णाट, २५ महाटवि, २६ चित्रकूट, २७ नासिक्य, २८ कोल्लगिरि, २९ चोल, ३० क्रौञ्चद्वीप, ३१ जटाधर, ३२ कावेर्य, ३३ ऋष्यमूक, ३४ वैडूर्य, शङ्ख, मुक्तधर्म पट्टण ( बेट, ) ३५ गणराज्य, ३६ कृष्णवेल्लर, ३७ पिशिक, ३८ शूर्पाद्रि, ३९ कुसुमनग ( पर्वत) ४० तुंगवन, ४१ कार्मणेयक, ४२ ,दक्षिणसमद्र, ४३ तापसाश्रम, ४४ काञ्ची, ४५ मरुचीपट्टन, ४६ चेर्य, ४७ आर्यक, ४८ सिंहल, ४९ ऋषभ, ५० बलदेवपट्टन ५१ दण्डकावन, ५२ तिमिंगलाजन, ५३ भद्र, ५४ कच्छ, ५५ कुञ्जरदरी,

५६ ताम्रपर्णी,

## नैऋत्य दिशेकडील लोक.

१ पल्हव, २ काम्बोज, ३ सिन्धु, ४ सौवीर, ५ वडवामुखरव, ६ अंबष्ठ, ७ कपिल, ८ नारीमुख, ९ आनर्त, १० फेनगिरी, ११ यावन, १२ माकर, १३ कर्णप्रापेय, १४ पारशव, १५ शूद्र, १६ बर्बर, १७ किरात, १८ क्रव्याश, १९ आभीर, २० चंचूक, २१ हेमगिरि, २२ सिन्धुकालक, २३ रैवतक, २४ सुराश्व, ( ष्ट्र ) २५ बादरिद्रविड, ( पलिकडे महासागर )

एकूण २५

## पश्चिम दिशेकडील लोक

१ मणिमान्, २ मेघमान्, ३ घनौघ,: ४ क्षुरर्पण, ५ अस्तगिरि, ६ अपरान्तिक, ७ शान्तिक, ८ हैहय, ९ प्रशस्ताद्रि, १० वोक्काण, ११ पंचनद, १२ रमठ, १३ पारत, १४ वारक्षिति, १५ जृङ्गवैश्य १६ कनकशक व इतर म्लेच्छ.

एकूण १६

## वायव्य दिशा.

१ मांडव्य, २ तुखार, ३ तालहल, ४ मद्र, ५ अश्मक, ६ कुलूत ७ लहड, ८ स्त्रीराज्य, ९ नृसिंह, १० वनखस्थ, ११ वेणुमतीं, १२ फल्गुलुक, १३ गुरुह, १४ मरुकुञ्ज, १५ चर्मरङ्ग, १५ एकविलोचन, १७ शूलिक, १८ दीर्घग्रीव, १९ आस्यकेश;

एकूण १९

## उत्तर दिशा.

१ कैलास पर्वत, २ हिमवान् पर्वत ३ वसुमान् पर्वत ४ धनुष्मान् पर्वत ५ क्रौंच पर्वत ६ मेरु पर्वत,--

१ उत्तर कुरु, २ क्षुद्रमीन, ३ कैकय, ४ वसाति, ५यामुन, ६ भोगप्रस्थ, ७ अर्जुनायन, ८ अग्नीध्र, ९ आदर्शान्त, १० त्रिगर्त ११ तुरगानन, १२ अश्वमुख, १३ केशधर १४ चिपिटनासिक, १५ दाशेरक, १६ शतधन, १७ तक्षशिला १८ पुष्कलावत, १९ कैलवत, २० कण्ठधन, २१ अम्बर २२ मुद्रक, २३ मालव, २४ पौरव, २५ कच्छार दण्ड, २६ पिङ्गलक, २७ माण, २८ हालहूण, २९ कोहल ३० शीलक, ३१ मांडव्य, ३२ भूतपुर, ३३ गांधार ३४ यशोवति, ३५ हेमताल, ३६ खचरगन्य, ३७ यौधेय, ३८ दासमेय, ३९ श्यमाक, ४० क्षेमधूर्त,

एकूण ४०

## ईशान्य दिशा.

१ मेरुक, २ नष्टराज्य, ३ पशुपाल, ४ कीर, ५ काश्मीर ६ अभिसार, ७ दरद, ८ तङ्गण, ९ कुलूत, १० सैरिन्ध, ११ वनराष्ट्र १२ ब्रह्मपुर, १३ दार्व, १४ डामर, १५ वनराज्य, १६ किरात, १७ चीन, १८ कौनिन्द, १९ भल्लापलोल, २० जटासुर, २१ कुवठ, २२ खश, २३ घोष, २४ कुभिक २५ एकचरण, २६ अनुविश्व, २७ सुपर्णभू, २८ वसुवन, २९ दिविष्ठ, ३० पौरव, ३१ चीरनिवसन, ३२ त्रिनेत्र, ३३ मुञ्ज, ३४ अद्रिगन्धर्व,

एकूण ३४

एकूण ३२+३३+२८+५६+१६+१९+४०+३४=२८३

या नामावलीसंबंधानें एवढी सूचना देणें अवश्य आहे कीं, तीं येथें, दिल्याप्रमाणेंच हुबेहुब वहारमिहिराचेहि मनांत होती याविषयीं आम्हाला खात्री देतां येत नाहीं. कारण, त्याच्या आर्यांचा आम्हीं जो पदच्छेद केला आहे त्यांत कांहीं चुकण्याचा संभव आहे. शिवाय हीं नांवे देशांचीं नसून कांहीं विशिष्ट लक्षणांमुळें निरनिराळीं चालू नांवें पडलेल्या लोकसमूहांची होत. त्यांतील दोन दोन किंवा तीन तीन किंवा अधिकहि एकाच राजाच्या राज्यांत रहात असतील. या यादींत एकंदर २८३ नांवें सांगितलीं आहेत व ही संख्या कांहीं लहान नव्हे. इ. स. ६०० च्या सुमारास ह्युएनत्संगानें तयार केलेल्या यादींत १५३ राज्यांची नांवें आलीं आहेत. अर्थात् या यादींत पूर्वीची इतिहास प्रसिद्ध नांवे आलेलीं नाहींत. असें जे दिसते त्याचा उलगडा वर सांगितल्याप्रमाणे सहज होतो. विशेषतः ह्युएनत्संगाने महाराष्ट्राचा उल्लेख केला असून वराहमिहिराच्या नामावलीत त्याचे नांव नाही. तेव्हां याचा खुलासा असा कीं, वराहमिहिराच्या वेळीं म्हणजे इ. स. ५०० च्या सुमारास अनेक लोकांना मिळून महाराष्ट्र असे नांव प्राप्त झालेले नव्हतें; पण त्या लोकांची सर्वसाधारण भाषा जी महाराष्ट्री ती इ. स. ६०० च्या पूर्वी पुष्कळ काळ प्रसिद्ध होतीच. वराहमिहिराच्या वेळीं बहुतकरून सर्व महाराष्ट्र एकाच राजाच्या अमलाखालीं नव्हता. तो पुढें चालुक्यांनीं आपल्या अमलाखालीं आणल्यावर सर्व महाराष्ट्र मिळून एक राज्य झालें व ह्मणून ह्युएनत्संगानें त्याचा स्वतंत्र राज्य ह्मणून उल्लेख केला. या नांवासंबंधानें आणखी असें आहे कीं, त्यांत दुसऱ्या कांहीं ग्रंथांत सांगितलेल्या लोकांचीं नांवेंहि आलेलीं आहेत. उदाहरण, रामायणामध्यें अयोध्या व पंजाब यांच्या दरम्यान उज्जिहान नामक देशाचा उल्लेख आहे, ( उद्यानमुज्जिहानायाः इ० ) व वराहमिहिरानेंहि मध्य देशांत त्यांची गणना केली आहे. अशा प्रकारचे दुसरें नांव माध्यमिक हें होय. ग्रीक लोकांनीं जिंकलेल्या एका लोकांचें ते नांव आहे ( व महाभाष्यकार पतंजलीनें त्यांचा उल्लेख केला आहे हे प्रसिद्ध आहे ). ते राजपुतान्याच्या एका भागांत रहाणारे असावे. उपज्योतिष हें नांव उकलण्यासारखे नाहीं, पण प्राग्ज्योतिष नांवावरून त्याचें सत्यत्व

मात्र स्थापित होतें. धर्मारण्य हें नांव महत्वाचें आहे. पुराणांत तें क्षेत्र ह्मणून प्रसिद्ध असून मोड ब्राह्मण व मोड वाणी मूळ तिकडून आले असें म्हणतात. गंगा व यमुना यांच्या दरम्यान तें कोठें तरी आसावें एवढें खरें, पण त्याचें नक्की ठिकाण सांगतां येत नाहीं. या यादींत मध्यदेशांत गुड म्हणून जो देश आलेला आहे, तो गौडांचें मूलस्थान होय. त्यालाच बाणभट्टानें श्रीकण्ठ आणि ह्युएनत्संगानें ठाणेश्वर ह्मटलें असून तें कुरुक्षेत्रांत आहे. औदुम्बर आणि कपिस्थल हे पंजाबाच्या पूर्वभागांत सांगितले आहेत, त्यावरून मध्य भारतवर्ष म्हणजे वराहमिहिराच्या मतें सतलज व राबी यांच्या उगमापासून हिमालयाच्या पायथ्याला धरून प्रयागपर्यंत दक्षिणेकडे गेलेला व तेथून यमुनेच्या दक्षिण तीरापासून पश्चिमेकडे जयपुरापर्यंत जाऊन नंतर उत्तरेकडे वळलेला असा टापू असला पाहिजे. तो वर्तुळाकार होता असा बहुधा समज होता. त्याच्या पश्चिमेस मरु ऊर्फ मारवाड प्रांत असून गंगा यमुनांच्या संगमाजवळचा वत्सदेश पूर्व हद्दीवर होता. मध्य भारतवर्षांत सांगितलेला परियात्र नग हाही महत्वाचा असून राजपुतान्यांतील एखाद्या डोंगराच्या ओळीचें तें नांव असलें पाहिजे.

पूर्व दिशेकडील देशांत वराहमिहिरानें क्षीरोदधि म्हणजे दुधाचा सागर ह्या पौराणिक प्रदेशाचें नांव दिलें आहे. त्यांत सुह्म म्हणून जें नांव आहे तें ब्रह्मदेशाचे आहे असें आम्हीं समजतों. याशिवाय बंगाल प्रांतांतील कांहीं ओळखीचीं नांवें या भागांत सांगितलेलीं आहेत. त्यांतील समतट ( पूर्व बंगाल ) हेंहि एक आहे. पण गमतीची गोष्ट अशी आहे कीं, वंग हें नांव पूर्वेकडील म्हणून दिलें नसून आग्नेयीकडील भागांत दिलें आहे. तसेंच त्यांत उपवंग म्हणून जें नांव आहे त्याचा इतर कोठें पत्ताच लागत नाहीं. ताम्रलिप्ति व उत्कल जर पूर्वेकडे म्हणून सांगितलीं आहेत, तर वंगच तेवढें आग्नेयीकडे कसें गेलें ? अंग देशहि आग्नेयीसच सांगितलेला असल्यामुळें हीं दोन्हीं नांवें कोडींच होऊन बसलीं आहेत.

आग्नेय भागांत कोशल हें पुनः आलेलें आहे, तें अर्थात् हैहयांचें महाकोशलच असलें पाहिजे. वराहमिहिराच्या भारतवर्षाचा मध्य दिल्लीजवळ मानिल्यास विदर्भ, आन्ध्र, चेदि इत्यादि देश आग्नेयीकडे सांगितले

आहेत तें ठीकच दिसतें. किष्किंधा आणि दशार्ण हे दोन्ही विन्ध्यपर्वताच्या लगतच आहेत.

दक्षिण भागांत इतक्या लोकांची नांवें सांगितलीं आहेत कीं, सकृद्दर्शनीं तें जरा चमत्कारीकच दिसतें. परंतु खरा प्रकार असा आहे कीं, दिल्लीपासून खालीं सिंहलद्वीपापर्यंत गेलें असतां किती लोक दिसतील तें पाहिलें पाहिजे. तरी एकदरींत दक्षिणेकडील बऱ्याच नांवांची ओळख पटत नाहीं एवढें खरें. महाराष्ट्राचें नांव त्यांत नाहीं व त्याचें कारण आम्हाला वाटतें तें पूर्वी सांगितलेंच आहे. दशरूप आणि अवन्ति मिळून हल्लींचा माळवा झालेला आहे. म्हणजे तो मध्य भारतवर्षाच्या बाहेर गेला हें उघड आहे. यादींत दक्षिण समुद्र सांगितला आहे तो ठीकच आहे. तसेंच महासागर म्हणून नैऋत्येकडे सांगून त्याजवळ सिन्धु, सौवीर आणि सुराष्ट्र म्हणजे गुजराथ व काठेवाड यांचीं नांवें दिलीं आहेत तेंहि योग्यच आहे. पण कच्छ प्रांत दक्षिण भागांत दिला आहे तें चमत्कारिक वाटतें.

पश्चिम भागांतील देशांची संख्या मात्र बरीच लहान आहे. त्यांतील अस्तगिरि ठिकाणींच आहे. पंचनद ह्मणजे पंजाबचा नैऋत्य भाग होय; त्याच्या पलीकडे अनेक म्लेच्छ लोक सांगितले आहेत. यांतील अपरान्त नांव हें दुसरें एक गूढ आहे. महाभारतांतील अपरान्त म्हणजे हल्लींचा ठाणें जिल्ह्याचा उत्तर कोंकणाचा प्रदेश व त्याची राजधानी शूर्पारक ह्मणजे हल्लींचा सोपारा. पण तो मध्य भागाच्या पश्चिमेस नाहीं. वायव्य कडील भागांत पंजाबांतील कांहीं लोकांचीं नांवें दिलीं आहेत. त्यांतील लहद हें नांव किंचित रूपान्तरानें पंजाबी भाषेच्या एका पोटभेदाचें सांप्रत दृष्टीस पडतें.

भारतवर्षाच्या उत्तरेस हिमालय पर्वत आहे हें सांगावयास नकोच. त्याच्या जोडीला सदर यादींत कैलास, मेरु, वसुमान् क्रौञ्च इत्यादि नांवें आलीं आहेत. तीं वस्तुतः लोकांचीं नसलीं तरी त्या पर्वतांजवळ रहाणाऱ्या लोकांबद्दल घातलेलीं असलीं पाहिजेत. त्यांत पुराणप्रसिद्ध उत्तर कुरूचेंहि नांव आहे. पंजाबांतील प्रमुख लोकांचीं नांवें वस्तुतः वायव्य भागांत यावयास पाहिजे होतीं, तथापि गांधारापर्यंतचीं तीं सर्व उत्तर भागांतच दिलीं आहेत.

पण काश्मीर मात्र उत्तर किंवा वायव्य यांत कोठेंच न सांगतां ईशान्य भागांत सांगून त्या बरोबर दरद, तंगण. कुलूत, अभिसार ( दार्वाभिसार ) हींहि दिलीं आहेत. डामर म्हणून जे लोक काश्मीरच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत त्यांचे देखील नांव यादींत आलेले आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्यांच्याविषयीं आम्हाला किंचित् शंका होती. पण ते उत्तरेकडील मंगोलियन लोकांपैकीं असून त्यांच्या बरोबर नीच, किरात ( नेपाळी लोक, पण नेपाळ नांव मात्र त्यांत आलेले नाही ) आणि कुनिन्द ( कानेत ) हेलोक सांगितलेले आहे तेहि बरोबर आहे.

## ४. ह्युएनत्संगानें वर्णिलेले हिंदुस्थानांतील इ. स. ६३० चे सुमाराचे देश.

१ कपिश ( काबूल व काफ्रिस्तान. ). राजा क्षत्रिय बौद्ध. लोक साधारण बौद्ध.

( अ ) लंपाक अथवा लंपा ( लमधान ) पूर्वेस काळा पर्वत. वलांडून कपिशाचा अंकित. बौद्धेतर अधिक, भिक्षु थोडे. लोक वाईट चालीचे व उर्मठ.

( ब ) नगर ( जलालाबाद ) आग्नेयीसचपर्वत वलांडूनच कपिशाचे अंकित लोक बुद्धाचे मतानुयायी इतर धर्माचे थोडे.

( क ) गांधार० अग्नेयीस, सिंधुनदापर्यंत. कपिशाचा अंकित बहुतेक लोक इतर धर्माचे, शहरे व गांव उध्वस्त पाणिनीची जन्मभूमि

२ उद्यान ( स्वात ) उत्तरेस नद्या वलांडून. राजा अनुल्लिखित. लोक पूर्ण बौद्ध महायान मताचे.

३ तक्षशिला ( रावळपिंडि ) दक्षिणेस परतून व सिंधु उतरून. पूर्वी कपिशाचा अंकित आतां काश्मीरचा, लोक शूर बौद्धमतानुयायी.

( ब ) सिंहपूर ( केतास, खारापर्वत ) आग्नेयीस डोंगर वलांडून पश्चिम सरहद्द सिंधु. काश्मीरचा. अंकित. ( लोकवर्णन नाहीं )

( क ) उरश ( हरिपूर ) झेलम. सदरप्रमाणें लोक बौद्धेतर

३ काश्मीर, आग्नेयीस. राजांचे रक्षण नाग करतो. लोक दोन्ही धर्मांचे, सुरेख, विद्याव्यासंगी परंतु फसविणारे.

( अ ) पुनाच वाव्येस काश्मीरचा अंकित

( ब ) राजपुर ( राजोरी ) अग्नेयीस सदरप्रमाणें बौद्धेतर अधिक.

४ टेक्क ( जुनी राजधानी शाकल उर्फ सियालकोट ) आग्नेयीस पश्चिमेस सिंधुनदापर्यंत, बियास पूर्वेस. राजा अनुल्लिखित. बुद्धानुयायी थोडे बहुतेक देवांचे भक्त येथून राजरस्त्यावर विश्रांतिगृहें लागतात.

५ चीनभुक्ति ( पूर्वेस जातां ) मिहिरकुल एक प्राचीन राजा हिंदु-धर्म व बौद्धधर्म दोन्हीं चालू संघाराम नाहींत. देवांचीं देवळें ९.

६ जालंधर ( जलंधर ) ईशान्य. एक पूर्व राजा बौद्धधर्माचा पूर्ण अधिकारी होता. संघाराम ९० देव देवळे ३ त्यांत **पाशुपत मताचे संन्यासी होते.**

७ कुलूत ( कुलु ) ईशान्येस, डोंगरांत.† संघाराम २० देवळें १५

८ शतद्रु दक्षिणेस जातां, सतलजनदी पश्चिमेस हद्द.† लोक पूर्ण बौद्ध.

९ पारियात्र ( वैराट ) नैऋत्येस. वैश्यजातीय राजा. संघाराम ८ मोडकळीस आलेले. १० देवळे आणि १००० संन्यासी.

१० मथुरा. पूर्वेस.† लोक नीतिमान् व बुद्धिमान् २० संघाराम २००० भिक्षु आणि ५ देवळें.

११ स्थानेश्वर ईशान्येस.† बहुतेक हिंदु. संघाराम ३, आणि देवळें १०० येथे भगवद्गीतेचा थोडासा उल्लेख आहे.

१२ स्रुघ्न. ईशान्येस. यमुनामध्यें वाहते. हिमालय उत्तरस आणि गंगा पूर्वेस.† देवळें १००, हिंदुधर्मी बहुतेक.

१३ मतिपूर ( पश्चिम रोहिलखंड ) गंगा उतरून पूर्वेस. शूद्रजातीय हिंदुराजा. बौद्धधर्म आणि इतर धर्मसारखे प्रबळ.

१४ ब्रह्मपर. उत्तरेस† संघाराम ५. थोडे भिक्षुक. देवळें १०.

१५ गोविषाण ( काशिपुर ) मतिपुराच्या आग्नेयीस† लोक शुद्ध आणि खऱ्या अंतःकरणाचे ज्ञानार्जनाचे भोक्ते, परंतु बहुतेक बौद्धतर व संसारासक्त.

१६ अहिच्छत्र ( पूर्वरोहिलखंड पिलीभीत ) आग्नेयीस संघाराम २० देवळें ९ तीनशे पाशुपत संन्यासी.

१७ पिलोशन. गंगा उतरून दक्षिणेस लोक मुख्यतः हिंदु.

१८ सांकाश्य ( कपित्थ ) आग्नेयीस.† संघाराम ४ देवळे १०, हिंदु शैवमताचे.

१९ कनोज. आग्नेयीस. राजधानी गंगेच्या पूर्वेस वैश्यजातीय श्रीहर्ष लोक स्वधर्मी व विधर्मी सारखे. राजधानींत सूर्याचे आणि महेश्वराचे प्रसिद्ध देऊळ. लोक दिसण्यांत तेजस्वी. पोषाक रेशमी. विद्या आणि कला यांची अभिवृद्धि.

२० अयुते ( अयोध्या ) आग्नेयीस गंगा उतरून.† संघाराम १०० भिक्षु ३००० देवळे १०, हिंदु थोडे. वसुबंधु आणि असंग यांनीं येथे उपदेश केला.

२१ अयोमुख. पूर्वेस. गंगा ( अन्यनदी ) उतरून.† लोक सारखे विभागलेले. संघाराम ५ देवळें १०.

२२ प्रयाग. आग्नेयीस. गंगेच्या दक्षिणेस यमुनेच्या उत्तरेस. बहुतेक लोक हिंदु. एका देवळासमोर एक मोठा वटवृक्ष ज्यावरून लोक खालीं उडी टाकून प्राण देत. संगमावरही लोक स्नान करून प्रायोपवेशनाने प्राण देत.

२३ कोशांबी, अरण्यांतून नैऋत्येस. प्राचीन राजा उदयम याने चंदनाची केलेली बुद्धाची मूर्ति राजवाड्याच्या देवळांत अद्याप आहे. हिंदूच विशेषतः अधिक आहेत.

२४ विशोक. उत्तरेस.† हिंदु अधिक.

२५ श्रावस्ती ( कोशल ) ईशान्येस. बुद्धकाळी, राजा प्रसनजित लोक इमानी व ज्ञानाचे भोक्ते. हिंदु अधिक.

२६ कपिलवस्तु ( उजाड देश ) अग्नेयीस प्रत्येक शहरीं स्वतंत्र राजा एक हजार संघाराम उध्वस्त पडलेले, देव मंदिरें २.

२७ रामग्राम ( देश उजाड ) अरण्यांतून पूर्वेस. हीं राज्यें दिसत नाहींत बुद्धाच्या चरित्रांतील पवित्र स्थळें असल्यानें प्रसिद्ध होतीं.

२८ कुशीनगर ( उजाड ) ईशान्येस.†

२९ बनारस ( गंगा पश्चिमेस ) नैॠत्येस.† बौद्ध थोडे. बहुतेक इतर धर्मी. लोक सौम्य व सभ्य अधिकांश शिवभक्त. शिवाची एक शंभर फूट उंच भव्य भयंकर धातूची मूर्ती होती.

३० चंचू ( यौधेय ? ) गंगा किनाऱ्यानें पूर्वेस.† संघाराम १० देवमंदिरें २० गंगेच्या दक्षिणेस एका महाशाळेंत सर्वच ब्राह्मण राहतात, बौद्ध मुळीच नाहींत. गंगेच्या उत्तरेस एका मंदिरांत नारायणाची फारच सुंदर मूर्ती.

३१ वैशाली. गंगा उतरून ईशान्येस.† लोक दोन्ही धर्माचे. येथें दिगंबरही आहेत.

३२ वृज्जी ईशान्येस.† बौद्ध थोडे. बहुतेक इतर धर्माचे.

३३ नेपाळ हिमालयांत. येथील राजे क्षत्रिय आहेत. ते विख्यात विद्वान असून बुद्धानुयायि आहेत. अंशुवर्मा नांवाच्या थोड्याच पूर्वी झालेल्या राजानें निरुक्तांवर एक ग्रंथ लिहिला आहे. लोक धटिंगण व फसवणारे, दिसण्यांत कुरूप, पण कारागीर आहेत. दोन्ही धर्मांचे मानणारे. संघाराम आणि मंदिरे एकमेकांस लागून आहेत.

३४ मगध दक्षिणेस गंगा उतरून पूर्वीची राजधानी राजगृह हल्लींची पाटलीपुत्र. सुवासिक तांदुळ येथें होतो. पूर्णवर्मा राजा नुकताच झाला. त्यापाशीं एक क्षत्रजातीय जयसेन नामक प्रसिद्ध बौद्ध विद्वान होता. लोक इमानी, विद्याव्यासंगी आणि बुद्धानुयायी. दक्षिणेस गया येथें हजार ब्राह्मण कुटुंबें होतीं हीं गयऋषीची वंशज असून त्यांजवर राजांची सत्ता नाहीं व सर्वलोक त्यांस मानतात.

नालंदामठ राजगृहाच्या पूर्वेस ( हल्लींच्या बुरगांवाजवळ ) पुराणे बौद्ध विद्यालय. बालादित्य वगैरेनीं बांधलें. १०० गांव इनाम चालतात. येथें राजा नाहीं

३५ हिरण्यपर्वत ( मोंघीर ) पूर्वेस राजधानी गंगेवर, उत्तर किनारा. शेजारच्या राजाने राज्य जिंकले आहे. संघाराम १० देवमंदिरें २० राजधानीजवळ गंगाकिनारी एक डोंगर आहे त्यावर पिढयानुपिढया ऋषि राहतात. त्यांची विद्या अद्याप मंदिरांतून जपून ठेविली आहे.

३६ चंपा ( भागलपूर ) पूर्वेस. राजधानी गंगेच्या दक्षिणेस. दक्षिणेकडच्या जंगलांत हत्तीचे कळप अनेक आहेत.† संघाराम मोडकळीस आलेले. गंगेच्या दक्षिण किनाऱ्यावर बेटांत एक सुंदर देवमंदिर.

३७ कजुगल ( राजमहाल ). राजा नाहीं. दुसऱ्याचे अंकित. संघाराम ६, देवमंदिर १०.

३८ पुंड्रवर्धन ( रंगपूर ) पूर्वेस.† संघाराम २०, देवमंदिरें १००, दिगंबर निग्रंथही आहेत.

३९ कामरूप ( आसाम ) पूर्वेस एक मोठीं नदी वलांडून राजा ब्राह्मण नारायण देवाचा वंशज, नांव भास्कर वर्मा. अन्य नांव कुमार. लोक ठेगणे भाषा निराळी बुद्धानुयायी नाहींत. देवमंदिरें शेंकडों, कांहीं बौद्ध छपून पूजा करतात.

४० समतट ( राजधानी. जेसोर )† संघाराम ३०, देवमंदिरें १०० दिगंबर निग्रंथ अनेक.

४१ ताम्रलिप्ति ( मिदनापूर, ) पश्चिमेस. राजधानी समुद्रावर खुषकी आणि जलमार्ग येथें मिळतात.† बौद्ध संघाराम १०, देव मंदिरें १००,

४२ कर्णसुवर्ण ( मुर्शिदाबाद ) ईशान्येस, राजा शशांक ( गुप्त इनस्क्रिप्शन.) २८२लोक विद्याभिय. संघाराम १० देव मंदिरें १०० इतर धर्माचे लोक·

४३ ओड्र ( ओरिसा. ) नैऋत्येस. पूर्वेस समुद्र. आग्नेयीस सिंहल द्वीपास जाण्याचें बंदर,† लोकांस बुद्धादर. भाषा व रिवाज मध्यहिंदुस्थानाहून भिन्न. फळें इतर ठिकाणाहून मोठीं. संघाराम १००, मंदिरें २०, बौद्ध लक्षावधि.

४४ कांगुटो. नैऋत्येस. डोंगर आणि समुद्र वलांडून† लोक उंच, काळे, शूर. लिपि एक पण भाषा भिन्न. बौद्ध नाहींत. सुमारें मंदिरें १००, तीर्थिक दहा हजार.

४५ कलिंग, नैऋत्येस.† लोक हट्टी. परंतु गोरवर्ण व सभ्य भाषी. भाषण आणि रिवाज मध्यहिंदुस्थानाहून भिन्न. बौद्ध थोडे. इतर धर्माचे बहुतेक. मंदिरे १०० त्यांत निग्रंथ अधिक.

४६ कोसल ( नागार्जुनाचा देश ) सभोंवार डोंगर क्षत्रिय बौद्ध धर्मी राजा. लोक उंच, काळे दोन्ही धर्माचे, संघाराम १००.

४७ आंध्र—कोसलाच्या दक्षिणेस.† लोक संतापी भाषा मध्य हिं. भिन्न. सघाराम १००, लोक भिन्न, भिन्न धर्माचे.

४८ धनककट. ( कृष्णेवर अमरावती राजधानी ) दक्षिणेस† लोक काळे. संघाराम उध्वस्त. देवळे १०० इतर धर्मी पुष्कळ आहेत.

४९ चोळ, नैऋत्येस† लोक क्रूर आणि जैनी तीर्थिकांचे मतानुयायी संघाराम पडलेले. मंदिरे कित्येक दसक. दिगंबर अधिक.

५० द्रविड दक्षिणेस सिंहलास जाण्याचे बंदर.† लोक शूर आणि इमानी विद्येचे चाहते. लिपी आणि भाषा मध्यहि. फारशी भिन्न नाहीं. संघाराम १००, ८० वर मदिरें. दिगंबरांचीं अधिक.

५१ मलयकूट कांचीच्या दक्षिणेस मोत्यांची वखार. सिंहलाचे बंदर. दक्षिणेस समुद्राजवळ मलयपर्वत ज्यावर चंदन, कापुर व इतर मौल्यवान वृक्ष, पूर्वेस पोतालक पर्वतावर पोतालशी ( ? ) सरोवर.† लोक धर्मविषयीं उदासीन. काळे आणि गर्वीत मात्र चांगले. संघाराम मोठे. शेंकडों मंदिरें. दिगंबर अधिक.

५२ कोंकण, द्रविडाचे उत्तरेस.† संघाराम १००. राजधानीजवळ ताडांचें बन' या ताडांच्या पानाचा लिहिण्यास उपयोग करितात.

५३ महाराष्ट्र वायव्येस. एका मोठ्या नदीच्या पूर्वेस राजधानी. राजा पुळकेशी. लोक लढवय्ये आणि विद्याव्यासंगी. दोन्ही धर्माचे. देशाच्या पूर्वेस एका डोंगरांत लेणींकोरलीं आहे त.

५४ भरुकच्छ. पश्चिमेस, नर्मदा वलांडून † लोक अडाणि आणि धोकेबाज. दोन्ही धर्मांचे. चरितार्थ समुद्रावरचा व्यापार आणि कारागिरी.

५५ मालव वायव्येस जातां, राजधानी महीनदीवर. साठवर्षांपूर्वी एक नामांकित राजा शिलादित्य राज्य करीत होता. त्यानें राजवाड्यापाशीं सुंदर बौद्धमंदिर बांधिलें आहे. लोक विद्वान, नैऋत्येकडे माळव आणि ईशान्येकडे मगध या दोन देशांत विद्वत्तेची किंमत आहे. लोक दोन्ही धर्मांचे

५६ अटाळी ( अज्ञात ) वायव्येस† लोक व्यापारी व श्रीमंत. जमीन रेताळ फळपुष्प कमी. भाषा वगैरे माळव्याप्रमाणें परंतु बौद्धमतांविषयीं अनादर. देवांची भक्ति विशेष. ( ह्युएनत्संग येथें बहुधा गेला नाहीं. )

५६ कित ( कच्छ ) माळव्याहून वायव्येस. मालवाचे अंकित लोक माळवा प्रमाणेंच. देवांचे भक्त मात्र अधिक.

५८ वलभी उत्तरेस जातां. क्षत्रिय जातीचा राजा माळव्याच्या शिलादित्याचा भाचा, आणि कनोजाधिपति हर्षाचा जांवई. तरुण आणि धांदल्या, परंतु पक्का बौद्ध. नांव ध्रवभट. देश माळव्याप्रमाणें व लोक श्रीमंत आणि उत्कर्षयुक्त. शेंकडों मंदिरें संघाराम १००.

५९ आनंदपुर. वायव्येस मालवाचा अंकित. जमीन सुपीक. उत्पन्न, हवा लिपी आणि लोकरिवाज माळव्याप्रमाणे. संघाराम १० वर.

६० सुराष्ट्र. पश्चिमेस, मही पूर्व बाजूस माळव्याचा अंकित. लोक धनाढ्य आणि उत्कर्षयुक्त परंतु उर्मट दोन्ही धर्मांचे. संघाराम १० मंदिरें १०० राजधानी जवळच्या उशंत पर्वतावर ( गिरनार ) अतिमानुष ऋषि राहातात जमीन काळीं, वादळें वारंवार. लोक समुद्राचा उपयोग व्यापारासाठीं करतात.

६१ गुर्जर, वलभीच्या उत्तरेस राजधानी भिनमाळ. क्षत्रिय जातींचा तरुण राजा. शौर्य आणि शहाणपणाविषयीं प्रख्यात, व पक्का बौद्ध, लोक गजबजलेले परंतु बहुतेक इतर धर्मी. संघाराम ३० मंदिरें, १० देश सुराष्ट्रासारखा.

६२ उज्जनी. वायव्येस. अशोककालीन येथें एक कारागृह होतें. राजा ब्राह्मण हिंदुधर्माचा. लोक संपन्न आणि उत्कर्षयुक्त, बौद्ध थोडे. संघाराम उध्वस्त मंदिरें १०

६३ चिचिटो. ईशान्येस. राजा ब्राह्मण परंतु बौद्धेतर. बहुतेक लोक बौद्धेतर, गहूं आणि डाळ मुख्य उत्पन्न.

६४ महेश्वरपुर. उत्तरेस. राजा ब्राह्मण परंतु बौद्धेतर. लोक बौद्धेतर. बहुतेक पाशुपत मताचे.

६५ सिंध. महेश्वरपुराहून गुर्जरास परतून, अरण्यमय व रेताळ देश वलांडून उत्तरेस सिंधुनद उतरून. शूद्रजातीय बौधधर्मी राजा. लोक तंटेखोर परंतु पूर्ण बौद्धमतानुयायी. संघाराम कित्येक शत आणि भिक्षु १००००, मंदिरें ३०. गहूं, उंट, खेचरें हे मुख्य उत्पन्न. सिंधुनदीच्या मुखाजवळील सखल मुलखांत लाखो कुटुंबें राहतात. दिसण्यांत भिक्षु परंतु जीव घेणें हा त्यांचा मुख्य तद्योग.

६६ मूलस्थानपूर पूर्वेस सिंधु उतरून. टेक्क देशाचे अंकित. लोक सचोटीदार आणि नीतिमान् पण बौद्ध थोडे. सूर्यमंदिर प्रसिद्ध. मूर्ति तेजस्वी सोन्याची आणि रत्नांनी शृंगारलेली. या मंदिरांत सारखें स्त्रियांचे गाणें सुरू असतें.

६७ पोफाटो (?) ईशान्येस. वरघाटी. टेक्कचे अंकित. बौद्ध संघाराम १०

६८ पोचियो (?) सिंधचे नैऋत्येस. राजधानी पश्चिमेस समुद्रावर. सिंधचे अंकित. संघाराम ८० राजधानींत एक महेश्वराचें देऊळ असून त्या मूर्तींत कांहीं साक्षा आहे.

६९ लांघल (?मक्रान) पश्चिमेस. इराणचे अंकित. लिपि हिंदुस्थानासारखी; परंतु भाषा निराळी. लोक दोन्ही धर्मांचे. संघाराम १०० वर मंदिरें शेंकडों. विशेषतः पाशुपत.

७० पीतशिला (?) सिंधचे अंकित राजधानींत एक महेश्वराचे मंदिर.

७१ अफंट (अवंदः) ईशान्येस† लोक संतापी परंतु खरे बौद्ध. भाषा हिंदुस्थानाहून, भिन्न संघाराम २०, देव मंदिरें १५

७२ फलाना (वरण–अथवा बन्नु). कपिशाचे अंकित. लोक धाडसी व क्रूर. दोन्ही धर्मांचे. बौद्ध संघाराम कित्येक दशक देवमंदिरें ५ विशेषतः पाशुपत.

## ५–वाचकांच्या विशेष माहितीकरितां तीन महत्वाचे शिलालेख अक्षरशः पुढें दिले आहेत.

### ( १ ) अफसड येथील आदित्यसेनाचा शिलालेख.

ॐ. आसीद्दन्तिसहस्रगाढकटको विद्याधराध्यासितः ॥
सद्वंशः स्थिर उन्नतो गिरिरिव श्रीकृष्णगुप्तो नृपः ॥
दृप्तारातिमदान्धवारणघटाकुम्भस्थलीः क्षुंदता ॥
यस्यासंख्यरिपुप्रतापजयिना दोष्णा मृगेन्द्रायितम् ॥ १ ॥
सकलः कलंकरहितः क्षततिमिरस्तोयधेः शशांक इव ॥
तस्मादुदपादि सुतो देवः श्रीहर्षगुप्त इति ॥ २ ॥
यो योग्याकालहेलावनतदृढधनुर्भीमबाणौघपाती ॥
मूर्तैः स्वस्वामिलक्ष्मीवसतिविभुखितैरीक्षितःसाश्रुपातम् ॥
घोराणामाहवानां लिखितमिव जयं श्लाघ्यमाविर्दधानो ॥
वक्षस्युद्दामशस्त्रव्रणकठिनकिणग्रन्थिलेखाच्छलेन ॥ ३ ॥
श्रीजीवितगुप्तोऽभूत् क्षितीशचूडामणिः सुतस्तस्य ॥
यो दृप्तवैरिनारीमुखनलिनवनिकशिशिरकरः ॥ ४ ॥
मुक्तामुक्तपयःप्रवाहशिशिरासूत्तुंगतालीवन–।
भ्राम्यद्दन्तिकरावलूनकदलीकाण्डासु वेलास्वपि ॥
द्योतत्स्फारतुषारनिर्झरपयःशीतेऽपिशैले स्थितान् ।
यस्योच्चैर्द्विषतो मुमोच न महाघोरः प्रतापज्वरः ॥ ५ ॥
यस्यातिमानुषं कर्म दृश्यते विस्मयाज्जनौघेन ।
अद्यापि कोशवर्धनतटात् प्लुतं पवनजस्येव ॥ ६ ॥
प्रख्यातशक्तिमाजिषु पुरःसरं श्रीकुमारगुप्तमिति ।
अजनयदेकं स नृपो हर इव शिखिवाहनं तनयम् ॥ ७ ॥
उत्सर्पद्वातहेलाचलितकदलिकावीचिमालावितानः ।
प्रोद्यद्धूलीजलौघभ्रमितगुरुमहामत्तमातंगशैलः ॥
भीमः श्रीशानवर्मक्षितिपतिशशिनः सैन्यदुग्धोपसिंधु–।
लक्ष्मीसंप्राप्तिहेतुः सपदि विमथितो मन्दरीभूय येन ॥ ८ ॥

शौर्यसत्यव्रतधरो यः प्रयागगतो धने ।
अम्भसीव करीषाग्नौ मग्नः सत्पुष्पपूजितः ॥ ९ ॥
श्रीदामोदरगुप्तोऽभूत्तनयस्तस्य भूपतेः ।
येन दामोदरेणेव दैत्या इव हता द्विषः ॥ १० ॥
यो मौखरेः समितिषूद्धतहूणसैन्या ।
वल्गद्घटा विघटयन्नुरुवारणानाम् ॥
सम्मूर्छितः सुरवधूर्वरयन्ममेति ।
तत्पाणिपंकजसुखस्पर्शाद्विबुद्धः ॥ ११ ॥
गुणवद्विजकन्यानां नानालंकारयौवनवतीनाम् ।
परिणायितवान स नृपः शतं निसृष्टाग्रहाराणाम् ॥ १२ ॥
श्रीमहासेनगुप्तोऽभूत्तस्माद्वीराग्रणीः सुतः ।
सर्ववीरसमाजेषु लेभे यो धुरि वीरताम् ॥ १३ ॥
श्रीमत्सुस्थितवर्मयुद्धविजयश्लाघापदांकं मुहु-।
र्यस्याद्यापि विबुद्धकुन्दकुमुदक्षुण्णाच्छहाराततम् ।
लोहित्यस्य तटेषु शीतलतलेषूत्फुल्लनागद्रुम-।
च्छायासुप्तविबुद्धसिद्धमिथुनैः स्फीतं यशो गीयते ॥ १४ ॥
वसुदेवादिव तस्माच्छ्रीसेवनशोदितचरणयुगः ।
श्रीमाधवगुप्तोऽभून्माधव इव विक्रमैकरसः ॥ १५ ॥
---˘ अनुस्मृतो धुरि रणे श्लाघावतामग्रणीः ।
सौजन्यस्य निधानमर्थनिचयत्यागोद्धुराणां ध ( व ? ) रः ॥
लक्ष्मीसत्यसरस्वती कुलगृहं धर्मस्य सेतुर्दृढः ।
पूज्यो नास्ति स भूतले ˘˘˘ ---- सद्गुणैः ॥ १६ ॥
चक्रं पाणितलेन सोऽप्युदवहत्तस्याऽपि शार्ङ्गं धनु-।
र्नाशायासुहृदां सुखाय सुहृदां तस्याप्यसिर्नन्दकः ॥
प्राप्ते विद्विषतां वधे प्रतिहत ( - ) तेना प [ --˘ - ] ।

आजौ मयां बिनिहता बलिनो द्विशन्तः ।
कृत्यं न मेऽस्त्यपरमित्यवधार्य वीरः ॥
श्रीहर्षदेवनिजसंगमवाञ्छयाच ।
– – ˘ – ˘ ˘ ˘ – ˘ ˘ – ˘ – – ॥ १८ ॥
श्रीमान् बभूव दलितारिकरीन्द्रकुम्भ– ।
मुक्तारजःपटलपांसुलमण्डलाग्रः ।
आदित्यसेन इति तत्तनयः क्षितीश–।
चूडामणिर्द ˘ ˘ – ˘ ˘ – ˘ – ॥ १९ ॥
– – – ˘ ˘ – ˘ मागतमरिध्वं सीत्थमाप्तं यशः ।
श्लाध्यं सर्वधनुष्मतां पुर इति श्लाघ्यं परां विभ्रती ॥
आशीर्वादपरंपरा चिरसकृद् – – ˘ – – ˘ – ।
– – – ˘ ˘ – ˘ – ˘ ˘ ˘ – – – ˘ यामासभ ॥ २० ॥
आजौ स्वेदच्छलेन ध्वजपटशिखया मार्जितो दानपंकम् ।
खड्गं क्षुण्णोन मुक्तां शकळ सिकतिली कृत्य – – ˘ – – ॥
– – – – ˘ – – ˘ ˘ ˘ ˘ ˘ ˘ – मत्तमातंगघातम् ।
तद्गंधाकृष्टसर्पद्वहलपरिमलभ्रान्तमत्तालिजालम् ॥ २१ ॥
आबद्धभीमविकटभ्रुकुटी कठोर– ।
संग्राम – ˘ ˘ ˘ – ˘ ˘ – ˘ – – ॥
– – ˘ – ˘ ˘ व वल्लभ भृत्य वर्ग – ।
गोष्ठीषु पेशलतया परिहासशीलः ॥ २२ ॥
सत्यभर्तृ व्रता यस्य मुखोपधानतापसी ।
परिहास्– ˘ – – – – – – – – ˘ – ˘ – ॥ २३ ॥
– – – – ˘ –ज्ञः सकलरिपुबलध्वंसहेतुर्गरीयान् ।
यस्मिन्नशोत्खातघातश्रमजनितजडोऽप्यूर्जितस्वप्रतापः ॥
युद्धे मत्तेभकुम्भस्थल ˘ ˘ ˘ ˘ – – ˘ – – ˘ – – ।
– – श्वेतातपत्रस्थगितवसुमतीमण्डलो लोकपालः ॥ २४ ॥
आजौ मत्तगजेन्द्रकुम्भदलनस्फीतस्फुरद्दोर्युगो ।
ध्वस्तानेकरिपुप्रभाव ˘ ˘ – – –यशोमण्डलः ॥

न्यरताशेषनरेंद्रमौलिचरणस्फारप्रतापानलो ।
लक्ष्मीवान् समराभिमानविमलप्रख्यातकीर्तिर्नृपः ॥ २५ ॥
येनेयं शरहिन्दुबिम्बधवला प्रख्यातभूमण्डला ।
लक्ष्मीसंगमकांक्षया सुमहती कीर्तिरूरं कोपिता ॥
याता सागरपारमद्भुतरसा सापल्यवैरादहो ।
तेनेदं भवनोत्तमं क्षितिभुजा विष्णोः कृते कारितम् ॥ २६ ॥
तज्जनन्या महादेव्या श्रीमत्या कारितो मठः ।
धार्मिकेभ्यः स्वयं दत्तः सुरलोकगृहोपमः ॥ २७ ॥
शंखेन्दुस्फटिकप्रभाप्रतिसमस्फारस्फुरच्छीकरम् ।
नक्रकान्तिचलत्तरंगविलसत्पक्षिप्रनृत्यत्तिमि ॥
राज्ञा खानितमद्भुतं सुतपसा पेपीयमानं जनै- ।
स्तस्यैव प्रियभार्यया नरपतेः श्रीकोणदेव्या सरः ॥ २८ ॥
यावच्चन्द्रकला हरस्य शिरसि श्रीः शार्ङ्गिणो वक्षसि ।
ब्रह्मास्ये च सरस्वती कृत – – – – – ॥
भोगे भूर्भुजगाधिपस्य च ताडियावद्घनस्योदरे ।
तावत्कीर्तिमिहातनोति धवलामादित्यसेनो नृपः ॥ २९ ॥
सूक्ष्मशिवेन गौडेन प्रशस्तिर्विकटाक्षरा ।
– – –मामिता सम्यग्धार्मिकेण सुधीमता ॥ ३० ॥

## ( २ ) देवबरनाक येथील दुसरा जीवितगुप्त याचा शिलालेख.

......नमः । स्वस्ति शक्तित्रयोपात्त-जय-शब्दान्महानौहस्त्यश्वपत्तिसंभार-दुर्निवाराज्जयस्कन्धावारात् गोमतिकोट्टकसमीप वासकात्.........श्रीमाधवगुप्तः । तस्य पुत्रस्तत्पादानुध्यातः परमभट्टारिकायां राज्ञ्यां महादेव्यां श्रीश्रीमत्यामुत्पन्नः परमभागवतः श्री-आदित्यसेनदेवः । तस्य पुत्रस्तत्पादानुध्यातः परमभट्टारिकायां राज्ञ्यां महादेव्यां श्रीकोणदेव्यामुत्पन्नः परममाहेश्वर परमभट्टारक महाराजाधिराज परमेश्वर श्रीदेवगुप्तदेवः। तस्य पुत्रस्तत्पादानुध्यातः परमभट्टारिकायां राज्ञ्यां महादेव्यां श्रीकमलदेव्यामुत्पन्नः परममाहेश्वर परमभट्टारक महाराजाधिराज परमेश्वर श्रीविष्णुगुप्तदेवः। तस्य पुत्रस्तत्पादान-

ध्यातः परमभट्टारिकायां राज्ञ्यां महादेव्यां श्री–इज्जादेव्यामुत्पन्नः परम... परमभट्टारक महाराजाधिराज परमेश्वर श्रीजीवितगुप्तदेवः कुशली नगरभुक्तौ वालवीवैषयिकश्री–वो...............पद्रलिक्षान्तष्पाति वारुणिकग्रामस्थान कुलतलावाटक-दूत-सीमाकर्मकर-मया......तक-राजपुत्र-राजामात्य-महा.... क्षतिक-महादण्डनायक-महाप्रतिहार-महासा.........प्रभातसा......कुमारा-मात्य-राजस्थानीयोदपरिक.......धिक-चोरोद्धरणिक-दाण्डिकदाण्डपाशिक... क...ष्णिवल-व्यायत-किशोरव टकराह.......द् . .त्...,यणिकग....पति-कर्म.........रसक..........त्-अस्मत्पादप्रसादोपजीविनश्च प्रतिवासि-नश्च ब्राह्मणोत्तरान्-महत्तर कुक्षिपुर-............विज्ञापित-श्रीवरुणवासिभट्टा रक-प्रतिबद्ध-भोजक-सूर्यमित्रेण उपरिलिखित......ग्रामाहिसंयुतं परमेश्वरश्री बालादित्यदेवेन स्वशासनेन भगवश्री वरुण वासिभट्टारक.........क...... वपरिवाहक ...... भोजकहंसमित्रस्य समापत्त्या यथाकालाध्यासिमिश्च एवं परमेश्वरश्रीशर्ववर्म .........भोजक–ऋषिमित्र ......यतकम् एवं परमेश्वर श्रीमद्–अवन्तिवर्मणा पूर्वदत्तकमवलंब्य .....एवं महाराजा-धिराज–परमेश्वर... ........शालनदानेन भोजक–दुर्धरमित्रा ग्यानुने ... ..............तेन भुजते तदहं किमपि......एवं...मतिमान............ आनुपामोदितमिति सर्वसमा-पना एता.........पयु.........वरुणवास्यायतनं तदनु दत्तम्...त्यक्ष......सोद्रंगं सोपरिकरं सदशापराधपञ्च.............

## ( ३ ) शर्ववर्म्याची तांब्याची मोहर.

चतुस्समुद्रातिक्रान्तकीर्तिः प्रतापानुरागोपनतान्यराजो वर्णाश्रमव्यवस्थापन प्रवृत्तचक्रश्चक्रधर इव प्रजानामार्तिहरः श्रीमहाराजहरिवर्मा। तस्य पुत्रस्तत्पादानुध्यातो जयस्वामिनी–भट्टारिकादेव्यामुत्पन्नः श्रीमहाराजादित्यवर्मा। तस्य पुत्रस्तत्पादानुध्यातो हर्षगुप्ताभट्टारिकादेव्यामुत्पन्नः श्रीमहाराज–ईश्वर वर्मा। तस्य पुत्रस्तत्पादानुध्यात उपगुप्ताभट्टारिकादेव्यामुत्पन्नो महाराजाधिराज श्री-ईशानवर्मा। तस्य पुत्रस्तत्पादानुध्यातो लक्ष्मीवतीभट्टारिकामहादेव्यामुत्पन्नः परममाहेश्वरो महाराजाधिराजश्री–शर्ववर्मा मौखरिः।

---

**पुस्तक पहिलें समाप्त.**

# पहिलीं हिंदु राज्यें.

## प्रकरण १ लें.

### सिंध प्रांतांतील राज्यक्रान्ति.

( या प्रकरणांतील मजकूर १२ व्या शतकांत लिहिलेल्या एका आरबी बखरीच्या चचनामा नामक फारशी भाषान्तराच्या आधारानें लिहिला आहे. ही बखर तत्कालीन मूळ लेखांवरून लिहिलेली असल्यामुळें जरी बरीच विश्वसनीय आहे, तथापि तींतील कालविधानाची बरीच उलटापालट झालेली आहे. आरब लोकांनीं सिंधप्रान्त जिंकिल्याचा तो काळ या बखरीप्रमाणें इ. स. ७१२ च्याहि कांहीं वर्षे पूर्वी जातो. असें असल्यामुळें स्वतः जातीनें पाहिलेल्या गोष्टी वर्णन करणाऱ्या ह्युएनत्संगाच्या लेखांच्या आधारानें सदर बखरींतील गोष्टींचे काळ ठरविण्याचा आम्हीं प्रयत्न केला आहे. ह्युएनत्संग सिंधप्रांतांत इ. स. ६४१ त गेला व तेथें त्यावेळीं कोणी शूद्र राजा राज्य करीत होता असें त्याने लिहिलें आहे. चचनाम्यांतील गोष्टींपैकीं भविष्य-कथनाच्या ज्या कित्येक गोष्टी आहेत त्या इतर पुराणांतील गोष्टींप्रमाणें मागाहून समाविष्ट केलेल्या असल्यामुळे त्यांचा समावेश अर्थातच आम्हीं केलेला नाहीं. भविष्यकथन आणि काल-विपर्यास एवढे दोष वगळले असतां चचनामा ही बखर मोठी उपयुक्त असून तिच्यावरून बरींच ऐतिहासिक अनुमानें काढतां येण्यासारखीं आहेत. )

हर्षवर्धनाच्या मृत्युसमयीं सिन्धप्रांतांत मौर्यवंशी साहसी नांवाचा कोणी शूद्र राजा राज्य करीत होता, आणि या घराण्याची दुसरी एक शाखा राजपुतान्यांत चित्तोड येथें राज्याधिष्ठित होती हें पूर्वी प्रथम पुस्तकांत सांगितलेंच आहे. साहसी राजाची राजधानी

अलोर येथें असून तें शहर सिन्धुनदीच्या डाव्या तीरावर वसलेलें होतें. पण हल्लीं त्या नदीचें पात्रहि त्या ठिकाणीं बदलल्यामुळें अलोरचा अवशेष फार थोडा राहिला आहे. या राजाच्या अमलाखालीं तीन चार लहान लहान राज्यें असून त्यांचे अधिपति जाट व क्षत्रिय राजे होते, व त्यांत ब्राह्मणाबाद येथील लुहाणा घराणें आणि सिविस्तान (शिबिस्थान) येथील क्षत्रिय घराणें हीं प्रसिद्ध होतीं. ब्राह्मणाबाद* हें नांव आरबी भाषेंतील आहे, व त्याचें इकडील मूळ काय होतें हें नीट [illegible] नाहीं. तथापि एवढे खचित कीं, तें अलोरच्या दक्षिणेस हल्लीं हैदराबादच्या जवळ कोठें तरी वसलेलें असून तेथील राजाची सत्ता समुद्र किनाऱ्यावरील कराचीच्या जवळ असलेल्या जुन्या देबाल शहरापर्यंत पसरली होती. सिविस्तान म्हणजे आमच्या मतें शिबी नांवाची जी क्षत्रिय जात महाभारतकालीं व त्यानंतर अलेक्झँडरचे स्वारीचे वेळींहि प्रसिद्ध होती त्या जातीच्या लोकांचा देश होय. या शिबींचे लहानसें राज्य सिंधुनदीच्या पश्चिमेस वसलेले होतें व तें प्राचीन काळापासून सिन्धुदेशाच्या आधिपत्याखालीं मोडत असे. महाभारतांतील सिन्धुराज जयद्रथ सिन्धु, सौवीर आणि शिबी या तिहींचा अधिपति होता ( वनपर्व अ. २६७ ), आणि शाल्व देशावरील स्वारीचे वेळीं सौवीर आणि शिबि देशांचे राजे त्याचे अनुयायी होते ( वनपर्व अ. २६५ ) असें महाभारतांत वर्णन आहे. महाभार-

* या शहरासंबंधानें मॅक् क्रिंडलकृत अलेक्झॅन्डरच्या स्वारीच्या वर्णनांत पुढील मजकूर आढळतो:—अलेग्झँडरनें स्वारी केली तेव्हां ( सिन्ध प्रातात ) ब्राह्मणांचें एक नगर होते, तें जिंकून तेथें बंडें उभारलेल्या अनेक ब्राह्मणांची त्याने कत्तल केली. त्या नगराचें नांव हर्मतलीस ( Hermatellis ) असावें अशी कल्पना असून त्याचें ( भारतीय ) मूळ रूप ब्राह्मण स्थल होय असें कोणी समजतात. ब्राह्मणाबाद हें नांव याचें केवळ आरबी रूपांतर आहे.

तांत सांगितलेले हे तीन देश म्हणजेच चचनाम्यांतील अलोर, ब्राह्मणाबाद आणि सिविस्तान हीं राज्यें होत. या सिन्ध राज्यांत पंजाबाकडील उत्तरेच्या बाजूला कांहीं जहागिरी वजा लहान लहान संस्थानेंहि होती आणि एवढया सर्व प्रदेशावर साहसी राजाचा अंमल चालत होता. चचनाम्यांतील हकीगत या साहसीच्या वर्णनापासूनच सुरू झालेली आहे. हा राजा आणि मांडलिकांसह त्याची प्रजा हीं सर्व पूर्णपणें बौद्धधर्मीय होतीं, आणि सर्व सिन्धुदेश नांवाचा कां होईना पण कनोजच्या हर्षवर्धनाच्या अधिराज्याखालीं त्यावेळीं मोडत असे.

इ. स. ६५० च्या सुमारास सिन्धुराज साहसी अजारी पडून निपुत्रिक स्थितींत मरण पावला. तेव्हां सिन्ध प्रांताचें राज्य साहसीच्या चच नांवाच्या एका महत्वाकांक्षी, कर्तृत्ववान् पण उलटया काळजाच्या अशा ब्राह्मण मंत्र्यानें बळकाविलें. ही गोष्ट त्यानें साहसीच्या राणीच्याच चिथावणीवरून व तिच्याच साहाय्यानें केली, कारण त्या दोघांचें अंतस्थ प्रेम जडलेलें होतें असें चचनाम्यांत म्हटलें आहे. आपला हेतु निर्विघ्न सिद्धीस जावा म्हणून साहसीच्या मृत्यूची वार्ता बरेच दिवस कोणालाहि लागूं न देतां त्या दोघांनीं त्याच्या डोईजड असणाऱ्या सरदारांना आणि नातेवाईकांना कांहीं निमित्तानें राजवाडयांत बोलावून आणून कैद करून ठेविलें आणि या युक्तीनें त्यांच्याकडून होणाऱ्या प्रतीकाराचा आगाऊच बंदोबस्त केला. याप्रमाणें आपली सत्ता आधींच प्रस्थापित करून चचानें अजारी राजाच्या नांवानें एक फर्मान प्रसिद्ध केलें आणि त्या अन्वयें राजरोसपणें राज्याचा अधिकार आपले हातीं घेतला. कांहीं लालची सरदारांना कैद केलेल्या सरदारांच्या जहागिरी देऊन चचानें आपल्या बाजूस वळविलें व अशा रीतीनें आपली बाजू

मजबूत करून घेतल्यावर त्यानें साहसीचा मृत्यु आणि त्याच्या मागून आपण गादीचे मालक झालों ही गोष्ट जाहीर केली. पुढें आपला पक्ष अधिक बळकट करण्यासाठीं त्यानें साहसीच्या राणाशीं लग्न लाविलें आणि या रीतीनें त्यानें सिन्धु देशांतील राज्यावर आपल्या घराण्याची मजबुतीनें स्थापना केली अशी चचनाम्यांतील या राज्यक्रान्तीची हकीकत थोडक्यांत आहे.

वरील हकीगतीपैकीं साहसीच्या राणीचें चचावर प्रेम बसल्याची गोष्ट खरी असो वा खोटी असो, पण प्रधान असतांना चचानें गादी बळकाविली हें खरें दिसतें व त्यांत आश्चर्यकारक किंवा असंभवनीय असे कांहीं नाहीं. अशीं पुष्कळ उदाहरणें भरतखंडाच्या प्राचीन व अर्वाचीन इतिहासांतून काढून दाखवितां येतील. पाटलिपुत्र येथील शुंग घराण्याचें राज्य बळकावणाऱ्या कण्वनामक प्रधानापासून तों मुसलमानी इतिहासांत बेदरच्या शेवटच्या बहामनी सुलतानाचें राज्य बळकावणाऱ्या कासिमबरीदपर्यंत किंवा अलीकडच्या पेशवाईंत किंवा नेपाळच्या राज्यांत ती घडलेली दिसतील. तसेंच, माजी राजाच्या राणीशीं चचानें लग्न लाविल्याची गोष्ट सुद्धां असंभवनीय नाहीं. पदच्युत झालेल्या किंवा मरण पावलेल्या राजांच्या स्त्रिया त्याची गादी बळकावणाऱ्या नव्या राजांनीं ह्यम्लेटच्या काकाप्रमाणें आपल्या कुटुंबांत घेतल्याचीं उदाहरणें प्राचीन इतिहासांत आढळून येतात. म्हणून सिन्धदेशांतील राजक्रान्तींत साहसीच्या राणीचें प्रत्यक्ष अंग होतें असें जरी मानिलें नाही तरी चचनाम्यांत वर्णिलेला एकंदर प्रकार चचासंबंधानें तरी विश्वसनीय समजावयास हरकत नाहीं.

आतां प्रधानानें गादी बळकावण्याचा हा प्रकार असंभवनीय नाहीं हें पाहिल्यावर या राजक्रांतींत विशिष्ट हेतु काय होता हेंहि

पाहिलें पाहिजे. त्यांत कांहीं धर्माचा संबंध होता कीं काय ? याचें उत्तर पुढें येईल. चचाचें भाग्य थोर होतें. साहसीचा संबंधी चितोडचा मौर्यवंशी बौद्ध राजा यानें आपला हक्क सिन्धदेशावर सांगून चचाला दूर करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांत चचालाच शेवटीं यश मिळालें. याप्रमाणें चचाचा पाय अधिकच स्थिर झाल्यावर त्यानें उत्तरेकडील कांहीं संस्थानें आणि मुलतानचा प्रदेश जिंकून आपलें सामर्थ्य व कीर्ति आणखी वाढविली आणि आपल्या राज्याची सरहद्द काश्मीरच्या राज्यापर्यंत नेऊन भिडविली.

प्रथम चचानें इस्कंदिया व बाबिया हीं उत्तरेकडील संस्थानें आणि मुलतान व कारूर हीं पूर्वेकडील राज्यें जिंकिली, आणि मग सिन्धु नदी ( आरबी–मेकरान ) वलांडून पश्चिमेस मोर्चा वळविला व तिकडे सिबिस्थानच्या महाराजाचा पराभव करून तो देश त्यानें अंकित केला. शेवटीं त्यानें आपली दृष्टी दक्षिणेकडे फिरविली व ब्राह्मणाबादच्या अघम लुहाणा नामक बालिष्ठ राजाला शरण यावयास सांगितले.* पण अघम लुहाण्यानें लढण्याचा निश्चय केल्यामुळें त्याचें ब्राह्मणाबादेनजीक युद्ध झालें व त्यांत अघमाचा पराभव होऊन तो आपल्या नगरांत पळून गेला. चचानें लगेच ब्राह्मणाबादेस वेढा दिला. तेव्हां त्या बौद्धधर्मीय अघमानें तत्कालीन उत्तर हिंदुस्थानची राजधानी जी कनोज तेथील राजाशीं साह्य मागितलें. पण ते येण्यापूर्वीच तो मृत्यु पावला व त्याचा अल्पवयी पुत्र चचाचा अंकित झाला. अशा रीतीनें चचाचें भाग्य उदयास येऊन त्यानें ब्राह्मणाबाद नगरांत प्रवेश

*चचनामाकाराला वरील हकीकत बहुधा कोणी हिंदी मनुष्यानें सांगितलें असावी आणि म्हणूनच तिचे स्वरूप संस्कृत कर्वाच्या दिग्विजयाच्या स्वरूपा सारखें दिसतें.

केला आणि तेथील लोकांना आपली प्रजा होण्याच्या अटीवर तेथेंच सुखानें राहूं दिलें.

या काळीं बौद्धधर्माची स्थिति किती निकृष्ट प्रकारची झाली होती हें चचनाम्यांतील ब्राह्मणाबादेजवळील नवविहारच्या सामानीच्या ( श्रमणाच्या ) गोष्टीवरून दिसून येईल. उच्च प्रकारच्या तत्वविचारापासून घसरत घसरत हिंदुधर्म जसा याच काळीं विचित्र अंध श्रद्धेपर्यंत आला होता, त्याचप्रमाणें बौद्ध धर्माचीही स्थिति झालेली होती. वर सांगितलेला नवविहार येथील श्रमण जबरदस्त सामर्थ्यवान् असा मांत्रिक असल्याची लोकांत ख्याति होती आणि ब्राह्मणाबादच्या अघम राजास त्यानें साहाय्य केल्यामुळेंच त्या शहराचा वेढा एक वर्षाहून अधिक काळपर्यंत आपल्याला चालवावा लागला अशी चचाची कोणी समजूत करून दिली. तेव्हां अशा माणसाचा नायनाट करण्याची बुद्धि धरून चच त्याजकडे गेला. त्यावेळीं तो श्रमण माती घेऊन बुद्धाच्या मूर्ति करीत बसला होता. चचासारखा समर्थ राजा जवळ येऊन डोळे वटारून पाहूं लागला तरी त्याकडे श्रमणानें कांहीं वेळ लक्षच दिलें नाहीं. मूर्ती घडण्याचें काम संपल्यावर त्यानें चचाकडे पाहिलें व लगेच एक गवताची चटई पुढें करून तीवर त्यास बसावयास सांगितलें. त्याप्रमाणें चच त्या आसनावर थोडा वेळ बसला, पण थोड्या वेळानें तो उठून गेला. श्रमणाचा वध तर त्याचे हातून झालाच नाहीं, पण उलट मोडकळीस आलेला नवविहार नीट करण्याचे कामीं त्या श्रमणाला साह्य करण्याचें त्यानें वचन दिलें. याप्रमाणें मनोवृत्तीला एकाएकीं बदल पडण्याचें कारण त्याला प्रधानानें विचारितां तो ह्मणाला मीं श्रमणाजवळ बसलों असतां कोणी राक्षस माझ्या डोक्यावर अंतरिक्षांत घिरट्या घालीत माझ्यावर हल्ला करण्याचे बेतांत आहे असें मला दिसलें आणि

ह्मणून भीतीनें मला कांहीं करवलें नाहीं. असो, तात्पर्य एवढेंच कीं त्या काळीं बौद्ध श्रमणांच्या मांत्रिक सामर्थ्याविषयीं कशा चमत्कारिक कल्पना लोकांत चालू होत्या हे दिसून येतें.

वर सांगितलेल्या गोष्टींतील श्रमणाच्या वाटेस जाण्याचें जरी चचानें सोडून दिलें तरी एकंदरींत तो हिंदुधर्माचा कट्टा अभिमानी होता आणि त्यामुळेंच त्याने बौद्धधर्मीय राजाची गादी बळकावण्याचा प्रयत्न केला असें मानावयास आधार आहे. चचनाम्यांत असें वर्णन आहे कीं ब्राह्मणाबाद येथें असतांना चचानें तेथील लुहाणा आणि जाट या पराक्रमी लोकांचा सामाजिक दर्जा कमी होईल अशा तऱ्हेचे हुकूम फर्माविले. त्यांत कांहीं असें होतें कीं ह्या लोकांनीं अगदीं निकडीच्या प्रसंगाखेरीज शस्त्रें वापरूं नयेत, रेशमी वस्त्रें अंगावर घेऊं नयेत, काळ्या व तांबड्या रंगाचींच वस्त्रें नेसावीं, खोगीर न घालतांच घोड्यावर बसावें, रस्त्यांतून जातांना पागोटी व जोडे घालूं नयेत; बाहेर जातांना नेहमीं आपली विशिष्ट खूण म्हणून बरोबर कुत्रें घ्यावें; तसेंच ब्राह्मणाबादच्या सुभेदाराला त्यांनीं जळाऊ लाकडाचा पुरवठा करावा आणि वाटाड्यांचें व गुप्तहेरांचें काम करून त्याशीं त्यांनीं विश्वासानें आणि प्रामाणिकपणें वागावें. हे नियम चचानें केल्याबद्दलची चचनाम्यांतील हकीगत विश्वसनीय असून ते नियम पुढें त्याच्या मुलाच्या कारकीर्दीतहि अमलांत होते. इतकेंच नव्हे तर आरबलोकांनीं सिन्धदेश काबीज केल्यावर महमद कासिमानें देखील तेच नियम चालू ठेविले होते असेंहि चचनाम्यांत सांगितलें आहे. जाट लोकांवरील हे निर्बंध थोड्या बहुत प्रमाणांत अजूनहि अमलांत आहेत. अजून जाटांच्या कांहीं जाती बोडक्यानें फिरतात. रजपुतांच्या अमदानींत सुद्धां जाट लोकांना शिरस्त्राणें घालण्याची, तांबडें पागोटें बांधण्याची, विवाह प्रसंगीं वराचे मस्तकीं मुकुट

ठेवण्याची तशीच बायकांना नाकांत नथ घालण्याची मोकळीक नव्हती. पुढें जेव्हां घटवाल जाटांनीं रजपुतांचा मोड केला तेव्हां त्या जाट लोकांवरील हे अपमानकारक घाणेरडे निर्बंध त्यांनीं काढून टाकिले. तेव्हांपासून त्यांना **मालिक** ही संज्ञा प्राप्त होऊन ते तांबडीं पागोटीं डोक्यांत घालूं लागले. ( इबेटसनकृत पंजाबांतील जातीचें वर्णन, पा. १३० ).

लुहाणे व जाट हे त्रासदायक बंडखोर लोक असून वाटमाऱ्यांचें व लुटारूंचे काम करीत म्हणून चचानें त्यांवर हे निर्बंध लादिले असें म्हणतां येईल पण त्यांच्यावरील या निर्बंधाचें दुसरें कारण वर दिलेल्या अटींच्या वर्णनावरूनही सहज कळण्यासारखें आहे. तें असें कीं, हे लोक आपल्याला क्षत्रिय म्हणवीत आणि तदनुसार शस्त्रें बाळगणें, घोड्यावर बसणें, तांबडीं पागोटीं घालणें इत्यादि क्षत्रियांचे सामाजिक हक्क ते बजावीत. पण आम्ही पूर्वी दाखविलेंच आहे कीं जाट हे आर्य असून मूळचे म्हणजे वैदिककालीन विश् आहेत तथापि त्यांनीं बौद्धधर्म स्वीकारून बौद्धधर्मी राजाच्या वेळीं वैश्य आचार पाळले नसावेत. बौद्धधर्मानें जातिभेद झुगारून दिला होता हें प्रसिद्धच आहे. त्याप्रमाणें त्यांतील भिक्षुवर्ग जात मानीत नसे. इतर व्यवहारी लोकांनीं कांहीं जाति-निर्बंध सोडिले नव्हते. जातीचें सामर्थ्य या देशांत नेहमीच अधिक आहे. तथापि बौद्धांच्या मूळ धर्मतत्त्वांत जातिभेदाला स्थान नसल्यामुळें बौद्ध धर्मीय जातींत जातिबंधनें शिथिल झालीं असलींच पाहिजेत. लुहाणे व जाट लोक बहुधा या वर्गांतील असावेत. बौद्ध धर्माच्या छत्राखालीं त्यांनीं आपल्या जुन्या वैदिकधर्मी चालीरीति थोड्या बहुत तरी सोडून दिल्या व त्यामुळें कट्या अभिमानी जातवाल्यांना त्यांच्याविषयीं तिरस्कार उत्पन्न होऊन हिंदुधर्माचें

डोकें वर आल्याबरोबर या मूळच्या वैश्य असलेल्या परंतु आतां आचारहीन झालेल्या जाट लोकांना विशेषतः त्यांच्या शेतकी करण्याच्या व इतर व्यासंगावरून त्यानें शूद्र लेखिलें, आणि जातिभेदाचा कोट पुन्हां बळकट करण्याचा प्रयत्न केला. जाट लोक शेतकीचा धंदा करून रहात; व बौद्ध धर्मानुयायित्वामुळें वैदिक यज्ञयाग व विधि मानीत नसत. तसेंच त्यांच्यांत स्त्रियांचे पुनर्विवाह होत* हीं त्यांच्या अवनतीचीं कारणें बहुधा झालीं असावींत. असो, वास्तविक कारण कांहीं असलें तरी, जाट व लुहाणे यांवर चचानें घातलेल्या निर्बंधाचें मुख्य कारण धर्माभिमानी हिंदूच्या मतें ते शूद्र होते असेंच दिसतें, ही गोष्ट अशा प्रकारच्या धार्मिक समजुतीला बळी पडून हिंदुस्थानांतील अनेक शौर्यशाली जातींचे लोक शस्त्रास्त्रें सोडून नेभळट मेंढरें होऊन बसले याबद्दल कोणाहि हिंदी इतिहासकाराला खेद वाटल्याशिवाय राहणार नाहीं. लुहाणे लोक मुळचे कदाचित् क्षत्रिय असून हल्लीं केवळ वैश्यवृत्ति झाले आहेत. तरी जाटांमध्यें अद्यापि जोमदारपणाची निर्भयता व लढवय्येपणा बऱ्याच प्रमाणांत दृष्टीस पडतात.

या हकीगतींत एक आश्चर्याची गोष्ट अशी आहे कीं, ज्या लुहाणे व जाट लोकांना चचानें शूद्राच्या स्थितीला पोंचविले त्यांच्याच अधम राजाच्या विधवा राणीशीं त्यानें लग्न लावून पूर्वी राजकीय घालमेलीसाठीं साहसीच्या विधवा राणीशीं केलेल्या विवाहाची पुनरावृत्ति केली, याचें कारण ही पूर्वीचेच राज्यावरील हक्क बळकट करण्याचे धोरण होय हें सांगणे नको. असो, ब्राह्मणानें चारीवर्गाच्या स्त्रिया करण्याचा संप्रदाय अद्याप बंद नव्हता.

---

* आजमितीला देखील जाट आणि रजपूत यांमध्यें मुख्य भेद हाच आहे की रजपुतांत स्त्रीपुनर्विवाह अमान्य असून जाटांत तो केरवा नांवानें चालू आहे.

याप्रमाणें ब्राह्मणाबादचें राज्य आपण हस्तगत केल्यावर चचाचे पाय सिन्धुदेशाच्या राज्यावर चांगलेच रोवले व तेथें त्यानें पुढें कित्येक वर्षें निर्विघ्नपणें राज्य केलें. त्याचा अन्त केव्हां झाला हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. पण अरबलोकांनीं सिन्धदेश इ. स. ७१२ त काबीज केला त्यावेळीं चचाच्या मागाहून गादीवर आलेला ब्राह्मण राजा जो दाहर त्यानें ३३ वर्षे राज्य केले होतें, असे जें चचनाम्यांत वर्णन आहे, त्यावरून पहातां दाहर हा इ. स. ६७९ त गादीवर आला असला पाहिजे, आणि चचाचा भाऊ चंद्र हा चचाच्या मागें व दाहराच्या पूर्वी ७ वर्षें राज्य करीत होता असेंहि चचनाम्यांत सांगितलें असल्या-मुळें चच इ. स. ६७२ त मरण पावला असावा. अर्थात त्यानें सुमारे २२ वर्षें राज्याचा उपभोग घेतला असावा असें म्हणाव-यास हरकत नाहीं.

चचाच्या मृत्यूनंतर त्याचे मुलगे कर्ते असते तर त्याच्या मागाहून त्याचा भाऊ चंद्र हा सात वर्षें गादीवर येण्याचा संभव नव्हता. म्हणून असें दिसते कीं,चचाच्या मृत्युसमयीं दाहर हा अल्पवयस्क असावा आणि तसा तो होता तितकाच काळ काय तो चंद्राच्या हातीं राज्यकारभार असावा. हा चंद्र पुढें बौद्ध भिक्षु झाल्याचें वर्णन आहे. तो ब्राह्मणाबाद येथेंच रहात असे व तेथें बौद्ध धर्माची छाप अद्यापि कमी झालेली नव्हती. चंद्राच्या नंतर वयांत आलेला दाहर स. ६७९ त गादीवर बसला. सिन्ध प्रान्ताचें मुख्य शहर जें अलोर तेथेंच त्याची राजधानी असून ब्राह्मणाबादच्या मांडलीक राज्याचा कारभार त्याचा भाऊ दहरशिया हा पहात असे. हा भाऊ दाहराहून वडील होता असें चचनाम्यांत सांगितलें आहे, पण तें चुकीचें दिसतें. चचनाम्यांत या बंधूंच्या आणखी कांहीं गोष्टी दिल्या आहेत. त्यांचें पुढें आपसांत बनेनासें

झालें व त्यांच्या बाई नांवाच्या बहिणीच्या विवाहासंबंधांत त्यांच्यांत तंटा उद्भवून दहरशियानें दाहराचा खून करविण्याचा प्रयत्न केला, परंतु बुद्धिमान नांवाच्या दाहराच्या प्रधानानें आपल्या चातुर्यानें त्याचा बचाव केला वगैरे सगळ्या गोष्टी खऱ्या ऐतिहासिक असतीलच असें नाहीं. तथापि एवढें खरें कीं, दाहर हा एकंदरींत बलाढ्य राजा असून त्यानें,* आपले भाऊ व नातेवाईक म्हणजे चंद्राची संतति यांना सिन्धच्या आधिराज्यांतील लहान लहान संस्थानांवर नेमिलेलें होतें. दाहर हा चचाच्या साहसीच्या विधवा राणीपासून झालेला मुलगा होता, असें चचनाम्यांत एके ठिकाणीं म्हटलें आहे. पण त्याविषयीं संशय वाटतो. दाहर, दाहरशिया व बाई हीं सगळीं तिचींच मुलें होतीं असें एकदां

---

सिबिस्तानच्या भट्टाराजाचा चचाकडून पराभव झाल्यावर त्याने कनोजच्या राजाचा आश्रय करून त्याच्या मदतीनें सिन्ध देशावर स्वारी केली असें चचनाम्यांत वर्णन आहे, व तें खरें असावे. कनोजचा राजा व भट्टा हे दोघेहि बौद्ध असल्यामुळे तसे होणे बरेंच संभवनीय दिसते. चचाची एक मुलगी काश्मीरच्या राजाला दिलेली असून, तिचा मुलगा, कनोजचा राजा साहिरस ( श्रीहर्ष ) आणि त्याचा भाऊ राशील अशा तिघांनीं मिळून सिन्ध प्रान्तांवर स्वारी केली, पण त्यांचा दाहराने युक्तीने पराभव केला, असें सदर बखरींत वर्णन आहे. त्यांतील बारीक सारीक गोष्टीहि ऐतिहासिक आहेत असें म्हणतां येत नाहीं. कारण साहिरस हा उघडच कनोजचा श्रीहर्ष होय, व आरबांच्या स्वारीच्या वेळीं त्याची कीर्ति या देशांत सर्वत्र दुमदुमत होती. पण दाहराच्या कारकीर्दींत श्रीहर्ष हयात नसावा असे आम्हाला वाटते. कनोजच्या राजानें सिन्धप्रान्तावर दाहराच्या अमदानींत स्वारी केलीच असेल. तर तो दुसरा कोणी राजा असेल. चचनाम्यांत आणखीं रमलच्या राजानेंहि सिन्ध देशावर स्वारी केल्याचे सांगितलें आहे. रमल म्हणजे आरबी भाषेत वाळवंट असा अर्थ असल्यामुळें हा रमलचा राजा म्हणजे राजपुतान्यांतील वाळवंटापैकीं भावलपुर अथवा जेसलमीर यांपैकीं कोठला तरी भाटी राजा असावा.

सांगितल्यावर पुढें चचनाम्यांत दुसरे ठिकाणीं बाई ही एका जाट स्त्रीपासून झालेली चचाची कन्या होय असें म्हटलें आहे. कदाचित असें असेल कीं, हिंदु राजांचा त्या वेळच्या रिवाजाप्रमाणें चचानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ( जाट ) व शूद्र ( साहसीची विधवा ) अशा सर्व जातीच्या स्त्रियांशीं लग्नें केलेलीं असून त्यांत ब्राह्मण स्त्री पासून दाहर झालेला असावा. कारण त्याला तत्कालीन ब्राह्मणांनीं ब्राह्मणच म्हटल्याचें चचनाम्यांत सांगितलें आहे. परंतु राजस्थानचा इतिहासकार टॉड ह्मणतो कीं, दाहरचें घराणें रजपुतांच्या मूळ छत्तीस घरांण्यापैकीं एक होय. या विषयाचा अधिक विचार पुढें करावयाचा असल्यामुळें येथें तो इतकाच सोडून आपण अरब लोकांनीं दाहराचा पाडाव करून सिन्ध देश कसा जिंकिला व त्यामुळें हिंदुस्थानच्या इतिहासाला नवीनच वळण कसें लागलें याच्या वर्णनाकडे वळूं.

---

# प्रकरण २ रें.



## अरबांनीं सिन्ध जिंकणें.

भारतखंडाच्या एकंदर भागांपैकीं सिन्ध प्रांत परकीय लोकांच्या हल्ल्याला केव्हांहि प्रथम बळी पडण्यास योग्य असल्यामुळें त्याची तुलना सुसरीच्या नाकांशी करतां येईल. हिंदुस्थानाची पाठ हिमालयाच्या बर्फाच्छादित शिखरांनीं सुसंरक्षित असल्यामुळें कठोण खवल्यांच्या सुसरीच्या पाठीप्रमाणें त्यावर त्या बाजूनें हल्ला चढविणें अशक्यच आहे. तसेंच त्याच्या शिरोभागावर आणि गंडप्रदेशावर हिंदुकुश आणि सुलेमान हे नगराज पहारा करीत असल्यामुळें त्या बाजूकडूनहि हा देश बहुधा अभेद्यच आहे. पण हे पर्वत सोडून दक्षिणेकडे सिन्धु नदी जेथें समुद्राला मिळायास जाते तो भाग मात्र नैसर्गिक संरक्षण साधनाच्या अभावीं उघडा पडून परकीय स्वाऱ्यांना वारंवार पात्र झालेला आहे. हा भारतखंडाचा नासिका प्रदेश हस्तगत करावयाचा म्हणजे प्रथम विर्जल अशा वालुकामय प्रदेशांतून येणाराला यावें लागतें हें खरें—पण अशाच रहाणीची नित्य संवय असलेल्या लोकांना उंटांवरून व खेंचरांवरून त्यांत येऊन उतरणें कठीण नाहीं. म्हणून याच भागावर प्राचीन काळीं परकीय स्वाऱ्यांचा पुनः पुनः मारा झालेला दिसून येतो.

ज्याकाळच्या इतिहासाचा प्रस्तुत आपण विचार करीत आहों त्या काळापूर्वीं पारसीक लोकांनीं सिन्ध प्रान्तावर अनेकवार स्वाऱ्या करून तो जिंकला; पण तितक्या सर्व प्रसंगीं तेथील हिंदी रहिवाशांनीं नेट करून आपलें स्वातंत्र्य पुनः पुनः प्रस्था-

पित केलें. चचानें उलथून पाडलेलें राजघराणें तेथें सुमारें १५० वर्षें राज्य करीत होतें आणि त्यानंतर चच आधि त्याचा पुत्र-दाहर यांनीं मिळून जवळ जवळ ६० वर्षें सिन्धप्रांतावर आपला अधिकार चालविला. पण दाहराचे कारकीर्दीत अरब लोकांनीं जो एकदां हा प्रदेश जिंकिला तेंव्हांपासून म्हणजे इ. स. ७१२ पासून तहत आजपर्यंत तो मध्यंतरीं थोडीशीं वर्षें खेरीज करून परकीयांच्याच हातांत राहिला आहे. अशारीतीनें अरब लोकांच्या हल्ल्याला कायमचा बळी पडावयला ८ व्या शतकाच्या आरंभीं या देशाला विशेष काय कारणें झालीं, तसेंच पुढे बाराव्या शत-काच्या अखेरीस देशाच्या इतर भागाचीहि तीच स्थिति कां झाली याचा सविस्तर विचार करणें अवश्य आहे, व अशा विचाराचीं साधनें बहुतेक आठव्या शतकांतच लिहिलेल्या चचनाम्यांत बरीच मिळण्यासारखीं आहेत ही सुदैवाची गोष्ट आहे.

कित्येक खलिफांच्या अमदानींत अरब लोकांनीं सिंन्ध प्रांतावर तो जिंकिण्याच्या बुद्धीनें वारंवार हल्ले चढविले, परंतु ते निष्फळ झाले असें चचनाम्यांत वर्णन आहे. पुढे जेंव्हां संपूर्ण पारसिक ह्मणजे इराण देश त्यांच्या ताब्यांत आल्यामुळें ते कायमचे सिन्ध-प्रान्ताच्या जवळ येऊन बसले व अशा रीतीनें त्यावर हल्ले चढविण्यासाठीं आधार ह्मणून जवळच मजबूत ठिकाण त्यांना प्राप्त झालें; तेंव्हां पुनः एकवार हा प्रांत जिंकण्याचा नेटाचा प्रयत्न त्यांनीं केला. त्यांना संधिहि यावेळीं चांगलीच सांपडली. यापूर्वी अरबस्थानापासून महंमदी धर्माची प्रगति जलमार्गानें थेट सिंहल-द्विपापर्यंत झालेली होती. खलिफ वालीद त्यावेळीं बगदाद येथें राज्य करीत होता; त्याला देण्यासाठीं बहुमोल मोत्यांचीं व रत्नांचीं भेट सिंहलद्वीपच्या राजापासून घेऊन कांहीं स्त्रीपुरुष मुसलमान यात्रेकरू गलबतांतून इराणी आखाताच्या मार्गानें तिकडे चालले,

असतां वाटेंत प्रतिकूळ वारा लागून त्यांचीं गलबतें सिंधुनदीच्या पश्चिम तीरावरील देबल नांवाच्या सिन्धप्रांतांतील बंदराला येऊन लागलीं. सिंधु नदीच्या मुखाजवळील दुआबांत यावेळीं दरोडेखोर व वाटमाऱ्यांची कांहीं वस्ती असून त्यांच्यापासून लोकांना फार उपद्रव होत असे. ते नांवाचे बौद्धधर्मीय होते, व त्यांचे शील अत्यंत घाणेरडें होतें असें ह्युएनत्संगानेंहि म्हटलें आहे. उपरिनिर्दिष्ट मुसलमान यात्रेकरूंचीं तारवें बंदरास लागल्या बरोबर या दरवडेखोरांनीं त्यांच्यावर हल्ला चढविला आणि त्यांच्यापाशीं असलेल्या सर्व मूल्यवान् जिनसा हिसकाऊन घेऊन देबल गांवीं नेल्या व त्या सर्व स्त्रीपुरुष यात्रेकरूंना कैद करून ठेविलें. देबल शहराच्या अधिकाऱ्यांनीं वास्तविक पहातां याचा बंदोबस्त करावयास पाहिजे होता; निदान चौकशी तरी करावयाला हवी होती. पण त्यांचाहि कदाचित त्या लुटीमध्यें भाग असल्यामुळें तशी चौकशी झाली नाहीं. पूर्वीप्रमाणें या असल्या प्रकाराबद्दल हज्जाज नामक इराणच्या सुभेदारानें दाहर राजाकडे तक्रारी केल्या होत्या. पण दाहरानें त्यावर असें उत्तर दिलें होतें कीं " हें नीच काम जे दरवडे खोर करतात ते फार बलाढय असून आह्मालाहि जुमानीत नाहींत. " समर्थ अशा राजाला असलें उत्तर देणें अनुचितच होतें, व त्याचा फायदा घेऊन हज्जाज यानें खलिफ वालीदचें मन वळवून त्याकडून सिन्धप्रांताच्या राजा विरुद्ध धार्मिक युद्ध पुकारविलें. सिंधप्रांत ( अरबी भाषेंत सिंदु व हिंद ) काबीज केल्यावर जी लूट मिळेल ती स्वारीच्या खर्चाच्या दुप्पट तरी असेल अशी हज्जाजनें खात्री दिल्यामुळें खलीपहि पुकारण्यास तयार झाला.

एवढें झाल्यावर इराणची राजधानी कूफा येथें हज्जाजनें स्वारीची कडेकोट तयारी केली आणि तिचें सैनापत्य आपला भाचा व जांवई जो महंमद कासिम त्याकडे सोपविलें. महंमद कासिम

हा सरळ कट्टा मुसलमान असून चतुर व कर्तृत्ववान् सेनापति होता. सिरिया प्रान्तांतील शामहून आलेले ६००० बडया घराण्यांतील लोक त्याला मिळाले. महंमद कासिमानें तटबंदीचीं शहरें व किल्ले पाडून टाकण्यासाठीं लोलगदा यंत्रें आणि भडिमार यंत्रें बरोबर घेतलीं. तीं प्रथम त्यानें शिराज बंदरांत गलबतांवर चढविलीं व तेथून जलमार्गानें देबाल येथें पाठविलीं, व महंमद कासिम स्वतः सैन्यानिशीं मेकरानच्या मार्गानें खुष्कीनेंच परस्पर देबालकडे निघाला. वाटेंत त्यानें अर्मन बेला येथें मुक्काम केला, व नंतर योग्य वेळांत देबालास येऊन पोंहोंचला; इतक्यांत त्याची गलबतेंहि समुद्राच्या वाटेनें तेथें येऊन ठेपलीं. नंतर अल्पकाळांतच महंमद कासिमानें आपलीं यंत्रें खालीं उतरवून त्यांच्यासह सैन्यानिशीं देबालच्या तटा बाहर तळ दिला व तेथून शहरावर हल्ला चढविला. इकडे हज्जाजनें या सैन्याशीं इराणहून नित्य दळणवळण ठेवण्यासाठीं सांडणी स्वारांची योजना केली व तद्द्वारा त्या सैन्याच्या हाल चालीवर प्रत्यक्षपणेंच बारीक नजर ठेविली.

शत्रूनें एवढें केलें तरी देबालच्या बचावासाठीं दाहरानें कांहीं मात्र उपाय केला नाहीं. त्यांच्या हाताशीं आलाफी नांवाच्या आरबाच्या नेतृत्वाखालीं ५०० आरब लढवय्यांची एक टोळी होती. आलाफी हा आपल्या देशांत खून करून शिक्षेच्या भीतीनें इकडे पळून आलेला होता. कासिमानें देबालला वेढा दिला आणि आपलीं भडिमार यंत्रें सुरू केलीं, तेव्हां दाहरानें पुढें काय करावें म्हणून आलाफीचें मत घेतलें. परंतु त्याला जेव्हां आलाफीनें सांगितलें कीं, महंमद कासिम हा अजिंक्य आहे, तेव्हां तो कांहीं एक न करतां स्वस्थ बसला. कदाचित् त्याला असेंहि वाटलें असेल कीं, देबाल शहर बंदो-

बस्ताचें असल्यामुळें पूर्वी अनेकवार जसा त्या शहरानें अरबा-विरुद्ध टिकाव धरला होता तसा तें आतांहि धरील. पण त्याचा असा समज असल्यास तो चुकीचा होता. आतांचा हल्ला पूर्वीच्या मानानें पहातां फार मोठ्या प्रमाणावर असल्यामुळें लवकरच देबाल शहर विजयी कासिमाच्या हातीं आलें. या हल्ल्याच्या बाबतींत एक विशेष गोष्ट सांगण्यासारखी आहे; ती अशी कीं, या शहरांत एक देवाचे मंदिर असून त्याच्या कळसावर त्याहूनहि उंच ध्वज फडकत होता, व त्यांत कांहीं मांत्रिक साधन केलेलें होतें असा तेथील लोकांचा समज होता. त्या अन्वयें त्यांची अशी खात्री होती कीं, जोंवर तो ध्वज पडला नाहीं, तोंवर देबाल नगराला धास्ती नाहीं. हें कासिमाला कळतांच त्यानें मंदिरावर आपला मोर्चा वळविला, आणि ५०० माणसांकडून भडिमार यंत्र चालवून ध्वजासह मंदिराचें शिखर खालीं पाडिलें. झालें, मंदिर व ध्वज पडल्याबरोबर सगळें शहर त्याच्या स्वाधीन झालें. असल्या मांत्रिक यंत्राच्या व जादूटोण्याचा गोष्टीवर तत्कालीन सर्वच लोकांचा विश्वास असे. मग ते बौद्ध असोत वा आरब असोत. एतद्विषयक बगदादचा खलिफा जो हरून-अल-रशीद त्याच्या आरबी भाषेंतील अद्भुत पण असंभाव्य कथा प्रसिद्धच आहेत. या गोष्टी इतिहासकारानें बाजूला ठेवल्या तरी युद्धप्रसंगीं विजय मिळविण्याच्या कामांत सुधारलेल्या राक्षसी लढाऊ यंत्रांचेंहि मोठेंच महत्व आहे हें त्याला नमूद केलेंच पाहिजे. आज जें प्रचंड तोफांचें महत्व आहे तसेंच त्यावेळीं भडिमार यंत्रांना (Catapults) होतें, व तीं चालविण्याच्या कामीं आरब लोकांनीं चांगलें प्रावीण्य संपादिलें होतें. पण हिंदु लोक त्याविषयीं अनभिज्ञ असल्यामुळें अरब लोकांचा हा विजय अंशतः तरी त्यांच्या सुधारलेल्या घातुक यंत्राच्या जोरावर घडून आला असें कबूल करावें लागतें.

याप्रमाणें देबालचा पाडाव केल्यावर विजयी आरबांनीं तेथील हिंदु व बौद्ध लोकांना महंमदीय लोकांच्या भयंकर युद्ध प्रकाराचा पहिला धडा शिकविला. तो असा कीं, त्यांनीं त्या नगरांतील सर्व पुरुष मंडळीची सरसकट कत्तल केली. दुबळ्या बनलेल्या त्या लोकांनीं केविलवाण्या मुद्रेनें आपले जीव वांचवून दया करा म्हणून कासिमाची प्रार्थना केली, तेव्हां 'मला दया करण्याची आज्ञा नाहीं' एवढेंच त्यानें उत्तर दिलें. हिंदी लोकांवर एकदां असल्या भयंकर प्रकारांनीं जरब बसवून पुनः त्यांनीं केव्हां डोकें वर करूं नये असाहि कदाचित असले अत्याचार करण्यांत कासिमाचा हेतु असेल. असो, देबाल येथील उपरोक्त मोठें मंदिर जेव्हां त्याच्या हस्तगत झालें, तेव्हां कासिमाला त्यांत 'बुद्धाच्या आश्रयास राहिलेल्या ७०० सुंदर स्त्रिया' आढळल्या, त्यांना अर्थात् त्यानें दासी करून टाकिलें हें सांगावयास नकोच. हें मंदिर बहुधा बौद्ध भिक्षुणींचा विहार असावें. कारण देबाल शहर बहुतांशीं बौद्धधर्मीय असून त्याचा सुभेदारहि बौद्धच होता. त्याचें नांव जहीन असें चचनाम्यांत सांगितलें आहे. हा जहीन नगराचा पाडाव झाल्या बरोबर तेथून निसटला व नेरून शहरीं दाहराचा जयसिंह नांवाचा एक मुलगा होता त्याला जाऊन मिळाला, इकडे गलबतांवरील कैद केलेल्या मुसलमान यात्रेकरूंना दाखवून देणाऱ्या लोकांना जीवदान देण्याचें कासिमानें कबूल करून ते सांपडल्यावर त्यानें आपलें वचन पुरें केलें. इतकेंच नव्हे, तर तीं माणसें कैदेंत असतां त्यांना ममतेनें वागविल्या बद्दल त्यांच्यावरील अधिकाऱ्यालाहि त्यानें सोडून दिलें. तरी पण कैद्यांना वाग विण्याच्या बाबतींत तेव्हांचे मुसलमान व बौद्ध लोक यांमध्यें केव्हढी तफावत !! कासिमानें त्या अधिकाऱ्याला जीवदान दिलें खरें, पण त्याला मुसलमान करून सोडलेंच.

एवढें झाल्यावर कासिमानें देबाल नगराची लूट करविली, आणि तींत सांपडलेल्या मालाचे पांच भाग करून खलीफाला देण्यासाठीं त्यांतील एक सरकारी वांटा म्हणून धर्माज्ञेप्रमाणें हज्जाजकडे पाठवून दिला, व उरलेले चार भाग त्यानें आपण स्वतः व आपले सैनिक यांमध्यें ठरींव नियमानुसार वांटून घेतले. लुटीचा वांटणीचा असा हा धर्मोक्त प्रकार असल्यामुळें अरब लोक सरकारासाठीं व त्याबरोबर आपल्या स्वतःच्या हितासाठीं फारच मोठ्या निकरानें लढत व विजय-संपादनार्थ शिकस्तीचा प्रयत्न करीत. कारण जय झाल्यास त्यांत राजा, सेनापति व प्रत्येक सैनिक यांचें सारखेंच स्वहित होतें. अरब लोकांना मिळालेल्या अव्याहत जयाचें हें हि अंशतः एक कारण आहे.

मुसलमानांनीं सुरू केलेल्या भरतखंडाच्या या विजयसत्राला असा हा भयंकर आरंभ होऊन त्यांत देबाल नगराचा बळि प्रथम पडला. पूर्वी सांगितल्याप्रमाणें तेथील बहुतेक सर्व पुरुष मंडळीची कत्तल झाली, सर्व संपत्ती अरबांनीं लुटून नेली, खुषीनें किंवा जबरीनें अनेक लोकांना महंमदीय धर्माची दीक्षा देण्यांत आली, आणि बहुतेक तरुण स्त्रियांना दासी म्हणून इराणाकडे रवाना करण्यांत आलें. याप्रमाणें भयंकर अत्याचार करून कासिमानें देबालच्या कारभाराची व्यवस्था लाविली, व तेथून पुढें नेरूनकडे कूच केलें. हें शहर सिन्धुनदीच्या पश्चिम तीरावर देबालच्या बरेंच वर आजच्या हैदराबाद नजीक वसलेलें होतें. कासिमाला तें काबीज करावयास मुळींच प्रयास पडले नाहींत. त्याचा बौद्धधर्मीय सुभेदार त्या वेळीं तेथें नसल्यामुळें त्याच्या तटाचे दरवाजे बंद होते खरे; पण तेथें थोडयाशा सैन्यानिशीं असलला दाहराचा मुलगा जयसिंह हा बापाच्या आज्ञेवरून नदीपलीकडे ब्राह्मणाबाद येथें निघून गेल्यामुळें लढण्यास कोणी पुढें येण्यासारखेंच नव्हतें.

कांहीं वेळानें तो बौद्ध सुभेदारहि परत आला व कासिमाच्या छावणींत जाऊन त्याला शरण गेला. तसेंच त्यानें कासिमाच्या सैन्याला विपुल सामुग्री पोंचविण्याचें कबूल केल्यामुळें नेरूनचा बचाव झाला. लगेच महंमद कासिमानें त्यांत प्रवेश करून एक देवालय मोडून त्यावर मशिदीची उभारणी केली आणि नगराचा कारभार हातीं घेऊन त्याचीहि व्यवस्था लाविली.

पुढें कूच करितांना वाटेंत न जिंकिलेला प्रदेश मुळींच राहूं नये म्हणून कासिमानें प्रथम सिन्धुनदीच्या पूर्वेस न जातां तसाच उत्तरेकडे शिबिस्तानवर मोर्चा धरिला. तेथील लोक म्हणजे शिबि लढवय्ये क्षत्रिय होते. त्यांची राजधानी तटबंदीची असून तेथें चंद्राचा मुलगा व दाहराचा चुलत भाऊ वत्सराज हा अधिकारावर होता. त्यानें कासिमाशीं दोन हात करण्याचें ठरवून तटाचे दरवाजे बंद केले. पण तेथील बहुतेक लोक बौद्धधर्मीय असल्यामुळें त्यांनीं वत्सराजाला निक्षून सांगितले कीं "आम्हीं भिक्षु, आमचा धर्म म्हणजे अहिंसा; त्याप्रमाणें युद्ध करणें व हत्या करणें हें आम्हाला निषिद्ध. शिवाय तुमचें ठिकाण मात्र मजबुतीचें. अरब लोक आमचें ठिकाण काबीज करून आमचे प्राण व धन हरण करतील अशी आम्हांला भीति वाटते. म्हणून तुम्हीं त्याच्याशीं संधिच करावा असें आमचें तुम्हाला सांगणें आहे." हा भागूबाईचा सल्ला वत्सराजाला अर्थातच रुचला नाहीं व त्यानें युद्ध सुरू केलें. कासिमानें नदी मार्गानें गदायंत्रें व भडिमार यंत्रें गलबतांतून नेरूनपर्यंत आणविलीं, व पुढें सिबिस्तानपर्यंत खुष्कीनें नेऊन त्या राजधानीवर मारा सुरू केला. तेव्हां आंतील बौद्ध मंडळीनें कासिमाला निरोप पाठविला कीं, "आम्हीं शेतकरी, कारागीर, व्यापारी व इतरहि सर्व लोक मिळून वत्सराजाचा पक्ष सोडिला आहे व त्याचा अधिकार आम्ही आतां मानीत नाहीं.'

याचा परिणाम असा झाला कीं, सिबिस्तानी थोडयाच वेळांत कासिमाच्या हातीं पडलें, व आंतील किल्ल्याचें रक्षण करणें आतां कठीण असें वाटून वत्सराज रात्रीचे काळोखांत संधि साधून आपल्या माणसांसह तेथून निसटून बुधिया नगराकडे पळून गेला. तो गेल्यावर महंमद कासिमानें सिबिस्तानांत प्रवेश करून तें लुटलें, पण त्यांतील समानी ( श्रमण ) म्हणजे बौद्ध लोकांना मात्र हात लावला नाहीं. लुटींत सांपडलेल्या वस्तूंचा पंचमांश त्यानें नित्यनियमाप्रमाणें हज्जाजकडे लावून दिला, आणि बाकीचा भाग सैनिकांत वांटून टाकला. मग सिबिस्तानांतील किल्ला व भोंवतालचा प्रदेश यांच्या कारभाराची योग्य व्यवस्था लावून तो सैन्यासह तेथून वत्सराजाच्या मागें लागण्यासाठीं बुधियाकडे निघाला. तेथें युद्ध होऊन तोहि सर्व मुलुख कासिमाच्या ताब्यांत आला. याप्रमाणें सिन्धुनदीच्या पश्चिमेकडील सर्व प्रदेश हस्तगत केल्यावर कासिम सिबिस्तानांत मुळींच सैन्य न ठेवतां सिन्धुनद वलांडून पूर्वेकडे जाण्याचा विचार करण्यासाठीं नेरूनला परत आला. या ठिकाणीं सिन्धुनदीच्या प्रवाहाच्या दिशेंत आज मितीस फारच बदल झालेला आहे; नेरून म्हणजे आजचें हैदराबाद पूर्वी त्या प्रवाहाच्या पश्चिमेस होतें तें आतां प्रवाह फिरल्यामुळें पूर्वेस झालें आहे.

येथें नेरून आणि सिबिस्तान येथील बौद्ध लोकांच्या वर्तणुकीचा थोडा तरी विचार करणें अवश्य आहे. या बाबतींत गिबन या रोमन साम्राज्याच्या इतिहासकारानें ख्रिस्ती धर्मासंबंधानें जो शेरा मारला आहे, तोच या बौद्धांनाहि लागू पडतो. गिबन म्हणतो, ख्रिस्ती धर्मामुळें रोमन लोकांना आलेला दुबळेपणा हाच त्यांच्या ऱ्हासाला मुख्यत्त्वें कारणीभूत झाला. तसा हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्यावर घाला पडावयासहि बौद्धधर्माचा प्रसार आणि

जोरच येथें विशेषेंकरून कारण झाला असें इतिहासाला नमूद केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. " ख्रिस्ती धर्मानें तरी टयूटानिक लोकांना कोठें दुबळें केलें ? तसें पौररुय देशांत सुद्धां सगळेच लोक दुबळे झाले असें नाहीं. मंगोलियन वंशीय व त्यांत विशेषतः जपानी लोकांवर तसा दुबळेपणाचा परिणाम झालेला नाहीं" असें कोणी म्हणेल. पण जीवंत प्राण्यांना न मारण्याचें जें अहिंसेचें तत्व व तदनुसार मांसाहाराचा निषेध यांचा येथील जनतेच्या मनावर मुख्य धार्मिक गोष्टी म्हणून खोल परिणाम झाल्यामुळें त्यांचें आचरण मवाळ सौम्य त्यांची क्षत्रियवृत्ति स्वाभाविकपणेंच ऱ्हास पावत चालली. अशी गोष्ट पाश्चात्य जर्मन किंवा पौर्वात्य जपान यांची झाली नाहीं. हिंसा व तदनुषंगी क्रूरपणा यांचें स्वरूप हिडीस तर खरेंच, पण क्रौर्याशिवाय क्षात्रवृत्ति कायम रहाणें कठीण. बौद्धधर्मीय हर्षवर्धनानें क्षात्रवृत्तीनें अफाट साम्राज्य स्थापन करण्यांत यश मिळविलें खरें, पण तो लहानपणापासून मांसाहारीच होता. मागाहून शेवटीं शेवटीं मात्र तो आहार त्यानें सोडला. गुप्त राजे जुन्या धर्माचे व तदनुसार पशुयज्ञाचे अनुयायी असल्यामुळें मांसाहारीच होते व त्यांच्या अमदानींत बहुतेक मध्यम वर्गांतील लोक म्हणजे व्यापारी, शेतकरी, वाणी, उदमी इत्यादि हेही मांसाहारीच असल्यामुळें ब्राह्मण क्षत्रिय या वरच्या आणि शूद्र या खालच्या जातींतील लोकांप्रमाणेंच वैश्यांनींहि क्षात्रवृत्तीचा त्याग केलेला नव्हता. त्यामुळेंच स्वतः वैश्यवर्णीय असूनहि मगधांतील गुप्त आणि ठाणेश्वरचे वर्धन राजे कुशान व हूण यांसारख्या परकीय क्रूर लोकाचें हल्ले परतविण्यास समर्थ झाले. पण बौद्धधर्माकडे कल झुकल्यावर पुढें त्या धर्माच्या अधिक कळकळीमुळें व आपल्या सार्वभौम सत्तेच्या जोरावर हर्षवर्धनानें प्राणि–हिंसेचा निषेध करून मांसाहाराला

देशांतून काढून लाविलें. या निषेधाचा मागाहून असा स्वाभाविकपणेंच परिणाम झाला कीं, पन्नास वर्षांच्या अवधींत मांसाहारापासून अलिप्त राहिल्यामुळें मध्यम वर्ग आठव्या शतकाच्या आरंभीं जो एकदां वीर्यहीन बनला तो अद्यापिहि तसाच आहे. जुन्या चालीचे ब्राह्मण व वीर्यवृत्ति क्षत्रिय यांनीं मात्र या निषेधाला फारसें जुमानिलें नाहीं. तथापि त्यामुळें आरब लोकांचे हल्ले सुरू झाले, तेव्हां एकंदर देशांतील निम्मेहून अधिक लोक शिळपट मेषवृत्ति बनलेले होते व त्यामुळें क्रूर अशा अरबांच्या शस्त्रांना ते सहजच बळी पडले. सिविस्तानच्या बौद्ध लोकांनीं सांगिल्याप्रमाणें अहिंसा व युद्धपराङमुखता हींच बौद्ध धर्माचीं मुख्य अंगें असल्यामुळें व तसें ते लोक उघडपणें प्रतिपादूं लागल्यामुळें ठिकठिकाणीं नेरून व सिव्हिस्तानप्रमाणेंच लोकांत दोन पक्ष उत्पन्न झाले; एक युद्धानूकूल व दुसरा युद्धविरोधी. प्रथम पक्षांत शेतकरी, व्यापारी, कारागीर ह्मणजे वैश्य व शूद्रांपैकीं शांतवृत्तीचे लोक याचा समावेश होई आणि बहुजनसमाज म्हणजे मध्यम वर्ग बहुधा याच लोकांचा बनलेला असतो. त्यांना मरणें व मारणें या दोन्ही गोष्टी किळस उत्पन्न करीत असल्यामुळें अरब लोकांशीं गांठ पडून त्यांचें सामर्थ्य अधिक आहे व ते विजयी होणार असें पहातांच ते त्यांच्या पक्षाला जाऊन मिळत. अरबांशीं जोराचा सामना करणारे मग उरले काय ते थोडेसे ब्राह्मण व क्षत्रिय त्यांचा देकरन बाधिया येथें ऱ्हास झाला हें सांगावयाचे आहे.

बुद्धिया येथें कासिम पोंचल्यावर वत्सराज आणि त्याचे ठाकूर अनुयायी यांच्याशीं त्याचें युद्ध होऊन "आपले पापी हेतु सिद्धीस नेण्याचा प्रयत्न करीत असतां" वत्सराज सगळ्या मंडळीसह मारला गेला असें चचनाम्यांत वर्णन आहे. त्या ठिकाणीं जाटांची वस्ति असून चचानें जरी त्यांना शूद्रवृत्ति बनविलें होतें तरी ते जात्याच

वीर्यशाली असल्यामुळें त्यांनींहि अरबांना निकरानें तोंड दिलें. तथापि एकंदरींत अर्धे अधिक लोक युद्धपराङमुख अतएव भागूबाई अरबांना मिळाल्यामुळें त्या थोडयाशा जाटलोकांचा कांहीं इलाज चालला नाहीं आणि सिन्धप्रांताची भवितव्यता कांहीं चुकली नाहीं. तथापि सुदैवाची गोष्ट एवढी होती कीं, पशुयज्ञात्मक आर्यधर्माचें ( त्याला अद्यापि हिंदुधर्म ही संज्ञा मिळाली नव्हती ) त्या वेळीं इतर ठिकाणीं पुनरुज्जीवन होऊन बौद्धधर्माचा पाडाव होऊं लागला व त्याच्या पिच्छेहाटीमुळें हिंदुस्थानच्या इतर भागांची दुर्दशा पुढें तीन शतकें तरी टळली. पण सिन्ध प्रान्त जो एकदां अरबांच्या ताब्यांत गेला तो शेवटपर्यंत तसाच राहिला.

महंमद कासिम नेरून येथें आल्यावर सिन्धुनदी कोणत्या ठिकाणीं ओलांडावी याचा विचार करीत बराच काळ राहिला; पण त्याला कांहीं मार्ग सुचेना. नदीचा हा त्याच्या मार्गांत मोठाच अडथळा होता. इकडे दाहरालाहि आपल्या कर्तव्याचा विसर न पडल्यामुळें त्यानें या संधीचा उपयोग करण्याचें ठरविलें; म्हणजे अरब लोकांशीं गांठ पडण्यापूर्वी त्यानें युद्धाची चांगली तयारी करून ठेविली. आपला पुत्र जयसिंह याला त्यानें नदीच्या पश्चिम तीरावरून आपलेकडे बोलावून आणिलेंच होतें. आतां त्याच्या हाताखालीं कांहीं निवडक सैन्य देऊन त्यानें अरबांना नदी ओलाडूं न देण्याच्या कामावर त्याची योजना केली. तो स्वतः देखील मोठें सैन्य घेऊन अलोराहून येऊन जयसिंहाच्या मागें कांहीं अंतरावर मैदानांत तळ देऊन राहिला. इतकेंच नव्हे तर कांहीं वेळानें आरबांच्या समोरच्या तीरावरच तो येऊन दाखल झाला. तो शरीरानें भक्कम असून उत्तम तिरंदाज होता. त्याचें धनुष्य इतर कोणाला वांकवितां येत नसे असें मुसलमानी बखरकाराांनीं नमूद केलेलें आहे. तीरावर आल्यावर आपलें जड धनुष्य

वांकवून त्यावर त्यानें दोरी चढविली, आणि शक्य तितकी ती ताणून, नदीपलीकडे उभा राहून आपल्यावर बाण टाकण्यास सज्ज झालेल्या एका अरब घोडेस्वारावर नेम धरून त्यानें बाण टाकिला आणि स्वाराचा वध केला. या धाडसी कृत्यावरून दाहराच्या शरीरसामर्थ्याची आणि समरांगणावर निर्धास्तपणें वावरण्याच्या धैर्याची उत्तम साक्ष पटते. हे गुण पूर्वी अलेक्झँडरचा प्रतिस्पर्धी पौरस आणि मागाहून शहाबुद्दीन घोरीचा प्रतिस्पर्धी पृथ्वीराज यांच्या अंगीं असलेल्या गुणाहून खास कमी नव्हते, तथापि असल्या एका किंवा अनेक रजपूत वीरांमध्यें व्यक्तीशः असलेल्या या पराक्रमाचा निग्रही व आवेशी अरबांपुढें व त्यांना अनुकूल झालेल्या फितुरी हिंदूंपुढें कांहीं टिकाव लागण्यासारखा नव्हता, हें सांगावयास नकोच. हिंदुस्थानच्या अवनतीचीं पूर्वी जीं कारणें सांगितलीं त्यांत येथील लोकांची आपसांत फूट आणि त्यामुळें नीचपणानें त्यांपैकीं कांहींनीं केलेला मायभूमीचा विश्वासघात यांची आतां भर घातली पाहिजे. आमच्याच लोकांच्या या विश्वासघातकी वर्तनाविषयीं अरब बखरकार काय म्हणतो तें आतां पाहूं.

महंमद कासिम नेरून येथें सिन्धुनदीच्या पश्चिमतीरावर येऊन ती ओलांडण्याच्या विवंचनेंत पडला होता. त्याला होडया व जहाजें मिळेतना, सैन्यांत अन्नाचा व इतर सामुग्रीचा तुटवडा पडलेला, शिपाई व घोडे अजारी पडलेले अशा स्थितींत त्याला मोठी काळजी लागून राहिली. पण तो मोठा निश्चयी तसाच भाग्यशालीहि होता. त्याला इराणांतून सहाय्य करणारा हज्जाज देखील त्याच नमुन्याचा खंबीर पुरुष होता. त्यानें या कासिमाच्या अडचणींत त्याला २००० नवीन घोडे व ताज्या दमाच्या नव्या शिपायांची एक तुकडी मदतीला पाठवून दिली, व त्याबरोबर एक अत्यंत संस्मरणीय असा सल्लाहि धाडिला. त्याचा सारांश असा का,

"राज्यसंपादनाचे मार्ग चार आहेत: १ ला, संधि व स्नेह, २ रा द्रव्य खर्चण्याची तयारी व उदार देणग्या, ३ रा विरोध प्रसंगीं योग्य उपायांचें अवलंबन, आणि ४ था जबरदस्त सैन्य, शक्ति आणि वैभव. तद्देशीय राजे करतील.ती ती विनंति मान्य करावी, व गंभीरपणें वचन देऊन सर्वांचें समाधान ठेवावें." आमच्या नीतिशास्त्रांत जे साम, दाम, दंड आणि भेद असे चार उपाय सांगितले आहेत त्याचेंच हें आरबी रूपान्तर आहे. शत्रूचा पाडाव करावयाचा तर वेळीं त्याच्याशीं सख्य करून वेळीं त्याला मोठमोठ्या देणग्या देऊन, साधल्यास त्याच्या राज्यांत फुट पाडून आणि शेवटीं निवळ जबरदस्तीचा उपयोग करून तो करतां येतो. यांपैकीं पहिल्या दोन उपायाचें अवलंबन दाहराच्या बाबतींत तरी कासिमाला शक्य नव्हतें. कारण दाहर हा अत्यन्त निग्रही व श्रीमान होता. तेव्हां उरले शेवटचे दोन उपाय कासिमाच्या सुदैवानें त्याला दाहराच्या राज्यांत फूट पाडून फितुरी उत्पन्न करण्याची संधि त्यास लवकरच मिळाली. सिन्धुनदीच्या पात्रांत एक लहानसें बेट असून तें मोका बस्सया नांवाच्या अधिकाऱ्याच्या ताब्यांत होतें. या अधिकाऱ्याचें कांहीं कारणानें दाहराशीं जुळेनासें झालें होतें. कासिम तेथें असतांना हा मोका त्याला जाऊन एकदम मिळाला व कासिमानेही त्याला बराच मुलुख देण्याचें कबूल केलें. पुढें अरब लोकांनीं जीं जीं युद्धें केलीं, त्या सर्वांत त्यांना मोका बस्सयानें प्रामाणिकपणे आणि उत्साहानें साह्य केलें. म्हणजे सिन्धुदेशाच्या इतिहासांतील याची कामगिरी लंकेंतील बिभीषणाच्या कामगिरीसारखी झाली. हा जातीनें रजपूत-ब्राह्मण असून त्याला आपल्या मायदेशाविषयींच्या कर्तृव्याची ब्राह्मतः तरी जाणीव होती असें दिसतें. कारण त्यानें कासिमाला लिहिलेल्या पत्रांत असें होतें कीं, "सिन्धु देश हा

आमचा मातृदेश आहे. आमच्या वाडवडिलांनीं हा आमच्या साठीं पैदा केलेला असल्यामुळे त्यावर आमचाच वारसा आहे. आम्ही आणि राजा दाहर यांच्यांत नात्याचा संबंधहि आहे. तो सार्वभौम असल्यामुळें दुसऱ्या हिंदी राजांवर त्याचा अंमल चालतो. म्हणून त्याला चिकटून राहून त्याच्याशीं सहकार्य करणें हेंच आमचें कर्तव्य आहे. त्याचें सुखदुःख म्हणजे आमचेंच सुखदुःख; कारण आम्ही एकाच मायभूमीचे पुत्र आहों. पण शहाणपणा, बुद्धिवाद आणि भवितव्यता यांचा विचार करतां असें स्पष्ट दिसतें कीं, हा देश इतःपर आमच्या हातीं रहाणें शक्य नाहीं. म्हणून तुम्हाला येऊन मिळणें हाच एकंदरींत सुज्ञपणाचा मार्ग दिसतो." मोका बस्सयासारख्या देशद्रोह्यांचा मायभूमीची राखरांगोळी करतांना हा नित्याचाच कोटिक्रम आहे. आलेक्झँडरच्या वेळीं तक्षशिलेच्या राजापासून तों अगदीं अलीकडील गुजराथच्या करण राजाच्या नागर प्रधानापर्यंत अनेक देशबुडव्यांनीं ह्याच नीच कोटिक्रमानें आंतून टोंचणाऱ्या आपल्या सदसद्विवेक बुद्धीला बोथट करून टाकिलें, व देशबांधवांच्या गळयावर सुरी ठेविली. कोणत्या देशांत असल्या अधम स्वभूशी कुपुत्रांचा निर्भर्त्सना करावी तितकी थोडीच.

महंमद कासिमानें बेट प्रांताच्या या अधिकाऱ्याला त्या प्रान्ताचा मालक करण्याचें वचन देऊन त्याप्रमाणें आपल्या सहो शिक्यानिशीं त्याला कराराहि लिहून दिल्यावर मोकानें त्याला उलट सर्व प्रकारची सामुग्री पुरविली. इतकेंच नव्हे, तर आणखी नदी उतरून त्याला पूर्वेकडे जाण्याच्या कामीं शक्य तितकें साहाय्य सुद्धां केलें. म्हणजे कासिमाला जरूर लागणाऱ्या होडया वगैरे त्यानें पुरवून बेटाच्या बाजूनें नदी उतरून जाणें सोईचें असल्यामुळें तो मार्गहि त्याला दाखवून दिला. मग तेथील पात्रा इतका

रुंदीचा होडयांचा पूल कासिमानें नदीच्या पश्चिम तीरावर तयार करून ठेविला. इकडे फितुरींची ही सर्व हकीगत दाहर राजाला कळतांच त्यांनें मोकाचा धाकटा भाऊ जो रासिल त्याची कासिमाला नदी उतरूं न देण्याच्या कामावर योजना केली, व त्याला बेट प्रांतावरील अधिकारी नेमिलें. पण तोहि आपल्या भावाप्रमाणेंच मनाला फसवून विश्वासघातकी बनला. या दोघां शिवाय आणखी देखील कित्येक ठाकूर व जाट लोक अरबांचें वर्चस्व मान्य करून त्यांना मिळाले. अर्थातच या सर्वांची योजना बेट प्रांतावर होऊन अरबलोकांना नदीपार जाण्यांत मदत करण्याची कामगिरी त्यांच्याकडे आली. मग पूर्वी तयार करून ठेविलेल्या होडयांच्या पुलाचे एक टोंक पश्चिम तीरावर जखडून दुसरें टोंक प्रवाहाच्या साह्यानें ढकलीत ढकलीत त्यांनीं पूर्व तीरावर नेलें तेथें तें टोंक पोंचतांच रासिलच्या हाताखालचे लोक तें तेथें बांधू द्यावयास अडथळा करूं लागले. पण त्यांच्यांतहि फितुरी होतीच. त्यांच्यांत विरोध उत्पन्न झालेला पाहून व त्याचा ताबडतोब फायदा घेऊन कासिम पक्षाच्या बहादरांनीं नांगर टाकून होडया जागीं खिळवून टाकिल्या; व पूल तयार झाला. याप्रमाणें मोका, त्याचे जाट अनुयायी व ठाकूर यांनीं रासिलच्या माणसांची समजूत घालून पूल तयार झाल्यावर अरब लोक विशेष अडचण न पडतां पूर्व तीरावर येऊन दाखल झाले. तेथें त्यांना तोंड देण्यासाठीं जयसिंह सैन्यासह तयार होता. त्यानें शक्य तितका अडथळा करून अरबांना थोपवून धरिलें. परंतु त्याचा अरबांनीं मोड केला. युद्धांतून पळून जावयाचें नाहीं असा जयसिंहाचा निश्चय होता. पण त्याच्या हत्तीच्या महातानें आपल्या धन्याचा जीव बचावण्याच्या दृढ इच्छेनें निसटून ‘ जावयाचें आहे काय ?’ असा हत्तीला उद्देशून प्रश्न केला. त्यावर ‘ही गोष्ट शक्य नाहीं असें

जयसिंहानें उत्तर दिलें. ' तेव्हां त्या चतुर व धारिष्टवान महातानें वेढा घालणाऱ्या अरबांच्या अंगावर हत्तीला एकदम चालवून त्यांची दाणादाण उडविली व अशा रीतीनें मार्ग मोकळा करून जयसिंहाला सुखरूपपणें तो दाहराकडे घेऊन आला. त्याला सुखरूप परत आलेला पाहून दाहराला आनंद झाला हें सांगावयास नकोच.

याप्रमाणें नदी उतरल्यावर व तेथें अडथळा करावयास सज्ज असलेल्या जयसिंहाची वर सांगितल्याप्रमाणें अरबांनीं बोळवण केल्यावर पुढें त्यांनीं मिळविलेल्या विजयांचें सविस्तर व साग्र वर्णन करण्याची आवश्यकता नाहींच. दाहर राजा अलोरहून निघून आपल्या अगदीं निवडक सैन्यासह ब्राह्मणाबादच्या दक्षिणेस झीम प्रान्तांत उतरला होताच. ' हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जितो वा भोक्ष्यसे महीम् ' या प्राचीन क्षत्रियांच्या ब्रीदाप्रमाणें जिंकावयाचें किंवा मरावयाचें असा ठाम निर्धार करून त्यानें अरबांशीं तुमुल रणकंदन केलें. हा संग्राम फारच भयंकर झाला. दाहराच्या बाजूला ५००० स्वार, १०० हत्ती आणि चिलखतवाले २०,००० पायदळ इतकें सैन्य होतें असें चचनाम्यांत म्हटलें आहे. स्वतः दाहर एका मत्त हत्तीवर स्वार झाला होता. हत्तीच्या पाठीवर पोलादी चिलखत अस्तरलें असून त्यावर हौदा जखडून बांधलेला होता. दाहर नखशिखान्त कवचावृत असून त्याच्या हातांत पूर्वीं सांगितलेलें वजनदार धनुष्य होतें, व त्याचा गुण शक्य तितका ताठ चढविलेला होता. हौद्यांत दाहराच्या दोन्ही बाजूंना दोन दासी असून एक त्याला भात्यांतून बाण पुरवीत होती व दुसरी तांबूल वाहिनी जरूर तेव्हां विडा करून देत होती. त्याच्या उजव्या बाजूकडे जयसिंह आणि डावीकडे त्याचा पुतण्या जहीन असे आपापल्या सैन्यासह तयारीनें उभे होते; आणि त्याचा मुलगा दहरशिया सिन्ध प्रांतांतील अनेक सरदार

(चचनाम्यांत यांचीं नावेंहि दिलीं आहेत) व पूर्व भागांतील जाट यासह पिछाडी राखीत होता. विरुद्ध बाजूला कासिमाचें सैन्य किती होतें हें सांगतां येत नाहीं, पण त्याजवळ ६००० तरी घोडेस्वार असून त्याच्यापाशीं भाले व बाण हीं हत्यारें होतीं. शिवाय कांहीं पायदळहि त्याजवळ होतें, व मोकाचें सैन्य, ठाकूर आणि पश्चिम सिन्धप्रांतांतील जाट इत्यादि फितूर झालेले लोक त्याला सहाय होते. तथापि त्यांची संख्या म्हणण्यासारखी नसावी. दोन्ही पक्ष जवळ येऊन सकाळचे प्रहरीं घनघोर युद्ध सुरू झालें व तें संध्याकाळीं प्रहर दिवसपर्यंत चाललें. या सुमारास दाहराचें दैव फिरून त्याच्या पक्षाकडे अपघात घडून आला. युद्धदेवतेच्या मनांत त्या दिवशीं अरबांनांच जय प्राप्त व्हावा असें होतें. दाहर मोठ्या निकरानें शरसंधान करीत असतां मधून मधून चक्र हें विशिष्ट भारतीय अस्त्रही सोडीत होता. या अस्त्राची अरब लोकांना माहिती नव्हती. त्याचा मार व नेम इतका अचूक असे कीं, घोडा, स्वार अथवा पदाति त्याच्या ज्याच्या म्हणून तें अंगावर येई त्याचें त्याचे शिर तें धडापासून मोकळें करी. पण याप्रमाणें दाहर पराक्रम करीत असतां अरब लोकांपैकीं सोडलेले नाफ्थ्याचे जळाऊ बाण त्याच्या हत्तीवरील हौद्यावर जोरानें आदळून त्यानें पेट घेतला. आपल्या देशांत अनेक युद्धप्रसंगीं असले अपघात घडून आलेले आहेत. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, आपले सेनापति नेहमीं उंच हत्तीवरच आरूढ असतात व त्यामुळें शत्रूंना त्यावर शस्त्रसंधान करणें फार सुलभ होतें. हत्तीचा हौदा पेटूं लागतांच ती उष्णता सहन न होऊन हत्ती भडकला आणि महाताच्या प्रयत्नाला न जुमानतां युद्धाच्या गर्दीतून निसटून जवळ एक तलाव होता त्यांत घुसला आणि वरून होरपळल्यामुळें त्यानें आपलें सर्वांग पाण्यांत बुडविलें. अर्थात् महातासह दाहराची

हौद्यांतून जोरानें उचलबांगडी होऊन ते खालीं पडले. ते कसे बसे पाण्यांतून बाहेर आले, पण इतक्यांत त्यांचा पाठलाग करीत असलेली एक अरबांची टोळी तेथें पोहोचून तिनें त्यांवर हल्ला करून दोघांचेहि प्राण घेतले. झालें, सेनापति मला असतां हिंदी सैन्याची नित्य जी स्थिति होते ती त्यावेळीं दाहराच्याहि सैन्याची होऊन तें दशदिशा पळत सुटलें. त्याची पूर्ण दाणादाण झाली. त्यांपैकीं पुष्कळांची अरब लोकांनीं कत्तल केली व अगदीं थोडे लोक मात्र जवळच असलेल्या रावर नामक किल्यांत जाऊन पोंचले. याप्रमाणें सिन्ध प्रान्ताचें स्वातंत्र्य हरण करणाऱ्या मुख्य युद्धाचा निकाल अरबलोकांना अनुकूल झाला. हा दिवस इ. स. ७१२ म्हणजे हिजरी शकाच्या ९३ व्या वर्षांतील रमजानची १० वी तारीख होय.

युद्धानंतर विजयी झालेल्या आरबांना अमूप लूट मिळाली. त्यांनीं हत्ती, घोडे व त्यांवरील मूल्यवान अलंकार, तसेंच गाड्या, बैल वगैरे सर्व सांपडलें तें हस्तगत करून त्यांपैकीं पंचमांश ऐवजाची किंमत हज्जाजकडे पाठवून दिली. त्याबरोबर महंमद कासिमानें विजयानंदाचें व आभारप्रदर्शक असें हज्जाजला पत्र लिहून दाहर आणि त्याचे मांडलिक यांचीं मस्तकें आणि ध्वजा-छत्रादि राजचिन्हेंहि लावून दिलीं. दासी म्हणून धरून नेलेल्या स्त्रियांत दाहराची राणी, अन्यराजांच्या कांहीं मुली, तशीच दाहराची एक पुतणी इतक्या होत्या; त्यांना अर्थात खलीफाकडे पाठविण्यांत आलें. पण दाहराची राणी लाडी हिला मात्र दासीपणांतून कासिमानें मुक्त केलें आणि जित राजांच्या स्त्रियांशीं लग्न करणाऱ्या विजयी सरदारांच्या नित्याच्या उत्कट आवडीला अनुसरून त्यानें तिला आपली पत्नी करून टाकिलें.

हिंदु व अरब लोकांच्या या प्रथम युद्धाच्या आरंभीं घडून आलेल्या एका विशेष गोष्टीचा येथें सविस्तर उल्लेख केल्यावांचून आमच्यानें रहावत नाहीं. पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, दाहाराच्या हाताखालीं ५०० अरबांची एक टोळी असून तिचा अलाफी नांवाचा अरब नाईक होता. या तुकडीला दाहरानें युद्धाच्या वेळीं आघाडी संभाळावयास सांगितलें. तेव्हां अलाफानें उत्तर केलें, " महाराज, आपण आमच्यावर अनेक वार दया करून आह्माला ऋणीकरून ठेविलें आहें. परंतु आह्मी मुसलमान असल्यामुळें आह्माला इस्लामाच्या सैन्याविरुद्ध शस्त्र उपसतां येणार नाहीं. कारण तसें करून आम्हाला मरण आलें तर तें अधम पाप्यांना मरण येंतें तसलें होय; व आमचा जय झाला, तर आह्माला खुनाचें पातक लागून अघोर नरकाच्या शिक्षेला आम्हीं पात्र होऊं. " असें बोलून तो आपल्या टोळीसह दाहराला सोडून गेला; आपल्याच धर्मबांधवांवर शस्त्र चालविण्याचें त्यानें साफ नाकारिलें. पुढें हे लोक एकदम काश्मीरला गेले असें कोणी म्हणतात, व दुसरे कांहीं जण म्हणतात कीं, कांहीं वेळ त्यांनीं जयसिंहाला मदत केली पण तो जेव्हां सिन्ध मधून पळून नव्या रजपुतान्यांत गेला, तेव्हां मग ते काश्मीराकडे गेले. या हकीगतीवरून सदर संस्मरणीय दिवशीं हिंदु व मुसलमान यांच्या वर्तनांतील ठळक विरोध दिसून येईल. या युद्धांत कांहीं हिंदुलोकांनीं आपल्या देशबांधवांचे व धर्मबांधवांचे मुसलमानांच्या पक्षाला मिळन गळे कापण्यास कमी केलें नाहीं; पण कोणत्याहि मुसलमानानें मात्र असला प्रकार केला नाहीं. या गोष्टीवरून तत्कालीन मुसलमानांचा धर्माभिमान किती जाज्वल्य व प्रखर होता याचें प्रत्यंतर मिळतें. धर्माभिमाना-शिवाय त्यांच्यामध्यें उच्च प्रकारच्या नीतीमत्तेचाहि अविर्भाव दिसून येतो. दाहराच्या नोकरींत असलेल्या ५०० अरबांनीं आपल्या

धर्मबांधवांविरुद्ध लढण्याचें नाकारलें, पण कासिमाला मिळून दाहरा विरुद्ध लढून स्वामिद्रोहाचें पातकहि त्यांनीं केलें नाहीं. याच्या उलट विजयनगरच्या रामरायाच्या हाताखालीं असलेल्या मुसलमानांचें वर्तन पहा. तालिकोटच्या सुप्रसिद्ध संग्रामांत त्यांनीं रामरायाच्या मुसलमान शत्रू विरुद्ध लढण्याचा आरंभीं मोठा आव घातला, पण प्रत्यक्ष युद्ध सुरू होतांच त्यांनीं बेलाशक हिंदुसैन्या वर शस्त्र चालविण्यास सुरुवात केली. अलाफीलाहि असें करतां आलें असतें. पण असला विश्वासघातकीपणा त्यावेळी मुसलमानी धर्मांत नव्हता. काफर लोकांशीं सुद्धां विश्वासघात करणें पाप आहे असें त्याचें तत्व होतें. काफर ऊर्फ नास्तिक लोकांशीं बेइमान होण्यास हरकत नाहीं, ह्या नीच तत्वाचा जसा पुढें कांहीं ख्रिस्ती उपदेशकांनीं अवलंब केला, तसा पुढील इतिहासांत कांहीं प्रसंगीं मुसलमानांनीहि केल्याचें आढळतें. पण महंमद कासिमाच्या वेळीं अरब लोकांनीं असा बेइमानपणा कधीं केला नाहीं. विरुद्ध असलेल्या हिंदु लोकांची कत्तल करणें, व त्यांच्या स्त्रियांना दासी म्हणून पकडणें किंवा त्यांच्याशीं लग्न लावणें हा तर त्यांचा उघड बाणाच होता, पण एकदां त्यांनीं कोणा हिंदूला अभयवचन दिल्यावर तें त्यांनीं कधीं मोडलें नाहीं. धर्मप्रसाराच्या कामीं देखील त्यांनीं हाच बाणा कायम ठेविला. ज्या हिंदु लोकांनीं अरबांचें वर्चस्व मान्य करून धार्मिक स्वातंत्र्यासाठीं त्यांना खंडणी देण्याचें कबूल केलें, त्यांना आपापल्यापरीनें देवालयें बांधून मूर्तीची पूजा करूं द्यावी कीं नाहीं असा प्रश्न उत्पन्न झाला, तेव्हां त्यांनीं हज्जाजकडे त्यांचा निर्णय सोंपविला, व त्या क्रूर व करड्या मुसलमानानेंहि असें सांगितलें कीं, ज्याअर्थीं आपण त्यांची खंडणी स्वीकारली आहे त्याअर्थीं त्यांना आपण धार्मिक स्वातंत्र्य अवश्य दिलें पाहिजे. या गोष्टीवरून एवढें म्हणावयास

हरकत नाहीं कीं, दिग्विजयाला निघालेले हे तत्कालीन अरब लोक नुसते कट्टे धर्माभिमानी नसून उच्च शीलवानहि होते. युद्धांत जय मिळविण्यांत लष्करी सामर्थ्य व एकी यांची जशी आवश्यकता आहे, तशी उत्कट शीलाचीहि आहे यांत शंका नाहीं.

वर सांगितल्याप्रमाणें दाहराची अवस्था झाल्यावर भयंकर युद्धाच्या गर्दीतून जयसिंह पळून थोड्याशा मंडळीसह राऊर येथें गेला. पण राऊरचा किल्लाहि सुरक्षित नाहीं असें पाहून तो पुढें ब्राह्मणाबादला गेला. तेथें त्याच्या बापाची सर्व संपत्ति असून अरबांशीं लढण्यापुरतें सैन्यहि होतें. दाहराची दुसरी राणी बाई ही १५००० लोकांनिशीं राऊरलाच राहिली होती. तेथें कासिमानें येऊन आपल्या विजयी सैन्याचा किल्याला वेढा दिला. तेव्हां आतां 'या गोमांस भक्षक चांडाळांच्या हातून सुटण्याला कांहीं मार्ग नाहीं' असें पाहून बाईनें जोहार करण्याचा निश्चय केला. तिच्या विचाराला दुसऱ्या अनेक रजपूत स्त्रियांचें आनुकूल्य मिळून त्या सर्व एका घरांत शिरल्या, आणि त्याला आग लावून देऊन त्यांनीं आपल्या देहांचें भस्म करून घेतलें. भरतखंडाच्या इतिहासांत स्त्रियांनीं केलेल्या शरीरयज्ञाचें बहुधा हेंच पहिलें उदाहरण असावें. हिंदुलोक पूर्वीहि एकमेकांशीं लढत व त्यांत विजय होणारे जित राजांच्या स्त्रियाहि प्रसंगोपात्त स्वतःच्या कबजांत घेत हें पूर्वीं हर्षकालीन चालीरीतींचें वर्णन करतांना दाखविलेंच आहे. पण तेव्हां असली गोष्ट त्या स्त्रियांच्या मताविरुद्ध जुलमानें मात्र होत नसे. विजयी राजांच्या जनानखान्यांत त्यांच्या पत्न्या किंवा नाटकशाळा म्हणून रहाण्याची त्यांची खुषी नसल्यास त्यांना केवळ दासीच्या पेशानें रहाण्यास किंवा वाटेल तर बौद्ध विहारांत भिक्षुणी होऊन रहाण्यासहि हरकत होत नसे. शिवाय विजयी राजांकडे रहाण्यांत जातिधर्माचाहि त्याग त्यांना घडत नसे. पण मुसलमान

त्यांच्या बाबतींत हें शक्य नव्हतें, ते हिंदुस्त्रियांशीं जबरीनेंच लग्नें लावीत किंवा त्यांना नाटकशाळा करीत, व मुसलमानी धर्माची दीक्षाहि जुलमानेंच देत. मुसलमानी धर्मांतील गोमांस-भक्षण आणि गोहत्या या तर हिंदुलोकांना अत्यंत चीड आणणाऱ्या गोष्टी ! ! हिंदुस्त्रियांच्या धैर्याची कसोटी पूर्वापर चालत आलेल्या सतीच्या प्रकारांत दिसून येत होतीच. तेंच धैर्य पुढें चालवून मुसलमानी स्वाऱ्यांचे प्रसंगीं त्यांनीं अनेकशः असले भयंकर आत्मयज्ञ केले व त्यामुळें हिंदुस्थानच्या इतिहासांतील मुसलमानी स्वाऱ्यांचा भाग अत्यंत भयंकर व उद्वेगजनक झालेला आहे. असो, दाहराची सापत्न भगिनी असून स्त्री बाई आणि दुसऱ्यारजपूत स्त्रिया यांचा शरीर यज्ञ हा असल्या प्रकारचें हिंदुस्थानाच्या इतिहासांतील बहुधा पहिलेंच उदाहरण होय.

दाहराच्या अन्तःपुराचा असा शेवट झाल्यावर कासिमानें राऊरचा किल्ला घेऊन तो लुटिला, आंतील सर्व लढाऊ लोकांची कत्तल केली आणि कांहीं उरलेल्या स्त्रियांना दासी करून टाकिलें. कासिमानें केलेल्या दासदासींची संख्या एकंदर ६०००० असून त्यांत हिंदु राजघराण्यांतील अनेक सुंदर स्त्रिया होत्या असें चचनाम्यांत म्हटलें आहे. आणि द्रव्याच्या लुटीप्रमाणें या मानवी लुटीचीहि सरकार आणि सैनिक यांत वांटणी होत असे. असो, राऊरची अशी वाट लावून कासिम तेथून ब्राह्मणाबादकडे निघाला. वाटेंत बऱ्हूर आणि दल्हील हीं शहरें त्यानें काबीज केलीं. तेव्हां आतां ब्राह्मणाबाद येथें रहाणेंहि सुरक्षित नाहीं असें जाणून कांहीं लोकांसह जयसिंह तेथून निघून पलीकडे वाळवंटांत गेला, आणि कासिमानें ब्राह्मणाबादला वेढा दिल्यावर त्याला तेथूनच सतावून सोडण्याचा त्यानें निश्चय केला. ब्राह्मणाबाद येथें युद्धाची सर्व तयारीच असल्यामुळें तेथील लोकांनीं कासिमाच्या वेढयाला

सहा महिनपयत दाद दिली नाहीं. अंत सुमारें ४०००० लढाऊ लोक असून ते वेढा घालणाऱ्या सैन्यावर सकाळपासून संध्याकाळपर्यंत वारंवार निकराचे हल्ले करीत. कासिमाच्या पिछाडीला सतावण्याचा इकडून जयसिंहानेंहि उपक्रम केला. याप्रमाणें दोन्हीकडून कासिमाची त्रेधा उडाली. पण हिंदुलोकांचें नष्टचर्य पूर्ण ओढवल्यामुळें मोका बस्सया लवकरच त्याच्या मदतीला धांवून आला. त्यानें कासिमाला जयसिंहाच्या ठिकाणाची खडान्खडा माहिती दिली आणि तिकडे सैन्याची तुकडी पाठविण्याचा त्याला सल्ला दिला. तेव्हां शेवटीं बिभीषणाच्या सल्ल्यानें रावणपुत्र इंद्रजिताप्रमाणें जयसिंहाचा पराभव होऊन तो चितोडच्या आश्रयास निघून गेला. ब्राह्मणाबादचीहि भवितव्यता आतां ठरून गेली. इतर शहरांची जी वाट तीच त्याचीहि झाली. त्यांतील व्यापारी वगैरे बिन लढाऊ लोक कासिमाला शरण गेले, आणि कोटाचे दरवाजे उघडून त्यांनीं त्याला आंत घेतलें. कासिमानें लगेच सर्व शहराचा ताबा घेऊन आंतील लढाऊ लोकांची कत्तल केली, आणि मिळाली तितकी लूट मिळविली. व्यापाऱ्यांच्या मात्र तो वाटेस गेला नाहीं. त्यांत सांपडलेल्या स्त्रियांत दाहराच्या दोन अविवाहित कन्या होत्या, त्यांना कासिमानें लुटीच्या पंचमांशा बरोबर खलीफाकडे रवाना केलें. पुढें कासिमाचा पाडाव होऊन त्याला मृत्यु यावयास याच कन्या कारणीभूत झाल्या ही गोष्ट तत्कालीन इतिहासांत प्रसिद्धच आहे.

मोकानें म्हटल्याप्रमाणें ब्राह्मणाबाद हें सिन्ध प्रान्ताचें नाक असल्यामुळें तें जिंकल्यावर अर्थात सगळा तो प्रांतच कासिमाच्या ताब्यांत आला. मग त्यानें त्या शहरांत बरेच दिवस राहून एकंदर प्रान्ताच्या कारभाराची व्यवस्था लावली. एके दिवशीं असें घडन आल्याचें सांगतात कीं, क्षौर केलेले एक हजार ब्राह्मण

कासिमापुढें येऊन उभे राहिले. तुम्हीं कां आलां म्हणून त्यानें विचारतां त्यांनीं उत्तर दिलें, ' आह्मी ब्राह्मण असून आमच्या ब्राह्मण राजाचा ( दाहराचा ) वध झालेला पाहून आमच्यापैकीं पुष्कळांनीं प्राण त्याग केला; व त्याच्यावरील निष्ठेची खूण म्हणून आम्हीं क्षौर केलें आहे. " हें ऐकून कासिमानें त्यांच्या निष्ठेची तारिफ केली आणि त्यांना क्षमा करून पूर्ववत् आपल्या प्रान्ताची सेवा करावयास सांगितलें. त्यांच्याकडे पूर्वीपासून जीं कामें चालत आलेलीं होतीं, ता त्यांच्याकडे सोंपवून त्यांना आपआपल्या अधिकारावर त्यानें पाठविलें. त्यांपैकीं जे खरोखर उपाध्याय पुरोहितांचा धंदा करणारे होते, त्यांना पूर्वीप्रमाणें देवालयांत मूर्तींची पूजा करण्याची व जे कोणी भिक्षा मागणारे होते त्यांना " भिक्षापात्र घेऊन कोरान्न मागण्याची" हि त्यानें परवानगी दिली. चचनाम्यांतील हें भिक्षेचें वर्णन बहुधा बौद्ध भिक्षूंचें असावें. याशिवाय शेतीच्या वसुलापैकीं शेंकडा तीन हिस्सा ब्राह्मणांना देऊन उरलेली रकम सरकारांत भरावी अशीहि त्याची शेतकऱ्यांना अनुज्ञा होती. ही जी लोकांना धार्मिक स्वतंत्रता ठेऊन त्यांनीं देवालये बांधावीं, आंत मूर्तींची पूजा करावी व शेतकीच्या उत्पन्नांतून त्यांच्या पुजाऱ्यांना वेतन मिळावें अशी व्यवस्था कासिमानें केली ती आणि पुढें कांहीं शतकांनीं आलेल्या मुसलमान जेत्यांची लोकांना या बाबतींत वागविण्याची रीत यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे. पूर्वी ह्मटल्याप्रमाणें हा सुज्ञपणाचा प्रामाणिक मार्ग कासिमानें हज्जाजच्या अनुमतीनेंच स्वीकारला होता; व प्रजेनें एकदां खंडणी द्यावयाचें मान्य केल्यावर त्यांना आपापल्या इच्छेनुसार धर्माचरण करावयाचा हक्कच आहे असें हज्जाज ह्मणत असे. ही धार्मिक खंडणी ऊर्फ झिझिया श्रीमंतांवर ४८ दिरम ह्मणजे सुमारें बारा १२ रुपये,

मध्यम स्थितींतल्या लोकांवर २४ दिरम आणि गरीबांवर १२ दिरम अशी वार्षिक ठरविली होती. जमीन महसुलाची पद्धत कासिमानें पूर्वींचीच कायम केली व त्या कामावर जुन्या अधिकाऱ्यांचीच पुनः नेमणूक केली. पुढें जसा तींत वाटेल तसा फेरफार करण्यांत आला तसा प्रकार कासिमानें केला नाहीं. याप्रमाणें कासिम व त्याचे वरिष्ठ यांचें एकंदर धोरण उदारपणाचें व दूरदर्शी मुत्सद्दीगिरीचें होतें.

पण हा उदारपणा त्यानें लुहाणे व जाट लोकांच्या संबंधांत दाखविला नाहीं. चचनाम्यांत लाखा व साम्मा या नांवांनीं उल्लेखिलेल्या या लोकांचा लढवय्येपणा आणि त्यामुळें उत्पन्न झालेला दांडगेपणा पाहून त्यांना चचानें घातलेल्या निर्बंधांतून मुक्त करण्यापेक्षां तशा स्थितींत राहूं देणेंच त्याला मुत्सद्दीपणाचें वाटलें असावें. शिवाय जुन्या हिंदुधर्माभिमान्याचेंहि मत या लोकांना अनुकूल नव्हतेंच. ब्राह्मणाबादचा पाडाव झाल्यावर मुसलमानी दीक्षा घेतलेला दाहराचा मंत्री वजीर सियाकर यानें कासिमाला सांगितलें कीं "चचानें या लोकांना जाडेंभरडें कापड वापरण्याची व बाहेर जातांना आपल्याला लोकांनीं ओळखावें ह्मणून बरोबर कुत्रीं घेण्याची आज्ञा करून घोड्यावर बसण्याची किंवा तरवार बाळगण्याची मनाई केली होती. त्याच्यांतल्या नाईकाला म्हणजे राण्याला घोड्यावर बसावयाचेंच असेल तर त्यानें खोगिराशिवायच बसलें पाहिजे. वाटसरूंना कोठें अडचण उपस्थित झाली तर या जाट लोकांनीं त्यांना मदत केली पाहिजे. त्यांपैकीं कोणी चोरी केली तर त्यांच्या मुलांना अग्नींत टाकून जाळून टाकावें; व कारवान लोकांना रात्रीची वाट त्यांनीं दाखविली पाहिजे." कासिमानें हे सर्व निर्बंध कायम ठेविले इतकेंच नव्हे तर, प्रवासी लोकांना एक एक दिवस अन्नदान करण्याचा व ते आजारी पड-

त्यास तीन तीन दिवस त्यांची बरदास्त ठेवण्याचा जो निर्बंध खलीफ ओमारनें सिरियांतील लोकांवर लादला होता, तोहि त्यानें आणखी या जाटांवर लादिला.

ब्राह्मणाबादची याप्रमाणें व्यवस्था लाविल्यावर कासिमानें अलोर व मुलतान यांकडे आपली दृष्टि वळविली. सिन्ध प्रांताच्या उत्तर भागांत हींच शहरें मुख्य होतीं. कासिम प्रथम मुस्थल नांवाच्या शहरीं येऊन त्याच्या नजीक असलेल्या सुंदर तलावावर उतरला. शहरांतील रहिवाश्यांचा भरणा श्रमण व बौद्ध यांचाच असल्यामुळें ते सर्व त्याला शरण आले व आसमंतातच्या जाटांनींहि त्यांचेंच अनुकरण केलें. त्यांना ठरल्याप्रमाणें कासिमानें माफी देऊन खंडणी द्यावयास लाविलें. मुस्थलाहून तो पुढे ‘ सम्मणांच्या देशास ’ आला; तेव्हां ते लोक पांवे वाजवीत व डोलग्यांच्या तालावर नाचत नाचत त्याच्या पुढें आले व म्हणाले ‘ राजाला सामोरें येण्याची आमची अशी रीत आहे. ’ या नंतर तो साहटांच्या देशीं आला. या लोकांनींहि अनवाणी व उघड्या डोक्यांनीं येऊन कासिमापुढे पदर पसरला व त्यानेंहि नित्याप्रमाणें त्यांपासून खंडणी घेऊन त्यांना माफी दिली. मग तेथून कांहीं वाटाड्ये घेऊन तो “ सिंध प्रान्तांतील सर्वांत मोठें शहर ” जें अलोर तथें येऊन धडकला. दाहराचा मुलगा तोफी हा तेथें होता, आपल्या बापाच्या मरणाची वार्ता खरी नसून तो हिंदुस्तानांत सैन्य आणण्यासाठीं गेला आहे अशी त्याची समजूत† असल्यामुळें कासिमानें शहराला वेढा दिला असतांहि त्याच्या लोकांनीं नेटानें युद्ध सुरू केलें. पण दाहराकडून कांहीं सैन्य येईना; व इतर

† पानिपताच्या युद्धानंतर भाऊसाहेबासंबंधाने देखील अशीच अफवा उठली होती.

ठिकाणांप्रमाणें तेथील व्यापारी व कारागीरसुद्धां कत्तलीच्या भीतीनें अरबांना शरण गेले. लोकांची ही स्थिती पाहून तोफी तेथून पळाला आणि चितोडला आपल्या बंधू जयसिंहाला जाऊन मिळाला. तेव्हां अर्थातच अलोर कासिमाच्या ताब्यांत आलें. तेथें लादीनें ( दाहराची राणी व आतां कासिमाची बायको ) सांगितल्यावरून त्यानें व्यापारी व कारागीर यांना जीवदान दिलेंच, पण शरण आलेल्या लष्करी लोकांनाहि सोडून दिलें. प्रत्यक्ष लढत असून विरोध करणाऱ्यांची मात्र त्यानें कत्तल करविली. हें वर्तमान हज्जाजला कळल्यावर त्यानें कासिमाच्या या मवाळ वर्तनाबद्दल त्याला दोष दिला आणि सर्व लढाऊ लोकांची सरसहा कत्तल करावी असा हुकूम पुढें सोडला. हा भयंकर प्रकार त्यांच्या दृष्टीनें त्यांना सोईचाच होता, कारण लष्करी लोक नाहींसे करून टाकल्यावर मागें बंदोबस्ताची फारशी दगदग रहात नाहीं. पण कासिमानें आजवर त्याचा नेहमींच अवलंब केला होता असें नाहीं. पण यापुढें मात्र त्यानें कोठेंहि मऊपणा दाखविली नाहीं. याचें प्रत्यंतर मुलतान वरील स्वारींत दिसून आलें, त्या स्वारीच्या वर्णनाकडे आतां वळूं.

मुलतानास जाण्यापूर्वी वाटेंत कासिम बियास नदीवरील बाबिया शहरीं आला. पूर्वी झीमच्या प्रसिद्ध लढाईंत दाहर मारला गेल्यानंतर त्याचा चुलत भाऊ व चंद्राचा मुलगा जो कक्ष तो तेथून बाबिया येथें येऊन राहिला होता. कासिम तेथें आल्याबरोबर कक्षानें शरण चिठी लिहून दिली. तो मोठया दर्जाचा पुरुष असल्यामुळें कासिमानें ती स्वीकारून त्याला त्या राज्यांतील तिजोरीचा अधिकारी नेमिलें, व तेथून तो पुढें गोळकोंडयास गेला. तेथें त्याला चांगलाच विरोध झाला, पण शेवटीं

विजया झाल्यामुळें त्यानें अलोट व ब्राह्मणाबाद येथें केल्याप्रमाणें ४००० लढवये लोकांची कत्तल केली. पुढें आणखी शिक्का येथेंहि त्याला वत्सराज टाकीशीं लढावें लागलें. हा वत्सराज पंजाब रजपुतांपैकीं तक्षक जातीचा असून त्यानें कासिमाशीं सात दिवस तुंबळ युद्ध करून पुष्कळ अरब सेनानायकांचा वध केला. परंतु अखेर टिकाव न लागल्यामुळें किल्ला सोडून तो नदी पार मुलतानास गेला. कासिम त्याच्या मागें लागला, व वाटेंत त्यानें अनेक गांवें उद्ध्वस्त केलीं. मुलतानला पोंचल्यावर त्याचें कुंदराय व वत्सराय यांशीं दोन महिने सतत युद्ध झालें.* पण हिंदुलोकांच्या दैवानें येथेंहि हार खाल्यामुळें येथेंहि फितुरी होऊन कोणी एकानें मुलतानच्या किल्याला खालून भोंक पाडतां येण्याजोगी जागा अरबांना दाखवून दिली; व अरबांनीं तिचा फायदा घेऊन किल्ला सर केला. किल्ला हातीं आल्यावर अरबांनीं आंतील व्यापारी व कारागीर वेगळून ६००० लष्करी लोकांची कत्तल केली, व व्यापाऱ्यांपासून जबर खंडणी वसूल केली. रुप्याचे ६०,००० दिरम तेथील सरदार मानकऱ्यांकडून यावेळीं गोळा झाले. तथापि खलीफाचा भाग म्हणून कासिम आणखी द्रव्य त्यांच्यापाशीं मागूं लागला. तेव्हां आतां काय करावें या विवंचनेंत ते असतांना एका ब्राह्मणानें एक देवालय दाखवून दिलें. या देवालयाच्या आवारांत एका सुंदर तळ्यांत लहानसें देऊळ असून त्यांत सुवर्ण मुद्रांनीं भरलेल्या तांब्याच्या हंड्यांवर एक सुवर्णाची मूर्ति बस-

---

* या ठिकाणीं जयाची आशा नाहीशी झाल्यामुळें दाहराचा पुतण्या कक्ष तेथून निघून काश्मीरच्या राजाकडे गेला असें चचनाम्यांत ह्मटलें आहे. पण हें कसें होईल ? बावियाचा कोशाधिकार सोडून अरबांविरुद्ध तो पुन: सिंधी लोकांस येऊन मिळाला होता की काय ?

विली होती. " ही मूर्ति मोठ्या मनुष्याच्या आकाराची असून तिच्या डोळ्यांच्या जागीं भारी किंमतीचे लाल बसविले होते. तिचें वजन २३० मण असून खालच्या ४० हांडयांत १३२० मण सोनें होतें. " हें सर्व द्रव्य कासिमानें काबीज केलें. मुलतानच्या ज्या सूर्यमंदिराचें ह्युएनत्संगानें एवढें वर्णन केलें आहे, त्याच प्रसिद्ध मंदिराची ही गोष्ट असावी काय ? आमच्या दृष्टीला तसेंच दिसतें. पण अलबिरुणी ह्मणतो कीं, " महंमद कासिमानें मुलतान जिंकिलें पण सूर्यमंदिराला त्यानें हात लाविला नाहीं. तें पुढें जहन इब्न शैबान यानें फोडिलें. पण शैबाननें फोडलेली मूर्ती निराळी असून कासिमानें उठवून नेलेल्या मूर्तीच्या जागीं मागाहून बसविलेली असावी. कारण ती लांकडाची असून लाल चामडयाच्या वादीनें गुंडाळलेली होती, व तिच्या डोळ्यांत मात्र लाल माणकें होतीं असें अलबिरुणीनें तिचे वर्णन केलें आहे. कदाचित् त्या मंदिरांत दोन मूर्ति असून एक स्थाईक ती सुवर्णाची व दुसरी हालवितां येण्यासारखी लांकडाची असण्याचाही संभव दिसतो.

मुलतानास सांपडलेली ही सगळी संपत्ति हज्जाजकडे पाठवायाची, पण त्या कटया मुसलमानानें कासिमाला लिहिलें कीं, " तुम्हीं आम्हाला आतांपर्यंत १,२०,००० दिरम देऊन स्वारीला लागलेल्या खर्चाच्या दुप्पट पोंच केली आहे. तरी आतां अधिक पैसा इकडे न पाठवितां, इस्लामाच्या भक्तांसाठीं मशिदी बांधाव्या. या हुकमाप्रमाणें कासिमानें मुलतानास भव्य मशिदी बांधण्यास सुरवात केली; व सरहद्दीवरील मुलतान हेंच मजबूत ठाणें असल्यामुळें तथेंच त्यानें रहाण्याचे ठरवून त्याच्या रक्षणासाठीं त्यानें ५०,००० घोडेस्वार ठेविले. पुढें त्यानें काश्मीरच्या सरहद्दीपर्यंत सर्व मुलूख जिंकिला असें चचनाम्यांत म्हटलें आहे. ही सरहद्द चचानें

ठाम करून तीवर देवदाराचीं झाडें त्यानें लाविलीं होतीं. कासिमानेंहि आणखी तसलीं झाडें तेथें लाविलीं. नंतर त्यानें कनोजचा राजा हरिचंद्रराय याला इस्लामाचें वर्चस्व कबूल कर म्हणून निरोप पाठविला. तेव्हां कनोजाधिपतीनें त्याला उत्तर पाठविलें कीं, "हें राज्य आज १६०० वर्षें आमच्याकडे असून त्यांत शत्रूचें पाऊल अद्यापि पडलेलें नाहीं. म्हणून समरांगणांत दोन हात झाल्याशिवाय तुम्ही म्हणतां त्या प्रश्नाचा निकाल होणार नाहीं," हें ऐकून कनोजवरहि स्वारी करण्याचा कासिमानें निश्चय केला; व तेथील लोक आपल्या हत्तीवर घमेंड मारीत आहेत तरी सावध असा अशी त्यानें आपल्या सैनिकांस इशारतहि दिली. परंतु आतां यापुढें कासिमाच्या उत्कर्षाचे दिवस संपावयाचे होते, व मुसलमानी दिग्विजयाची लाट कांहीं शतकें थांबावयाची होती. कासिम कनोजच्या स्वारीची तयारी करीत आहे, तों एके दिवशीं सकाळीं एक सांडणीस्वार खलीफाकडून पत्र घेऊन त्यापुढें हजर झाला. तो पत्र उघडून पहातो तों " असशील तसा कच्या कातड्यांत बसून एकदम आमच्यापुढें हजर हो " अशी खलीफाची आज्ञा त्याला दिसली. ईश्वराचा मृत्युलोकांतील प्रतिनिधि म्हणून खलीफाविषयीं कासिमाच्या कट्या मुसलमानी अंतःकरणांत एवढी श्रद्धा होती कीं, त्यानें तो हुकूम वाचतांच, दुसरें कांहीं न करतां आपल्याला ताज्या कातड्यांत घालण्याची नोकरांना आज्ञा केली. त्याप्रमाणे झाल्यावर ती कातडयाची पिशवी एका पेटींतून बगदादकडे रवाना झाली; व तेथें जाऊन खलीफानें ती उघडल्यावर आंत त्याला सिन्धप्रान्त जिंकणाऱ्या त्या शूर सरदारचें प्रेत दृष्टीस पडलें. ही सर्व कारवाई खलीफाकडे पाठविलेल्या दाहराच्या मुलींची असून आपल्या बापाच्या वधाबद्दल व आपल्याला अशा दुःस्थितीला पोंचविल्याबद्दल त्यांनीं कासि-

माचा अशा रीतीनें सूड घेतला होता. ही कासिमाच्या मृत्यूची गोष्ट कल्पित असण्याचा संभव नाहीं. ती निःसंशय खरीच असली पाहिजे. पण ही गोष्ट व येथपर्यंत कथन केलेला सिन्ध-प्रान्ताच्या विजयाचा इतिहास यांवरून एक गोष्ट सिद्ध होते. ती अशी कीं, आरंभीं तरी अरब लोकांचें साम्राज्य ऐक्य, शिस्त, व कडक धर्माभिमान यांच्या प्रेरणेमुळें फारच भक्कम पायावर उभारलेलें होतें.

# प्रकरण ३ रें

——:०:——

## १२ व्या शतकाच्या अन्तापर्यंतचा सिन्ध प्रान्ताचा वृत्तांत.

इ. स. ७१२ त महंमद कासिमाच्या नेतृत्वाखालीं अरब लोकांनीं सिन्धप्रान्त काबीज केला, तो पुढें तीन शतकेंपर्यंत म्हणजे इ. स. १०२५ या वर्षी गिझनीच्या महमुदाची स्वारी होईपर्यंत त्यांच्याच हातांत राहिला. बगदादचे खलीफ आपल्या प्रतिनिधीं मार्फत त्यावर अंमल चालवीत. त्यांचे मुख्य सुभेदार मुलतान येथें रहात व त्यांच्या हाताखालचे अधिकारी सिन्धुनदावरील इतर मोठमोठ्या शहरीं असत. त्या प्रान्ताच्या पोट भागांवरील स्थानिक अधिकारी ब्राह्मण किंवा रजपूत यांपैकीं म्हणजे कोणी तरी हिंदूच असत. बौद्धधर्मीय लोकांनीं हीं कामें कधीं स्विकारली नाहींत. या अधिकारारूढ असलेल्या प्राचीन रजपूत घराण्याचे वंशज पुढें बराच काळ तेथेंच असून त्यांचीं नांवें इन्फल-उल्-किरम नामक ग्रंथांत ( दिल्लीपति अरमशहा याच्या कारकीर्दीत ) पुढें लिहिल्याप्रमाणें आढळतात.

१ दरबेला येथें राणा भनर सहज राठोड. २ भोपमधील तिंग येथें राणा सुइयर सम्मा. ३ माणिकतार येथें जेस मचली सोळंगी. ४ दोरा सिब्रि येथील पुनुन चंद्राचा पुत्र वाकीया. ५ भम्रानी येथें चनन चनस. ६ झुम्मी हिम्मकोट येथील जिया. ७ भनभोर ( ब्राह्मणाबाद ) प्रान्तांतील मेनटकोरचा यशोधन अग्र या नांव-निशींत सम्म, सहत, राठोड, सोळंकी इत्यादि अनेक सुप्रसिद्ध रजपूत नांवाचा उल्लेख आहे; पण दाहराचें नांव कोठें आढळत नाहीं. यावरून त्याच्या वंशजांनीं सिन्ध प्रान्त अजीबात सोडून देऊन पुढें रजपुताना पंजाब व काश्मीर या बाजूंना वस्ती

केली असावी असें अनुमान होतें. सिन्ध प्रांतांतील हिंदु अमदानींतील ऐतिहासिक स्थलनामें म्हणजे अलोर, ब्राह्मणाबाद, झिम ( हल्लींचें हैदराबाद, ) सेवान इत्यादि अद्यापिहि कायम राहिलीं होतीं; पण शिवाय मुसलमानी अमदानींत उछ, बक्कर, ठठ्ठा इत्यादि नवीन स्थळेंहि प्रसिद्धीस आलीं. या नवीन स्थळांपैकीं ठठ्ठा शहरानें देबाल बंदराची जागा पटकाविली, व त्याचें नांवहि पुढें ऐकूं येईनासें केलें. येथें हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, इ. स. ७८० च्या सुमारास ह्मणजे हरून-अल-रशीद या खलीफाच्या कारकीर्दीत किंवा जरा त्यापूर्वी सिन्धप्रांताला भूकंपाचा धक्का बसून त्याच्या भूपृष्ठांत बराच फरक झाला म्हणजे पूर्वीचीं ब्राह्मणाबाद अलोर इत्यादि शहरें नाश पावून सिन्धुनदीचा प्रवाह देखील पालटून गेला. कारण पूर्वी तो नेरूनच्या पूर्वेकडून वहात असून हल्लीं पश्चिमेकडून वहातो आहे. याप्रमाणें एकंदर निसर्गानेंच या प्रांतांतील आपलें स्वरूप पालटून टाकिलें असें म्हणावें लागतें तेथील पुष्कळ लोकांना मुसलमानीधर्माची दीक्षा देण्यांत आली, व त्यांपैकीं कित्येक राजेरजवाडेहि होते. बहुजनसमाज जरी हिंदुच राहिला, तरी त्यांचेंहि मुसलमानी साधूंकडे लक्ष लागून त्यामुळें सहजच बौद्धसाधूंकडून तें उठत चाललें. मुसलमानी साधूंच्या समाधीचीं म्हणून पवित्र मानलेलीं स्थळें, व मशिदी अजूनहि मुलतान व दुसऱ्या शहरांत आढळतात; व तेथें हिंदु व मुसलमान अशा दोन्ही धर्मांचे लोक आदरानें जातात. अरब लोकांची धर्माविषयींची कळकळ व उत्साह हीं प्रारंभीं प्रारंभीं फारच उत्कट असल्यामुळें बौद्ध साधूंच्या बरोबरीनें शेख आणि सय्यद साधूनाही अजमत ऊर्फ आध्यात्मिक सामर्थ्य प्राप्त झालें होतें, असें सर्वांना वाटणें स्वाभाविकच होतें. हें सामर्थ्य अर्थातच वाममार्गानें प्राप्त झालेलें नसून ईश्वरनिष्ठेमुळें आलेलें होतें.

सिन्धप्रान्त इतक्या झपाट्यानें हस्तगत केल्यावर अरब लोकांनीं आपला दिग्विजय पुढें चालू ठेवला नाहीं, याचें बरेंच आश्चर्य वाटतें. पण याचें कारण आम्हांला असें दिसतें कीं, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें बौद्ध धर्माच्या ऱ्हासाला यावेळीं सुरुवात होऊन पूर्वीच्या आर्यधर्माचें पुनरुज्जीवन झाल्याने या देशाचा इतर भाग सामर्थ्यवान् झाला. दुसरें असेंहि असेल कीं, महंमदी लोकांचे धर्माचार्य जे खलीफ त्यांची स्वतःची अवनति होऊन ते ऐष-आरामांत मग्न झाल्यामुळें अधिक प्रांत जिंकण्याची कटकट त्यांना नकोशी झाली. औमिया खलीफांची अमदानी इ. स. ७६४ च्या सुमारास नष्ट होऊन अब्बासिदो घराण्यानें त्याचें स्थान पटकावलें. त्यांचा अंमल इ. स. १०२५ पर्यंत चालला. पुढें गिझनीच्या महंमुदाचे कारकीर्दींत कादिर बिला या खलीफानें फर्दूसी* कवीला आश्रय दिला, व महंमुदानें त्याला परत मागितलें असतां खलीफानें तसे करण्याचें नाकारल्यावरून महंमुदानें मुलतानवर स्वारी करून तें काबीज केले, व सिन्ध प्रांत घेण्यासाठीं आपला सेनापति अबदुल रझाक याला तिकडे पाठविलें. त्यानें एका वर्षाच्या आंत तो प्रांत जिंकून घेतला व तेथून अरबांची हकालपट्टी केली. अशा रीतीनें विद्वान् कवींना आश्रय देणाऱ्या दोन राजांच्या परस्पर तंट्यामुळें सिन्धप्रांत पुनः हिंदुस्थानाचा भाग होऊन बसला; व यांत कांहीं वावगेंहि झालें नाहीं. यापुढें इ. स. १२०० पर्यंत हा प्रान्त गिझनीच्या राज्यांत मोडत असे. नंतर शहाबुदीन घोरीनें हिंदुस्थान (उत्तर भाग) जिंकल्यावर त्याच्या मागाहून त्याचा वजीर कुतुबुदीन हा जेव्हा हिंदुस्थानचा स्वतंत्र बादशहा

---

* या फर्दूसीनें महंमुदच्या कृपणपणाबद्दल एक उपहासात्मक काव्य लिहिल्यामुळें त्याच्यावर महंमुदाचा रोष झाला होता हें प्रसिद्धच आहे.

झाला, तेव्हां सिन्धप्रांत हिन्दुस्थानांतील तुर्कीसाम्राज्याचा एक भाग बनला. या पुढील काळाचा इतिहास आपला प्रस्तुत विषय नसल्यामुळें तो येथेंच सोडणें भाग आहे.

तथापि जातां जातां सिन्धमधील १४ व्या शतकांतील हिंदी मुसलमान राजघराणीं जीं सुम्र व सम्म त्यांचा थोडा उल्लेख केला पाहिजे. मोंगल लोकांनीं तैमूरलंगाचे नेतृत्वाखालीं हिंदुस्थानांत घुसून दिल्लीच्या तखतावर जेव्हां घाला घातला, तेव्हां दिल्लीच्या आधिपत्याच्या खालीं असलेल्या इतर प्रान्तांप्रमाणें सिंध देखील स्वतंत्र झाला. त्याचे या नंतरचे पहिले राजे सुम्र* घराण्यांतील असून त्यांनीं तेथें १३३८ पासून १३५७ पर्यंत राज्य केले; व त्यांच्या मागून सम्म घराणें अधिकारारूढ होऊन त्याचा अमल स. १५१९ पर्यंत चालला. हे सम्म राजे मूळ हिंदु असून पुढें मुसलमान बनलेले होते असें दिसतें. तथापि धर्मान्तर केलेल्या लोकांच्या विशिष्ट चमत्कारिक धार्मिक उत्साहाला अनुसरून त्यांनीं आपल्या वंशाचें मूळ खुद्द महंमदपैगंबराच्या आरबी घराण्याशीं नेऊन भिडविलें.पण खरोखर पहातां त्यांच्या पूर्वजांचीं नांवें

---

*सम्मघराण्याप्रमाणें सुम्र घराणेंही मूळ रजपूत असून पुढें मुसलमान झालें, व सम्मांप्रमाणें त्यानेंहि आपलें मूळ आरबी घराण्याशीं जोडिलें. या पंजाबांतील सुम्रांसंबंधाने ‘ पंजाबांतील जाती ’ या पुस्तकांत सर डी. इबेटसन ह्मणतात “ हे सुम्र इ. स. ७५० च्या सुमारास रजपूतच होते. त्यांनीं प्रथम आलेल्या रजपुतांना मुलतान व सिंध येथून हांकून देऊन तेथें आपली गादी स्थापिली. ” कर्नल टॉडच्या मतें हे उम्र व सुम्र या बड्या दोन जाती पैकीं असून पंवार रजपुतांच्या सोध कूटांतील मूळ होते. यापैकीं उम्रांचें नांव उमरकोटच्या नांवांत दिसत असून बक्खर देशाच्या उम्रसुम्र या पर्यायांत त्या दोघांचीं नांवें दिसत आहेत. हे सोध कूट अलेग्झँडरच्या वेळच्या सगधी ( Sogdi ) कूटापैकींच बहुधा असावें.

भरत, शत्रुघ्न अशीं हिंदुच असून चचनाम्यांतहि ते लुहाणा जातीचे होते असेंच म्हटलें आहे. त्यांचा मूळ पुरुष श्रीकृष्णाचा पुत्र सांब हा मुलतान ( मुलस्थान ) येथील प्रारंभीचा सूर्योपासक होता व तेथील प्रसिद्ध सूर्यमंदिर त्यानेंच स्थापिलें असें पुराणांत वर्णन आहे. म्हणजे एकंदरींत हें सम्म ( सांब ) घराणें मूळ आर्यवंशीय क्षत्रियांचें असून चचानें त्यांना शूद्र पदवीस पोंचविलें होतें. तें मुसलमान बनल्यावरहि त्यांचें वजन बरेंच असल्यामुळें व त्यांची वृत्तिहि क्षात्र तेजाची असल्यामुळें त्यांनीं संधि साधून सिन्धप्रान्तांत आपलें स्वतंत्र राज्य स्थापन केलें व सुमारें २०० वर्षे त्याचा उपभोग घेतला. त्यांच्या नंतर बाबरानें आपला मोंगली अंमल तेथें चालू केला व तो स. १७६२ पर्यंत राहिला. पुढें कांहीं काळ अमीर नामक राजांनीं तेथें स्वतंत्रपणें राज्य केल्यावर इ. स. १८४३ त तो प्रांत इंग्रज लोकांच्या हातीं आला.

# प्रकरण ४ थें.

## काबूलचे शाहि राजे.

( काबूलचा हा वृत्तान्त अरब बखरकारांच्या ग्रंथांतून माहिती मिळवून लिहिलेल्या 'अफगाणिस्तान' नामक रॅावर्टीच्या पुस्तकावरून मुख्यत्वे घेतला आहे. शिवाय ह्युएनत्संगाचे लेख, राजतरंगिणी नामक काश्मीरचा संस्कृत इतिहास, आणि कनिंगहॅमकृत 'मध्यकालीन भारतवर्षांतील नाणीं' यां ग्रंथावरूनहि मिळाली तेवढीं प्रत्यन्तरे मिळविण्याचा आह्मी प्रयत्न केला आहे. काबूलचा इत्थंभूत इतिहास लिहिण्याचीं साधनें उपलब्धच नाहींत, ही दुर्दैवाची गोष्ट खरी. तथापि त्यांतील जेवढा भाग कळण्यासारखा आहे तो व विशेषतः अलबिरुणीचें वर्णन ही फार मनोवेधक आहेत यांत शंका नाही. )

प्राचीन काळीं काबूल प्रांत हा भारतवर्षाचाच एक कायमचा भाग होता. ऋग्वेदामध्यें पंजाबांतील पांच नद्या समवेत कुभा आणि क्रमु या नद्या सांगितल्या असून त्या साती मिळून वैदिक आणि अवेस्तिक वाङ्मयांत प्रसिद्ध असलेल्या सप्तसिन्धूंचा प्रान्त बनलेला होता. या नद्यांपैकीं कुभा म्हणजे हल्लींची काबूल आणि क्रमु म्हणजे कुर्रम नदी होय. औपनिषदकालीन गान्धार लोक म्हणजे सिन्धुनदीच्या पश्चिम तीरावरील सपाट प्रदेशांत पर्वतांच्या रांगाच्या पूर्व बाजूस रहाणारे लोक होत. परंतु काबूल प्रांत हिंदुकुश पर्वतापर्यंत पसरला असून गांधार देशापासून पृथक् समजला जात असे. या गान्धार देशाची राजधानी पुरुषपुर म्हणजे हल्लींचें पेशावर येथें होती. काबूल प्रान्ताच्या सरहद्दीवरील हिंदुकुश पर्वताचें नांव सार्थच आहे असें म्हणतां येतें.

इराण देशाच्या प्राचीन इतिहासांत प्रति भीमसेन म्हणून प्रसिद्ध असलेल्या रुस्तुमनें काबूलच्या राजाच्या कन्येचें पाणिग्रहण

केल्याचा उल्लेख असून, तदनंतरच्या इतिहासांतहि एका पारसीक चक्रवर्तीनें तत्कालीन काबूलच्या राजकन्येशीं विवाह केलेला आढळतो. पारसीक साम्राज्यामध्यें काबूल आणि झाबूल (म्हणजे हल्लींचा गिझनी प्रांत) व त्यांच्या आसमंतातचा सिन्धुनदीपर्यंतचा मुलुख देखील अनेक वेळा समाविष्ट झालेला होता. अर्थात् या मुलखांतील लोक व काबूलचे राजेहि निःसंशय आर्यवंशीय असून त्यांचा एकीकडून पारसीक आर्यांशीं व दुसरीकडून भारतीय आर्यांशीं विवाहसंबंध घडत असे. मानववंशशास्त्रदृष्ट्या अफगाण लोक तुर्की आर्य म्हणजे आर्य व तुर्क यांचें मिश्रण होत, असें खानेसुमारीच्या अहवालांत रिस्ले साहेबांनीं सिद्ध केलें आहे; व आजमितीला जरी ते स्वतः आपलें मूळ इतरत्र लोकांशीं नेऊन भिडवात आहेत, तथापि वस्तुतः ते मूळचे बहुंशीं आर्यच होत यांत शंका नाहीं. ते लोक आपल्याला यहुदी मूळ पुरुषाची प्रजा म्हणवितात, पण या त्यांच्या समजुतीचें निराकरण सहज करतां येईल. धर्मांतराच्या बाबतींत अशी एक गंमत दिसून येते कीं, ज्या भारतीय आर्यांनीं मुसलमानी धर्म स्वीकारिला त्यांनीं धर्मांतराबरोबर मनानें वंशांतरहि केलें व आपलें मूळ पूर्वेकडून काढून अरबस्तानांत नेऊन ठेविलें. पंजाबांतहि ही स्थिति आढळून येते. रजपुतान्यांतील पुष्कळ मुसलमान शरीरदृष्ट्या, इतिहासदृष्ट्या, व व्यवहारवळणावरूनहि स्पष्टपणें रजपूत दिसत असून देखील ते आपल्याला महंमद पैगंबराचेच वंशज समजून खरे सय्यद म्हणवितात. त्याच रीतीनें मूळ बहुतांशीं आर्य असलेल्या अफगाण लोकांनीं धर्मांतर केल्यावर आपण आरबी वंशांतील आहों असें मानण्याची सुरुवात केली; व आपलें मूळ इब्राहिम व मूसा म्हणजे जुन्या करारांतील एब्राहम आणि मोझेस यांशीं नेऊन जोडिले. परंतु मानववंश-शास्त्रदृष्ट्या व

इतिहासदृष्ट्या ते खरोखर आर्यवंशीय होत. ग्रीक स्वाऱ्यांच्या वर्णनांत त्यांना भारतीय आर्यच मानिलेलें आढळतें. त्यांच्या मुलुखाला अराचोसिया हें नांव असून तें हरहवती (संस्कृत सरस्वती) ह्या पारसीकांच्या नदीच्या नांवावरून मिळालेलें होतें व पार्थियन लोक त्याला "श्वेतभारत" ( White India ) म्हणत असत असें इसिडोरसनें म्हटलें आहे (मॅक्‌रिंडलकृत टालेमीचें प्राचीन भारतवर्ष पा. ३१९). ग्रीक लेखकांनीं काबूलचा उल्लेख केलेला नाहीं; कारण तें बहुधा त्यांच्या वेळीं विशेष महत्वाचें नव्हतें. पण पुढें पारसीक व अरब लेखकांनीं त्याचा अन्तर्भाव भरतखंडांत केलेला आहे हें त्याच्या नकाशांवरून उघड होत आहे. "मसच ऊर्फ ममच नामक ग्रंथांतील नकाशांत हिरमंड (हेलमण्ड) नदीला हिंद व त्याची पश्चिम सरहद्द जो सिन्धप्रांत त्यांची नदी मानिलें असून काबूलचा मुलुख हिंदमध्यें मोडत असे" आणि ही स्थिति स. १०२० च्या सुमारास तुर्क लोक काबूल जिंकीपर्यंत चालू होती. (रावर्टीकृत अफगाणिस्तान पा. ६२).

काबूलच्या प्राचीन इतिहासाची फारशी माहिती आज उपलब्ध नाहीं, व चालू विषयांत तिची आपल्याला वस्तुतः अवश्यकताहि नाहीं. ज्या कालापासून आपण प्रस्तुत इतिहासाला सुरुवात केलेली आहे तेव्हां म्हणजे इसवी सनाच्या ७ व्या शतकाच्या आरंभीं काबूल प्रांतांत बौद्धधर्मीय क्षत्रिय घराणें राज्य करीत होते यांत शंका नाहीं. ह्युएनत्संग तेथें इ. स. ६३० त गेला होता त्यानें तसें स्पष्ट म्हटलें आहे (कनिंगहॅमकृत हिंदुस्थानचें प्राचीन भूवर्णन, प्रवासवृत्तात्मक परिशिष्ट, पान ५६३). ह्युएनत्संगानें शिवाय असेंहि सांगितलेलें आहे कीं, लंपाक, नगर (आधुनिक जलालाबाद) आणि गांधार देश हीं तिन्ही काबूलच्या अंमलाखालीं होतीं. अर्थात काबूलचें राज्य त्या वेळीं बरेंच विस्तृत असले

पाहिजे. तेथील राजा आपल्याला शहा म्हणवीत असून, ही पदवी इराणीलोकांच्या भाषेंतून घेतलेली होती, कारण काबूलप्रान्त अनेक वेळां इराणी साम्राज्यांत सामील झालेला होता. म्हणजे एकदरींत काबूलचा राजा बौद्धधर्माचा, क्षत्रियवर्णाचा व शहा उपपदाचा असल्यामुळें त्यानें चिनी, हिंदी व इराणी या तीन्ही परंपरांचा व सुधारणांचा एकत्र मिलाफ केला होता असें म्हणावें लागतें शहा पदवीचा उल्लेख अरब ग्रंथकार आणि राजतरंगिणी-कार कल्हण यांनीहि केलेला आहे. काबूलची प्रजा सामान्यतः बौद्धधर्माची असून लंपाक आणि गांधार येथील लोक बहुतांशीं हिंदुधर्मांचे होते असें ह्युएनत्संग म्हणतो. त्यांच्या वर्णनावरून पहातां लंपाकांतील प्रजा अज्ञानी व स्वरूपानें कुरूप होती. म्हणजे ती अफगाण लोकांप्रमाणें गौरवर्ण नव्हती, ऊष्ण हवेनें त्यांच्यांत काळेपणा आला होता असें दिसतें. अफगाण लोक त्यांतले त्यांत थंड हवेंत रहात असल्यामुळें ऊष्ण हवेंतील हिंदी लोकांप्रमाणे कृष्णवर्ण बनले नव्हते व म्हणून त्यांच्या मुलखाला 'श्वेतभारत' असें नांव मिळालें होतें. काबूलचे तत्कालीन लोक नक्की कोणत्या जातीचे होते व तेथील राजे कोणत्या क्षत्रियवंशांतील होते हें अद्यापि समजलेलें नाहीं. अरबांचा जेव्हां काबूलाशीं संबंध येऊं लागला तेव्हां त्यांनीं काबूलाच्या राजाला काबूलशहा 'झंतबिल,' रार्वटीच्या अंदाजाप्रमाणें हें रणपालाचें आरबी रूप असावें, असें नांव दिलेलें आढळतें. हें नांव खरें काय असावें हें सांगणें कठी-णच आहे. पण पर्शियन लिपींत र, ज आणि ब, प हीं अक्षरें सारखींच असल्यामुळें रावर्टीचा अंदाज खरा असावा व राजतरं-गिणीवरूनहि त्याला फार थोडा कां होईना पण आधार मिळण्या-सारखा आहे. अरब इतिहासकारांनीं काबूलविषयीं केलेले उल्लेख इ. स. ६४० पासून १० व्या शतकांत तुर्कलोक तो प्रांत जिंकी.

पर्यंत सारखे आढळून येतात. तेव्हां इतक्या चारशें वर्षांत काबुलास एकच घराणें सारखें राज्यारूढ होतें असें म्हणतां येत नाहीं. तथापि त्या राजाविषयीं लिहितांना केव्हांही काबूलशहा झंतबिल हेंच नांव अरब ग्रंथकारांनीं योजिलेलें आहे.

अरबांनीं मेक्रान स. ६४० त जिंकिलें, व पुढें ६५० त हिरात जिंकल्यावर ते काबूलच्या सरहद्दीला येऊन भिडले. तथापि स. ६६३ पर्यंत ( हिजरी शक ४३ ) त्यांनीं काबूलावर प्रत्यक्ष स्वारी केलेली नव्हती. स. ६६३ त अबदुल रहिमाननें त्या शहराला एक वर्ष वेढा देऊन शेवटीं तें हस्तगत केलें, व सिन्धप्रांताप्रमाणेंच तेथील लष्करी लोकांची अरबांनीं कत्तल करून बायकामुलांना गुलाम केलें. राजाला मात्र त्यानें मुसलमान होण्याचें कबूल केल्यावरून जीवदान देण्यांत आलें. मुसलमान बनल्यावर काबूलशहालाच त्यांनीं पुनः खंडणी देणारा मांडलिक करून तेथे अधिकारारूढ केलें व ते तेथून निघून गेले. पण सिंध प्रांतांतील लोकांप्रमाणें काबूलचे लोक नेभळट नव्हते. त्यांनीं अरब लोकांची पाठ फिरल्याबरोबर पुनः आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. तेव्हां हज्जाजनें, सिन्धप्रान्तावर जशी महंमद कासिमाची योजना केली, तशी काबूल पादाक्रांत करण्याच्या कामीं अब्दुल्ला नामक एका सरदाराची नेमणूक केली. अबदुल्ला तेथें आल्याबरोबर शहा तेथून निघून डोंगरांत लपून राहिला, आणि पुढील इतिहासांत अफगाण लोकांनीं स्वीकारलेल्या धोरणाप्रमाणें, डोंगरांतील वाटा रोंखून आपला पाठलाग करणाऱ्या शत्रूचें मागील लोकांशीं दळणवळण त्यानें बंद करून टाकिलें. तेव्हां शेवटीं अन्नाच्या टंचाईमुळें अबदुल्ला यास शरण जाणें भाग पडून त्यानें शहाला सात लाख दिनार द्यावयाचें कबूल केलें व आपली मुक्तता करून घेऊन

तेथून मागें पाय काढला. पण असल्या अपयशानें हज्जाज भेदरून जाणारा नव्हता. त्यानें लगेच अबदुलरहिमानच्या हाताखालीं सैन्य देऊन त्याला काबूलावर लावून दिलें. तेव्हां म्हणजे सन ७०० च्या सुमारास, पुनः काबूलशहानें पूर्वीचेंच धोरण स्वीकारून गनिमी काव्याचा अवलंब केल्यामुळें व हज्जाजच्या आग्रही स्वभावामुळें अबदुल रहिमानानेंच त्याच्या विरुद्ध बंड केलें व ही स्वारी देखोल निष्फळ झाली. अबदुलरहिमानचें हें वर्तन मात्र कासिमाच्या मानानें पाहातां बरेंच विलक्षण वाटतें, व आरब लोकांच्या एकदर तत्कालीन शिस्तीच्याहि तें विरुद्ध आहे. असो, एकंदरींत अबदुलरहिमाननें काबूलशहाशीं तह केला, व त्यामुळें हज्जाजच्या सैन्यानें रहिमानवर हल्ला केला तेव्हां काबूलशहानें त्याला मदत करून त्याची सुटकाहि केली. पुढे स. ७१३ त हज्जाज मरण पावला तेव्हां बरींच वर्षेंपर्यंत काबुलाला अरबांपासून त्रास झाला नाहीं. इ. स. ७८६ त पुनः हरून-अलरशीद या खलीफाच्या अमदानींत अब्बासच्या आधिपात्याखालीं अरब लोकांची काबुलावर स्वारी झाली. अब्बासनें काबूलच्या बाहेर असलेल्या शहा-विहार नामक एक भव्य बौद्ध विहार काबीज करून लुटून फस्त केला. हें ठिकाण अजूनहि याच नांवानें प्रसिद्ध आहे. यावेळींहि काबूलशहा व त्याची प्रजा बौद्धच होती. याहि राजानें पूर्वीच्या राजाचें अनुकरण करून डोंगरांचा आश्रय केल्यामुळें अब्बासचे शेवटीं कांहीं चाललें नाहीं, व काबूल प्रांत आणखीहि दोन शतकेंपर्यंत या हिंदुशाही घराण्याकडेच असून भरभराटींत राहिला. पण या मुदतींत समानी नामक आरबांनीं गिझनीचा पाडाव करून तो प्रांत हस्तगत केला, व पुढें काबूलहि जिंकिलें. तथापि आणखी एक शतकपर्यंतहि काबूलच्या हिंदुघराण्याला गिझनीचा मांडलिक म्हणून राज्य करतां आलें.

आतां या पुढें तुर्क लोकांच्या स्वाऱ्या सुरू होऊन इ. स. ९३४ त अल्फ तेगीनच्या* सैन्यापत्याखालीं त्यांनीं गिझनीचा मुलुख काबीज केला. त्यावेळीं काबूलच्या शहानें आपल्या सम्राट् गिझनीपतीला सैन्यानिशीं साह्य केले. पण गिझनीचा पाडाव झाल्यामुळें काबूलचें राज्य पुढें कांहीं काळ पुनः स्वतंत्र झालें. पण इ. स. ९७५ च्या सुमारास सब्क तेगीननें तें काबीज केल्यामुळें पुनरपि तें गिझनीच्या तुर्की आधिपत्याखालीं आले; व काबूलशहा आतां त्या सब्क तेगीनलाहि दुसऱ्या शत्रूंविरुद्ध साह्य करण्यास तयार झाला असें अलबिरुणीने लिहिलें आहे, पण महंमुद हा गिझनीच्या गादीवर आल्यानंतर त्याच्या वाढत्या महत्वाकांक्षेपुढें काबूलच्या राज्याचा टिकाव लागणें शक्य नव्हतें; इ. स. १०२१ त शेवटचा एक निकराचा संग्राम होऊन काबूलचे हिंदु राज्य गिझनीच्या राज्यांत सामील झाले, व दोघांचा यापुढें इतका एकजीव होऊन गेला कीं काबूल म्हणजे कोणे एके काळीं हिंदु राज्य होतें ही गोष्ट देखील लोकांच्या स्मरणांतून नष्ट झाली. तेथील लोकांना जबरीनें मुसलमान बनविण्यांत आलें. अलबिरुणीनें या सक्तीच्या धर्मांत्तराविषयीं पुढील मौजेची आख्यायिका सांगितली आहे ( अलबिरुणी पु. २ पा. १५७ ). काबूलचा इस्पिहादाद म्हणजे सुभेदार मुसलमान होण्यास कबूल झाला तेव्हां आपण गोमांस भक्षण करणार नाहीं, व खोजे बाळगणार नाहीं अशा अटी त्यानें घातल्या होत्या. पण तेथील लोकांना आपल्या पूर्व भावनांचा लवकरच इतका विसर पडला कीं, या अटी व आपलें पूर्वीचें आर्यत्व या गोष्टींचे त्यांना स्मरणहि राहिले नाहीं.

---

* अल्फ् तेगीन हे दोन निराळे शब्द असून चुकीने त्यांना अलफ्तगीन असें एक समजण्यांत येतें.

आतां राजतरंगिणीवरून या काबूलशहाविषयीं काय विशेष महत्वाचा माहिती मिळण्यासारखी आहे ती पाहूं. स. ८८४ पासून स. ९०२ पर्यंत कश्मीरावर राज्य करणारा राजा शंकरवर्मा यानें लल्लिय या काबूलशहाचा पराभव करून त्याचे राज्य बळकाविलें. तेव्हां लल्लियाने तेथून पळून जाऊन आलखान गूर्जराचा आश्रय केला. ही गोष्ट काबूलशहाचे सम्राट् समानी मुसलमान राजे गिझनीचे अधिपति असतांना घडली असली पाहिजे. यानंतर शंकरवर्म्याच्या पाठीमागून त्याची विधवा राणी सुगन्धा आपल्या अल्पवयीं गोपाळवर्मा नांवाच्या मुलाला गादीवर बसवून राज्यकारभार पहात असतां, मंत्री प्रभाकरदेव यानें पुनः काबुलावर स्वारी केली व तें राज्य जिंकिलें ( उदभांडपुरे तेन शाहिराज्यं व्यजीयत । ५–२३२ ). शंकरवर्मा वारल्यावर शाहि घराण्यानें काश्मीरचें आधिपत्य बहुधा झुगारून दिलें असलें पाहिजे; म्हणून तें जिंकण्याचा पुनः प्रसंग आला. पण यावेळीं लल्लियाचा पुत्र तोरमाण * यालाच काबूलच्या गादीवर बसविण्यांत आलें. यावरून स. ८८४ ते ९०४ पर्यंतच्या काळांत काबूलचें राज्य काश्मीरच्या प्रत्यक्ष आधिपत्याखालीं होतें असें दिसून येतें. यानंतर एका शाहि राजाची नात व लोहरच्या सिंहराजाची मुलगी दिद्दा नांवाची काश्मीरच्या क्षेमगुप्त नांवाच्या राजाला दिलेली होती असें आढळतें. क्षेमगुप्तानें लौकिक शक २६ ते ३४ म्हणजे इ. स. ९५१ ते ९५९ पर्यंत राज्य केलें ( राजतरंगिणी, ६, १८७ ). या वर्णनांतील शाहिराजाचें नांव त्यानें आपल्या नातीच्या स्मरणार्थ काश्मीरास बांधिलेल्या विष्णूच्या मन्दिरावरून उपलब्ध झालें आहे, तें भीमशहा हें होय. त्याविषयीं राजतरंगिणींत " माता

* आज्ञातिक्रमिणः शाहेः कृत्वा कमलुकाभिधाम् । तोरमाणाय संप्रादाद्राज्यं लल्लियसूनवे ॥ ५–२३३

महेन भूभर्तृवध्वास्तस्या व्यधीयत। श्रीभीमशाहिनोदात्तप्रसादो भीम केशवः॥ ६,१७८" असा उल्लेख आहे. त्या मन्दिराचें नांव भीम केशव आणि राजाचें नांव भीमशहा असें यावरून स्पष्ट होतें. हा अर्थात् बौद्ध नसून वैष्णव असला पाहिजे. दहाव्या शतकांत बौद्धधर्माची या देशांतून बहुतेक उचलबांगडी कशी झाली होती व बुद्धाला विष्णूच्या अवतारमालिकेंतच स्थान मिळाल्यामुळें बौद्धधर्मीयांचेंच वैष्णवधर्मांत कसें परिवर्तन झालें हें वरील हकीगतीवरून सामान्यतः दिसून येईल. याविषयीं अधिक विवेचन पुढील भागांत येणार आहे.

काबूलच्या शाहि घराण्याच्या अंताचें मनोहर वर्णन शेवटीं राजतरंगिणीच्या ७ व्या तरंगांत दिले आहे. लोहरच्या राजघराण्यांतील एक पुरुष संग्रामराज हा अभिमन्यूच्या मागून काश्मीरावर राज्य करीत असतां त्रिलोनचपाल नांवाच्या काबूलशहानें त्याची गिझनीच्या महंमुदाविरुद्ध मदत मागितली. तेव्हां संग्रामराजानें तुंग नांवाच्या आपल्या शूर प्रधानाला मोठें सैन्य देऊन काबुलास पाठविलें. प्रसंग पडल्यास काबूलच्या नित्य वहिवाटीप्रमाणें डोंगरांच्या आश्रयानें गनिमी काव्यानें लढण्याविषयीं त्रिलोचनपालानें तुंगाला सल्ला दिली. पण तिला न जुमानतां त्यानें उघड्या मैदानांतच तुर्कांना तोंड देण्याचें ठरविलें. मग ठरल्याप्रमाणें तुर्कांचा हम्मीर ( अमीर ) आणि काबूल व काश्मीर राजांचें जोड सैन्य यांचे तेथे भयंकर रणकंदन झालें. काश्मीरचे पुष्कळ सरदार या वेळीं शौर्य गाजवून धारातीर्थी पतन पावले व आतां नाइलाज झाला असें पाहून शेवटीं त्रिलोचनपाल तेथून पळून गेला. याप्रमाणें पराभव झाल्यावर उरलेल्या सैन्याची पूर्व वहिवाटीप्रमाणें तुर्कांकडून पूर्ण कत्तल झाली व अशा रीतीनें काबूलचें राज्य हिंदु घराण्याला शेवटीं कायमचें मुकलें. स्वदेशा-

भिमानी राजतरंगिणीकारानें हें वर्णन करून पुढील दुःखोद्गार काढिले आहेत, "शाहि राजांच्या प्रतापाचें नांवहि नष्ट झालें. जें स्वप्नांत देखील कधीं दिसलें नाहीं, व कल्पनेलाहि ज्याचें आकलन करतां येत नाहीं, तें दैवहतकानें सहजगत्या प्रत्यक्ष घडवून आणिलें"* (रा. त. ६-६७). एवढें झालें तरी काबूलचा भरतखंडाशीं असलेला संबंध कायम तुटण्याचें कारण नव्हतें. पण तुर्कांनीं झाडून साऱ्या लोकांना मुसलमान बनविल्यामुळें तोहि प्रकार घडून आला. सिन्धुनदीच्या पश्चिमेकडे हा जो सरसकट धर्मान्तराचा प्रकार मुसलमानांनीं घडविला तसा या बाजूला झाला नाहीं; या गोष्टीच्या कारणांचा पुढें विचार करूं

पळून गेल्यावर त्रिलोचनपालानें परदेशांत वास पतकरिला, व पुनः तो काबूलास कधींच परतला नाहीं. त्याचे मुलगे मात्र काश्मीरच्या आश्रयाला राहून तेथील राजांचा पाहुणचार भोगीत असल्याचें राजतरंगिणींत सांगितले आहे. त्यांचीं नांवें रुद्रपाल वगैरे होतीं. पुढें काश्मीरांत देखील त्यांच्या वंशाचा कांहीं मागमूस राहिला नाहीं. या शाहिराजांच्या नांवापुढें जें 'पल' हें पद येतें त्यावरून झंतबिल या आरबी नांवाचें मूळ रणपाल असून तो या शाहिघराण्याचा काबूल येथील मूळपुरुष असावा अशी जी कल्पना आहे तिला पाठबळ मिळतें. हे घराणे स. ६३० त ह्युएनत्सगाला तेथें आढळलेल्या क्षत्रिय घराण्याहून बहुधा वेगळेंच होतें. संग्रामसिंहानें काश्मीरावर स. १००३ पासून १०२८ पर्यंत राज्य केले, आणि त्याच्या अमदानींत काबूलचें हिंदुघराणे नष्ट झालें तें अलबिरुणीनें ह्मटल्याप्रमाणें सन १०१० ते १०२१ च्या

---

* यथा नामापि निनष्ट शोघ्रं शाहिश्रियस्तथा। स्वप्नेऽपि यदसंभाव्यं यत्र भग्ना मनोरथाः। हेलया तद्विदध्वतो नासाध्यं विद्यते विधेः॥

दरम्यान केव्हां तरी झालें असलें पाहिजे. याविषयीं व्हिन्सेन्ट स्मिथनें लिहिलें आहे कीं, "शंकरवर्म्याचे कारकीर्दीत ( सन ८८३ ते ९०२ ) कनिष्काचा वंशज व तुर्की शाही घराण्याचा शेवटचा राजा, लल्लिय नामक ब्राह्मणाचे हातून पराभव पावला. तेव्हां लल्लियानें तेथें आपलें घराणें स्थापन केलें व तें स. 1021 पर्यंत तेथें नांदल्यावर मुसलमानांनीं त्या सुमारास त्याचा उच्छेद- केला." ( प्राचीन भारतवर्षाचा इतिहास. ति. आ. पा. ३७६ ) पण राजतरंगिणीवरून व्हिन्सेन्ट स्मिथचें हें पूर्वीचें घराणें असल्या- विषयींचें ह्मणणें बरोबर दिसत नाहीं. त्यानें तरंगिणीचें ह्मणणें नीट पाहिलें नाहींसें वाटतें. लल्लियानें आपलें घराणें काबूल येथें स्थापन केलें यांत शंका नाहीं; त्याच्या घराण्यानें शेवटपर्यंत शाहि ही पदवी देखील धारण केली होतीच. पण काश्मीरचा राजा शंकरवर्मा यानें लल्लियाचा पराभव करून त्याला पळून जावयास लाविलें, व त्याचा पुत्र तोरमाण याला पुढें काश्मीरचा प्रधान प्रभाकरदेव यानें काबूलचे गादीवर बसविलें. म्हणून पुढील पाल पदांकित काबूलचे राजे लल्लियपुत्र तोरमाणाचेच वंशज व ब्राह्मण असले पाहिजेत; व राजतरंगिणीवरून देखील हीच गोष्ट निष्पन्न होते. या राजांच्या मुली मात्र वाटेल त्या घराण्यांत दिलेल्या आढ- ळतात. त्यांपैकीं एकाची नात दिद्दा पूर्वी सांगितल्याप्रमाणें काश्मी- रच्या क्षेमगुप्ताला दिलेली होती, दुसरी प्रधान तुंग याच्या मुलाला दिली होती, व तिसरी एक लोहरच्या राजाला दिली होती. असो, या घराण्यापूर्वी बराच काळ ह्मणजे ह्युएनत्संगाच्या वेळीं काबूल येथें असलेलें क्षत्रिय घराणेंहि आमच्या मतें कनिष्क वंशांतील नव्हतें. कनिष्काचें घराणें गांधार देशांत पुरुषपुर ( पेशावर ) यथें राज्य करीत असून तेथें कनिष्काचा स्तूपहि बराच काळ उभा होता. पण ह्युएनत्संग इकडे येण्याचे पूर्वी पुष्कळ काळ हें

कनिष्काचें घराणें तेथून नाहींसें झालेलें असून तो देश काबूलच्या क्षत्रिय घराण्याच्या आधिराज्याखालीं आलेला होता. ही गोष्ट त्याच्याच लेखांवरून ठरत आहे. तेव्हां हें क्षत्रिय घराणें स. ८८३ च्या थोडेंच पूर्वी लयास जाऊन त्याच्या जागीं लल्लियाचें ब्राह्मण घराणें स्थापन झालें असलें पाहिजे असें अनुमान होतें. लल्लियाच्या ब्राह्मण घराण्याचा काश्मीरच्या राजघराण्याशीं विवाह-संबंध घडून येत असे व तें स. १००३ ते १०२९ च्या दरम्यान केव्हा तरी उलथून पडलें हें वरील विवेचनात आलेंच आहे. ( लल्लियानें उलथून टाकिलेलें काबूलचें घराणें अलबिरुणी ह्मणतो तसें तुर्की होतें कीं ह्युएनत्संग ह्मणतो त्याप्रमाणें क्षत्रिय होतें, या प्रश्नाचा सविस्तर विचार पुढें स्वतंत्र टीपेंत करूं. त्याचप्रमाणें गिझनीच्या महंमुदानें काबूल जिंकिल्याचा सविस्तर इतिहासहि स्वतंत्रपणेंच दिला पाहिजे )

काबूलच्या इतिहासाचें तिसरें साधन जें प्राचीन नाणीं त्यांच्या वरून त्याविषयीं काय माहिती मिळतें तें आतां शेवटीं पहावयाचें. नाण्यांवर बहुधा वर्ष मिती वगैरे नसल्यामुळें त्यांवरून मिळणारी माहिती अर्थातच पुष्कळ अपुरी असणार हें सांगावयास नकोच. तथापि जी कांहीं मिळते तो मात्र अचूक व बिनतोड मिळते. ही माहिती जनरल कनिंगहॅमनें "मध्यकालीन भारत वर्षांतील नाणीं" या आपल्या बहुमोल ग्रंथांत दिली आहे. पण त्यानें आपल्या अनुमानासाठीं ज्या कल्पना प्रथम मुक्रर केल्या आहेत त्यांतील कांहीं आमच्या मतें बिनआधारी आहेत. गांधार देशांतील नाण्यां-वरून निष्पन्न होणारी विशेष गोष्ट ह्मणजे त्यांत तीं पाडणाऱ्या राजाला स्पलपति ह्मटलें आहे ही होय. यावर कनिंगहॅमचें असें ह्मणणें आहे कीं, स्पलपति या शब्दाचा अर्थ पर्शियन भाषेंत युद्धपति असा असून तो समरपति या संस्कृत शब्दाशीं समाना-

र्थक आहे. तेव्हां अलबिरुणीच्या ह्मणण्याप्रमाणें कल्लर नांवाच्या ज्या ब्राह्मण प्रधानानें, सिन्ध प्रान्तांत चचानें केल्याप्रमाणें, काबूलची गादी बळकाविली तो काबूलचा सेनापति असून राजाच्या फारशी शाही पदवीप्रमाणें त्याचीहि स्पलपति अशी फारशीच पदवी असावी, व तीच त्यानें राजपद मिळाल्यावर देखील कायम ठेविली असावी. अलबिरुणीचा हा कल्लर ह्मणजेच राजतरंगीणींतील लल्लिय असावा व त्यावरून कल्लर हा आरबी अपभ्रंश झालेला असावा; अथवा प्राकृत भाषेंतील अलीकडील लाला किंवा लाल शब्दाचें मूळ लल्लिय हें त्या प्रधानाचें आवडतें टोपण नांव असावें. स्पलपति देवाच्या नाण्यांवर एका बाजूला वशिंडवाला बैल व शंकराचा त्रिशूळ असून दुसऱ्या बाजूला उजवे हातांत भाला धरलेला घोडेस्वार असतो. हीं नाणीं काबूल प्रांतांत व पंजाबांत देखील फार दिवस चालू असल्यामुळे तीं तिकडे इतकी लोकप्रिय झालीं होतीं कीं, गिझनीच्या महंमुदानें तो प्रदेश जिंकल्यावर व त्यानंतर महंमद घोरीनेहि तशाच प्रकारचीं नाणीं पाडून त्यांवर आपले नांव मात्र संस्कृत अक्षरांत घोडेस्वाराचे चित्रावर अधिक घातले.

हीं नाणीं स्पलपति देव, सामन्तदेव, खमर्यक, व भीमदेव यांच्या नांवाचीं आहेत व तीं काबूलच्या ब्राह्मण घराण्यांतले जे चार क्रमिक राजे कल्लर, सामन्त, कमलु व भीम असे अलबिरुणीनें सांगितले आहेत त्यांचींच अर्थात् असलीं पाहिजेत असें कनिंगहॅमचें म्हणणे आहे. तरंगिणींत देखील लल्लिय हें यांपैकीं पहिल्या राजाबद्दल, कमलुक* ( ऊर्फ तोरमाण ) हें तिसऱ्याबद्दल व शेवटीं भीम अशीं नांवें सांगितलीं आहेत. या वंशांतील पुढचे राजे जे

* पूर्वीच्या एका टीपेंत दिलेला राजतरं. ५,२३३ श्लोक पहा.

जयपाल, आनंदपाल आणि त्रिलोचनपाल त्यांचीं नाणीं सांपडलेलीं नाहींत, व त्या संबंधांत कनिंगहॅम म्हणतो कीं, हे पाल राजे निराळ्या म्हणजे लल्लियानें उलथून टाकिलेल्या माजी तुर्की रजपूत अथवा क्षत्रियघराण्यांपैकीं असावेत. पण हें म्हणणें अलबिरुणीच्या लिहिण्याशीं जुळत नाहीं. तो त्रिलोचनपालाचा बहुतेक समकालीनच असल्यामुळें त्याला ही गोष्ट चांगलीच माहीत असली पाहिजे. त्यानें जयपालादि सर्व राजांना ब्राह्मणच म्हटलेलें आहे. त्यांपैकीं कांहींच्या नांवांपुढें असलेल्या **देव** पदावरून त्यांचें ब्राह्मणत्वच दिसून येतें. पण तें पद निरर्थक मानिलें तरी हरकत नाहीं. पूर्वी सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणी राजांचे क्षत्रियांशीं विवाह संबध घडून आल्यावर कालान्तरानें ते ब्राह्मण व्यवहारदृष्ट्या सर्वस्वीं क्षत्रियच झाले. म्हणून त्यांनीं धारण केलेलें **पाल** हें उपपद कांहीं विलक्षण नसून त्यावरून त्याचें घराणें निराळेंच होतें असें मानण्याचें कारण नाहीं. या शिवाय **झुसी** येथील ताम्रलेखावरून आणखीहि एक अनुमान कनिंगहॅमनें काढिलें आहे; व तेंहि असेंच बिन आधारी आहे. हा लेख दानलेख असून (इंडियन अँटिक्वरी पु. १८) त्याचें निरीक्षण केल्यास तो **काबूलच्या त्रिलोचन पालाचा** आहे असें कोणास म्हणतां येणार नाहीं. कारण त्यांत **शाहि** घराण्याचें नांवच नाहीं. शिवाय हा ताम्रलेख **अलाहाबाद** जवळ सांपडलेला असल्यामुळें तो तद्देशीयच असला पाहिजे. त्यांत **त्रिलोचनपालाचें** नांव आहे, पण त्याच्या बापाचें नांव **राज्यपाल,** आणि त्याच्या आजाचें **विजयपाल** अशीं नांवें सांगितलीं आहेत. त्यांत सांगितलेला दानविषयक ग्राम **अलाहाबाद** जवळच बहुधा असून तो **वटिस्थान** येथील सर्व ब्राह्मणांना मिळून दिलेला आहे. हा सर्व प्रकार काबूलच्या त्रिलोचनाचे हातून झालेला असणें शक्य दिसत नाहीं. आणखी असें कीं या ताम्र-

पत्राचें वर्ष स. १०२७ हें आहे. या वेळीं त्रिलोचनपाल राज्यावर नव्हता; व कदाचित् जीवंतहि नसावा हें पूर्वी दिलेल्या हकीगतीवरून दिसून येईलच. अर्थात हा झुसीच्या दानलेखांतील त्रिलोचनपाल खास दुसरा कोणी तरी असला पाहिजे हें स्पष्ट आहे. त्रिलोचन आणि पाल हीं दोन्ही नांवें उत्तर हिंदुस्थानांत सर्व साधारण आहेत. आमच्या मतें काबूलचें शाहि घराणें त्रिलोचनपालानंतर राज्य करावयाला शिल्लक राहिलें नाहीं. त्रिलोचनाबरोबर त्या घराण्याचाहि अंत झाला.

# टीप.

## काबूलचें राजघराणें मूळ तुर्की होतें काय ?

व्हिन्सेंट स्मिथनें आपल्या भारतवर्षाच्या प्राचीन इतिहासांत ( आवृत्ति ३ री, पा. ३७३ ) काश्मीरविषयीं लिहितांना " त्याच्या ( म्हणजे शंकर वर्म्याच्या ) कारकीर्दीत काबूलचे तुर्की राजे ह्मणजे कनिष्काचे वंशज जे शाहि घराणे त्यांचें लल्लिय नामक ब्राह्मणाने उच्चाटण करून तेथें आपल्या घराण्याची स्थापना केली. या लल्लियाचे घराणे तेथे स.१०२१ पर्यंत नांदन्यावर त्या वर्षी त्याचा मुसलमानांनीं उच्छेद केला, " असे विधान केलें आहे. गिझनीच्या महंमुदने ज्या काबूलच्या शेवटच्या घराण्याचा उच्छेद केला ते ब्राह्मणी असून त्यांतील शेवटचा राजा त्रिलोचनपाल याचा काश्मीरचा इतिहास जी राजतरंगिणी यांत उल्लेख आलेला आहे हें आह्मी पूर्वीच दाखविले आहे. आतां त्यांच्या पूर्वीचे काबूलचे घराणे मूळ तुर्की असून कनिष्काचे वंशज होते की काय याचा येथे विचार करावयाचा आहे. स्मिथच्या ह्मणण्याला मुख्य आधार म्हणजे राजतरंगिणीच्या इंग्रजी भाषान्तरांतील ( पा. ३३६ ) ' उदभाण्ड येथील शाहि ' ह्या मथळयाची टीप होय. ही टीप भाषान्तरकार डॉ. स्टीन याने अलबिरुणीच्या आधावर रचिलेली आहे तेव्हां अलबिरुणी आपल्या लेखांत स्वत: त्या संबधानें काय ह्मणतो हें आधी पाहूं. ( अलबिरुणीच्या ग्रंथाचें भाषान्तर सचऊ यानें केलें आहे. त्यांत पु. २, पा.१० पहा ) तो ह्मणतो–" काबूल येथें हिंदु राजे वास्तव्य करीत होते. तुर्क लोक तिबेटकडील मूळचे होत. बरहतकिन् हा त्यांचा मूळ पुरुष प्रथम हिंदुस्थान देशांत आला व एका गुहेंत यानें प्रवेश केला. ( या पुढें अलबिरुणीनें कांहीं विचित्र कथा दिली आहे; ती गाळणेंच बरें ). पुढें तो काबुलास शाहीय या नांवानें राज्यारूढ झाला, व तें राज्य त्याच्या वंशांत ६० पिढया राहिलें. हिंदुलोक असल्या घडामोडींच्या ऐतिहासिक क्रमाकडे फार दुर्लक्ष करितात, व आपल्या राजांच्या वंशावळी वगैरे सांगतांना कालानुक्रमाकडे मुळींच नजर देत नाहींत ही मोठया दु:खाची गोष्ट आहे. त्यांना कोणी कांहीं माहिती विचारील्यास काय

सांगावे हेंच त्यांना कळत नसल्यामुळे ते कांही तरी बाता मारूं लागतात. या घराण्यांतील एक राजा कणिक नांवाचा होता. ( या कणिक ऊर्फ बौद्ध कनिष्कासंबंधानें देखील एक विचित्र दंतकथा त्याने सांगितली आहे, पण तीहि आह्मी येथे सांगत नाही ). या घराण्यांतील शेवटचा राजा **लगतुरमाण** नांवाचा असून त्याचा वजीर **कल्लर** नांवाचा ब्राह्मण होता. लगतुरमाणाचा स्वभाव चैनी व आचरण त्याहून वाईट होते. त्याविषयीं लोकांनीं तक्रारी केल्या. ह्मणून कल्लर वजीराने त्याला बंदीत टाकून आपण राज्यावर आरोहण केले. त्याच्या मागून सामन्त, कमलु, भीम, जयपाल, आनन्दपाल, आणि तिरोजनपाल असे आणखी ब्राह्मण राजे होऊन गेले. त्या शेवटच्या राजाचा हि. श. ४१२ त वध झाला. व पुढें पांच वर्षांनी त्याचा पुत्र भीमपाल याचाहि वध झाला." काबुलच्या हिंदी घराण्याच्या अंताचे संक्षिप्त वर्णन करतांना कल्हणानें जसे दुःखोद्गार काढिले, तसेच अलबिरुणीनेहि काढिले आहेत, व ते दिल्याशिवाय त्याच्या ग्रंथांतील हें अवतरण आह्माला पुरे करवत नांही. तो पुढे ह्मणतोः— "हिंदु शाहीय घराणे आतां नामशेष झालें असून त्याचा बारीक कोंब देखील कोठे आढळून येत नाहीं. त्याच्या वैभवकाळी त्यांनी धर्म्य व न्याय्य गोष्टी करण्याची आपली उत्कंठा कधीहि शिथिल केली नाहीं; त्यांच्या भावना उदात्त होत्या व त्याचे आचरणहि तसेंच थोरपणाचे होतें, हे आम्हाला कबूल केलें पाहिजे. आनंदपालाने राजा महंमुदाला जें पत्र लिहिलें त्यांतलें खालील वाक्य तर मला फारच आवडलें. "तुर्कलोकांनी तुमच्या विरुद्ध बंड केलें हें मला कळलें; तुमची इच्छा असल्यास तुमच्या मदतीला मी स्वतः येतों, किंवा ५००० घोडेस्वार, १०००० पायदळ, व १०० हत्ती बरोबर देऊन पाहिजे तर आपल्या मुलाला पाठवितों. तुम्ही मला जिंकल्यामुळें, आतां तुम्हाला कोणी जिंकूं नये अशी माझी मनीषा आहे." या उद्गारांत रजपुतांचा खरा तेजस्वी व उदात्तबाणा स्पष्ट दृग्गोचर होत आहे. दैव फिरलें, व काबूलच्या ब्राह्मणीशाही घराण्याचा उच्छेद झाला; त्याची कहाणी पुढें सांगावी लागणारच आहे.

आतां या ठिकाणीं कल्लर या ब्राह्मण वजीरानें पदच्युत केलेलें मूळ घराणें जात्या तुर्की होतें कीं काय असा प्रश्न उत्पन्न झालेला आहे. अलबिरुणीनें लिहिलेली हकीकत त्याच्याच म्हणण्याप्रमाणें पाहतां गांवढळ लोकांच्या बातां-वरच उभारलेली आहे; व ती पुष्कळ ठिकाणीं अगदींच क्रम विरुद्ध आहे असेंहि त्याचें म्हणणें आहे. आतां दुसरे पक्षीं ह्युएनत्संगानें स. ६३० त पाहिलेल्या प्रत्यक्ष स्थितीवरून काबुलास क्षत्रिय राजा होता असें लिहिलें आहे. तुर्क म्हणजे कोण व हिंदु क्षत्रिय म्हणजे कोण हे त्याला पूर्ण माहीत होतें. कारण येतांना तो तुर्कांच्या देशांतूनच आलेला होता. तेव्हां त्यानें प्रत्यक्ष पाहून लिहिलेल्या गोष्टींचा पुरावा सोडून ४०० वर्षांनंतर कर्णोपकर्णी ऐकिलेल्या हकीकतीच्या आधारावर अलबिरुणीने मोठ्या नाखुषीने व अविश्वास पूर्वक लिहिलेल्या गोष्टीच खऱ्या ऐतिहासिक असे मानण्यांत काय अर्थ आहे ? या दंतकथेचा पोकळपणाहि सहज दिसण्यासारखा आहे. प्रथमत: कोणतेहि राजघराणे सारखे ६० पिढ्या ह्मणजे निदान १२०० वर्षे चालू असलेले इतिहासांत आढळत नाही. दुसरे असे कीं, कनिष्क जरी तुर्क असला तरी तो अलबिरुणीच्या पूर्वी ९०० वर्षें होऊन गेलेला असल्यामुळें इतका काळ त्याचा वंश काबुलास नांदत असेल असें ह्मणवत नाहीं. शिवाय कनिष्काचे राज्य काबुलास नसून गांधारांतील पुरुषपुरास म्हणजे पेशावरास होतें हेहि सुप्रसिद्धच आहे. तिसरी गोष्ट अशी कीं कनिष्कानंतर कित्येक परकीय लोकांच्या स्वाऱ्या या देशावर झाल्या; यांतील मिहिरकुलाच्या आधिपत्याखाली झालेली हूण लोकांची स्वारी विशेष महत्वाची होती हें इतिहासांत नमूद आहेच. जर कनिष्काचे कोणी वंशज शिल्लक राहिले असले, तर या हूणादिकांच्या स्वाऱ्यांच्या तडाक्यांत सांपडून ते नामशेष झाले असले पाहिजेत. या हूण लोकांचेंहि पुढें हिंदुस्थानांतून व इराणांतून उच्चाटण झालें. ह्मणून आम्ही म्हणतों कीं स. ६३० त जेव्हां ह्युएनत्संग काबुलास आला तेव्हां तेथें आर्य क्षत्रियांचें घराणे राज्य करीत होते असें जे त्याने लिहिलें आहे तेंच खरें होय. ते राजे आपल्याला शाहि म्हणवीत हे खरें, पण ती पदवी जवळच्या इराणांतील बलाढ्य बादशाहपासून त्यांनीं उचलली होती. स. ६३० नंतर तों महंमुदाच्या काळापर्यंत तुर्क किंवा हूण या तुराणी

लोकांच्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर झाल्या नाहीत व त्यामुळें काबूलचे राज्यहि ४०० वर्षे शांततेत नांदत होतें हें इतिहास-प्रसिद्ध आहे. याकाळाच्या आरंभीं आरब लोकांनीं त्याला थोडासा धाक उत्पन्न केला. पण पुढे लवकरच त्यांच्यांत यादवी सुरू झाल्यामुळें सिन्धु देशापलीकडे यांची प्रगती होण्याचे बंद पडले. तात्पर्य कीं, आमच्या मते स. ६३० च्या सुमारास कनिष्काच्या वंशांतील कोणी तुर्की घराणें काबुलास राज्य करीत असणें शक्य नाही. या काळाच्या सुमारास नुकतेंच गांधारचे राज्य काबूलच्या शाहींनी जिंकिलें होते असे ह्युएनत्संगाने सांगितले आहे. हा गांधारचा राजा त्यावेळी कोणी हूण असावा. राजतरंगिणींत उदभाण्डपुर म्हणून जें अनेकशः आलेलें आहे ते अर्थात् काबूलच्या राज्यांत मोडत असले पाहिजे; व मुसलमानी बखरकार ज्याला वाहिंद म्हणतात तेंच ते असावें असे जें डॉ. स्टीननें म्हटले आहे ते बरोबर दिसते. उदभाण्ड याचे प्राकृत रूप दचा लोप होऊन व भ बद्दल हा येऊन उअहाण्ड, वाहण्ड, वाहिंड असे होणे योग्यच आहे.

ह्युएनत्संगाने सांगितलेल्या काबूलच्या क्षत्रिय घराण्याचे उच्चाटण करणाऱ्या ब्राह्मणवंशाची थोडीशी माहिती अलबिरुणीच्या लेखांवरून मिळण्यासारखी आहे, व अलबिरुणी त्याच सुमारास होऊन गेला असल्यामुळें ती विश्वसनीयहि आहे. मोडकळीस आलेल्या जुन्या राजघराण्याला पदच्युत करून तेथील प्रधानानें गादी बळकावण्याचा प्रकार कांहीं हिंदुस्थानच्या इतिहासांत नवीन नाहीं. चचाचें एतद्विषयक उदाहरण पूर्वी आलेच आहे. इ. स. ८७८ च्या सुमारास सफावीनें काबूलावर स्वारी करून ते काबीज केल्यामुळें तर ल्लियाला तसे करणें अधिकच सुकर झालें असलें पाहिजे. त्याच्या वंशांत सहा राजे झाल्याचें अलबिरुणीने सांगितले आहें. त्यांची नांवे व कारकीर्दीचे अंदाजीं काल दर कारकीर्दीला २० वर्षे धरून खाली दिले आहेत:-

१ कल्लर स. ८८० ते स. ९०० ४ भीमपाळ स. ९४०--९६०
२ सामन्त स. ९००—९२० ५ जयपाल ९६०—९८०
३ कमलु ९२०—९४० ६ आनंदपाल ९८०—१०००
७ त्रिलोचनपाल--याला गिझनीचे महंमुदानें १०२१ त जिंकिलें.

या राजांपैकी तिघांची नांवे राजतरंगिणीत आली आहेत; व तेथे त्यांचे शकहि सांगितले आहेत. हे शक वर दिलेल्या अंदाजी काळाशीं बहुतेक मिळतात. प्रथम त्रिलोचनापासून सुरुवात करूं. महंमुदाविरुद्ध त्याला साह्य करणारा काश्मीराधिपति संग्रामराज हा स. १०२७ त मृत्यु पावला. दुसरे भीमपालाची नात दुर्वर्तनी दिद्दा क्षेमगुप्ताला दिली असून भीमाने आपल्या स्मरणार्थ भीमकेशव नांवाचे विष्णुमंदिर काश्मीरांत बांधिले. क्षेमगुप्त स.९५८ त मरण पावला. भीमपाल त्याचा समकालीन समजण्यास हरकत नाहीं. तिसरी गोष्ट म्हणजे काश्मीरच्या शंकरवर्म्याने लल्लिय या शाहि राजाचा पराभव केला. हा शंकरवर्मा स. ८८५ त गादीवर आला, व स. ९०२ त मृत्यु पावला. गादीवर बसल्यावर लवकरच त्याने काबुलावर स्वारी केली हे लक्षांत घेतां लल्लियाने काबुलचे राज्य स. ८८० च्या सुमारास बळकाविले असे होते. यानंतर थोड्याच वर्षांनीं शंकरवर्म्याने त्याची उचलबांगडी केली. राजतरंगिणींतील एतद्विषय श्लोक जरा अस्पष्ट आहेत (१५२–१५५) व त्यांचा अर्थ आमच्या मतें डॉ. स्टीन करतो तसा नसून निराळा आहे.*शंकरवर्म्याने काबूलावर स्वारी केली तेव्हां लल्लियाने पंजाबचा गुर्जर राजा जो आलखान त्याचा आश्रय केला.; व त्यानंतर कांही काळ काबूलचे राज्य काश्मीरच्या आधिपत्याखालीं होतें, असे आम्हाला वाटते. शंकरवर्म्याच्या मृत्यूनंतर त्याची राणी सुगन्धा ही राज्य कारभार पाहूं लागली, व तिचा प्रधान प्रभाकरदेव यानें लल्लियाच्या तोरमाण नांवाच्या मुलाला ( याचे दुसरे नांव कमलुक ) पुनः काबूलच्या गादीवर बसविले. हीं गोष्ट घडण्यापूर्वी लल्लिय स. ९०२ च्या सुमारास मरण पावला होता. अलबिरुणीने आपल्या राजनामावळींत दुसरे नांव सामन्त म्हणून सांगितले आहे. या नांवावरून तो स्वतंत्र राजा नसून मांड-

---

* दरत्तुरुष्काधिपयोर्मध्यः केसरिवराहयोः । हिमवद्विंध्ययोरासीदार्यावर्त इवान्तरे ॥ उदभाण्डपुरे तस्थुर्यदाये निर्भया नृपाः । पक्षच्छेदव्यथात्रस्ता महार्णव इवाद्रयः ॥ नक्षत्रेष्विव भूपेषु नभसीवोत्तरापथे । यस्यैव विपुला ख्यातिर्मार्तण्डस्येव मंडलम् ॥ स श्रीमांल्लल्लियः शाहिरलखानाश्रयः क्रुधा । निराकरिष्णोः साम्राज्यात्तस्य सेवां न लब्धवान् ॥

लिक होता हे स्पष्ट होते; व पूर्वी सांगितल्याप्रमाणें लल्लियाच्या मागून काबूलचें राज्य काश्मीरच्या आधिपत्याखालीं होते ही गोष्ट या अनुमानाशी जुळतीच आहे. पण काबुलांतील आर्य लोक पूर्वी काय व आतां काय स्वातंत्र्याचे भोक्ते होते. अरबांनीं देखील या लोकांच्या स्वातंत्र्यप्रियतेची वाखाणणी करून " काबूलच्या गादीवर जो बसलेला नाहीं अशा कोणत्याहि राजाला ते मानीत नाहीत,इतकी त्यांची आपल्या स्वत:च्या राजा विषयी निष्ठा आहे " असें म्हटले आहे. या स्वातंत्र्यप्रियतेमुळे त्या लोकांनीं शंकरवर्म्याच्या मृत्यूनंतर लगेच बंड उभारले, व शंकरवर्म्याचा पुत्र अल्पवयी असल्यामुळें त्यांना ती संधि बरी वाटली. तेव्हां काश्मीरचा प्रधान प्रभाकरदेव यानें काबुलास जाऊन त्यांचें बंड मोडले. पण त्या लोकांचा एकंदर स्वभाव ओळखून गेल्या शतकांत जशी काबूल जिंकल्यावरहि इंग्लिशांनीं तेथे दुसऱ्या अमीराचीच स्थापना केली त्याप्रमाणे प्रभाकरदेवानेहि दूरदर्शीपणानें लल्लियाच्या तोरमाण नांवाच्या मुलालाच तेथील गादीवर बसविलें. राजतरंगिणीवरून या तोरणमाला कमलुक असें दुसरे नांव दिलें होतें असे दिसते. ( कृत्वा कमलुकाभिधाम् ). याप्रमाणे अलबिरुणीच्या लल्लिय वंशाविषयींच्या माहितीला राजतरंगिणीवरुन पूर्ण प्रत्यंतर मिळते. या घराण्यांतील पहिले तीन राजे ह्मणजे ' कल्लर उर्फ लल्लिय, सामन्त ( लल्लियाचा कोणी संबंधी मांडलीक ) व ३ रा कमलुक ऊर्फ पूर्वीचा तोरमाण. पूर्वी सांगितल्याप्रमाणें या सर्वांचीं नाणीं सांपडलेलीं आहेत.

# प्रकरण ५ वें.

## काश्मीरांतील कर्कोटक वंश.

[सिन्ध प्रान्तांच्या इतिहासाच्या विश्वसनीय साधनाप्रमाणेंच काश्मीरच्या इतिहासाचेंहि तसे साधन उपलब्ध आहे; इतकेंच नव्हे तर चचनाम्या-प्रमाणे ते परकीयांनी लिहिलेलें नसून भारतवर्षीय इतिहासकारानें ते संस्कृतांत लिहिले आहे. हें साधन म्हणजे कल्हण पंडिताचा राजतरंगिणीनामक सुप्रसिद्ध ग्रंथ होय तो त्याने शके १०७० ह्मणजे सन ११४८ त लिहिला.* राजतरंगिणीच्या प्रस्तावनेत कल्हणाने आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या **सुव्रत, क्षेमेन्द्र, नीलमुनि, पद्ममिहिर, हेलराज,** या नृपावली-कारांचीं ( बखरकारांची ) नांवें सांगितलीं आहेत. या बखरनवीसांचे ग्रंथ आज दुर्दैवेंकरून उपलब्ध नाहींत. राजतरंगिणीपुढे ते फिक्के पडल्यामुळें त्यांचा लोप झाला असावा. कल्हणाने त्याचे दोष सांगितले आहेत. तथापि त्यानें त्यांच्या हकीगतीचा कोठें कोठे उल्लेख केलेला असल्यामुळे ती मूळ हकीगत काय होती व ती दुसऱ्या प्रमाणशीर हकीगतीशी कितपत जुळती किंवा विरोधी होती हे समजणें अवश्य होते. पण ' गतं न शोचेत् 'या न्यायानें आतां कल्हण काय ह्मणतो त्यावरच बहुतेक विश्वास टाकून चाललें पाहिजे. ज्या ठिकाणी त्याचें ह्मणणें अगदींच क्रम विरुद्ध असेल तेथे गोष्ट निराळी. डॉ. स्टीनने या ग्रंथाचें चांगले निरीक्षण करून असें अनुमान काढलें आहे कीं सातव्या शतकापुढील कल्हणानें सांगितलेली हकीगत बहुधा विश्वसनीय आहे. आपण लिहिलेली हकीकत, दानलेख, शिलालेख व इतर प्राचीन राजकीय पत्रे यांशी ताडून पाहिलेलीं असल्याबद्दलहि कल्हणानें

---

* काश्मीरच्या जयसिंहाच्या कारकीर्दीत हा ग्रंथ संपला. तो काळ कल्हणानें असा सांगितला आहे:–" लौकिकेऽब्दे चतुर्विंशे शककालस्य सांप्रतम् सप्तत्यभ्यधिकं यातं सहस्त्रं परिवत्सराः॥" १–५२

सांगितलें आहे.* तो स्वतः काश्मीर दरबारांत मोठा अधिकारी होता.× या सर्व गोष्टींचा विचार करतां, ह्युएनत्संगाचे लेख, चचनामा, व दुसरी उपलब्ध असलेलीं ऐतिहासिक प्रमाणे जमेस धरून राजतरंगिणीच्या मुख्य आधाराने काश्मीरच्या इतिहासाचें स्वरूप दाखविण्यास हरकत नाही. ]

भरतखंडाच्या इतिहासाच्या मध्यकालाला काश्मीरांत सातव्या शतकाच्या आरंभींच नवीन राजघराण्याची स्थापना होऊन सुरुवात झाली ही गोष्ट राजतरंगिणीवरून दिसून येते. पुराणप्रसिद्ध प्राचीन गोनर्दीय वंशाचा लौकिक शक ३६७७ त अंत होऊन नवीन युगाला आरंभ झाला. कलियुगारंभानंतर २५ किंवा २६ वर्षांनीं लौकिक शक सुरू झाला व कलियुगारंभ खि. स. पूर्वी ३१०१ या वर्षी चालू झाला हें सुप्रसिद्ध व सर्वमान्यच आहे. म्हणजे लौकिक शक इ. स. पूर्वी ३०७५ वर्षें सुरू होऊन तो कल्हणाच्या वेळेपर्यंत काश्मीरांत चालू होता. या शकाच्या ३६७७ वर्षी म्हणजे इ. स. ६०२ त गोनर्दीय वंशांतील बालादित्य नांवाचा शेवटचा राजा निपुत्रिक मरण पावल्यामुळें, व त्याला दुसरा कोणी पुरुष वारस नसल्यामुळें तो वंशच लयास गेला. तथापि आपल्या मागें आपलें राज्य कन्येच्या मार्फत कां होईना पण आपल्याच घरांत रहावें या हेतूनें बालादित्यानें आपली एकुलती एक कन्या नित्य रिवाजाप्रमाणें कोणा राजाला न देता दुर्लभवर्धन नांवाच्या आपल्या एका अधिकाऱ्यालाच दिली होती. बालादित्याच्या मृत्यूनंतर इ. स. ६०२ त हा दुर्लभवर्धन ठरल्याप्रमाणें गादीवर बसला. त्याच्या वंशाला कर्कोटक वंश असें नांव आहे, व महा-

* दृष्टैश्च पूर्वभूभर्तृ–प्रतिष्ठा–वस्तु–शासनैः । प्रशस्तिपट्टैः शास्त्रैश्च शान्तोऽशेषभ्रमक्लमः ॥ १–१५

× इति काश्मीरिक–महामात्यचम्पक प्रभुसूनोः कल्हणस्य कवेःकृतौ... तरंग ॥ असे प्रत्येक तरंगाचे शेवटी आहे.

भारतांत सांगितलेला कर्कोटक नाग त्याच्या कुलाचें संरक्षण करीत असे अशा समजुतीवर तें पडलें होतें. दुर्लभवर्धनाचें घराणें असेंच कोणतें तरी असल्यामुळें त्याला थोडेंसें महत्व प्राप्त होण्यासाठीं त्यानें आपल्या दरबारी भाटांकडून असली दंतकथा रचविलीहि असेल. अथवा तो नागवंशाच्या कोणा एतद्देशीय मूळ लोकांपैकीं असल्यामुळें नामसादृश्यावरून साहजिकपणेंहि ती उत्पन्न झालेली असेल. कसेंहि मानिलें तरी ह्युएनत्संगानेंहि तिचा उल्लेख केलेला असल्यामुळें ती त्यावेळीं लोकांत रूढ होती हें निःसंशय ठरते. "काश्मीरचे राजे नागाच्या पंखाखालीं असल्यामुळें ते इतर राजांवर गुरगुरतात" असें ह्युएनत्संगानें त्याच्याविषयीं लिहिले आहे. दुर्लभवर्धन जातीनें कायस्थ होता असें कल्हण म्हणतो. पण क्षत्रिय बालादित्यानें आपली मुलगी कायस्थाला दिली असेल हें संभवत नाहीं. म्हणून बहुधा तो नागवंशांतील कोणी मांडलिक असावा, व वर्धन या त्याच्या उपपदावरून तो कायस्थाहून श्रेष्ठ असून राजाच्या सैन्यांतील घोडेस्वारांना दाणावैरण पुरविण्याच्या कामावर होता असें दिसून येतें. तो मोठा धोरणी व दूरदर्शी असून त्यानें ३८ वर्षें बिनबोभाट राज्यकारभार हांकिला. त्याच्या वंशांत चांगले कर्तृत्ववान् व जोरदार असे अनेक राजे झाले. त्यांची एकंदर संख्या १७ असून त्यांनीं स. ६०२ पासून ८५६ पर्यंत २५४ वर्षें काश्मीरांत राज्य केलें.

हें कर्कोटक घराणें ठाणेश्वरच्या वर्धन घराण्याप्रमाणें शिवोपासक होतें. शिवोपासनेवर तत्कालीन लोकांचा बराच भर असे. शिवाशिवाय विष्णु व आदित्य याहि देवता उपासनाविषय कित्येक ठिकाणीं असत. कर्कोटकाची अमदानी सुरू होण्यापूर्वींच बौद्ध धर्माला काश्मीर देशांत उतरती कळा लागली होती, व मेघवाहनाच्या काळची स्थिति पार नष्ट झाली होती. त्याच्या वेळीं

'कसायांचा धंदा बंद झाल्यामुळें त्यांना जी सरकारांतून नुकसान भरपाई मिळत होती' ती आतां बंद होऊन पशुवधावरील निबंध काढून टाकण्यांत आले होते. पूर्ण अहिंसात्मक धर्माबद्दलची जबर शिक्षा काश्मीरदेशाला पूर्वीच भोगावी लागून मिहिरकुलाच्या हाताखालीं हूणलोकांनीं या देशाला कांहीं काल तरी दास्य करावयास लाविले होतें. पण गोनर्दीय वंशांतील एक अवशिष्ट राजा प्रवरसेन याने दुर्लभवर्धनाच्या पूर्वीं सुमारें १०० वर्षे हिंदुशाहीचें काश्मीरांत पुनरुज्जीवन करून शिवोपासनेचीहि स्थापना केली होती. पशुयज्ञात्मक जुन्या ब्राह्मणधर्माच्या या पुनरुत्थापनामुळें प्रवरसेनाच्या घराण्यांतून शिळपटपणा नाहींसा होऊन त्यांत क्षात्रतेज चमकूं लागलें. या राजांनीं आपल्या हिंदुदेवतांचीं अनेक मंदिरें बांधिलीं, त्यांत मुख्यत्वें करून शिवमन्दिरांचा भरणा असून विष्णु आणि आदित्य यांचीं त्याच्या खालोखाल असत. कल्हणानें प्रत्येक राजाचें वर्णन करतांना त्यानें कोणकोणतीं मन्दिरें बांधिलीं हें सविस्तर सांगितलें आहे. पण त्याचें सामान्य इतिहासांत विशेष महत्व नसल्यानें आम्ही तीं विशेष महत्वाचीं वाटल्यावांचून त्यांचा निर्देश करणार नाहीं.

दुर्लभवर्धन राज्य करीत असतांना ह्युएनत्संग काश्मीरांत आला व त्यावेळीं तेथें बौद्धधर्माला उतरती कळा लागलेली त्याच्या दृष्टीस पडली. तथापि अजून तेथें बौद्ध विहार होते, व त्यांपकीं एकांत त्यानें मुक्काम केला होता. कर्कोटक घराण्यांतील राजस्त्रियांनीं विहार बांधिल्याचें कल्हणानें वर्णन केलें आहे. पण विहार हें नांव जरी बौद्ध असले तरी तन्निर्दिष्ट या संस्था बहुधा बौद्ध नव्हत्या. शिवोपासक देखील आपल्या संस्थांना विहारच म्हणत, व त्यांत शैव व वैष्णव साधु संन्यासी वास्तव्य करीत, असें ह्युएनत्संगानेंच वर्णन केलें आहे. यावरून कर्कोटक घराण्याच्या अम-

दानींत बौद्धधर्म राजधर्म तर नव्हताच, पण लोकांमधूनहि त्याचा प्रसार कमीच होऊन तो अगदीं मागें पडूं लागला होता असें उघड दिसतें. राजे व त्यांच्या स्त्रिया देखील जुन्या धर्माचे अभिमानी असून शिव, विष्णु व आदित्य यांची भक्ति करीत. यज्ञविधि सुद्धां त्यावेळीं चालू होते, पण वेदकालीन हिंसात्मक यज्ञांचा फारसा प्रघात राहिला नव्हता. या घराण्यांतील पराक्रमी राजांनीं सुद्धां प्राचीन चक्रवर्तीप्रमाणें किंवा पूर्वीच्या गुप्त घराण्यांतील राजांप्रमाणे सम्राट्पद सूचक असे अश्वमेध केले नाहींत. यावरून हिंसात्मक यज्ञाविषयीं सामान्यतः लोकमतच यावेळीं फिरलेले असलें पाहिजे, असें दिसते. कर्कोटक राजे क्षत्रिय नसल्यामुळे समुद्र गुप्तासारखा दिग्विजय करूनहि त्यांच्यापैकीं ललितादित्यानें अश्वमेध केला नाहीं असें केवळ म्हणतां येत नाहीं. कारण समुद्रगुप्त देखील क्षत्रिय नव्हता; वैश्य असून त्यानें अश्वमेध केलेला होताच. ललितादित्याच्या मनांत जर अश्वमेध करण्याचे आलें असतें तर त्याला तसें करण्याला आधार त्याच्या दरबारांतील पुरोहितांनीं शोधून काढला असता असें आम्हाला वाटतें. पण मुळीं जुन्या ब्राह्मणधर्माच्या अनुयायांतच या वेळीं प्राचीन वैदिक हिंसात्मक घोर यज्ञाविरुद्ध उचल झालेली होती; व एवढ्या पुरता तरी काश्मीरप्रान्तावरील बौद्ध धर्माचा हा विजय कबूल करणे भाग आहे.

काश्मीरच्या लोकसमाजांतील खालचे वर्ग आर्येतर होते. त्यांना त्यावेळीं **डामर** असें म्हणत, व अद्यापि सुद्धां तें नांव चालू आहे. वरिष्ठवर्गांतील लोक त्रैवर्णिक आर्य म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य असे असून कित्येक कायस्थादि मिश्र जातींचेहि होते. यांपैकीं ब्राह्मणांकडे पौरोहित्याचें व धार्मिक आणि लौकिक विद्यांचें रक्षण करण्याचें काम होतें. या वैदिक धार्मिक धंद्याच्या पंडितांबरोबर

आजकालच्याप्रमाणें सरकारी महत्वाची कामें करणारेहि ब्राह्मण असत. प्रधानापासून तों तहशीलदारासारख्या वसुली कामगारापर्यंत सर्व जागांवर काश्मीरांत व सिन्ध प्रान्तांतहि बहुधा ब्राह्मणांचीच योजना असे. सिन्धप्रान्तांत तर पूर्वी सांगितल्याप्रमाणें महंमद कासिमाला वसुली खात्याच्या कामावर पूर्वीचे ब्राह्मणच कायम करावे लागले होते. प्रधानाचें काम सर्वत्र बहुत करून ब्राह्मणच करीत. सिन्धप्रान्तांत चच,काबुलांत लल्लिय व काश्मीरांत प्रभाकरदेव यांचीं उदाहरणें ही गोष्ट स्पष्ट करितात. लष्करीखात्यांतील कामें बहुधा क्षत्रियांकडे असत. पण तीं देखील ब्राह्मणांना व गुप्तांसारख्या शूर वैश्यांना बंद नसत. शेतकीचें काम मात्र सिन्ध किंवा पंजाबाप्रमाणें काश्मीरांत वैश्य वर्गाच्या हातीं नसून शूद्र म्हणजे डामर लोकांकडेच सर्वस्वीं होतें. सिन्ध व पंजाब येथील शेतकाम करणारे जाट व गूर्जर हे प्राचीन आर्य-समाज-व्यवस्थेंतील कृषि व गोरक्ष्य करणारे खरे आर्य वैश्यच होते. पंजाब हा खरोखरी आर्यदेश असून सिन्धप्रांतहि जवळ जवळ तसाच होता. पण काश्मीरांत मात्र अर्धे आर्य व अर्धे आर्येतर शूद्र अशी स्थिति होती. काश्मीरांतील आर्यांविषयीं लिहितांना ह्युएनत्संगानें त्यांना रूपवान, विद्वान्, पण कपटी म्हटलेलें आहे हें प्रथम भागांत सांगितलेंच आहे.

येथवर कर्कोटक घराण्याच्या सुरुवातीचे सुमारास काश्मीर देशाची सामाजिक व धार्मिक स्थिति कशी होती याचें दिग्दर्शन केलें. आतां तेथील राजकीय परिस्थितीचा विचार करूं. कर्कोटकांचें नवीनच घराणें राज्यारूढ झालेलें असल्यामुळें त्यांत अर्थातच आरंभींचा जोर, आवेश वगैरे गुण असून नीतिभ्रष्टपणा शिरलेला नव्हता. दुर्लभवर्धनानें या पहिल्या तडफडींत आपल्या राज्याचा विस्तार वाढविण्याचा प्रयत्न केला. तक्षशिला, सिंह-

पुर, उरश इत्यादि पंजाबांतील लहान लहान राज्यें त्यानें प्रथम जिंकिलीं. तक्षशिलेला काश्मीरच्या राज्यांत समाविष्ट केल्याबद्दल ह्युएनत्संगानें स्पष्टच सांगितलें आहे. त्यानें पुनाच, राजपुरी, इत्यादि डोंगरी संस्थानेंहि काश्मीरच्या अमलाखालीं असल्याचें लिहिलें आहे. म्हणजे एकंदरींत हिमालयाच्या पायथ्यापासून तों मिठाच्या डोंगरापर्यंतचा पंजाबचा बहुतेक भाग दुर्लभवर्धनानें आपल्या कह्यांत आणलेला होता. या प्रदेशाच्या पूर्वेकडील व दक्षिणेकडील भाग म्हणजे हल्लींचा पंजाब हा मात्र टेक्क ऊर्फ तक्षक घराण्याच्या ताब्यांत असून बाकी सगळा प्रदेश काश्मीर किंवा सिन्ध यांपैकीं कोणाच्या तरी आधिराज्याखालीं गेलेला होता; व या दोन राज्यांच्या सीमा चचनाम्यांत सांगितल्याप्रमाणें एकमेकींला भिडल्या होत्या. या काळांतच हर्षानें दिग्विजय करून उत्तर हिंदुस्थानांत आपलें साम्राज्य स्थापिलें. त्यानें काश्मीरप्रांतहि एकदां जिंकून आपल्या नामधारी अमलाखालीं आणिला होता असें म्हणतात. काश्मीराहून हर्षानें करभार आणिला असें बाणानें म्हटलें आहे; व ह्युएनत्संगाच्या मतें त्यानें तेथून बुद्धाचा दांत जबरीनें आणून तो विजयोत्सवपूर्वक कनोजला नेला. दुर्लभवर्धन स्वतः बौद्ध नसल्यामुळें बौद्धांना मूल्यवान वाटणाऱ्या असल्या बुद्धाच्या शरीरावशेषाच्या लुटीबद्दल त्याला फारसा विषाद वाटण्याचें कारण नव्हतें.

दुर्लभवर्धन ३६ वर्षें राज्य करून स. ६३७ त मरण पावला. त्याच्या मागून त्याचा मुलगा दुर्लभक ऊर्फ छोटा दुर्लभ गादीवर आला. माजी घराण्यांतील बालादित्याचा हा नातू असल्यामुळें त्यानें प्रतापादित्य हें नवीन नांव धारण केलें. त्यानें ५० वर्षें राज्य केलें असें राजतरंगिणींत म्हटलें आहे, परंतु त्याच्या पूर्वी त्याच्या बापाचें राज्य ३६ वर्षें झालेलें असल्यामुळें ही गोष्ट खरी

असेलच असें म्हणवत नाहीं. प्रतापादित्य मोठा पुण्यशाली होता. त्याच्या न्यायप्रियतेच्या आणि प्रजाहित-तत्परतेच्या पुष्कळ गोष्टी कल्हणानें सांगितल्या आहेत. त्यानें रौहित देशांतील ब्राह्मणांसाठीं नोणमठ नांवाचा मठ स्थापिला. त्रिभुवनस्वामीचें मन्दिर त्यानें बांधिलें. तें बांधण्यासाठीं जागेचा तुटवडा आला असता जवळ एका चांभाराची झोंपडी होती तिची जागा मागावी असें राजाच्या सल्लागारांनीं ठरविलें पण चांभार ती देण्यास तयार होईना. राजानें त्याला तेथून काढून लावण्याचें नाकारलें, व हा त्याचा न्यायीपणा पाहून चांभाराला गहिंवर आला आणि त्यानें झोंपडीची जागा आपखुषीनेंच मन्दिरासाठीं देऊन टाकिली. प्रतापादित्याची राणी प्रकाशदेवी हिनें प्रकाशिकाविहार नांवाचा एक विहार स्थापन केला. ती जातीनें वैश्य होती, व तत्कालीन सर्व भरतखंडांतील वैश्यांमध्यें दयामूल व अहिंसाप्रधान अशा धर्माबद्दल म्हणजे बौद्ध व जैनधर्मांबद्दल आदरबुद्धि असे. म्हणून हा प्रकाशिकाविहार बौद्धविहार असण्याचा संभव आहे. राजाचा गुरु मिहिरदत्त नांवाचा ब्राह्मण होता, त्यानें गंभीरस्वामीचें म्हणून एक विष्णुमंदिर बांधिलें. राजे, राण्या, प्रधान इत्यादि थोर थोर मंडळीला आपापल्या प्रियदेवतांचीं मंदिरें बांधण्याची त्याकाळीं कशी आवड होती हें दाखविण्यासाठींच वरील उदाहरणें आम्ही दिलीं आहेत. याप्रमाणें धर्मशीलता व न्यायप्रियता यांच्या योगानें सर्व प्रजेला प्रिय झालेल्या या राजानें आपल्या राज्याचा दीर्घकाल सुखानें उपभोग घेतला.

दुर्लभकाला चंद्रापीड, तारापीड आणि मुक्तापीड असे तीन पुत्र होते. यावेळीं बाणभट्टाची कादंबरी सर्व प्रसिद्ध होऊन त्यांतलीं हीं आपीडपदान्त नांवें राजे लोकांना बहुधा आवडूं लागलीं असावीं. चंद्रापीड बऱ्याच मोठ्या वयांत गादीवर आला,

व त्यामुळें त्याला तिचा आठ वर्षें व आठ महिने इतका काळ उपभोग घेतां आला. हा आपल्या बापाप्रमाणेंच मोठा सच्छील राजा होता. परंतु त्याचा धाकटा भाऊ तारापीड यानें त्याचा अभिचारानें म्हणजे मूठ मारून वध करविला असें म्हटलें आहे. त्याकाळीं असल्या जारणमारणादि-मंत्र-सामर्थ्यावर सामान्यतः सर्व लोकांचा विश्वास असे. म्हणून चंद्रापीड कदाचित् कांहीं अकस्मात् दुखणें येऊन मरण पावला असून तारापीडाच्या दुर्वर्तनामुळें लोकांना तसा संशय आला असेल, असाहि संभव आहे. चंद्रापीडाच्या मागून हा तारापीडच गादीवर आला; त्यानेंहि अवघीं चार वर्षें व चोवीस दिवस पर्यंतच राज्य केलें. तो दुष्ट व जुलमी असल्यामुळें त्याच्या प्रजेपैकींच कोणी एकानें गांजून जाऊन अभिचारानें त्याला मृत्यु आणविला. त्याच्यामागून त्याचा कनिष्ठ बंधु मुक्तापीड हा ललितादित्य नांव धारण करून सिंहासनाधिष्ठित झाला, व त्यानें काश्मीरच्या नृपावळींत पाहिलेंच नसलें तरी फार वरचें स्थान पटकाविलें.

राजाच्या श्रेष्ठपणाचें फार मोठें लक्षण भारती समजुतीप्रमाणें ह्मणजे त्यानें केलेला दिग्विजय होय. चक्रवर्तीपदाची महत्वाकांक्षा प्राचीन अर्वाचीन सर्वकाळीं सर्व कर्तृत्वशाली राजांना पछाडून बसली आहे. याच सार्वभौमपदवीच्या लोभानें रोमन साम्राज्यांत जूलीयस सीझर व ऑगष्टस यांची धडपड होती, तिच्याच मुळें फ्रान्सचा मध्ययुगीन बादशहा शार्लमेन यानें अनेक युद्धें केलीं, पांचवाचार्लस आणि चौदावा लुई यांचा याच पदावर डोळा होता, नेपोलियनची तीच मनीषा, व नुकत्याच संपलेल्या युरोपांतील महायुद्धाचा वणवा पेटवून त्यांत लक्षावधि माणसांची आहुती देण्यांत जर्मन बादशहा दुसरा विल्यम याचा तरी तोच हेतु होता. आपल्या इकडे पाहिलें तसी प्राचीनकाळीं अशोक समुद्रगुप्तासारखे राजे व अर्वाचीन

काळीं अकबर-औरंगजेबासारखे बादशहा याच महत्वाकांक्षेनें प्रेरित झालेले होते. ललितादित्यापुढें समुद्रगुप्त व हर्ष यांच्या दिग्विजयांचीं ताजीं उदाहरणें होतीं. त्यांवरून त्यानें सम्राटपदाची आकांक्षा धरून चारी दिशा जिंकण्याचा प्रयत्न केला. त्याच्या दिग्विजयाचें राजतरंगिणींत सविस्तर वर्णन केलेलें आहे. ही दिग्विजयाची गोष्ट अलीकडील इतिहासकार फारशी वर्णन करीत नाहींत. ललितादित्याच्या दिग्विजयाचें तरंगिणींतील वर्णन सकृद्दर्शनीं, प्राचीन इतिहासांत सुप्रसिद्ध असलेल्या मन्दसोरच्या यशोधर्म्याचें त्याच्या दरबारांतील राजकवीनें जें भपकेदार यशोवर्णन तेथील जयस्तंभावर लिहून ठेविलें आहे, त्याप्रमाणें अतिशयोक्तिपूर्ण व काल्पनिक वाटण्याचा संभव आहे. परंतु त्याच्या समकालीन परकीय बखरनवीसानें लिहिलेल्या चचनाम्यां-तील सिन्धप्रान्ताच्या जिंकण्याच्या वर्णनांत या दिग्विजयाच्या खरेपणाविषयीं फार विलक्षण प्रत्यंतर मिळत असल्यामुळें आमच्या मतें त्याविषयीं संशयाला जागा रहात नाहीं. चचनाम्यांत दाहरराजानें महंमद कासिमाला लिहिलेलें एक पत्र दिलें असून त्यांत पुढील मजकूर आहे. “ तुमच्या विरुद्ध मीं काश्मीरच्या महाराजांची योजना केली असती; या महाराजांचे चरणीं कित्येक हिंदी राजे लोटांगणें घालितात; त्यांचे राज्य सर्व हिंदभर असून शिवाय बाहेर मेकरान व तुराण इकडेहि पसरलें आहे. मोठे मोठे सरदार व उमराव त्यांची आज्ञा शिरसामान्य करतात; त्यांच्या पदरीं १००० हत्ती असून ते स्वतः पांढऱ्या हत्तीवर आरोहरण करितात; व त्यांच्या समोरहि उभें रहाण्याची कोणा मनुष्याची प्राज्ञा नाहीं. इ. इ. ” हा मजकूर सदर बखरींत कांहीं विशेष कारण नसतांना सहजगत्या आलेला असल्यामुळें तो भरतीसाठीं मागाहून घुसडलेला असण्याचा संभव नाहीं; व

म्हणून ललितादित्याच्या अफाट विजयाच्या खरेपणाचें प्रत्यंतर या दृष्टीनें त्याचें विशेष महत्व आहे. तात्पर्य ललितादित्याचा दिग्विजय खरा ऐतिहासिक असून समुद्रगुप्त किंवा हर्ष यांनीं केलेल्या दिग्विजयाच्या तोडीचा आहे. यास्तव त्या दृष्टीनें तो प्राचीन भारतवर्षाच्या इतिहासाच्या वाचकांपुढें मांडण्यास आम्हाला मुळींच दिक्कत वाटत नाहीं.

सदरील चचनाम्यांतील मजकूर इ. स. ७१२ त लिहिलेल्या पत्रांत आलेला असल्यामुळें ललितादित्याचा दिग्विजय त्या पूर्वीं नुकताच होऊन गेलेला असून दाहराचें त्याविषयींचें स्मरण ताजें असलें पाहिजे. हा संपूर्ण व्हावयाला पांच सहा वर्षें तरी लागलीं असलीं पाहिजेत, असें मानलें तर एकंदरींत कल्हणानें दिलेला त्याचा शक बरोबर व विश्वसनीय दिसतो. कारण दुर्लभवर्धन इ. स. ६०२ त सिंहासनारूढ झाला, त्यानें ३६ वर्षें राज्य केलें, व त्याच्या मागाहून त्याच्या मुलानें ५० वर्षें केलें. त्यानंतर त्याच्या दोन वडील नातवांनीं म्हणजे चंद्रापीड व तारापीड यांनीं अनुक्रमें ८ वर्षें आणि ४ वर्षें राज्य-सुख भोगिलें; म्हणजे स. ६०२+३६+५०+८+४=७०० हा ललितादित्याच्या कारकीर्दीचा आरंभ येतो, व तो दाहराच्या काळाशीं चांगला मिळता आहे. हर्षाप्रमाणेंच ललितादित्यानेंहि गादीवर आल्याबरोबर दिग्विजयाला प्रारंभ केला असला पाहिजे. शंभर वर्षें सुयंत्रित रीतीनें चाललेल्या काश्मीराच्या बड्या राज्यांतील अफाट साधनसामुग्रीचा आधार त्याला होता, व तिला त्याच्या आंगचें शौर्य आणि जबर महत्वाकांक्षा यांची जोड मिळाली. दिग्विजयाला सुरुवात झाल्यावर त्याला प्रथमच जो जोरदार प्रतिस्पर्धी भेटला तो कनोजचा यशोवर्मा होय. त्याचें वर्णन कनोजच्या इतिहासांत यथावकाश येणार आहे. ८ व्या शतकाच्या आरंभीं या यशोवर्म्यानें गौड देशाच्या

म्हणजे बंगालच्या राजाला जिंकून उत्तर हिंदुस्थानाच्या बहुतेक भागावर स्वामित्व मिळविलें होतें. अर्थात् ललितादित्याचा त्याशीं झालेला झगडा कांहीं सामान्य प्रतीचा नव्हता. पण शेवटीं ललितादित्यालाच विजय प्राप्त होऊन यशोवर्मा शत्रूला पाठ दाखवून रणांतून पळून गेला. पुढें त्यास ललितादित्यानें पदच्युत केलें कीं काय हें निश्चित समजत नाहीं. कारण कल्हणानें एकदां 'यशोवर्मनृपं तं तु समूलमुदपाटयत्' ४, १४० म्हणजे त्याला मुळासकट उपटून टाकिलें असें सांगून लगेच पुढें एका श्लोकांत 'कविर्वाक्पतिराजश्रीभवभूत्यादिसेवितः। जितो ययौ यशोवर्मा तद्गुण-स्तुति-बंदिताम्' ४, १४४ म्हणजे वाक्पतिराज आणि भवभूतिसारख्या कवींनीं यशोवर्णन केलेला यशोवर्मा स्वतः ललितादित्याची स्तुति गाणारा भाट झाला, असें म्हटलें आहे. ललितादित्यानें आपला सांधिविग्रहिक ऊर्फ परराष्ट्रीय मंत्रि जो मित्रशर्मा त्याला त्याच्या उत्तम कामगिरीबद्दल पंचमहाशब्दभागी राजाच्या पदवीला पोंचवून त्याच्या कामगिरीबद्दल पारितोषिक दिलें. या प्रधानाला शाह ही पारसीक पदवी सुद्धां त्यानें दिली. पण त्याविषयीं अधिक माहिती पुढें सांगूं. त्यानें साम्राज्याच्या व्यवस्थेसाठीं शाह—पदवीधर पांच अधिकारीहि नेमिले होते; त्यांचीं नांवें महाप्रतिहारी, महासांधिविग्रहिक, महाश्वबल (घोडेस्वारांचा अध्यक्ष) महाभाण्डागार, आणि महासाधनिक ( सामुग्री पुरविणारा ) अशीं होतीं. त्याच्या सैन्याचा महत्वाचा भाग म्हणजे घोडेस्वार असून हत्तींवर त्याचा फारसा भर नव्हता. हर्षाच्या सैन्यांत हत्तींचा भरणा फार असे. पण काश्मीरची तशी स्थिति नव्हती. काश्मीर राजाला तुर्कस्तान, इराण, अफगाणिस्तान इत्यादि देशांतून मुबलक उत्तम घोडे पैदा करणें सोपें जाई. त्याच्याजवळ हत्ती मुळींच नव्हते असें मात्र नाहीं. इतकेंच

नव्हे तर गौड राजाला त्यानें हतवीर्य केल्यावर त्याचें सगळें हस्तिसैन्य त्यानें आपल्या पुढील कार्यासाठीं आपल्या आधीन करून घेतलें.

गौड राजाला जिंकिल्यानंतर ललितादित्यानें, कलिंग देशचा राजा, कर्णाटचा राजा, कावेरीच्या प्रदेशाचा अधिपति, सात कोंकणाचे राजे, तसेंच सौराष्ट्र आणि द्वारका येथील राजे, व शेवटीं अवन्ति ऊर्फ माळवा देशाचा राजा इतक्यांच्या मुलखांवर क्रमानें स्वाऱ्या करून ते आपल्या अमलाखालीं आणिले असें तरंगणींत वर्णन आहे. पण यांपकीं एकाहि राजाचें नांव कल्हणानें सांगितलेलें नाहीं. यावरून कदाचित् हें वर्णन काल्पनिक असावें असा डॉ. स्टीननें संशय प्रकट केला आहे. परंतु आम्हाला त्यांत विश्वास न ठेवण्यासारखें कांहीं दिसत नाहीं. पूर्वी समुद्रगुप्तानें ज्याप्रमाणें त्याकाळीं ज्ञात असलेल्या भरतखंडाच्या सर्व त्रिभागांतून दिग्विजयाचा दौरा केला, तसाच बरोबर ललितादित्यानेंहि आतां केला. शिवाय वर सांगितलेलीं सर्व राज्यें त्यावेळीं उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांत प्रमुखस्थानींच होतीं. कनोज, बंगाल उर्फ गौड, चालुक्यांच्या अमलाखालीं असलेला कर्णाट उर्फ रट्ठ, पल्लवांचा कावेरीच्या कांठचा कांची देश आणि कदंबराजांचा सप्तकोंकणाचा प्रदेश हे सर्व त्यावेळीं सुप्रसिद्ध होते. इकडे सौराष्ट्रांत म्हणजे काठेवाडांत प्रसिद्ध वलभी घराणें राज्य करीत होतें, व महाकालाच्या सुप्रसिद्ध मंदिरामुळें सर्वांच्या दृष्टीसमोर असलेल्या मालवदेशांत अवन्ति म्हणजे उज्जनीचें राज्य होतें. ललितादित्यानें आपल्या अधिकाराखालीं आणिलेल्या या देशांपैकीं कर्णाटदेशाविषयीं विशेष सांगण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, तेथें रट्ठ घराण्यांतील एक राणी राजकारभार करीत असून तिनें आपखुषीनेच ललितादित्याचें आधिराज्य मान्य केलें, असें कल्हणानें

वर्णन केलें आहे, अशी ही राणी होती तरी कोण? स. ७०० च्या सुमारास दक्षिणापथांत म्हणजे दक्षिण हिंदुस्थानांत पश्चिम चालुक्य वल्लभ घराण्यांतील विजयादित्य नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याची कारकीर्द स. ६९६ ते ७३६ पर्यंत होती हें पुढें त्या घराण्याच्या इतिहासवर्णनांत समजून येईल. हा विजयादित्य कांहीं काळपर्यंत कांची राज्यांत कैदेंत होता. तेव्हां त्याच्या राणीनें कदाचित ललितादित्याशीं लढण्याचा प्रसंग टाळून त्याचें आधिराज्य मान्य केलें असेल. पण यांत दुसरी अडचण अशी आहे कीं, ललितादित्य समुद्र किनाऱ्यानेंच चाल करीत होता व त्यामुळें बहुधा तो चालुक्यांच्या वातापी नगरास गेला असेल असें वाटत नाहीं. या संदर्भांत विन्ध्यपर्वताचे जें नांव आलेलें आहे, तें बरोबर असून याचा संबंध पूर्वघांटाशीं असला पाहिजे. या पूर्वघांटाच्या प्रदेशांतहि रट्ट घराणेंच होते. या घराण्यांतील जयसिंह नामक राजाची विधवा राणी यावेळीं कारभार पहात असून तीच वरील वर्णनांत आलेली राणी असावी. तिच्या पाठीमागें रट्ट घराण्यांत अंतस्थ कलह उत्पन्न झाले वगैरे हकीगत पुढें यथावकाश येईल.

ललितादित्याच्या दिग्विजय-वर्णनांत जवळचा सिन्धप्रांत जिंकल्याचें वर्णन नाहीं. म्हणजे तो तेथें प्रत्यक्ष गेला नाहीं, तरी दाहर राजानें त्याचें चक्रवर्तित्व मान्य केलेलें असलें पाहिजे, व ही गोष्ट ललितादित्य सिन्धप्रांताच्या दक्षिणेस द्वारकेंत असतांना घडली असली पाहिजे. दाहराच्या पत्रांतील जो थोडासा भाग पूर्वी दिला आहे त्यावरून त्यानें काश्मीर राजाचें आधिराज्य मान्य केलें असल्याचें स्पष्ट दिसत आहे. असो, याप्रमाणें पूर्व, दक्षिण आणि पश्चिम या दिशांकडील राज्यें जिंकून ललितादित्य काश्मीरास परत आल्यानंतर पुढें उत्तर दिशेकडील राज्यें म्हणजे तिबेट, तुर्कस्तान इत्यादि जिंकण्याचें दुर्घट कार्य कसें पार पडावें याच्या

विचारास लागला. योग्य तयारी करून त्या उद्योगास लागल्यावर त्यानें दरद व कांबोज म्हणजे तिबेट हे देश तर विशेष प्रयासाशिवाय पादाक्रान्त केले, व पुढें तुर्कांवर स्वारी करून त्याच्या मुम्मुनि (मुमेनखान) नांवाच्या राजाचा तीन वेळां पराभव केला. भरतखंडाच्या इतिहासांत हिंदुराजानें तुराण सारख्या कडव्या लोकांच्या परकीय देशावर स्वारी करून विजय मिळविल्याचें हें एकच एक उदाहरण दिसतें. या विजयाला खोटा म्हणण्याचेंहि कांहीं कारण नाहीं. कारण तुर्कलोकांच्या तत्कालीन मुम्मुनिराजाचें म्हणजे मुमेन खानाचें नांवहि कल्हणानें सांगितलें आहे. व चचनाम्यांतील दाहराच्या पत्रांत देखील काश्मीराधिपतीनें मेकरान ऊर्फ बलुचिस्तान व तुराण म्हणजे तुर्कस्तान जिंकिल्याचा उल्लेख आलेला आहे. तुराणांतील टोळधाडी हिंदुस्थानांत येतात; तेव्हां बाहेरील तुराणांवर स्वारीकरून जय मिळविल्याची ललितादित्याची ही गोष्ट भरतखंडाच्या मध्यकालीन इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं नमूद करून ठेवण्यासारखी आहे यांत शंका नाहीं. तुराणी लोकांनीं ललितादित्याला कसून विरोध केला असावा,* कारण त्याच्या मुम्मुनि राजाचा त्याला तीनदां पाडाव करावा लागला असें राजतरंगिणींत म्हटलें आहे. या नंतरहि ललितादित्यानें दिग्विजयाचें काम चालू ठेवून काश्मीरच्या उत्तरकडील देशांवर अनेक स्वाऱ्या केल्या, व गोबीचें वाळवंट उलटून पलीकडे तो एकदां गेला व तिकडेच तो शेवटीं मरण पावला. त्याच्या मृत्यूचें कारण मात्र काश्मीरच्या इतिहासकारांनीं दिलेलें नाहीं. तें त्यांना बहुधा माहीतच नसावें. उत्तरेकडील देशांतल्या कडव्या लोकांपैकीं तुःखार आणि भौट्ट अशा दोन जातींचीं नांवें कल्हणानें

* त्रीन् वारान् समरे जित्वा जितं मेने स मुम्मुनिम् । सकृज्जयो रेबीरा मन्यन्तेहि घुणाक्षरम् ॥ ४.१६७.

सांगितली असून महाभारतांतील अश्वमेधाच्या स्वारींतील खोगीर भरतीच्या वर्णनाप्रमाणें त्यानें प्राग्जोतिष्यपुर आणि स्त्रीराज्य यांचाहि या दिग्विजय-वर्णनांत निर्देश केला आहे. हीं राज्यें अनुक्रमें अलीकडील आसाम व ब्रह्मदेश किंवा मणिपूर हीं होत. शेवटीं कल्हणानें दिग्विजयाचा कळस म्हणून पौराणिक उत्तर कुरूंचाहि समावेश केला आहे. ललितादित्याच्या पक्षपाती असलेल्या या कवि इतिहासकारानें या वर्णनाच्या शेवटीं आपल्या स्तुतिविषयाचा अधिकच गौरव करण्याच्या हेतूनें असें लिहिलें आहे कीं* " ललितादित्यानें उत्तरेकडील तुरुष्कांना आपला पराजय व्यक्त करण्यासाठीं आपलें अर्धें डोकें मुंडावयास व हात मागें करावयास लाविलें, व दक्षिणेकडिल लोकांस आपला पशुतुल्य हीनपणा दाखवण्यासाठीं जमिनीपर्यंत पुच्छाप्रमाणें लोळणारे कांसोटे घालावयास लाविलें" !! पूर्वीपासून चालत आलेल्या कांहीं लोकांच्या विशिष्ट चालीरीतींनां आपल्या इष्ट राजाच्या स्तुतीच्या भरांत कवि कसें चमत्कारिक स्वरूप देतात हें यावरून चांगलें दिसून येईल. तुर्कांमध्यें अर्धें डोके मुंडण्याची चाल फार जुनी असून ती महंमदीय धर्माबरोबरच कांहीं सुरू झालेली नव्हे— तसेंच लांब कच्छ घालण्याची दाक्षिणात्यांची चाल देखील अशीच प्राचीन आहे. उत्तर हिंदुस्थानांतील लोक—त्यामध्यें काश्मीरी लोकांचाहि समावेश होतोच—चांगला घट्ट कासोटा मारीत. त्यांच्यामध्यें पायजमा घालण्याची जी चाल अलीकडे आढळते ती कल्हणाच्या वेळीं नसून अगदीं अलीकडची म्हणजे मुसलमानी अमदानींत त्यांच्यापासून घेतलेली आहे.

* बन्धमुद्राभिधानाय पश्चाद्बाहू तदाज्ञया । तुरुष्कादधतेऽव्यक्तं मूर्धानं चार्धमुंडितम् ॥ क्षितिभृद्दाक्षिणात्यानां तिर्यक्त्वज्ञापनाय यः। पुच्छेमहीतलस्पर्शि चक्रे कौपीनवाससी ४,१७९–१८०

ललितादित्याच्या या दिग्विजयाप्रमाणें त्याच्या राज्यांतील कारभाराची रीतहि संस्मरणीय होती. अनेक देश त्यानें जिंकिल्यामुळें काश्मीरच्या राज्यांत अलोट संपत्ति चालून आलेली होती. या संपत्तीचा उपयोग ललितादित्यानें मोठमोठीं देवालयें व विहार बांधण्याच्या कामीं केला. त्यानें भूतेश नामक शिवाच्या एक मंदिरासाठीं ११ कोट रुपये खर्च केले. त्यानें अखंड शिलांचा प्राकार असलेलें मार्तंडाचें ( सूर्याचें ) मंदिरहि बांधिलें, व तें अजून प्रसिद्ध आहे. दुसरींहि अशींच कामें त्यानें करविलीं; चक्रपूरचा वितस्तानदीवरील पूल, श्रीनगरापासून थोडयाच अंतरावरील परिहासपुर नांवाचें नगर व त्यांत बांधिलेलें परिहास-केशव नांवाचें विष्णुमंदिर, ५४ हात उंचीच्या एक-संधी पाषाणाच्या स्तंभावर उभारलेला गरुड, विष्णु, वराह इत्यादि देवतांच्या सोन्याचांदीच्या रत्नखचित मोठमोठया मूर्ति इत्यादिकांचे निर्देश कल्हणानें केले आहेत. मूर्तीपूजेचा अवश्यभावी परिणाम जो देवालयांत रत्नें व सोनें यांचा संग्रह होणें, तो या मन्दिरांत पूर्णपणें घडून आला, व असल्या मूल्यवान् मूर्तीपासून मिळणाऱ्या अपार संपतीच्या लोभानें मूर्तिभंजकपणाची धर्मवेडाची लाट मुसलमानांत उत्कंटेनें उत्पन्न झाली. सोनें, रुपें, रत्नें, माणकें इत्यादिक जंगम संपत्तीनें मूर्तींना मढवून टाकण्याची राजे रजवाडयांची जी ही विलक्षण जबर प्रवृत्ति दिसून येते, तिच्या संबंधानें आम्हाला बरेंच लिहावयाचें आहे, व तें यथास्थळीं येईलच. ही चाल मात्र नवीन नसून ललितादित्याच्या पूर्वीपासूनच चालत आलेली होती. तिचा स्पष्ट उल्लेख कल्हणानें केला इतकेंच काय तें, तो म्हणतो:—' मंदिराकडे अर्पण केलेली संपत्ति* खरोखर

* कियन्ति तत्र रत्नानि ग्रामान्परिकरांस्तथा । स प्रादादिति कः शक्तः परिच्छेत्तुमियत्तया ॥ ४, २०६

अगणित होतो ' राजाप्रमाणें राण्याहि आपल्या इष्ट देवतांचीं मंदिरें बांधीत. तुःखारच्या चद्गुण नामक प्रधानानें ललितादित्याला मंत्रानें भरलेले दोन मणी देऊन त्यापासून त्यानें मगध देश जिंकून तेथून आणिलेली बुद्धाची मूर्ति विकत घेतली, व तिची एका बौद्ध विहारांत स्थापना केली. मुसलमानीधर्माचा प्रसार होण्यापूर्वी तुर्क वगैरे तुराणी लोकांचा धर्म बौद्ध होता असें जें समजतात, त्याचें हें स्पष्ट प्रत्यंतर आहे.

वर सांगितलेली शिव, विष्णु, आदित्य व बुद्ध यांचीं मन्दिरें तत्कालीन लोकांची धर्मलालसा पूर्ण करण्यास पुरेशीं होतीं—तथापि त्याच्या भरीला ललितादित्यानें आपल्या राज्यांत क्षुधितांसाठीं अन्नछत्रें आणि तृषितांसाठीं प्रपागृहें (पाणपोयी) स्थापिलीं होतीं, ही गोष्ट आधुनिक इतिहासकाराला लक्षांत ठेवण्यासारखी वाटेल यांत शंका नाहीं. त्यां संस्थांवरून त्या राजाची भूतदया व प्रजावात्सल्य ह्यांची चांगली साक्ष पटते. या शिवाय काश्मीरच्या उत्तरेकडे तुर्कांच्या देशांतील वाळवंटांत जेथें सारखे कित्येक कोसपर्यंत पाण्याचें दर्शनहि होण्यासारखें नाहीं अशा ठिकाणीं त्यानें विहिरी खोदून व झऱ्या बांधून पाणी मिळण्याची व्यवस्था केली असें वर्णन आहे. त्या निर्जल व निर्जन वाळवंटाच्या प्रदेशांत अद्यापि सुद्धां त्या विहिरी व झऱ्या दिसत असून तृषाक्रान्त पांथस्थांना पाण्याची सोय करीत आहेत असें कल्हणानें ह्मटलें आहे. तत्कालीन क्लेशमय कलियुगांत ललितादित्य हा सत्ययुगीन राजाच काश्मीर देशाला लाभला असें ह्मणावयास हरकत नाहीं.

पण बहुतांशीं सत्ययुगीन अशा या राजाच्या हातून कलियुगाला उचित असें एक मात्र दुष्कृत्य घडल्याचे कल्हणानें वर्णन केलें आहे. गौड राजाला जिंकिल्यावर तो ललितादित्याला शरण आला असतां त्यानें आपल्या परिहासपुर नामक प्रिय नगरांतील

परिहास-केशवाच्या मंदिरांत गौड राजाच्या जीवाला धक्का न पोंचविण्याचें शपथपूर्वक वचन दिलें होतें. परंतु तें बाजूला सारून त्यानें गौड राजाचा पुढें वध करविला. हा गौड राजा कोण होता व ललितादित्यानें हें दुष्कृत्य कां केलें तें कल्हणानें सांगितलेलें नाहीं. पण पुढें गौडराजाच्या स्वामिभक्त सेवकांनीं जेव्हां हें वर्तमान ऐकिलें तेव्हां ते ताबडतोब निघून काश्मीरला आले, व शारदादर्शनाच्या मिषानें काश्मीरांत प्रवेश करून त्यांनीं परिहासपुर गांठलें पण ललितादित्याच्या सुदैवानें तो त्या वेळीं तेथें नसून उत्तरदेशांत स्वारीवर गेलेला होता. तेव्हां त्या गौडांनीं संतापाच्या आवेशांत परिहास-केशवाच्या मूर्तीजवळ जाऊन आपल्या समक्ष दिलेलें वचन मोडूं देणाऱ्या त्या देवाचा सूड घेण्याचा निश्चय केला. तेथें रामस्वामीचें मन्दिर त्यावेळीं उघडें होतें. तेंच परिहास-केशवाचें समजून त्यांनीं त्यांतील रौप्य मूर्तीला आसनावरून ओढून तिचे कणाएवढे तुकडे केले आणि ते वाटेंत फेंकीत फेंकीत आपल्या देशीं ते निघून गेले. गौडराजाचा वध आणि त्याबद्दल त्याच्या स्वामिभक्त सेवकांनीं धार्मिक माथेफिरूपणानें घेतलेला चमत्कारिक सूड यांचें असें हें वर्णन कल्हणानें केलें आहे.

या विलक्षण काश्मीराधिपतीचा अंतहि विलक्षण रीतीनेंच झाला. तो केव्हां व कोठें झाला हें कांहीं कोणाला ठाऊक नाहीं. तो उत्तरदेशीं स्वारीवर असतांना एके दिवशीं त्याच्या छावणीकडून अकस्मात एक मनुष्य आला, आणि महाराज आतां परत येणार नाहींत असें म्हणून त्यांच्या पुत्राला गादीवर बसवावें असें त्यानें प्रधानाला सांगितलें. ललितादित्यानें ३६ वर्षें राज्य केलें असें राजतरंगिणीकार लिहितो. यावरून त्याचा हा अंत इ. स ७३६ त झाला असला पाहिजे. या वर्णनाशीं परकीय लोकांच्या लेखांवरून

व्हिन्सेन्ट स्मिथनें दिलेली माहिती ताडून पाहतां असें दिसतें कीं चीनच्या बादशहाकडून ललितादित्याला राजा ही पदवी अर्पण करण्यासाठीं आलेलें प्रतिनिधिमंडळ काश्मीरांत स. ७३३ त आलें. चिनी लोकांनीं आपल्या बादशहांना सर्व पृथ्वीचा अधिपति म्हटलें आहे, व ललितादित्यहि आपल्याला चक्रवर्तीच म्हणवीत होता. तेव्हां अर्थातच हें प्रतिनिधिमंडळ म्हणजे तुर्कस्तानावर स्वामित्व सांगणाऱ्या दोन प्रतिस्पर्धि चक्रवर्तीचें परस्पर अभिनंदन करण्याच्या कामावरच आलेलें असलें पाहिजे. दुसरी गोष्ट अशी कीं ललितादित्यानें कनोजच्या यशोवर्म्याला स. ७४० त जिंकिलें असें स्मिथनें लिव्हि व चवेनीज यांच्या आधारानें लिहिलें आहे पण तें खरें दिसत नाहीं. कारण तरंगिणीवरून ललितादित्य स.७३६ त मरण पावला असें सिद्ध होत असून चचनाम्यावरूनहि सिन्धप्रांत अरबांनीं काबीज करण्यापूर्वीच म्हणजे स ७१२ पूर्वी यशोवर्म्याचा पराभव झाल्याचें स्पष्ट दिसत आहे. या कालासंबंधीं अधिक विवेचन पुढें एका स्वतंत्र टीपेंत केलें आहे.

ललितादित्याच्या मागून त्याचा मुलगा कुवलयापीड हा काश्मीरच्या सिंहासनावर आला. तो फार निर्बल मनाचा होता. एकदां त्याच्या प्रधानानें त्याचा आज्ञाभंग केला, तेव्हां तो इतका अस्वस्थ झाला कीं, त्याला सर्व रात्रभर मुळींच झोंप आली नाहीं. पण दुसरे दिवशीं सकाळीं त्याच्या विचारांची दिशा बदलून राजपद म्हणजे संकटें व अस्वस्थता यांचें माहेरघर होय असें त्याच्या मनानें घेतलें, व म्हणून ताबडतोब त्यानें राज्यत्याग करून अरण्यवास पत्करिला. त्यानें फक्त एक वर्ष पधरा दिवस राज्य केलें त्याच्या मागून त्याचा भाऊ वज्रादित्य राज्यावर आला. त्याचा स्वभाव कुवलयापीडाच्या अगदीं विरुद्ध होता. त्यानें राज्यसुखाचा परिपूर्ण उपभोग घेण्याचें ठरविलें व त्यामुळें सातच वर्षे दुर्वर्त-

नांत घालविल्यावर त्याला प्राणास मुकावें लागलें. त्याच्यानंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र संग्रामापीड गादीवर आला. पण तोहि सात वर्षें राज्य करून मृत्यु पावला. तेव्हां त्याचा भाऊ व ललितादित्याचा नातू जयापीड काश्मीरचा अधिपति झाला. ललितादित्य जीवंत असतांनाच जयापीडाचे उत्कृष्ट गुण त्याच्या दृष्टीस पडले होते, व तो पुढें फार महत्वास पोहोंचणार असें त्यानें भाकीत सुद्धां केलें होतें. त्याप्रमाणें जयापीड खरोखरच ललितादित्याच्या तोडीचा पराक्रमी निघाला व त्यानें केलेला दिग्विजयहि त्याच्या आजोबाच्या खालोखाल लागण्यासारखा आहे.

सिंहासनाधिष्ठित झाल्याबरोबरच जयापीडानें वीर्यशाली भारतीय राजांच्या ठराविक आवडीला अनुसरून दिग्विजय करण्यासाठीं कंबर कसली. पूर्वीप्रमाणें यावेळींहि कनोजाधिपति (नांव कल्हणानें दिलेलें नाहीं.) याचा पराभव करून जयापीड प्रयागापर्यंत आला, व तेथें त्यानें ब्राह्मणांना मोठमोठीं दानें दिलीं. पण पुढें त्याचें सैन्य दक्षिणदेशांत दूरवर जाण्याला कंटाळून माघारें वळलें व आपल्या देशीं निघून गेलें. तथापि एवढ्यानें गलित-धैर्य न होतां जयापीड एकटाच बंगालप्रांतांत गेला. तेथें जयन्तनामक कोणा राजाच्या पौण्ड्रवर्धन नांवाच्या नगराशीं आला असतां त्यानें तेथील लोकांना बरेच दिवस सतावून सोडणाऱ्या एका वाघाला ठार केलें व अशा रीतीनें तो जयंताच्या नजरेंत आला. तेव्हां जयंतानें आपली कन्या कमलादेवी त्याला दिली. ही गोष्ट इतिहासापेक्षां कादंबरींतच शोभण्यासारखी आहे. याप्रमाणें जयन्ताचा जांवई झाल्यावर जयापीडानें पांच गौड राजांना पादाक्रान्त केलें, आणि मग आपल्या नूतन राणीसह तो काश्मीरांत परत आला. वाटेंत त्यानें कनोजचें बहुमोल सिंहासन हस्तगत केलें व तें बरोबर काश्मिरांत आणिलें. त्याच्या इतक्या दिवसांच्या गैर-

हजेरींत त्याच्या जज्ज नांवाच्या मेहुण्यानें काश्मीरचें राज्य बळकाविलें होतें. तेव्हां जज्जाशीं त्याचें युद्ध होऊन जज्ज मारला गेला व आपला खरा वारसदार राजा आपल्याला पुनः लाभल्याबद्दल काश्मीरच्या प्रजानांहि साभिमान आनंद वाटला.

विद्वानांचा आश्रयदाता ह्मणून जयापीडाची प्रसिद्धि त्याचा आजा ललितादित्य याहूनहि अधिक झाली. तो स्वतः मोठा पंडित असून शस्त्रास्त्रविद्येप्रमाणेंच विद्येच्या क्षेत्रांतहि प्रतिस्पर्धी त्याला सहन होत नसे. 'इतर राजांनीं त्याची स्पर्धा केलेली त्याला खपत नसेच, पण विद्येच्या बाबतींतही विद्वानांशीं स्पर्धा करण्याची त्याला आवड असे' असें त्याविषयीं राजतरंगिणीकारानें ह्मटलें आहे. त्यानें पतंजलीच्या महाभाष्य नामक व्याकरणावरील मोठ्या ग्रंथाच्या अभ्यासाला प्रोत्साहन देऊन क्षीरस्वामीला ( अमर-कोशाचा प्रसिद्ध टीकाकार ) व्याकरण शास्त्राचा अध्यापक नेमिलें. त्याच्या दरबारांतील पंडितांचा अध्यक्ष ( सभापति ) उद्भटालंकार नामक साहित्य ग्रंथाचा कर्ता उद्भट नामक प्रसिद्ध पंडित होता. त्याला तो प्रत्यहीं एक लक्ष दीनार वेतन ह्मणून देत असे असें ह्मटलें आहे. पण हे दिनार तांब्याचे समजले तरीहि हा प्रकार अतिशयोक्तीचाच वाटतो. त्याच्या दरबारांतील दुसरे प्रसिद्ध पंडित म्हणजे मनोरथ, शंखदत्त, चटक व संधिमान् हे कवि, व्याकरण आणि साहित्यशास्त्रावरील ग्रंथकार वामन, कुट्टिनीमताचा कर्ता दामोदर गुप्त, व थक्किय हे होत. यांतील शेवटचा थक्किय जयापीडाच्या एका मंत्र्याकडे पूर्वी कोठीवाला* ह्मणून काम करीत होता; पण त्याची विद्वत्ता पाहून

* भक्तशालेवरील अध्यक्ष ( म्हणजे भाताच्या पेवावरील अधिकारी ) असें कल्हणानें म्हटलें आहे. ४।४९४.

राजानें त्याला आपले पदरीं बाळगिलें. भरतखंडांत जेथें जेथें ह्मणून चांगला पंडित आढळेल तेथून तेथून त्याला आणून आपल्या सभेंत बाळगण्याचा त्याचा उपक्रम असे; त्यामुळें काश्मीर देश विद्वद्भूमि या नांवास पात्र होऊन, कल्हणानें ह्मटल्याप्रमाणें इतर प्रान्तांतून विद्वानांचा दुष्काळ पडूं लागला ( समग्रहीत्तथा राजा सोन्विष्य निखिलान्बुधान् । विद्वद्दुर्भिक्षमभवद्यथान्यनृपमण्डले ॥ ४-४९३) अनेक राजांचा जेता असूनहि त्यानें विनयादित्य ह्मणजे ' सुशिक्षणाचा सूर्य ' असें नांव धारण केलें व "विद्या आणि विक्रम यांच्या मधोमध असल्यामुळें दोन आरशांमध्ये बसल्याप्रमाणें तो एक असून शतविध आहेसा वाटे" ( मंत्रविक्रमयोस्तस्य द्वयोर्दर्पणयोरिव । एकैव बिम्बिता मूर्तिः सहस्त्रगुणतां ययौ ४–५०२ ) त्यानें पुनः पुनः मांडलिक राजांच्या साहाय्यानें परकीय देशांवर स्वाऱ्या करण्याचा क्रम ठेवला होता; व त्याच्या सहाय्यकांत तुराणच्या मुम्मुनीचेंहि नांव आहे यांचें आश्चर्य वाटतें. या स्वाऱ्यांपैकीं नेपाळच्या स्वारींत त्याला हार खावी लागून तो तेथील अरमुंडि नामक राजाच्या हातीं सांपडून बंदींत पडला. या प्रसंगीं त्याच्या मंत्र्यानें दुसरी सैन्यांची तुकडी नेपाळांत आणवून त्याची सुटका केली. जयापीड ज्या किल्ल्यांत कैदी म्हणून होता तेथून त्याची त्या मंत्र्यानें युक्तीनें सुटका करविली आणि आपल्या स्वतःच्या जीवाची पर्वा न करितां आपल्या राजाला त्या नव्या सैन्यापर्यंत पोचवून तें त्याच्या ताब्यांत दिलें. पुढें जयापीडानें नेपालाधिपतीचा पराजय केला आणि मोठ्या विजयोत्सवानें तो काश्मीरास परत आला.पण या कामांत आपल्या आजाच्या वेळचा प्रसिद्ध मित्रशर्मा नामक मंत्र्याचा पुत्र व स्वतःचा विश्वासू मंत्री जो देवशर्मा त्याचा मृत्यु झाल्यामुळें त्याला फार दुःख झालें.

जयापीड असा शूर विद्वान आणि पंडिताचा आश्रयदाता असून पुढें आपल्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं फार जुलमी होऊन ब्राह्मणांचा छळ करूं लागला ही मोठया दुर्दैवाची गोष्ट होय. कदाचित् त्याच्या अनेक स्वाऱ्यामध्यें जरी त्याला एकंदरींत जय मिळाले होते तरी पुष्कळ बिकट प्रसंगहि आले असल्यामुळें त्याची सांपत्तिक स्थिति खालावून त्यामुळें त्याच्या स्वभावांत फरक पडला असावा. असें सांगतात कीं एका नागानें त्याला एक सोन्याचा डोंगर दाखविण्याचें कबूल करून शेवटीं कांहीं चुकीमुळें तांब्याचा डोंगर मात्र दाखविला. तो काश्मीरांत क्रमराज्यनामक भागांत होता. तेथील तांब्याचे त्यानें ९९ कोटी दिनार पाडिले. पण या तांब्यानें त्याची सुवर्णाची गरज भागली नाहीं; व म्हणून आपल्या कायस्थ मंत्र्यांच्या सल्ल्यानें त्यानें प्रजेला छळूनच सोने मिळविण्याचा उपक्रम चालविला.

जयापीडानें प्रजेला छळून त्यांच्याकडून हरतऱ्हेनें द्रव्य उकळण्याचा क्रम सुरू केला, पण स्पष्टवक्त्या ब्राह्मणांनीं त्याला विरोधहि करण्याचें ठरविलें. कल्हण म्हणतो "सर्वकालं ब्राह्मणानामहो धैर्यमकुंठितम् । निस्त्रिंशस्य बभूवुर्ये तस्यापि परिपन्थिनः॥६।६३१" जुलमी कृतीमुळें पंडितांना देखील तो लवकरच अप्रिय झाला; व याची निंदा करण्याच्या कामीं त्यांनीं लगेच आपली बुद्धि खर्च केली. विद्वन्मन्य जयापीड राजा पाणिनीहून कमी योग्यतेचा नाहीं असें श्लिष्ट शब्दांनीं ह्मणून ते त्याची थट्टा करूं लागले. एतद्विषयक पुढील श्लोक लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. "नितान्तकृतकृत्यस्य गुणवृद्धिविधायिनः । श्रीजयापीडदेवस्य पाणिनेश्च किमन्तरम् ॥ कृत विप्रोपसर्गस्य भूतनिष्ठाविधायिनः। श्रीजयापीडदेवस्य पाणिनेश्च किमन्तरम्" ॥४–६३५–३७. पण दिवसानुदिवस जयापीडांत सुधारणा न होतां तो ब्राह्मणांचा अधिकाधिक छळ व तिरस्कार करूं

लागला. शेवटीं एकदां एका ब्राह्मणानें त्याला शाप दिल्यामुळें (?) त्याच्या तंबूच्या सोन्याचा खांब त्याचें अंगावर पडून त्याला जखम झाली, व ती विकोपास जाऊन हाल अपेष्टेंत तो मरण पावला. त्यानें एकतीस वर्षें राज्य केलें, म्हणजे त्याची कारकीर्द स. ७८२ त संपली (७३६+१+७+७+३१=७८२).ललितादित्यानंतर आलेल्या तिन्ही राजांचीं मिळून १५ वर्षें झाल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे.

आतां कर्कोट घराण्यांतील बाकीच्या राजांचें संक्षिप्त वर्णन करून हें प्रकरण आटोपतें घेऊं. कोणत्याहि घराण्याचा ऱ्हासकाळ आला म्हणजे त्यांत दुर्बल माणसें उत्पन्न होऊं लागतात, तसें कर्कोटकांचेंहि झालें; व मोंगलांच्या अखेरच्या दिवसांत, किंवा खलिफांच्या शेवटच्या काळांत, किंवा इतर वेळीं व ठिकाणीं, दुर्बल राजांना बाजूला सारून महत्वाकांक्षी नवीन लोकांनीं सत्ता बळकावण्याचा जो प्रघात दिसून येतो, त्याचीच आवृत्ति काश्मीरांत निघाली. जयापीडाचा मुलगा ललितापीड यानें बारा वर्षें राज्य करून बापानें अन्यायानें मिळविलेली सर्व संपत्ती ऐषआरामांत उडवून टाकिली. त्याच्यानंतर त्याचा भाऊ संग्रामापीड सात वर्षें गादीवर होता, व तो मेल्यावर चिप्पटजयापीड नांवाचा ललितापीडाचा अल्पवयी मुलगा सिंहासनारूढ झाला. तेव्हां त्याच्या मामांनीं म्हणजे उत्पल व मम्म यांनीं आपले हातीं सत्ता राखण्याचा प्रयत्न केला. उत्पलानें चिप्पटजयापीड वयांत आल्यावरहि आपले हातची सत्ता जाऊं नये ह्मणून अजितापीड नामक दुसऱ्या एका अल्पवयी मुलाला पुढें केलें, व मम्मानेंहि तिसऱ्या एकाला हाताशीं धरिलें. तेव्हां त्या दोन मंत्री बंधूंमध्यें युद्ध उपस्थित होऊन त्यांत उत्पलाला जय मिळाला.यानंतर कर्कोटक घराण्यांतील ह्मणून एक अल्पवयी अनङ्गापीड नांवाच्या मुलाला शेवटीं गादीवर

बसविण्यांत आलें. पण उत्पलाचा नातू अवन्तिवर्मा यानें त्याला पदच्युत करून स्वतः गादी बळकाविली व इ. स. ८५५ च्या सुमारास काश्मीरांत आपल्या उत्पल घराण्याची स्थापना केली.

कर्कोटक घराण्याच्या अमदानींत काश्मीरचें राज्य राजकीयदृष्ट्या फार बलवान् असून दोन वेळां संपूर्ण उत्तरहिंदुस्थानचें चक्रवर्तित्व तेथील राजाकडे आलें. काश्मीरच्या खुद्द राज्यांत पंजाबांतील कांहीं सुभे मोडत असत; व काश्मीर प्रांताचेहि क्रमराज्य, मडवराज्य इत्यादि पोटविभाग असून त्यांचा स्पष्ट निर्देश कल्हणानें केलेला आहे. कर्कोटकवंशाचे राजे शिव किंवा विष्णु यांची सामान्यतः उपासना करीत. राजतरंगिणींत ज्या मंदिरांची नांवें सांगितलीं आहेत, त्यांत शिवमंदिरांच्या नांवापुढें ईश किंवा ईश्वर असें पद घालून व विष्णुमंदिराच्या नांवापुढें स्वामी पद घालून त्यांचा भेद दाखविण्याचा प्रघात दिसतो. सामान्य लोकांतहि शैव व वैष्णव हेच साधारणपणें भेद असून, खालच्या वर्गांत, व परकीय जातींच्या लोकांत बौद्धांचा भरणा असे. कर्कोटकवंशाच्या अमदानींत काश्मीर प्रांतानें विद्येविषयींचा आपला नांवलौकिक कायम ठेविला इतकेंच नव्हे, तर थोडा बहुत वृद्धिंगतहि केला. संस्कृत वाङ्मयांत सुप्रसिद्ध असलेले पुष्कळ पंडित या काळांत होऊन गेले. भरतखंडांतील पंडितांमध्यें काश्मीरी पंडितांना जिंकिण्याची जी लालसा साधारणतः दिसून येते तिचें कारण यावरून आपल्याला समजून यईल. अद्वैतमताचार्य शंकराचार्यांनीं तेथें शारदामन्दिरांत जाऊन जो वाद केला त्यावरून पंडितांची ही मनःप्रवृत्ति स्पष्ट होते. शारदामंदिराचा उल्लेख आणखी पुढें येणारच आहे.

## प्रकरण ६ वें.

---

### काश्मीर देशाचा वृत्तान्त-भाग २ रा

या प्रकरणांत कर्कोटक घराण्यानंतरचा मोंगलशाहीपर्यंतचा काश्मीरचा इतिहास संक्षेपानें कथन करावयाचा आहे. पुढच्या परिस्थितींत काश्मीर प्रान्त हिंदुस्थानापासून बहुतेक अलग राहिलेला असल्यामुळें या इतिहासाचें हिंदुस्थानच्या सामान्य इतिहासांत फारसें महत्व नाहीं हें खरें; तथापि दुसऱ्या एका दृष्टीनें त्याचें बरेंच महत्व आहे. एकतंत्री राज्यांत आरंभीं आरंभीं न्याय, समता, शौर्य इत्यादि गुणाच्या योगानें लोकांना कितीहि वैभव लाभलें, तरी पुढें राजे लोक ऐषआरामी होऊन राजसत्ता खंगत जाऊन जुलमी होऊं लागते; एखाद्या नवीन राजघराण्यांतील पहिले पहिले राजे जोमदार व धर्मबुद्धीचे असले तरी पुढें त्यांचेच वंशज नीतिभ्रष्ट व दुर्वर्तनी निपजतात; घराण्याचे स्थापक आपल्या सत्तेचा उपयोग जबाबदारीनें व सदसद्विवेक बुद्धीनें करतात, पण पुढें तीच सत्ता दुर्व्यसनी राजांच्या हातांत प्रजेला छळण्याचें एक हत्यारच होऊन बसते; कर्तृत्ववान् राजे व त्यांच्या हाताखालीं कर्तृत्ववानच मंत्री अशी जोडी जमली म्हणजे त्यांच्या हातून राज्यव्यवस्थेंत किती तरी प्रगति होते, पण उलट नादान राजांना उलट्या काळजाचे मंत्री भेटल्यानें लांच-लुचपत व दंडुकेगिरीच्या जोरावर प्रजेला ते पायांखालीं दडपून टाकितात; प्रतापशाली राजांच्या हातीं व्यवस्थित तयार केलेलें सैन्य म्हणजे स्वदेशीं शांतता आणि परदेशीं मान्यता वाढविण्याचें साधन बनलेलें असतें, पण दुबळ्या राजांच्या कारकीर्दींत तेंच सैन्य स्वतः राज्याचें मालक बनतें व एका मागून एक असे राजे बाहुल्यांप्रमाणें गादीवर बसवून

वाटेल तसें धिंगाणा घालूं लागतें; राजसत्तेची लालसा बापाला मुलाविरुद्ध, मुलाला बापाविरुद्ध, फार काय, बंधुबंधूची गोष्टच बोलावयास नको, पण प्रसंगीं आईला पुत्राविरुद्ध व केव्हां केव्हां तर पत्नीला पतीविरुद्धहि चिथावून देते. हे व इतर असेच जे अनेक अनिष्ट प्रकार एकतंत्री राज्यपद्धतींत नेहमी सर्वत्र आढळून येतात, व पूर्वी रोमच्या साम्राज्यांत, किंवा बगदादच्या खलिफाच्या अमदानींत, तसेंच अलीकडे मोंगल बादशाहींत व ईजिप्त देशांत जसे ते दिसून आले, तसेच ते हुबेहुब थोडयाबहुत प्रमाणांत काश्मीरच्या या पुढील इतिहासांतहि स्पष्ट दृष्टीस पडतात. यासाठीं हा इतिहास थोडा तरी खुलासेवार देऊन त्यावरून राजा व प्रजा यांच्या संगनमतानें चाललेली सत्ताच शेवटीं देशाच्या अस्खलित सुव्यवस्थेला व प्रगतीला कारणीभूत होते, हें दाखवून देणें इष्ट आहे.

कर्कोटक घराणें जुनें पुराणे होऊन मोडल्यावर काश्मीरच्या सिंहासनावर अवन्तिवर्म्यानें आपल्या उत्पल घराण्याची सत्ता प्रस्थापित केली. या अवन्तिवर्म्याचा आजा उत्पल नांवाचा असून कर्कोटक घराण्याच्या ऱ्हासकालीं त्याचा मंत्रि होता, व त्यानें स्वतःच त्यावेळीं गादी बळकाविण्याचा प्रयत्न केला होता. त्याचेंच नांव पुढें त्याच्या घराण्याला मिळालें. वंश-संस्थापकांत नित्य आढळून येत असल्याप्रमाणें अवन्तिवर्म्यांतहि कर्तृत्वशक्ति आणि जागृत सदसद्विवेकबुद्धि हे गुण उत्कटतेनें वास करीत होते. त्याच्या कडक न्यायीपणाच्या कांहीं कथा राजतरंगणींत दिल्या आहेत, पण त्या येथें सांगण्याचें कारण नाहीं. त्यानें मिळविलेल्या विजयांप्रमाणेंच त्याची जमीन महसुलाची पद्धत देखील फार यशस्वी झाली. सुय्य नामक कर्तृत्वशाली व बुद्धिमान मंत्र्याच्या साहाय्यानें त्यानें आपल्या राज्यांत वितस्ता आणि काश्मीरांतील

इतर नद्या यांना बंधारे घालून त्यांपासून अनेक ठिकाणीं काल-
व्यांचीं कामें करून घेतलीं. त्यामुळें त्या प्रांतांत शेंकडों नवीन
गांवें अस्तित्वांत येऊन हजारों एकर पडित जमीन लागवडीखालीं
आली. काश्मीर प्रान्तांत फार प्राचीनकाळापासून चांगल्या सुका-
ळांत देखील खंडीभर भाताला ( धान्य खारीला ) २०० दीनार
पडत असत, पण त्यालाच आतां या नवीन व्यवस्थेमुळें केवळ
३६ दीनार पडूं लागले असें कल्हणानें म्हटलें आहे. ( ५,११६-
११७–यस्मिन्महासुभिक्षेषु दीनाराणां शतद्वयी । धान्य-खारेः
प्राप्तिहेतुरासर्गादभवत्पुरा ॥ ततः प्रभृति तत्रैव चित्रं कश्मीर
मण्डले । पट्त्रिंशता धान्य-खारेर्दीनारैरुदितः क्रयः ॥)

अवन्तिवर्मा फार धार्मिक होता. त्यानें व त्याच्या राणीनें
आणि प्रधानांनीं शिवाचीं व विष्णूची अनेक मन्दिरें बांधिलीं.
ऐहिकसंपत्तीला तो इतकी क्षुद्र लेखीत असे व ब्राह्मणांविषयीं
त्याचें एवढें औदार्य असे कीं, छत्रचामरेंखेरीज करून त्यानें
सर्वस्व ब्राह्मणांना देऊन टाकिलें ( ५,१८). तो महावैष्णव असून
अहिंसा-प्रतिपादक होता. बौद्धधर्माचें अहिंसा-प्रसाराचें काम आतां
वैष्णवधर्मानें उचलले होते. त्याप्रमाणें अवन्तिवर्म्यानें आपल्या
राज्यांत सर्वत्र प्राणिहिंसा बंद केली, व तेव्हांपासून दहा वर्षे
सगळया काश्मीर प्रान्तांत पूर्वीं मेघवाहनाच्या कारकीर्दीप्रमाणेंच
कोणा प्राण्याचा जीव घेण्यांत आला नाहीं असें कल्हणानें सांगि-
तलें आहे. ( श्रीमेघवाहनस्येव साम्राज्येऽवन्तिवर्मणः । अशेष-
प्राणिनामासीदमारो दशवत्सरान् ॥ (५,६४) ‘ हिंवाळयाच्या
दिवसांत कांसवें नदीच्या थंड पाण्यांतून बाहेर येऊन कांठावर
स्वस्थपणें ऊन खात पडत ’ ( ५,६५ ). ‘ अवन्तिवर्म्याच्या कार-
कीर्दींत भट्ट कल्लट आणि दुसरे अनेक सिद्ध पुरुष देशाच्या उद्धा-
रार्थ जन्मास आले ’ ( ५.६६ ). हा कल्लट कोण हें कांहीं सम-

जत नाहीं. तो बहुधा कोणी वैष्णव ग्रंथकार असावा. अवन्तिवर्म्याचें सगळें आयुष्य जसें धर्माचरणांत गेलें तसा त्याचा अंतहि त्याच स्थितींत झाला, म्हणजे भगवद्गीतेचें पारायण चाललें असतां त्यानें देह ठेविला ( तेनान्ते भगवद्गीता शृण्वता भावितात्मना। ध्यायता वैष्णवं धाम निरमुच्यत जीवितम् ॥ ५,१२५ ). धार्मिक बुद्धीनें पारायण करण्याचा ग्रंथ या नात्यानें भगवद्गीतेचा हाच पहिला ऐतिहासिक उल्लेख दिसतो. असो, अवन्तिवर्म्याचें देहावसान लौकिक शक ५९ त आषाढ शुक्ल ३ स झालें (५,१२६ ). यावर्षी इ. सनाचे ८८४ ( ३९५९–३०७५ ) वर्ष येते. म्हणजे त्यानें स. ८५५ पासून ८८४ पर्यंत २९ वर्षें राज्य केले.

त्याच्या मागून त्याचा पुत्र शंकरवर्मा सिंहासनावर आला. पण त्याच्या मंत्रिमंडळांत पक्षभेद उत्पन्न होऊन एका पक्षानें त्याच्या एका चुलत भावाची युवराज म्हणून स्थापना केली. तेव्हां त्या दोघांत लढा उत्पन्न होऊन यादवी माजली, व तींत उभयपक्षांचेहि अनेक स्वामिभक्त सेवक मृत्युमुखीं पडले; पण सरते शेवटीं शंकरवर्म्याचें वर्चस्व होऊन तो एकटाच राज्यकारभार पाहूं लागला. यादवींतून बाहेर पडल्याबरोबर त्याने आपल्या क्षात्रवृत्तीच्या अनुयायांच्या फुरफुरणाऱ्या शौर्याला वाट काढून देण्यासाठीं म्हणूनच कीं काय, दिग्विजयाची तयारी केली. त्यानें जिंकिलेल्या देशांची व तेथील राजांचीं नांवें इतिहासदृष्ट्या महत्वाचीं आहेत. त्यानें दार्वाभिसारच्या राजाला जिंकून हरिगण नांवाच्या राजाला बंदिवान केलें, व गूर्जराधिपतीशीं लढत असतानांच त्रिगर्तदेशाच्या पृथिवीचंद्र राजाला पळावयास लाविलें. तो पळून गेल्यावर त्यानें त्याच्या भुवनचंद्र नांवाच्या मुलाला तेथील गादीवर बसविलें. कारण तो आधींच त्याला शरण आलेला होता. शंकरवर्म्याच्या सैन्यांत ९ लक्ष पायदळ व ३०० हत्ती होते असें म्हटले

आहे. पण ही पायदळाची संख्या उघड उघड फुगविलेली दिसते. तरी एकंदरींत त्याचें सैन्य अफाट होतें एवढें खरें. या सैन्याच्या साह्यानें त्यानें गुर्जराधिपति आलखानाचा पराभव केला तेव्हां आलखानानें आपल्या राज्यापैकीं टक्क देश "जो त्याला जीवापलिकडे वाटत होता तो" त्याला देऊन टाकिला. नंतर शंकरवर्म्यानें कनोजच्या भोजाकडून पदच्युत झालेल्या थक्कियाच्या वंशजांना त्यांच्या पूर्वीच्या पदावर चढविलें. हिमालय व विंध्याद्रि यांच्या मधोमध जसा आर्यावर्त देश शोभतो तसा शंकरवर्मा एकीकडे दरद आणि दुसरीकडे तुरुष्क यांच्यामध्यें अजिंक्य होऊन राहिला होता ५,१२५ उदमाण्डपुर (काबूल) येथेंहि त्याचें स्थैर्य टिकून राहिलें असें म्हटलें आहे. त्यावरून त्याचें उत्तरेकडील कडव्या लोकाशीं या ठिकाणीं युद्ध झालें असावें असें दिसतें. शाहिराजा लल्लिय याचा त्यानें पराभव केला व क्रोधामुळें त्याला पुनः गादीवर न बसविल्यामुळें त्यानें गूर्जरराज आलखानाचा आश्रय केला.

हा कल्हणानें दिलेला वृत्तान्त इतर देशांच्या इतिहासाशीं ताडून पहाणें अवश्य आहे. वरील हकीगतींत जीं त्रिगर्त, टक्क आणि गूर्जर अशीं नांवें आलीं आहेत त्यांचीं राजतरंगिणीच्या एका प्रतींतील टीकेंत नगरकोट, अटकनदीच्या कांठचा शकरद, आणि छोटा गुजरात अशीं चालू भाषेंतील नांवें सांगितलीं आहेत. (५,१४४-१५०). त्यांचा विचार करतां शंकरवर्म्याचा दिग्विजय काश्मीरच्या आजूबाजूच्या देशांपुरताच म्हणजे पंजाबांतील गुजरात, व काबूल येथपर्यंतच होता असें दिसतें. पूर्वेकडील दरद आणि पश्चिमेकडील तुरुष्क यांच्यावरहि त्यानें स्वाऱ्या केल्या, व उत्तरेकडील मुलखावर तर त्याचा उगीच नांवाचाच दिग्विजय दिसतो. भोजानें पदच्युत केलेला थक्किय म्हणजे कोण याचा नीटसा पत्ता लागत नाहीं. पण त्यावेळीं कनोज येथें भोज

( प्रतिहार ? ) राज्य करीत असून त्यानें ज्या राजापुरीच्या राजाला पदच्युत केलें होतें, तोच तो असावा. शाहिराजा लल्लिय यानें आलखानाचा आश्रय केला तेव्हां त्याचें काबूलचें राज्य त्याला परत न मिळतां कांहीं काळ तें प्रत्यक्ष शंकरवर्म्याच्याच अमलाखालीं राहिलें. पण शंकरवर्म्याच्या मृत्यूनंतर काबुलांत बंड झालें, व त्याच्या प्रभाकरदेव नामक प्रधानानें जरी तें मोडून टाकिलें, तरी लल्लियाचा पुत्र तोरमाण याला गादीवर बसवून शाहिघराण्याला पुनः पदारूढ करणेंच त्याला एकंदरींत सोईचें व इष्ट वाटलें. ( ५,२२३ ).

शंकरवर्मा पराक्रमी होता खरा, पण त्याची वृत्ति त्याच्या बापाप्रमाणें धर्मशील नव्हती. तो पुढें पुढें प्रजेचा नानातऱ्हांनीं छळ करूं लागला. त्याने केलेल्या जुलमी कृत्यांचें वर्णन स्वतंत्रच करावयास पाहिजे. पण थोडक्यांत सांगावयाचें तर 'त्याच्या छळामुळें संतापलेल्या प्रजांच्या शापामुळें त्याचे पन्नास पुत्र ऐन उमेदींत कांहीं रोग वगैरे न होतां पटापट मेले,' असे उद्गार त्या संबंधानें तरंगिणीकारानें काढिले आहेत (५, २१०). या म्हणण्यांत थोडी बहुत अतिशयोक्ति दिसतेच आहे. एका स्वारीवरून तो परत येत असतांना त्याचा सैन्याचा तळ उरशा देशांत पडला होता; तेथें कांही स्थानिक लोकांशीं एकाएकीं त्याचा तंटा सुरू झाला, व त्या झटापटींत एक बाण चुकून त्याच्या गळ्याला येऊन लागला. त्याचे सेनापति सुज्ञ असल्यामुळें त्यांनीं सैन्यांत गडबड उडूं न देतां त्याला काश्मीरास नीट परत आणिलें. पण गळ्यांत रुतलेलें बाणाचें टोंक बाहेर काढतांना शंकरवर्मा मात्र वाटेंतच मरण पावला. त्याचें प्रेत काश्मीरांत आणून तेथें त्याचें दहन झालें, व त्याच्या बरोबर त्याच्या तीन राण्या, दोन परिचारक, आणि एक विश्वासू प्रधान यांनींहि स्वतःस जाळून

घेतलें. या गोष्टीवरून तो प्रजेला सर्वथैव अप्रियच होता असें म्हणवत नाहीं, व म्हणून त्याच्या जुलमी कृत्यांच्या कल्हणकृत वर्णनांत थोडी तरी अतिशयोक्ति असावी असें आम्हीं वर म्हटलें आहे. हर्षचरितांत बाणानें वर्णिलेल्याप्रमाणें राजा मेल्यावर त्याच्यावर प्रेम करणारीं त्याचीं अनेक चाकर माणसें, व मंत्री सुद्धां आपला प्राणत्याग करीत व या चालीचेंहि प्रत्यंतर वरील वर्णनावरून मिळत आहे. ठाणेंश्वराच्या इतिहासांत पूर्वी सांगितल्याप्रमाणें असली वहिवाट जपानांत आजहि आढळून येत आहे. असो, शंकरवर्मा लौकिक शक ३९७७ म्हणजे इ. स. ९०२ त फाल्गुन महिन्यांत मरण पावला, व तेव्हां त्यानें अवघें ८ वर्षे राज्य केलें होतें.

जातां जातां येथें एवढें सांगितलें पाहिजे कीं, लोभी शंकरवर्मा कवि पंडितांचा आश्रयदाता नव्हता; व त्यामुळें भल्लट आदिकरून पंडितांना पोटासाठीं अन्य मार्ग स्वीकारावा लागला होता. लवट नांवाचा एकच कवि काय तो शंकरवर्म्याच्या पदरीं होता.

शंकरवर्म्यानंतर त्याच्या अल्पवयी गोपालवर्मा नांवाच्या पुत्राला गादीवर बसवून सुगन्धा नामक त्याची विधवा राणी राज्यकारभार पाहूं लागली. गोपालवर्मा अल्पवयांतच मरण पावला, व त्याच्या संकटनामक भावाचीहि पुढें तीच स्थिति झाली. तेव्हां सुगन्धा राणीनें तंत्रिनामक सैनिकांच्या साह्यानें स्वतःच्या जबाबदारीवरच राज्यकारभार करण्याची सुरवात केली. कान्स्टंटिनोपल येथ जानिझरी नामक लोकांचें, रोमन राज्यांत कांहीं काळ प्रिटोरियन सैन्याचें, अथवा बगदाद येथें तुर्की सैनिकांचें, तसेंच या देशांत पुढें दिल्लीस मराठ्यांचें जसें वर्चस्व होतें तसेंच बहुतेक यावेळीं काश्मीरांत या तंत्रि सैन्याचें होतें. त्यांनीं पङ्गु नांवाच्या

एका दहा वर्षांच्या याच घराण्याशीं संबंध असलेल्या मुलाला गादीवर बसविलें, व लोकांपासून द्रव्य उकलण्यास सुरवात केली. त्याच्यापासून लोकांना न भूतो न भविष्यति असा त्रास झाला. पुढें लौ. श. ४९९३ म्ह. स. ९१८ त काश्मीरांत मोठा दुष्काळ पडला, तेव्हां या तंत्रिसैन्याच्या हुंडिकेची (५,२७१) म्हणजे खंडणीची भर लोकांना पोरें विकून करावी लागली. कल्हण म्हणतो, 'अशा रीतीनें तुज्जिन व चंद्रापोड इत्यादि भाग्यशाली राजांनीं मोठया श्रमानें पाळिलेल्या प्रजेचा या राक्षसी मंत्र्यांनीं नाश केला." (५,२७८). या सुमारास तंत्रिसेनेनें चक्रवर्मा नांवाच्या दुसऱ्या एका राजाला गादीवर आणिलें, व राज्याची अधिकच दुर्दशा केली. त्यांचा व मंत्रिमंडळाचा द्रव्यलोभ दिवसानुदिवस वाढतच चालला. पण चक्रवर्म्यांत थोडी कर्तृत्वशक्ति होतीसें दिसतें. या तंत्रिसैन्याचा एकंदर जुलूम पाहून त्यांची काश्मीरांतून उचलबांगडी करण्याच्या हेतूनें त्यानें एकदां डामर लोकांच्या संग्रामनामक सरदाराची मदत मागितली. हे डामर म्हणजे तेथील मूळचे क्षात्रवृत्तीचे लोक असून त्या वेळीं शेतकीवर आपला उदरनिर्वाह करीत. त्यांनीं चक्रवर्म्याला असा सल्ला दिला कीं, आपण स्वतःचें सामर्थ्य प्रकट करूं लागल्यावर तंत्रीची कथा ती काय? ते आपल्याला तृणासमान आहेत (५,३०९). या सल्ल्याप्रमाणें चक्रवर्म्यानें वागून तंत्रीविरुद्ध शस्त्र उपसलें, व डामरांच्या साह्यानें त्यांच्या त्रासांतून तो मुक्त झाला.

पण हें साह्य देण्यापूर्वी डामरांनीं चक्रवर्म्याला तूं पुढें आमचाच विश्वासघात करशील म्हणून बजाविलें होतें, व तसेंच शेवटीं घडून आलें. त्यानें डामरांवर जुलूम करण्याचा उपक्रम करून आपलें आयुष्य दुर्व्यसनांत घालविलें. पुढें त्याच्या मागून आलेल्या

पार्थराजाच्या कारकीर्दींतहि तोच प्रकार चालू होता. चक्रवर्मा मरण पावला तेव्हां डामरांनीं राज्य लुटलें, व नंतर पुढच्या राजानें दुष्ट कायस्थांना उठवून पुनः लोकांवर जुलूम केला. ( ५,४३९ ). त्याच्या निष्ठुर कृत्यांचें वर्णन करण्याची कांहीं जरूरी नाहीं. तो लौ. श. ४०१५ म्हणजे इ. स. ९३९ च्या ग्रीष्म ऋतूंत मरण पावला. त्याच सुमारास तंत्री लोकांचा एक सरदार कमलवर्धन व दुसरे कांहीं असंतुष्ट लोक यांनीं श्रीनगराला वेढा दिला व डामरांचा पराभव करून शहरांत प्रवेश केला. तेव्हां पार्थ राजाची विधवा राणी कांहीं अनर्थ ओढवण्याच्या भीतीने आपल्या तान्ह्या मुलासह एका सुरक्षित ठिकाणीं लपून राहिली.

या ठिकाणीं कल्हणानें एक मजेदार प्रकार वर्णिला आहे. भोळसट स्वभावाच्या त्या कमलवर्धनानें राणी पळून गेल्यावर रिकामें झालेलें सिंहासन स्वतःच न बळकावतां तेथील ब्राह्मणांनाच नवीन राजाची निवड करावयास सांगितलें. कारण त्याला अशी आशा वाटली कीं, ते आपल्यालाच निवडतील. पण ब्राह्मणांनीं श्रीनगरच्या गोशाळेंत सभा भरवून राजाच्या निवडणुकीवर पांच दिवस खडाजंगीचा वाद केला, तरी त्याचें नांव मात्र कोणी काढिले नाहीं. "यज्ञाग्नीच्या धुरानें मलिन झालेल्या दाढीचे बिनशिंगाच्या बैलांसारखे हे ब्राह्मण आपसांत एकमत न झाल्यामुळे बराच वेळ भांडत राहिले. त्यांनीं राजाला अभिषेक करण्याऐवजीं वादाच्या भरांत तोंडांतून उडालेल्या थुंकीनें आपल्या दाढयांना मात्र अभिषेक केला" ( ५,४६१–६१ ). कल्हणाने स्वतः ब्राह्मण असून ब्राम्हणांविषयींच असे उद्गार काढावे हें चमत्कारिक दिसतें. पण वैमत्य म्हणजे मतभेद हा ब्राह्मणांचा नित्याचाच दुर्गुण आहे. तथापि या संबंधांत एक गोष्ट निष्पन्न होते, ती अशी कीं, पूर्वी राजकीयदृष्ट्या ब्राह्मणाचे

बरेंच वर्चस्व यावेळीं असून सिंहासन रिकामें पडलें असतां नवीन राजाची निवड करण्याचा अधिकार कधीं कधीं त्यांच्याकडे येत असे. पुराणांवरून सुद्धां हीच गोष्ट दिसून येते. वेन नांवाच्या जुलमी राजाचा वध केल्यावर तत्कालीन ब्राह्मणांनीं पृथु नांवाचा त्याच्या मांडींतून पुत्र उत्पन्न करून त्याला राज्य दिलें ही गोष्ट प्रसिद्धच आहे. रिकाम्या गादीवर नवीन राजा बसविण्याच्या अधिकारासंबंधाची उपपत्ति कांहीं असली तरी निदान प्रस्तुत प्रसंगीं काश्मीरांत तो अधिकार ब्राह्मणांकडे आला होता हें निर्विवाद आहे. त्यांनीं पांच दिवस आपसांत खल करून कांहीं निर्णय केला नाहीं पण सुदैवानें सहावें दिवशीं, माजी सुगन्धा राणीचा मंत्री जो प्रभाकरदेव त्याचा दैवानुसार बाहेर देशीं भटकत असलेला सुपुत्र यशस्कर हा एकाएकीं तेथें परत आला व त्यालाच राजा करावें असें ब्राह्मणांनीं ओरडून ठरविलें. या ठरावाला कमलवर्धन व दुसरे लोक यांनींहि अनुमोदन दिलें आणि त्याप्रमाणें लोकांच्या आनंदोत्सवांत यशस्कराला राज्याभिषेक झाला.

नवीन घराण्याच्या संस्थापकांत नित्य आढळून येत असल्याप्रमाणें यशस्कराच्या अंगींहि सदसद्विवेक बुद्धि जागृत असून तो कर्तृत्ववान् व तेजस्वी होता. एकदां राज्यपद मिळाल्यावर त्यानें ब्राह्मणांची बोळवण करून त्यांना आपलें यज्ञयागाचें काम संभाळण्यास सांगितलें, व राज्यसूत्रें स्वतःच्या हातीं घेऊन जोमानें पण विचारपूर्वक कारभार चालविला. कल्हणानें त्याचें केलेलें वर्णन येथें देण्यासारखें आहे. तो म्हणतो, "यशस्कर राज्य करित असतां लोक दरवाजे उघडे टाकून घरांत स्वस्थ झोंप घेत; व प्रवाशांना वाटेंत कोणताहि उपद्रव होत नसे, इतका चोरांचा बंदोबस्त झालेला होता. गांवांतील लोक आपल्या शेतकीच्या कामांत निमग्न असत, व राजदरबारांत येण्याचा त्यांना प्रसंगच

येत नसे. तसेंच ब्राह्मण आपल्या अध्ययनांत गुंग झाल्यामुळें त्यांना शस्त्रधारण करण्याचें कधीं कारण पडलें नाहीं. सामगानांच्या मिषानें ब्राह्मणगुरु मदिरापान करीत नसत; व तापसी म्हणविणारे आश्रमवासी लोक पुत्रकलत्रादीच्या व कृषिगोरक्ष्यादिकांच्या फंदांत पडत नसत. मूर्ख लोकांना आपले गुरु करून व आपणच केलेल्या ग्रंथांच्या आधारानें वेदांचा अर्थ करून मत्स्य व अपूप याच्या आहुती देऊन यज्ञ करण्याच्या भानगडींत धार्मिक लोक पडले नाहींत. कुलस्त्रिया पतीचें अतिक्रमण करून भोंदू गुरूंच्या भजनीं लागून त्यांच्या बोलण्याला माना तुकावीत नसत. तसेंच त्याच्या राज्यांत कार्तान्तिक ( ज्योतिषी ), भिषक् ( वैद्य ), गुरु, मंत्रि, पुरोहित, दूत, स्येय ( न्यायाधिकारी ), लेखक इत्यादि धंदे करणाऱ्यांपैकीं कोणीहि अपंडित (अशिक्षित) असा आढळत नसे." ( ५,७–१३ ) या वर्णनांत कल्हणाने तत्कालीन राजकीय व सामाजिक चालीचें अगदीं हुबेहुब चित्र रेखाटलें आहे. त्यावरून राजा चांगला किंवा वाईट असेल त्या मानानें राष्ट्राची चर्या कशी बदलते हें चांगलें दिसून येईल. पण अशा या चांगल्या राजाला अवघीं ९ वर्षेंच काय तो राज्योपभोग घ्यावयास सांपडला. लौ. श. ४०२४ म्हणजे इ. स. ९४८ त तो मरण पावला; व त्याच्या मागून संग्रामदेव नांवाचा त्याचा अल्पवयी मुलगा गादीवर आला. त्यामुळें अव्यवस्था, जुलूम, व दुर्व्यसनें यांचा त्या राज्यांत पुनः पगडा सुरू झाला, व एकांग, सामन्त, कायस्थ आणि तंत्री या लोकांना पाठीशीं घेऊन पर्वगुप्त नांवाच्या एका मनुष्यानें सिंहासन बळकाविलें. थोडे दिवस राज्य केल्यावर तोहि मृत्यु पावला व त्याच्या मागून त्याचा पुत्र क्षेमगुप्त राजा झाला. तो वैश्य किंवा क्षत्रिय असून त्यानें सिंहराज नामक लोहराधिपतीच्या दिद्दानांवाच्या प्रसिद्ध मुलीशीं विवाह केला. ही दिद्दा

काबूलच्या भीमपाळ नामक शाहिराजाची नात होती हें पूर्वी सांगितलेंच आहे. क्षेत्रगुप्त लौ. श. ४०३४ म्हणजे इ.स. ९५८ त मरण पावल्यावर या दिद्दाराणीनें बरेच दिवस राज्य केलें. ती दुर्वर्तनी असून तुंगनामक खशजातीच्या प्रधानाशीं तिचा प्रेमसंबंध होता. त्याच्या तंत्रानें व तंत्रि लोकांच्या साह्यानें तिनें आपला अल्पवयी मुलगा अभिमन्यु याच्या कारकीर्दींत, तसेंच पुढें स. ९६८ त तो अल्पवयांतच मरण पावल्यावर नंदगुप्त नांवाच्या अल्पवयी नातवाच्या कारकीर्दींत राज्यकारभाराचीं सूत्रें आपल्याच हातीं ठेविली. नंदगुप्ताच्या मरणानंतर त्याचा भाऊ भीमगुप्त राजा झाला, पण तोहि अल्पवयी असल्यामुळें दिद्दाच कारभार पहात असे. पुढें भीमगुप्त मारला गेला, तेव्हां तर तिनें आपल्या नांवानेंच राज्य चालविलें. पण कांहीं काळानें तिनें आपल्या भावाच्या संग्रामराज नांवाच्या मुलाला आपल्या मागें गादीचा वारस ठरविलें; व अशा रीतीनें काश्मीरांत लोहरघराण्याची राज्यपदावर स्थापना झाली. ही उलट्या काळजाची दिद्दाराणी तशाच स्वभावाच्या पाताळयंत्री मंत्र्यांच्या साह्यानें प्रजेचा अनेक प्रकारें छळ करून इ. स. १००३ त मरण पावली. तिच्या हातांत राज्याची सूत्रें सुमारें ४५ वर्षें होतीं.

लोहरघराण्याच्या काळींच कल्हण होऊन गेला असल्यामुळें त्यानें या घराण्यांतील राजाचें वर्णन फारच सविस्तर केलें आहे. पण आपल्या दृष्टीला आज तो काळ दूरचाच अतएव तितका महत्वाचा नसल्यामुळें त्याचा सारांश देणेंच इष्ट होय. या वंशांतील पहिला राजा संग्रामराज इतर काश्मीरवंशांतील पहिल्या राजाप्रमाणेंच चांगला असल्यामुळें त्याची कारकीर्द भरभराटीची झाली. तथापि त्याच्याच अमदानींत मुसलमान लोकांनीं भरतखंड जिंकण्यास जारानें सुरवात केली

त्याच वेळीं काबुलास त्रिलोचनपाल नामक राजा गादीवर असून त्याच्यावर तुर्कांच्या हमीरानें (या अमीराचें नांव माहीत नाहीं) स्वारी केली असतां त्यानें संग्राम-राजापाशीं मदत मागितली. त्याप्रमाणें संग्रामानें आपल्या तुंग प्रधानाला सैन्यासह तिकडे पाठविलें. तुर्कांशीं झालेल्या या युद्धाचें सरस वर्णन कल्हणानें तरंगिणींत केलें आहे (७ वा तरंग ५५-६५). पुढें तो म्हणतो "शंकरवर्म्याच्या काळीं काबूलाच्या उत्कर्षाचें आम्हीं वर्णन केलें. पण आतां तें शाहींचें राज्य आहे कोठें? त्याचे वैभवशाली राजे, त्यांचा तो थाट या गोष्टी मनांत आल्या म्हणजे तें खरोखर अस्तित्वांत तरी होतें कीं नाहीं याचीच शंका येऊं लागते." ( ७,६९ ) असो. तुर्कांनीं या वेळीं त्रिलोचनपालाचा पाडाव केल्यामुळें तो काश्मीरास पळून आला व काबूल तुर्कांच्या हातीं जाऊन भरतखंड त्याला कायमचें मुकलें. तंगानें त्रिलोचनपालाचा सल्ला न ऐकिल्यामुळें तोहि पराभव पावून आपल्या देशीं परत आला, व 'त्यानें आपल्या या कृत्यानें तुर्कांच्या स्वारोला भरतखंडांत चांगला वाव करून दिला' ( ७,७० ). कल्हणाच्या मताप्रमाणें हिंदुस्थानाच्या नाशाला तुंगाची करणीच बहुतांशीं कारण झाली. (७,७१) तुंगाच्या एकंदर वर्तनाचा संग्रामाला वीटच आलेला होता. त्याच्या विरुद्ध दरबारांतहि बराच असंतोष माजला, व शेवटीं त्यामुळें त्याचा दरबारांत खून झाला. त्यावेळीं त्याच्या पक्षाच्या दुसऱ्याहि पुष्कळ मंडळीला प्राणास मुकावें लागून काश्मीरच्या दरबारांतून तुंगाचें उच्चाटण झालें. संग्रामानें लौ. श. ४१०४ पर्यंत म्हणजे २४ वर्षें राज्य केलें, व त्यावर्षीं तो मरण पावला. त्याच्या मागून हरिराज नांवाचा त्याचा पुत्र राज्यारूढ झाला. तो बापाप्रमाणें चांगला होता, पण लवकरच मृत्यु पावल्यामुळें त्याचा पुत्र अनंतदेव हा लहान असतांच राजा झाला. काबूलच्या पदच्युत झालेल्या त्रिलो-

चनपालाचे पुत्र रुद्रपाल, दिद्दपाल, क्षमपाल व अनंगपाल हे अनंतराजाचे संवगडी होते. संग्रामानें त्यांना भरपुर नेमणुका करून दिल्या होत्या, तरी त्यांच्या उधळ्या स्वभावामुळें ते नेहमीं द्रव्याच्या अडचणींत असत. तेव्हां ते लांचलुचपतीचा उपयोग करून काश्मीरच्या प्रजेला छळूं लागले.' तेव्हां थोडयाच काळांत त्यांचाहि अंत झाला; ' कल्हण म्हणतो ' अन्येऽपि शाहि-तनयाः क्षिप्रमेव क्षयं ययुः । रूद्रपाले ततो लूतामयेन प्रमयं गते ॥'(७,१७८) तथापि एकंदरींत ते पराक्रमी असल्यामुळें तुर्कांबरोबर झालेल्या युद्धांत अनंतदेवाला त्यांचा बराच उपयोग झाला. हिंदुस्थानांतील लोकांच्या नित्याच्या संवईप्रमाणें काश्मीर दरबारांतील एका असंतुष्ट सरदारानें अनंताचा पाडाव करण्यासाठीं तुर्क लोकांना घरांत घेतलें. यावेळीं सात तुर्क सरदार, डामर लोक, दरदांचा राजा, आणि हा काश्मीरचा असंतुष्ट सरदार ब्रह्मराज, इतक्यांचा अनंत देवाविरुद्ध मेळ जमला होता. पण अनंतदेव कांहीं कमी नव्हता. त्यानें विरुद्ध पक्षाशीं तुमुल युद्ध केलें. राजतरंगिणीकारानें म्हटलें आहे. “ त्या दिवशीं स्वर्गस्थ अप्सरांचा विवाहोत्सव असावा असें शस्त्रास्त्रांच्या खणखणाटांतून पडलेल्या विवाहाग्निस्फुलिंगावरून स्पष्ट दिसत होतें. ” ( ७,१७३ ). या युद्धांत रुद्रपालानें दरदांच्या राजाला ठार करून मोठी कीर्ति मिळविली. “ साती म्लेंच्छ सरदारांना मृत्यूची किंवा बंदिवासाची प्राप्ति झाली व अनन्तदेवाला उलट सुवर्णरत्नांची प्राप्ति झाली. ” ( ७,१७५ ) या वर्णनावरून तुर्कांचा या युद्धांत पूर्णपणें मोड झाला असला पाहिजे असें दिसतें. याविषयीं व्हिन्सेंट स्मिथनें आपल्या भरतखंडाच्या प्राचीन इतिहासांत लिहिलें आहे कीं “ तिच्या (दिद्दाच्या) संग्रामनामक भाच्याच्या कारकीर्दीत गिझनीच्या महंमुदानें काश्मीरावर स्वारी केली व तेथील सैन्याचा पराभव केला. तथापि

या देशाभोंवतालच्या पर्वतरूपी नैसर्गिक तटांमुळें त्याचें स्वातंत्र्य मात्र कायम राहिलें. ( पा. ३०९ प्रथम आवृत्ति ). " पण ही हकीगत राजतरंगिणीच्या विरुद्ध आहे. या हकीगतींतील संग्रामराजाच्या सैन्याच्या पराभवाचा संबंध आमच्या मतें वस्तुतः काश्मीरच्या राज्याशीं नसून काबूलच्या राज्याशीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें आहे. तुंगाबरोबर त्रिलोचनपालाच्या साहाय्यार्थ काबुलास पाठविलेल्या सैन्याचा मुसलमानांनीं पराभव केला. संग्राम राजाच्या कारकीर्दीत मसलमानांची स्वारी काश्मीरावर केव्हांहि झालीच नाहीं. सातम्लेंच्छ सरदारांनीं वर सांगितल्याप्रमाणें अनन्तदेव राज्य करीत असतां ब्रह्मराजाच्या फितुरीमुळें काश्मीरांत प्रवेश केला होता; पण पूर्ण पराजय पावून त्यांना माघारें जावें लागलें.

अनंतदेवाची राणी सूर्यमती जालंधराच्या राजाची कन्या होती. हीं राजाराणी दोघेंहि फार धार्मिक बुद्धीचीं होतीं. त्यांनीं आपलें नांव मागें रहावें म्हणून अनेक शिवालयें बांधिलीं, व ब्राह्मणांकडून निर्वेध वेदाभ्यास व्हावा म्हणून त्यांना .१०८ अग्रहारहि दिले. याच वेळीं माळव्याच्या भोज राजानें काश्मीर प्रान्तांत आपलें नांव राहण्यासाठीं एक मोठें कुंड बांधिलें असें सांगतात. यावरून या दोन्ही बड्या राजांमध्यें असलेला परस्पर स्नेह-संबंध दिसून येतो. सूर्यमती देवी आपल्या पतीला राज्यकारभाराचे कामीं पुष्कळ साह्य करी, व कांहीं प्रसंगीं सगळी जबाबदारी सुद्धां तिनें आपल्या अंगावर घेऊन राजाला धार्मिक व्रतें वगैरे करण्याला पूर्ण सवड द्यावी. त्याच्या धार्मिकपणाविषयीं लिहितांना ' भवभक्तिव्रतस्नान-त्यागशीलादिभिर्गुणैः । कृतिनाऽनन्तदेवेन मुनयोपि विनिर्जिताः ॥ ' असें कल्हणानें म्हटलें आहे ( ७,२०१ ). हिंदुस्थानच्या इतिहासांत फार करून न आढळणाऱ्या या सुखी राजदंपतीला पुढें पुढें मात्र अत्यंत दुःखाचे दिवस काढावे

लागले. राणीच्या आग्रहानें अनन्तदेवानें वृद्धपणीं कलश नांवाच्या आपल्या पुत्राला सिंहासनावर बसवून वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार केला. पण कलश दुर्व्यसनी निघाल्यामुळें त्याची बापानें त्याबद्दल कानउघाडणी केली असतां, त्या दुष्ट पोरानें त्याचा जीव घेण्याचाच प्रयत्न केला. वनवासांतील त्यांच्या आश्रमाला त्यानें एक दिवस गराडा घालून आग लावून दिली. तेव्हां त्यांतून तीं वृद्ध राजाराणी कशींबशीं बाहेर पडलीं, व देश सोडून जाण्याच्या तयारीस लागलीं. परंतु प्रजेनें आग्रह करून त्यांना तेथेंच राहवून घेतलें. त्यांनीं कलशाच्या हर्षनामक मुलाला जवळ बोलाविलें, व तोहि बापाला सोडून आपल्या वृद्ध पितामहाची सेवा करावयास त्यांच्याजवळ राहिला. पण निष्ठुर कलशानें त्यांचा छळ सारखा सुरूच ठेविल्यामुळें कंटाळून जाऊन एके दिवशीं अनन्तदेवानें आत्महत्या करून प्राणत्याग केला. सूर्यमतीला कलशाविषयीं इतकेंहि झालें तरी फार प्रेम वाटे, व ती नेहमीं त्याचाच पक्ष घेत असे. तथापि अशा स्थितींतही कलश आपल्या आईला चार समाधानाच्या गोष्टी सांगण्यासाठीं तिजकडे गेला नाहीं. सूर्यमतीला हा सगळा दोष कलशाचा नसून त्याला दुष्ट सल्ला देणाऱ्या मंत्र्यांचा आहे असें वाटे. म्हणून त्यांच्या नांवानेंच शिव्या शाप देत तिनें अनेक पतिव्रता हिंदु स्त्रियांप्रमाणें सती जाण्याचें ठरवून पतिप्रेतासमवेत आपल्याला जाळून घेतलें.

मातापितरांची अशी व्यवस्था लागल्यावर कलशानें हर्षाला परत यावयास सांगून अनंतदेवाची सर्व खासगी संपत्ति त्याच्या नांवानें मुद्रा करून निराळी ठेवून दिली. पित्याच्या मरणानंतर कलशानें आपलें दुर्मार्गगामित्व सोडून दिलें, व तो विचारपूर्वक राज्यकारभार पाहूं लागला. हर्षानेंहि त्याजवळ शांतपणें राहून व

अनेक विद्या संपादन करून सर्व भरतखंडांत मोठी कीर्ति संपादन केली असें तरंगिणींत म्हटलें आहे. सातव्या शतकांतील चक्रवर्ती हर्षाप्रमाणें हा हर्षहि स्वतः विद्वान् विशेषतः संगीतनिष्णात होता. त्याचीं काव्यें त्याच्या बापालाहि फार पसंत पडलीं. पण चक्रवर्ती हर्षाप्रमाणे या हर्षाचे दिवस सुखानें जावयाचे नव्हते. काश्मीर दरबारांतील मंत्र्यांनीं पितापुत्रांमध्यें भेद पाडण्याचा प्रयत्न चालू केला आणि तो कांहीं काळानें यशस्वी होऊन दुर्दैव-वश झालेल्या हर्षानें बापाविरुद्ध बंड उभारिलें.हें बंड लवकरच मोडलें गेलें व हर्षाला बंदिवास पत्करावा लागला. कारागृहांत असतांना त्याला अन्ना-बरोबर विष घालून मारण्याचाहि त्याच्या कांहीं सावत्र आयांनीं मंत्र्यांच्या साहाय्यानें प्रयत्न केला.पण हर्षाला त्याची वार्ता लागल्या-मुळें अन्न घेण्याचें त्यानें नाकारलें व बरेच दिवस उपास काढिले. अशा स्थितींत पुत्राच्या दुर्वर्तनाबद्दल बापाप्रमाणेच खेद करीत कलश राजा मरण पावला. मरतेसमयीं हर्षाला गादीवर बसवावें असें त्यांच्या मनांत आलें.परंतु नोनक नांवाच्या दुष्ट मंत्र्यानें मध्यें पडून त्याच्या उत्कर्ष नांवाच्या दुसऱ्याच मुलाला राज्य देवविलें. कलश राजा लौ. श. ४१४९त म्हणजे इ. स. १०७३ त मरण पावला. त्याच्या प्रजेचे प्रेम हर्षावरच सामान्यतः होतें. तथापि प्रजेला न जुमानतां उत्कर्षानें बरेच दिवस मन मानेल तसा कारभार केला. पण पुढें त्यांचा तिसरा भाऊ विजयमल्ल यानें वडील भाऊ हर्षाची बंदिवासांतून सुटका करण्याचें ठरवून पुष्कळ लोकांचें साहाय्य मिळविलें. त्याप्रमाणें त्यांचा प्रयत्न सिद्धीस गेला, व उत्कर्षाशीं त्यांचें युद्ध होऊन उत्कर्ष पराभव पावून मारला गेला. शेवटीं हर्षाची कारागृहांतून मुक्तता झाली व काश्मीरच्या राज्यावर तो अधिष्ठित झाला.

हर्षानें नंतर कांहीं काळ आपल्या धाकट्या भावाशीं या उपकाराबद्दल कृतज्ञ राहून व त्याशीं प्रेमानें वागून धर्मानें व न्यायानें राज्य केलें. त्यानें नोनक आदि करून उत्कर्षाच्या पक्षपाती लोकांना कारागृहांत ठेविलें हें सांगावयास नकोच. तथापि पुढें कांहीं दिवसांनीं त्यांनाहि त्यानें क्षमा करून आपल्या पूर्वीच्या अधिकारावर बसविलें.

हर्षाचा दरबार यापुढें विद्वान् पंडितांचें आश्रयस्थान झाला. त्यानें पंडितांना फारच औदार्य दाखविलें. तरंगणीकार त्याविषयीं म्हणतो "कलश राज्य करीत असतां काश्मीरांतून निघून जाऊन कर्नाटकांत पर्माडि विक्रमादित्याच्या आश्रयाखालीं जो विद्यापति झाला आणि ज्याचा हत्ती तेथील सैन्याच्या अग्रभागीं चालत असे त्या विल्हण पंडितालाहि हर्षाच्या औदार्याची वार्ता ऐकून व्यर्थ आपण काश्मीर सोडलें असें वाटलें" ( ७, ९३५-३७ ). विद्येंतील राजाची स्वतःची प्रगति सुद्धां वर्णनांतीत होती. त्याचा बहुतेक वेळ गाणें गाण्यांत व ऐकण्यांत, किंवा गायनाच्या चिजा रचण्यांत जात असे. तो दिवसा एक प्रहर झोंप घेऊन रात्रभर जागरण करी. हजारों दिव्यांच्या लखलखाटांत सभागृहांत बसून तो रात्रीच्या रात्री शास्त्रीय वाद करण्यांत किंवा नृत्य-गीतांत घालवीत असे. "त्याच्या सभेत कुबेर आणि यम या दोघांचेहि नित्य वास्तव्य असून दान व भय या दोहोंचा तेथें विहार चाले." ( ७, ९४८ ). इतकें असूनहि त्याची कारकीर्द शेवटीं दुःखप्रद होऊन मोंगलघराण्यांतील दारा शिकोप्रमाणें त्याचाहि अपेष्टेंत अंत झाला.

दरबारांतील कुटाळ माणसांचे भेद उत्पन्न करण्याचे प्रयत्न सारखे सुरू होतेच; त्याप्रमाणें हर्ष आणि विजयमल्ल यांच्यांतहि वितुष्टपणा आणण्याची कांहीं विघ्नसंतोषी माणसांची खटपट

होती, तिला दुर्दैवानें यश आलें. खरें पाहिलें तर ज्या ठिकाणीं राजपदाची प्राप्ति करून घेणें हें केवळ आंगच्या धाडसावर अवलंबून असतें, व जेथें त्यांत लोकांच्या इच्छेची कांहींच मातब्बरी नसते अशा एकतंत्री जुलमी पद्धतीच्या राज्यांत असले प्रकार घडून येणें हें अगदीं स्वाभाविक आहे. ज्याच्या अंगी अवश्य तेवढें सामर्थ्य व धाडस आहे व ज्याला पापपुण्याची फारशी क्षिति नाहीं असा मनुष्य संधि सांपडल्यास राजपदाचा अभिलाष अशा स्थितींत करणारच. विजयमल्लाच्या मनांत त्या कुटाळ लोकांनीं असें भरवून दिलें कीं, वस्तुतः सर्व राज्य त्याच्या घरांत चालत आलेलें असतां त्यानें आपल्या श्रमाचें फळ आपण भोगण्याचे सोडून चुकीनें तें हर्षाच्या गळ्यांत बांधिलें. या कानभारणीचा परिणाम होऊन विजयमल्लानें हर्षाविरुद्ध बंड केलें. पण त्याचा पराभव होऊन त्याला राज्यांतून निघून जावें लागलें. यानंतरचा हर्षाचा राज्यकारभार म्हणजे विजयमल्लाच्या पक्षाच्या लोकांचा अविच्छिन्न छळ व त्याबरोबरच प्रजेवरील जुलुम या स्वरूपाचा होता. दुधानें तोंड भाजल्यावर ताकहि कोणी मनुष्य फुंकून पितो, तशी हर्षाची अवस्था झाली. त्याचा स्वतःच्या भोजनामक पुत्रावरीलहि विश्वास उडाला, व त्यामुळें भोजहि दूरदेशीं पळून गेला. शेवटीं लोहर घराण्यांतीलच हर्षाच्या एका उच्छल नांवाच्या आतानें बंड उभारिलें, व हर्षाशीं युद्ध करून त्याचा पाडाव केला. हर्षाच्या सैन्याची दाणादाण होऊन राजधानी देखील उच्छलाच्या हातीं लागली. तेव्हां हर्षाच्या राण्यांनीं स्वतःस जाळून घेतलें, आणि तो स्वतः एका विश्वासू सेवकासह तेथून निसटून एका मठांत जाऊन लपून राहिला. पण उच्छलाच्या हेरांनीं तेथेंहि त्याचा पाठलाग करून मठाला वेढा दिला. त्यावेळीं मात्र हर्षाला पुढील ऋषिवचनाची

आठवण झाली. " प्रजापीडनसंतापात्समुद्भूतो हुताशनः । राज्ञः श्रियं कुलं प्राणान्नादग्ध्वा विनिवर्तते ॥ " प्रजांच्या छळणुकीमुळें उत्पन्न होणारा संतापाग्नि राजाचें वैभव, कुळ व शेवटीं प्राण यांची राखरांगोळी केल्याशिवाय विझत नाहीं !!! यावेळीं त्याला असेंहि समजलें कीं आपल्या या दुर्दशेबद्दल सूड घेण्यासाठीं आपला मुलगा परदेशाहून परत येत असतां तो सुद्धां वाटेंत युद्धांत मारला गेला. अशा रीतीनें चोहोंकडून निराशा झाल्यामुळें हर्ष वेढा घालणारांच्या अंगावर तुटून पडला, व त्या हल्ल्यांत तो मारला गेला. त्याच्या प्रेताचें दहन करावयास कोणी दयाळु पुरुष पुढें आला असतां त्याला मोठ्या नाखुषीनें उच्छलानें तसें करण्याची परवानगी दिली; व तिच्या अन्वयें हर्षाचें व त्याच्याबरोबर मारल्या गेलेल्या त्याच्या प्रयागनामक विश्वासू सेवकाचें अशा दोन्ही प्रेतांचें कोणा भिकाऱ्यांच्या प्रेतांप्रमाणें दहन करण्यांत आलें.

हर्षाच जन्मकालीन ग्रह दुर्योधनादि स्वकुटुंबघातकी पुरुषांच्या ग्रहांप्रमाणें* होते असें तरंगिणीकारानें लिहिलें आहे तो. लौ. श. ४१७७ त म्हणजे इ. स. ११०१ त भाद्रपद महिन्यांत मरण पावला; व तेव्हां त्याचें वय ४२ वर्षें ८ महिने इतकें होतें, असें

* हे ग्रह पुढील श्लोकांत दिले आहेत:–' चंद्रदैत्येज्यपापेषु खमदास्मज गतेषु च । आहुः सुसंहिताकाराः कौरवादीन्कुलान्तकान् ' ॥ कुंडलीत ते असे दिसतील.



कल्हण म्हणतो. पण कदाचित् तें याहून अधिक असावें. त्याच्या मृत्यूनें पहिल्या लोहर घराण्याचा अंत होऊन उच्छलाच्या सातवाहन घराण्याची काश्मीरांत स्थापना झाली. कल्हणानें इ. स. ११४८ त राजतरंगिणी लिहिली तेव्हां तेथें याच घराण्याचें राज्य चालू होतें. उच्छलानें इ. स. ११०१ पासून ११११ पर्यंत राज्य केलें, व त्याच्या मागून त्याचा भाऊ सुस्सल गादीवर आला. त्यानें इ. स. ११२८ पर्यंत राज्य भोगिलें. सुस्सलाची कारकीर्द एकंदरींत जोमाची झाली. पण मध्यंतरीं एकदां हर्षाचा नातू भिक्षु धारानगरीस तेथील राजाच्या आश्रयाला होता त्यानें त्याला कांहीं काळ गादी सोडावयास लाविलें होते, तथापि सुस्सलानें ती पुनः परत मिळविली व आपल्या अंतकालापर्यंत तिचा सुखानें उपभोग घेतला. त्याच्या मागें जयसिंह नांवाचा त्याचा सद्गुणी व सच्छील पुत्र राज्यारूढ झाला, व तोच कल्हणाचे वेळीं काश्मीरचा अधिपति होता. या शेवटच्या घराण्यांतील राजांचीं इतकी सविस्तर वर्णनें कल्हणानें दिलीं आहेत कीं त्यांनीं त्याच्या एकंदर ग्रंथाचा अर्धा भाग व्यापिला आहे. म्हणजे एकंदर ३००० वर्षांच्या इतिहासापैकीं अवघा ४७ वर्षांचा इतिहास या भागांत आला आहे. पण इतकें विस्तृत वर्णन सामान्य वाचकाला कंटाळवाणें, व हिंदुस्थानच्या स्थूल इतिहासाच्या जिज्ञासूंना अनवश्यक असल्यामुळें त्याचा अधिक विचार आपणास करावयास नको.

आतां कल्हणानंतरचा काश्मीरचा* इतिहास जातां जातां थोडा दिला पाहिजे. अंतस्थ कलहांनीं फाटाफूट झालेल्या स्थितींत

---

* दामोदर पंडित नांवाच्या एका विद्वान पंडितांनी पुढील काश्मीरचा इतिहास तरंगिणीच्या धर्तीवर लिहिण्यास सुरुवात केली होती. पण तो अपुरा राहिला.

काश्मीर प्रान्त लहानसें राज्य म्हणून पुष्कळ दिवस काळ कंठीत होता. इतक्या अवधींत हिंदुस्थानचा इतर बहुतेक भाग क्रमशः मुसलमानी अमलाखालीं येऊन बसला. शेवटीं इ. स. १३३९त काश्मीरच्या दक्षिणेकडून आलेल्या एका शहामीर नांवाच्या धाडशी मुसलमानानें काश्मीरच्या शेवटच्या हिंदुराजाच्या कोटानामक विधवा राणीला पदच्युत करून तेथें आपलें मुसलमानी घराणें चालू केलें. तेव्हां क्रमाक्रमानें महंमदी धर्मानें आपलें पाऊल तेथें कांहीं जुलमानें व कांहीं लोकांच्या खुषीनें रोवण्यास सुरुवात केली. तथापि ब्राह्मणांनीं तेथील आपलें वर्चस्व धर्मत्याग न करतांहि कायम ठेविलें, व विद्या आणि सरकारी महत्वाचीं कामें आपल्या हातून जाऊं दिलीं नाहींत. इतकेंच नव्हे तर आश्चर्याची गोष्ट अशी आहे कीं, अकबरानें इ. स. १५८६ त काश्मीर देश जिंकून त्याला आपल्या राज्यांतील एक सुभा बनवीपर्यंत तेथें संस्कृत भाषा हीच कांहीं फारशी व आरबी शब्दांच्या मिश्रणानें दरबारी भाषा म्हणून राहिली होती ( डॉ. स्टीनकृत राजतरंगिणी पु. १ प्रस्तावना. )

# प्रकरण ७ वें



## काश्मीर देशाची राजकीय स्थिति.

काश्मीरांतील राज्यव्यवस्थेची पद्धत सामान्यपणें भरतखंडाच्या इतर भागांत आढळून येत असल्याप्रमाणेंच होती. तथापि राजतरंगणीवरून त्यांतील ज्या कांहीं विशिष्ट गोष्टी दिसून येतात त्यांचा निर्देश स्वतंत्र रितीनें करावयास पाहिजे. काश्मीर प्रान्तांत प्राचीन कोरींव लेख म्हणजे ताम्रपट, नाणीं, शिलालेख इत्यादि सांपडले नसल्यामुळें राजतरंगणीवरून मिळणाऱ्या माहितीचें प्रत्यंतर पहावयाचें साधन उपलब्ध नाहीं ही दुःखाची गोष्ट आहे. काश्मीरच्या अनेक राजांनीं ठिकठिकाणीं शिवमंदिरें व विष्णुमंदिरें बांधून ब्राह्मणांना अनेक अग्रहारहि करून दिलेले होते. असें असतां त्याविषयींचे तत्कालीन लेख सांपडत नाहींत याचें आश्चर्य वाटतें. तथापि पूर्वी सांगितल्याप्रमाणें स्वतः कल्हणानें राजतरंगिणी लिहितांना पूर्वींच्या बखरी आणि दानपत्रादि लेख यांचा उपयोग केला आहे असें त्याच्याच लिहिण्यावरून दिसतें व तो दरबारांतील मोठा अधिकारी असल्यामुळें त्याला तीं साधनें चांगलीं सुलभहि होतीं यांत शंका नाहीं. म्हणून त्याचें लिहिणें बऱ्याच अंशीं विश्वसनीय मानण्यास हरकत नाहीं. यास्तव काश्मीरच्या राज्यव्यवस्थेचें स्वरूप त्याच्या ग्रंथावरून कसें दिसून येतें हें येथें पाहूं.

इतर सर्व ठिकाणांप्रमाणें अर्थात् काश्मीरचेंहि राज्य एकतंत्री-राजसत्तात्मक होतें हें सामान्यपणें समजण्यासारखें आहेच. ब्राह्मणाकडून शास्त्रोक्त अभिषेक होऊन सिंहासनाधिष्ठित झालेल्या राजाची सत्ता नेहमींच अमर्याद असे. धार्मिक विधींमुळें म्हणजे एका अर्थी प्रत्यक्ष परमेश्वरापासूनच ती त्याला मिळालेली असून त्याला ब्राह्मणांची अभिषेक ही साक्ष, अशी समजूत असल्यामुळें

त्याच्या अधिकाराचेहि नियमन करणारी ऐहिक सत्ता मुळीं उरत नसे. या देशांतील राजे क्षत्रिय, वैश्य अथवा ब्राह्मण यांपैकीं कोणत्या तरी जातीचे असत. पण त्यांची मूळ जात कोणतीहि असली तरी एकदां राजपद प्राप्त झाल्यावर हिंदुस्थानच्या इतर कोणत्याहि राजघराण्याशीं त्याचे शरीरसंबंध सुरू होत, व अशा रीतीनें ते शेवटीं व्यवहारांत क्षत्रिय बनत. या राजांपैकीं बहुतेक राजे शूर व विद्वान् असे दोन्ही असत. काश्मीरच्या इतिहासांत नेभळट भित्रे व अशिक्षित असे राजे मुळींच आढळत नाहींत. त्यांची न्यायदानांतील पद्धति निःपक्षपाताची असे. पण एरवीं द्रव्यलोभानें त्यांना फार पछाडलेलें असल्यामुळें प्रजेवर द्रव्याच्या बाबतींत बराच जुलूम होई. त्यांचें खासगी वर्तन अत्यंत स्वैर व दुर्व्यसनात्मक असे. पूर्वजन्मीं केलेल्या दुर्धर तपश्चर्येचें फळ म्हणून या जन्मीं राजपद मिळतें या कल्पनेमुळें आपला या जगांतील अवतार मिळतील तितके भोग भोगून घेण्यासाठींच आहे असें ते समजत, व तदनुसार सारासार विचार सोडून ते विषयभोगाच्या पराकाष्ठेला जात. उत्तमोत्तम म्हणून मानिलेल्या काश्मीर राजांच्याहि अंतःपुरामध्यें शेंकडों विवाहित सुंदर स्त्रिया, व त्याचप्रमाणें आणखी कित्येक नाटकशाळा यांचा भरणा असे, व त्यांच्या संगतींत ते विषयांत यथेष्ट विहार करीत. याला एकपत्नीक अनन्तदेवाचा मात्र अपवाद दिसतो. असला विषयोपभोगाचा प्रकार काश्मीर राजांतच विशेषतः आढळत असून त्याचा प्रचार इतर प्रांतांत इतका नव्हता. कदाचित् कल्हणाप्रमाणें इतर प्रांतांना इतिहासकारच चांगला न मिळाल्यामुळें तेथील खरा प्रकार बाहेर आलेला नसेल. तथापि एकंदरींत या बाबतींत काश्मीर राजांचें इतर हिंदी राजांपेक्षां मुसलमानी व रोमन पादशहांशींच अधिक साम्य दिसतें. एतद्विषयक खिस्ती धर्ममताचा जो सुपरिणाम खिस्ती राजांच्या

इतिहासांत दिसून येतो तो वाखाणण्यासारखा नाहीं असें कोण म्हणेल ? काश्मीर राजांच्या असल्या दुर्वर्तनाचें अनुकरण तेथील अनेक राण्यांनीं देखील पति जिवंत असतांना व वैधव्य स्थितींत अशा दोन्ही वेळां केलेलें तरंगणीवरून दिसून येतें. तथापि सच्छील व कडक प्रतिव्रता स्त्रियांची उदाहरणेंहि त्यांत कांहीं कमी नाहींत. पण या बाबतींत विशेष आश्चर्याची गोष्ट अशी आहे कीं, सद्वर्तनी व दुर्वर्तनी अशा दोन्ही प्रकारच्या राण्या आपल्या मृत पतींबरोबर सती गेल्याचीं उदाहरणें कल्हणानें दिलीं आहेत.आंतून कसें असलें तरी बाह्यात्कारीं लोकांकडून बरें म्हणवून घेण्याची जी उत्कट इच्छा जगांत सर्वत्र दिसून येते तिचाच हा परिणाम असला पाहिजे.

राज्यकारभाराचे कामीं सल्लामसलत देण्यासाठीं राजा स्वेच्छेनुसार मंत्रिमंडल नेमीत असे.हे मंत्रि बहुधा कर्तृत्ववान् पण बऱ्यावाईटाची क्षिति न बाळगणारे असेच दिसतात. तथापि काश्मीरी लोकांच्या एकंदर बुद्धिमत्तेचें चित्र या मंत्र्याच्या कारभारांत स्पष्ट उमटलेलें दिसतें. काश्मीरांतील निरनिराळ्या मंत्र्यांचीं नांवें इतर प्रान्तांपक्षां जरा निराळीं दिसतात. मंत्रिमंडळांत कोणी मुख्य मंत्री म्हणून असे असें दिसत नाहीं; व इतर देशांत देखील हाच प्रकार आढळून येतो. पण काश्मीरांत द्वाराधिप पदवीच्या मंत्र्याचें विशेष महत्त्व दिसतें. इतर ठिकाणच्या महाप्रतिहारीच्या दर्जाचा हा मंत्री असून राजाची भेट करवून देण्याचें काम त्याच्या हातांत असे ( ८,५७४ ). दुसरा एक मंत्री कंपनाधीश नांवाचा असे. त्याचें काम काय असावें हें नीट समजत नाहीं. पण बहुधा तो लष्करी खात्याचा मुख्य असावा. ( ८।५७६ ). तिसरा मंत्री नगराधीश नांवाचा असून तो राजधानीवरील मुख्य अधिकारी होता. (५।५८० ). यांशिवाय एक मुख्य कोशाधिकारी, व सांधिविग्रहिक म्हणजे परराष्ट्रीय प्रधान, असे आणखी दोन मंत्री असत. हे

शेवटचे दोन मंत्री इतरहि सर्व राज्यांतून आढळतात. याखेरीज आणखी गंजाधिकारी म्हणजे आमच्या मतें बहुधा बाजारांवर देखरेख करणारा एक अधिकारी होता. राजे, राण्या, व केव्हां केव्हां प्रधानहि आपापल्या नांवानें नवीन नवीन बाजार बसवीत. या ठिकाणीं देवघेव व इतर व्यापार चालत असल्यामुळें या अधिकाऱ्याकडे व्यापार-नियमनाचे व सायर म्हणजे जकात वसूल करण्याचें महत्वाचें काम होतें. या मंत्रिमंडळावर राजाची पूर्णसत्ता असून त्यांना नेमणें किंवा काढून टाकणें हें सर्वस्वीं त्याच्याच मर्जीवर असे. वरील मंत्र्याशिवाय अक्षपटलाध्यक्ष म्हणजे जमीन महसुलाच्या खात्यावरील एक मुख्य अधिकारीहि असे. या अधिकाऱ्यापैकीं कोणीहि तत्वतः वंशपरंपरागत नसत. तथापि त्यांपैकीं कोणत्या तरी ठिकाणीं माजी मंत्र्यांच्या पुत्रांचीच नेमणूक होत असे.

सरकारी अधिकाऱ्यांपैकीं तिरस्करणीय म्हणून मानलेला वर्ग म्हणजे कायस्थांचा होता. काश्मीरांत कायस्थांची स्वतंत्र जात होती कीं काय हें कांहीं सांगतां येत नाहीं. बऱ्या अधिकाराचीं सर्व कामें ब्राह्मण किंवा क्षत्रिय जातींतील पुरुषांकडेच बहुधा असत; व कायस्थ म्हणजे आमच्या मतें कोणती विशिष्ट जात नसून जमीन महसूल खात्यांतील खालच्या अधिकाऱ्यांना हे सामान्य नांव होतें. कल्हणानें त्यांना लोभिष्ट, कृतघ्न इत्यादि निन्दाव्यंजक शब्द लाविलेले आहेत. पण जुलमी राजांना कोणी तरी अधिकारी जुलुम करण्यास सहाय करणारे मिळावयाचेंच हे लक्षांत घेतां हा दोष मुख्यतः राजांवरच पडतो. असो, हे वसुली अधिकारी, लष्करी अधिकारी, व तंत्रि नांवाचे सैनिक हे बहुधा द्रव्यलोभी व लांचखाऊ असून, लांच शब्दाचा वाचक जो संस्कृत उत्कोच शब्द त्याचा प्रयोग या कारणास्तव तरंगणींत अनेकवार आलेला आहे.

कल्हणानें वरील खात्यांशिवाय आणखी कर्मस्थान म्हणून एक खातें सांगितलें आहे; व त्यावरील अधिकारी फार महत्वाचा समजला जाई. हें खातें आजच्या पब्लिक वर्क्स खात्यासारखें असावेंसें वाटतें. म्हणजे सार्वजनिक इमारती, देवळें, मठ, विहार, इत्यादि बांधण्याचें काम त्याच्याकडे असून तें सर्वस्वीं खर्चाचें खाते असल्यामुळें द्रव्यापहार करणाऱ्याला त्यांत पुष्कळ सवड असे.

प्राचीन काळाप्रमाणेंच या मध्यकाळांतहि राजदरबार म्हणजेच न्यायमंदिर असे; व तेथें प्रत्यहीं राजेलोक अर्थीच्या ह्मणजे फिर्यादी माणसांच्या तक्रारी ऐकून कळकळीनें न्यायदानाचें काम करीत असत असें वर्णन केलेलें आढळतें. त्याठिकाणीं येणाऱ्या विवादांची म्हणजे खटल्यांची चौकशी स्थेयांच्या म्हणजे ठराविक पंचाच्या साह्यानें राजा करी, जर हे पंच पक्षपात करणारे आहेत असें त्याला आढळलें, तर तो कांहीं चमत्कारिक क्लृप्ति काढून सत्य बाहेर काढण्याचा प्रयत्न करी. एका मनुष्यानें दुसऱ्या जवळ कांहीं ठेव ठेवावयास दिली असतां तिचा ती घेणारानें अपहार केल्याबद्दलच्या एका खटल्यांत राजानें मोठ्या चातुर्यानें खरा प्रकार उघडकीस आणिला असें तरंगिणींत सांगितलें आहे. त्यानें त्या ठेवीच्या द्रव्याच्या थैलीवरील मुद्रा तपासून आंतील नाण्यावर ज्या राज्यांचीं नांवें होतीं ते राजे ठेव ठेवण्यावेळीं गादीवरहि नव्हते असें सर्वांच्या नजरेस आणून अपहार करणाऱ्यावर आरोप सिद्ध केला. या गोष्टीवरून प्रत्येक राजा गादीवर आल्यावर आपल्या नांवाचीं नाणीं पाडीत असे असेंहि दिसून येतें, या नाण्यांना दीन्नार असेंच सामान्यतः म्हणत असत, व तें सोनें, चांदी व तांबें या धातूंचे असत. सरकारी कामगारांना रोज तांब्याचे अमुक दीन्नार असें ठरवून वेतन देण्यांत येई. एका कवीला रोज एक लक्ष दीन्नार*

* यांतील न्न द्वित्त आहे.

वतन होतें अशा विषयीं वर्णन पूर्वी आलेंच आहे, तें अर्थातच अतिशयोक्तीचें आहे; पण दिवसांच्या हिशोबानें वेतन देण्याची पद्धत त्यावरून दिसून येते.

नित्य नेमानें राजाला न्यायसभेच्या प्रमुखस्थानीं बसण्याला सवड नसल्यामुळें अशा प्रसंगीं सभेचें काम चालविण्यासाठीं राजस्थानीयाची म्हणजे उपाध्यक्षाची योजना केलेली असे. राजस्थानीय शब्दाचे सर न्यायाधीश असे डॉ. स्टीननेंहि भाषान्तर केलें आहे (७।५७३). सर्व राज्य मिळून कारागृहांवर देखरेख करणारा दण्डनायक नांवाचा एक अधिकारी असे. येथपर्यंत नामनिर्देश केलेले सर्व अधिकारी, प्रसंगीं त्यांना युद्धालाहि जावें लागत असल्यामुळें, शस्त्रास्त्र–विद्या शिकलेले लढवय्ये असत. राजा आपल्या इच्छेनुसार त्यांना बंडखोरांविरुद्ध मोहिमेवर पाठवीत असल्यामुळें त्यांना सेनाध्यक्षाचेंहि काम करावें लागे. महत्वाच्या प्रसंगीं राजा सेनापतीचे काम अर्थात् स्वतःच करीत असे.

काश्मीरच्या राज्याचे कांहीं पोटभाग असून त्यांना राज्य अशी संज्ञा होती. तरंगणींत त्यापैकीं मडवराज्य व क्रमराज्य हीं नांवें अनेकवार आलीं आहेत. त्यांवरील अधिकारी कोणी तरी बहुधा राजाचे आप्तसंबंधी असत. इतरत्रसारख्या तालुके तहशिली काश्मीरांत नव्हत्या व वसुलाचें व्यवस्थेसाठीं सर्वांत लहान घटक म्हणजे ग्रामच समजत असत. तरंगणींत ग्रामाधिपतींचा जरी स्पष्ट उल्लेख नसला तरी ते त्यावेळीं असलेच पाहिजेत. गांवचे हे अधिकारी बहुधा डामर लोकांपैकीं कोणी असत. हे डामर शूर लढवय्ये व त्यामुळें राजाला वारंवार जाचक असे लोक असल्यामुळें त्यांना शूलारोपणादि कडक शिक्षा देऊन नेहमीं धाकांत ठेवावें लागे. तथापि लष्करभरतीच्या वेळीं खुषीनें येऊन राजाला मदत करणारेहि हेच

असत. जमिनीवरील उत्पन्नाचा सरकारी भाग पैशाच्या रूपानें न घेता इतर ठिकाणांप्रमाणेंच येथेंहि धान्य रूपानेंच घेत असत.

वर सांगितलेल्या अधिकाऱ्यांशिवाय दिविर नांवाच्या अधिकाऱ्यांचा काश्मीरच्या इतिहासांत उल्लेख आढळतो. त्यांचें काम काय असावें याचा आम्हाला पत्ता लावतां आलेला नाहीं. पण डॉ. स्टीननें त्यांना लेखक किंवा चिटणीस म्हणून मानिलें आहे. या दिविरांचा निर्देश वलभीच्या दानलेखांत देखील आलेला आहे. त्यांच्या प्रमाणेंच तंत्री व एकांग या लढाऊ कामगारांचेंहि स्वरूप कांहीं समजत नाहीं. काश्मीराखेरीज या दोन नांवांचा उल्लेख कोठें आढळत नाहीं. त्यांपैकीं एकांग हे महाराष्ट्रांतील एकांडे असावेत काय? अथवा फिरिस्त्यानें सांगितलेले एका शस्त्रानें लढणारे म्हणजे संरक्षण व हल्ला अशीं दोन्ही कामें एका तरवारीनेंच करणारे मुसलमान यकंगबाज आहेत? काश्मीरच्या राज्यांत लोहर, उरश, व राजपुरी हीं मांडलोक संस्थानें होतीं. इ. स. ६३० तहि तीं काश्मीरचींच मांडलिक होतीं, असें ह्युएनत्संगाच्या लिहिण्यावरून दिसतें. कलश राजाच्या वेळीं इ.स. १०८७त त्याच्या भेटीला एकदां आठ राजे एक वेळीं काश्मीरास आले व त्या प्रसंगीं मोठा उत्सव झाला. त्या प्रसंगीं वामन नांवाच्या मंत्र्यानें त्या मांडलिकांच्या स्वागताची उत्तम व्यवस्था ठेवून कोणतेंहि उणें पडूं दिलें नाहीं असें वर्णन आहे. हे आठ राजे म्हणजे अब्बपुरचा किर्तिनी, चंपा येथील आसट, बल्लापुरच्या तुकराजाचा पुत्र कलश, राजपुरीचा संग्रामपाल, लोहरचा उत्कर्ष, उरशच्या मुंगराजाचा पुत्र, कन्देश येथील गम्भीरसिंह आणि काष्ठवाटचा उत्तमराज हे होत. हे देश म्हणजे काश्मीरच्या सरहद्दीवरील बारीक बारीक संस्थानें होत. काश्मीरच्या राजघराण्याशीं तेथील राज-

घराण्यांचे शरीरसंबंध अनेक वेळां होत. पण या संस्थानाचें निश्चित स्थळ मात्र आज सांगतां येत नाहीं.

वरील राज्यांशिवाय काश्मीरला लागून असलेलीं दुसरीं स्वतंत्र राज्येंहि होतीं. त्यांपैकीं दक्षिणेस गूर्जर, पश्चिमेस काबूलचें शाहि, उत्तरेस तुरुष्क आणि पूर्वेस दरद हीं प्रसिद्ध असून पूर्वीं त्यांचा उल्लेख आलाच आहे. हें शेवटचें दरद किंवा दरद्चें राज्य व काश्मीर यांत नेहमीं युद्ध-प्रसंग होत असत असें दिसतें. त्यांचा मुलूख काश्मीरच्या पूर्वेस असावा, पण त्या लोकांविषयीं निश्चित कांहीं आम्हाला सांगतां येत नाहीं.

काश्मीर देश पहिल्यापासून विद्येविषयीं प्रसिद्ध आहे. तेथील राजे पंडितांचे मोठें आश्रयदाते असत. या ठिकाणीं अनेक पाठशाला असून त्यांच्या वृत्तीसाठीं राजांकडून अग्रहार म्हणजे इनाम गांवें दिलेलीं असत. हल्लींच्या विद्यापीठांप्रमाणेंच त्यांची तेव्हां योग्यता असून त्यामुळें त्यांना राजाश्रयहि चांगला असे. काश्मीरी पंडितांची ख्याति सर्व हिंदुस्थानभर असे. त्यांच्या नांवांत एक विशेष आढळतो, तो असा कीं, त्यांच्या शेवटीं ट किंवा ण हीं अक्षरें नेहमीं येतात. उद्भट, मम्मट, लवट, कल्लट, तशींच कल्हण, बिल्हण, सल्हण इत्यादि नांवें पूर्वीं आलींच आहेत. आज हीं काश्मीरी नांवें जरा चमत्कारिक अशीं कानाला लागतात खरीं, पण तीं कांहीं मूळचीं तुर्की किंवा दुसऱ्या बाहेर देशचीं नव्हत.

# टीप्पणी.

## १–काश्मीर राजांच्या वंशावळी.

### १ लें कर्कोटक घराणें:—

दुर्लभवर्धन इ. स. ६०१ ते ६३७ ( ३६ वर्षे )

दुर्लभक ( पुत्र ) इ. स. ६३७ ते ६८७(५० वर्षे)

- चंद्रापीड ६८७–६९५ (८ व.).
- तारापीड ६९५–६९९ (४ व.).
- मुक्तापीड ऊर्फ ललितादित्य. ६९९ ते ७३५ (३६व.).
  - कुवलयापीड ७३६ (१ वर्ष)
    - संग्रामापीड ७४३–७५० ( ७ वर्षे )
    - ललितापीड, चिप्पटजयापाड ऊर्फ बृहस्पति.
      - उत्पलापीड
      - अजितापीड
        - अनंगापीड ( याला उत्पलाचा पुत्र अवन्तिवर्मा याने पदच्युत करून गादि बळकाविली. स. ८५५ )

        (हे सर्व अल्पवयी असून चिप्पटाचा मामा उत्पल याच्या हातांत सारी सत्ता होती.)
  - वज्रापीड (७ वष) ७३६–७४३.

### २ रें उत्पल घराणें.

अवन्तिवर्मा इ. स. ८५५ ते ८८४ ( २९ वर्षे )

शंकरवर्मा इ. स. ८८४ ते ९०२ ( १८ वर्षे )

- गोपालवर्मा (अल्पवयी)
- संकटवर्मा (अल्पवयी)

(यांचा कारभार त्यांची आई सुगन्धा पहात असे. स. ९०२ते९०४)

## ३ रें घराणें वीरदेवाचा वंश.

यशस्करदेव इ. स. ९४० ते ९४८ ( ८ वर्षें )

|

संग्रामदेव ( १ वर्ष ) स. ९४९.

---

## ४ थें घराणें दिविर वंश.

पर्वतगुप्त इ. स. ९५० ते ९५८ (८ वर्षें)

|

क्षेमगुप्त स. ९५८ ते ९७२ (याची राणी भीमशाहाची नात दिद्दा)

|

अभिमन्यु ९७३

|

नंदिगुप्त ९७५ | त्रिभुवनगुप्त ९८० | भीमगुप्त

} यांचा कारभार दिद्दा पहात असे. व त्यांच्या मागून स. १००३ पर्यंत तिने स्वतः राज्य केलें

---

## ५ वें घराणें लोहरवंश.

१ ली शाखा

संग्रामराज स. १०२९ ( दिद्दाचा भाचा )

|

अनंतराज स. १०५९

|

कलश स. १०७९

|

हर्ष ११०१ | उत्कर्ष १०८९

हर्ष → भोज ( मारला गेला )

|

भिक्षु स. ११२०

२ री शाखा

( मल्ल )

|

उच्चल स. ११११ | सुस्सल स. ११२८

सुस्सल → जयसिंह

( हा कल्हणानें स. ११४८ त राजतरंगिणी लिहिली तेव्हां काश्मीरच्या सिंहासनावर होता.

## २–काश्मीरसंबंधीं कांहीं लक्षांत ठेवण्यासारख्या गोष्टी.

१. काश्मीरप्रांत हिमालयाच्या दोन दुर्लंघ्य पर्वतराजींच्या मधील विस्तीर्ण दरींत वसलेला आहे. वितस्तानामक नदी त्या दरींतून वहात असून ती एका अरुंद खिंडीवाटे पंजाबच्या सपाट प्रदेशांत उतरते काश्मीरच्या दरींत प्रवेश करण्याचें महाद्वार हेंच होय. या द्वारामुळें काश्मिरी लोकांना परकीय लोकांचा अन्तःप्रवेश इतका बंद करतां येतो कीं, द्वारें लावून घेतलेला तो एक प्रचंड किल्लाच आहे कीं काय असें वाटतें. इतर प्रान्तांनीं ज्याप्रमाणें परकीयांना आपल्या येथें खुशाल येऊं दिलें, तसें काश्मीरनें न करतां त्यांना बाहेरचे बाहेर ठेवण्याची अवश्य ती काळजी घेतलेली आहे. ललितादित्यानें गौड राजाचा वध केल्यावर त्याचा सूड घेण्यासाठीं जे गौड काश्मीरांत आले ते शारदा देवीच्या दर्शनाच्या मिषानें आले असें पूर्वीं वर्णन आलेंच आहे. एरवीं त्यांना कोणी आंत जाऊं देता ना. या वराहमूळाजवळील* महाद्वाराशिवाय दुसरीं तीन चार लहान द्वारेंहि त्यांत जाण्यासारखीं आहेत; पण तींहि नित्य बंदोबस्तांत राखिलेलीं असत.

२. काश्मीरदरीच्या बहुतेक मध्याजवळ वितस्ता नदीला दुसरी एक सिंधु नांवाची नदी येऊन मिळते. ही सिन्धु सुप्रसिद्ध मोठया सिन्धु नदीहून निराळी आहे; व तिला काश्मीरची गंगाच समजतात. फार काय पण वितस्तासिन्धुसंगम हें काश्मीरांतील मोठे क्षेत्र असून तिकडे त्याला प्रयाग म्हणतात, व गंगायमुनांच्या संगमाजवळील सुप्रसिद्ध प्रयागा इतकेंच त्यालाहि पवित्र मानितात या तीर्थाजवळ ललितादित्यानें आपलें परिहासपुर नामक नगर वसविलें होतें. पण तें आज अस्तित्वांत नाहीं. काश्मीरांतील तिसरी महत्त्वाची नदी कृष्णा नांवाची असून तिला हल्लीं किसन-गंगा म्हणजे कृष्णगंगा म्हणतात, व ती वितस्तेला पुढें दरीच्या तोंडाजवळ मिळते.

३. श्रीनगर हें काश्मीरच्या राजधानीचें शहर असून फार प्राचीन आहे. याचा जुना भाग आजहि दिसत असून तो अशोकानें वसविला असें म्हणतात. नवीन शहर प्रवरसेन नांवाच्या राजानें इ. स. ५५० च्या सुमारास

---

* याचें हल्लींचें नांव बारामूला असें आहे.

म्हणजे ह्युएनत्संग इकडे येण्यापूर्वी (स. ६३०) कांहीं वर्षे वसविले व म्हणून त्याला प्रवरपुर हें नांव होतें. परिहासपुराच्या जरा वरच्या बाजूला वितस्तेच्या दोनी कांठांवर हें वसलेलें आहे व त्याच्या या दोन भागांतील दळणवळणासाठीं नदीवर अनेक ठिकाणीं होड्यांचे पूल केलेले आहेत.

४. काश्मीरांत केशर उत्पन्न होतें (व म्हणून केशराला संस्कृतांत काश्मीरज असें नांव आहे) हे प्रसिद्धच आहे. याशिवाय तेथील दुसरे मोठें उत्पन्न म्हणजे तांदुळाचें. तेथें प्राचीन काळीं सर्व देवघेवीचे साधन तांदूळच होते. जमिनीवरील सरकार देणें लोक तांदुळांच्या रूपानेंच देत, व सरकारी नोकरांनाहि वेतन त्याच रूपानें मिळे. अर्थात् सरकारापाशीं त्यावेळीं तांदुळांचे मोठ मोठे सांठे असत. इतर लोक सुद्धां आपल्या नोकराचाकरांना वतनाबद्दल तांदूळ देत व दुसऱ्या लागणाऱ्या वस्तु घेण्यासाठीं उलट तांदूळच किंमत म्हणून देत. या वर्णनावरून कोंकणपट्टींतहि पूर्वी कशी स्थिति असे याची बरोबर कल्पना येईल. ब्रिटिश अंमल सुरू झाल्यापासून अर्थात त्याला नवें स्वरूप आलें आहे. या बाबतींत काश्मीर प्रांत म्हणजे कोंकण प्रांताची प्रतिमाच होय.

५. दुसऱ्याहि एका गोष्टींत काश्मीर प्रांताचें कोंकणपट्टीशीं साम्य आहे तेथील उच्च नीच वगैरे सर्व जातीचे लोक तांदूळांवरच रहात असल्यामुळे फार बुद्धिमान आहेत. दोन्ही प्रांतांतील कनिष्ठ जातीचे लोक मूळ अनार्य असून ब्राह्मण, क्षत्रिय व कायस्थ या जाती आर्य होत. हे आर्य बुद्धिमान, दिसण्यांत सुरेख, पण ह्युएनत्संगानें सांगितल्याप्रमाणें कपटी आहेत. दोन्ही ठिकाणचे ब्राह्मण सारखेच प्राचीन मताभिमानी व धार्मिक वृत्तीचे आहेत. काश्मीरी लोक जसे सर्व उत्तर हिंदुस्थानभर पसरले आहेत, त्याप्रमाणें कोंकणी लोक सर्व दक्षिण हिंदुस्थानांत पसरले आहेत. व विशेष आश्चर्याची गोष्ट अशी कीं, पंडित ही पदवी उत्तर हिंदुस्थानांत हल्लीं केवळ काश्मिरी व दक्षिणी ब्राह्मण लोकांना मात्र लावतात. या गोष्टीवरून दोन्ही ठिकाणच्या ब्राह्मणांची विद्वत्ते बद्दलची ख्याति दिसून येते.

६. काश्मीरी नाण्याचें नांव दीन्नार होतें हें मागें सांगितलेंच आहे. रोमन नाण्याच्या 'देनारिस' या नांवावरून तो शब्द आलेला आहे. त्याचें

मूळ शकांमार्फत इकडे आलें. पण येथें आल्यावर सोनें, चांदी व तांबें अशा तीन्ही धातूंचे दीन्नार पाडण्याची वहिवाट पडली; व सर्वांना एकच नांव राहिलें; इतकेंच नव्हे तर तांब्याच्या नाण्याहून देखील फार हलकी अशी एक किंमत ठरवून तिलाहि दीन्नार असें मोघम नांव ठेविलेलें होतें असे दिसतें. यूरोपीय विद्वानांनीं आपल्या अविश्रांत श्रमाच्या जोरावर काश्मीरांतील पुष्कळ जुनीं नाणीं जमवून त्यांच्या धातूची व वजनाची परीक्षा केली आहे. उद्भटासारख्या कवींना किंवा रुद्रपालासारख्या पदच्युत राजपुत्रांना प्रत्यही वेतन म्हणून मिळत असलेल्या लक्ष दीन्नारांची जी कथा कल्हणाने सांगितली आहे तिचें योग्य स्पष्टीकरण डॉ. स्टीनने केलें आहे. तें असें की, त्या लोकांनीं अत्यंत लहान किंमतीचें काल्पनिक प्रमाण ठरवून त्या मानाने दशांश पद्धतीने गणना करण्याची चाल ठेविली. या गणनेंतील पंचविंशति, शत, सहस्त्र इत्यादि शब्दांबद्दल काश्मीरांत हल्लीं पचीस, हठ, सिस्नु इत्यादि परिमाणवाचक शब्द रूढ आहेत. म्हणजे नाण्यांच्या किंमतींचीहि दशांश पद्धतीने गणना करण्याची मूळ कल्पना काढिल्याचें श्रेय बुद्धिमान् काश्मीरी लोकांनाच दिले पाहिजे. या पद्धतीप्रमाणें प्रत्यक्ष व्यवहारांत जरी तांदुळांनी सर्व देवघेव होत असे, तथापि त्याच्या किंमतीची गणना त्या अत्यल्प काल्पनिक प्रमाणाच्या मानानें सहस्त्रांनीं, किंवा शतांनीं करतां येत होती. (अकबराच्या वेळीं हीच पद्धतो दिसली. )'

७. काश्मीरांतील ग्रामांची संख्या डॉ. स्टीननें ६६०६३ अशी दिली आहे. हिंदुस्थानांत प्राचीन काळीं सर्व देशांतील ग्रामसंख्या परंपरागत ठरलेली असे. उदाहरणार्थ तीन महाराष्ट्रांमिळून ९९००० ग्रामसंख्या असल्याचें वर्णन पूर्व भागांत आलेंच आहे. काश्मीरच्या क्षेत्रफळाचा विचार करतां ६६०६३ ही ग्रामसंख्या फार मोठी दिसते. पण ही परंपरागत संख्या स्कंदपुराणाच्या माहेश्वर खंडाच्या ३९ व्या अध्यायांतहि आली असून तेथे हिंदुस्थानांतील निरनिराळ्या देशांचीं नांवें दिलीं आहेत, व त्यांतील पृथक् पृथक् ग्रामसंख्याहि सांगितली आहे. काश्मीरची ग्रामसंख्या या स्कन्द पुराणांतील उल्लेखाप्रमाणें ६६००० आहे. या संख्येंत सर्व नगरांचाहि

अन्तर्भाव केलेला असून एकेका नगराबद्दल कांही गांवें असे कोष्टक बहुधा मानिलेलें असावें.

८. काश्मीर देश आणि काश्मीरी लोक यांचे कोंकणप्रांत व तेथील लोक यांशीं असलेलें साम्य पूर्वीं दाखविलें. आतां त्यांमध्ये असलेला एक दोन महत्वाच्या बाबतीतला विरोधहि सांगितला पाहिजे. प्रथम काश्मीरी लोक प्राचीन काळापासून मांसाहारी असून अजूनहि त्यांनीं मांसाहार वर्ज केलेला नाहीं. पण कोंकणस्थ लोक बऱ्याच काळापासून शुद्ध शाकाहारीच आहेत. दुसरी गोष्ट म्हणजे काश्मीरी ब्राह्मणांची दाढी ठेवण्याची चाल होय. कोंकणस्थांत दाढी ठेवीत नाहीत. काश्मीर लोकांची ही चाल जुनी म्हणजे मुसलमानांच्या पूर्वीं पासूनचीच आहे; आणि यशस्कराला राजा म्हणून निवडण्याचे प्रसंगाचे जे वर्णन कल्हणानें केले आहे, त्यांत त्यांच्या यज्ञाग्नीच्या धुरानें मळलेल्या कूर्चाचा स्पष्ट उल्लेख आहेच.

## ३.–कर्कोटक घराण्यांतील राजांचा कालक्रम.

डॉ. स्टीनने काश्मीरच्या इतिहासाचे तीन भाग करून पहिल्यांत पुराण कालापासून कर्कोटकवंशापर्यंतचे राजे, दुसऱ्यांत कर्कोटकवंश, आणि तिसऱ्यांत त्यानंतरचे वंश असे घातले आहेत. यांपैकीं पहिल्या भागांतील कालक्रम राजतरंगिणींत कसा तरी अनमान धपक्याचा दिला असल्यामुळे तो विश्वसनीय नाही. पण कर्कोटकोत्तरकालीन कालक्रम त्यांत बरोबर सांगितला आहे. मात्र मधल्या कर्कोटक राजांच्या काळांत स्टीन व इतर विद्वानांच्या मताप्रमाणें २५ वर्षांचा फरक केल्यास तोहि बहुतेक विश्वसनीयच आहे. हा २५ वर्षांचा फरक चिनी इतिहासांत काश्मिरी राजांचे जे उल्लेख आहेत त्यांच्या आधारावर पंडितांनीं काढिलेला आहे. उदाहरणार्थ, चंद्रापीडाचा राज्यकाल कल्हणाने इ. स. ६८६ ते ६९५ असा दिलेला आहे. पण चिनी इतिहासावरून चंद्रापीडाने इ.स.७१३ आपले प्रतिनिधि चीनच्या बादशहाकडे पाठविले होते व त्यानंतर इ. स. ७२० त त्या बादशहाने चंद्रापीडाला काश्मीरचा राजा ह्मणून मान्यता दिली, असें दिसतें. तसेंच मुक्तापीडाचा उर्फ ललितादित्याचा काळ कल्हणानें इ. स. ६९९ ते ७३५

असा सांगितला असून त्यानेंहि इ. स. ७३६–३७ नंतर चीन देशांत आपले वकील पाठविले असें चिनी इतिहासावरून दिसतें. या वंशातील पहिल्या दुर्लभवर्धनाचाहि ( इ. स. ६०२–६३५ ) चिनी ग्रंथांत उल्लेख असावासा वाटतो; कारण त्यांत दुलोपराजाकडे किपिशि ( काबूलच्या ) वकिलांना आपल्या राज्यांतून सुखरूप वाट देण्याबद्दल मागणी केली होती असे वर्णन आहे, व ही गोष्ट त्या इतिहासाप्रमाणें इ. स. ६२७ ते ६४९ च्या दरम्यान झालेली आहे. शेवटची गोष्ट म्हणजे चिनी इतिहासांत ' रत्नाकर नांवाच्या कवीने कर्कोटकवंशातील शेवटचा राजा जो बृहस्पति त्याच्या कारकीर्दींत ग्रंथ लिहिले असे म्हटले आहे. पण कल्हणानें हा कवि पुढील राजाच्या म्हणजे अवन्तिवर्म्याच्या आश्रयास होता असे स्पष्ट लिहिले आहे. अवन्तिवर्म्यानें राजतरंगिणीप्रमाणें पाहतां स. ८५५ ते ८८३ पर्यंत राज्य केलें, व हीं वर्षे दुसऱ्या प्रमाणांशीं जुळत आहेत. तर मग कल्हणानें सांगितलेला बृहस्पतीच्या मरणाचा इ. स. ८१४ हा काळ कसा खरा मानावा ? असा डॉ स्टीन प्रभृतींचा प्रश्न आहे.

स्टीन आदिकरून यूरोपीय पंडितांनीं या अशा चिनी ग्रंथावर विश्वसून कल्हणानें दिलेल्या कर्कोटकांच्या काळाला २५ वर्षे अलीकडे खेचले आहे; व त्यांचाच अनुवाद करून व्हिन्सेन्ट स्मिथनें ललितादित्याने कनोज जिंकिल्याचा काळ इ. स. ७३६ नंतरचा सांगितला आहे.

परंतु आम्हांला कल्हणानें दिलेले काळच विश्वासनीय वाटत असल्यामुळें तेच आम्ही वर संक्षेपानें कथन केलेल्या काश्मीरच्या इतिहासांत दिले आहेत. तेथे सांगितल्याप्रमाणे कल्हणानें दिलेले काळ चचनाम्यांतील काळाशींहि जुळतात. त्यांत ललितादित्याचा दिग्विजय महंमद कासिमाने इ स. ७१२ त सिंधप्रान्त जिंकण्यापूर्वी झालेला होता असें वर्णन असल्याचे पूर्वी दाखविलेंच आहे. तेव्हां आपल्याच महत्त्वाची नित्य टिमकी वाजविणाऱ्या चिनी लेखकांपेक्षां आरबी लेखकांशीं जुळणाऱ्या कल्हणाच्या वर्णनालाच विश्वसनीय मानिले पाहिजे. ललितादित्य हा चिनी बादशहाचा मांडलिक होता असेंहि अगदीं खोटे विधान चिनी लेखकांनीं केलें आहे. शिवाय वर दिलेल्या यूरोपीयन पंडितांच्या कोटिक्रमांत म्हणजे बिनतोड मुद्दे आहेत

असेंहि नाहीं. चिनी ग्रंथकारांनीं सांगितलेला दुर्लभ हा आमच्या दुर्लभवर्धनाचा मुलगाहि असूं शकेल. कारण त्याचेंहि नांव दुर्लभ होतें; व म्हणून इ. स. ६३६ ते ६४९ हीं चिनी ग्रंथकारांनीं सांगितलेलीं वर्षें या दुर्लभकाच्या कारकीर्दीचा असण्याचा संभव आहे. चंद्रापीड व मुक्तापीड यांचे काळ चिनी लेखकांनीं आपल्या कल्पनांशीं जुळावे म्हणून २५ वर्षें अलीकडे ओढले असण्याचा बराच संभव आहे. शेवटचा रत्नाकराविषयींचा मुद्दाहि तसाच उलगडण्यासारखा आहे. त्यानें आपले हरिविजय काव्य आपल्या तरुणपणीं बृहस्पतीच्या म्हणजे चिप्पट जयापीडाच्या कारकीर्दीत म्हणजे इ. स. ८१३ च्या सुमारास लिहिलें असे म्हणूनहि तो अवन्तिवर्म्याचा इ स. ८५५ त आश्रित होता, या म्हणण्याला बाध येत नाहीं. हें ४०-४२ वर्षांचें अंतर आश्चर्य मानण्यासारखे मुळींच नाहीं; तसेच काश्मीर प्रांतांत ८०-९० वर्षांचा आयुष्यक्रमहि कांहीं अशक्य नाही. इ स. ८१३त रत्नाकर कवि ३०-३५ वर्षांचा होता असें मानिलें तरी पुढें ८५५ त तो ७२-७७ वर्षांचा होता. त्यांत असंभाव्य असे काय आहे ?

## ४-शंकरवर्म्याचीं प्रजापीडनाचीं कृत्यें ८८३-९०२.

शंकरवर्म्यानें आपल्या प्रजेचा फार छळ केला. त्याचें वर्णन स्वतंत्रपणेंच देणें अवश्य आहे, असें पूर्वीं सांगितलें आहें. कल्हणाने ते वर्णन पांचव्या तरंगाच्या १६५ ते १८१ श्लोकांत केलें आहे. त्याचा भावार्थ असा:—

पूर्वीं मोठी कीर्ति मिळविलेले राजे पुढें व्यसनासक्तीमुळें लोभी होऊन प्रजेला पीडूं लागतात याचें आश्चर्य वाटते, असा शेरा मारून कल्हण म्हणतो, ‘ शंकरवर्म्याचा कोश व्यसनाधीनतेमुळें रिकामा पडल्यावर तो देवायालयांतून जुलमानें द्रव्य काढूं लागला. नगरें, खेडीं इत्यादिकांतून धन हरण करण्यासाठीं त्याने **अट्टपति-भाग** आणि **गृहकृत्य** असे दोन नवीन कर बसवून त्यांची वसुली करण्यासाठीं कर्मस्थानें ( कचेऱ्या ) ठेविलीं देवळांतील चंदन, धूप, तेल इत्यादि पदार्थांच्या विक्रीपैकीं आपला भाग म्हणून कांहीं द्रव्य तो घेई. देखरेख करण्याच्या मिषानें स्वतंत्र अधिकारी नेमून त्यानें ६४ देवळांची तर प्रत्यक्षच लूट केली. देवालयांना इनाम

दिलेलीं गावें कांहीं मोबदला ( प्रतिकर ) देऊन त्यानें परत घेतलीं व त्यांत तो शेतकऱ्यांप्रमाणें लागवड करूं लागला. देवळांना द्यावयाच्या वार्षिक पदार्थांचें वजन तृतीयांशानें कमी करून वरती, धान्य व वस्त्रें यांचे भाव वाढलेले असल्यामुळे एकंदरींत त्या देवळांना पूर्वीं पेक्षां अधिकच प्राप्ति होते, असें हि तो म्हणे. दुसऱ्या प्रान्तीं कोठे तो गेला असतां तेथील लोकांनीं त्याचें ओझीं नेण्याचें काम न केल्यास तो त्यांना त्या ओझ्यांच्या तेथील मजुरी इतका त्या वर्षी दंड करी. त्याच्या पुढच्या वर्षी गांवकऱ्यांचा कांहीं अपराध नसतांहि पुनः तितक्याच रकमेचा दंड तो त्यांवर लादी. याप्रमाणें जुलमाच्या वाहातुकीची ( वेठीची किंवा बिगारीची ) चाल त्याने प्रथम सुरू केली, त्यामुळें गांवकरी लोकांच्या दारिद्र्याला आरंभ झाला. ही बिगार तेरा प्रकारची असे. स्कंदक व ग्रामकायस्थ ( तलाठी वगैरे नोकर ) यांच्या मासिक वेतनासाठीं व अन्य निमित्ताने लोकांच्या उत्पन्नाचा अंश घेऊन त्याने गांवचे गांव निर्धन करून सोडले. याप्रमाणे वजनांत कमी अधिकपणा करून ( देतांना कमी व घेतांना अधिक ), गांवकऱ्यांवर निष्कारण दंड लादून व इतर छळणुकीच्या उपायांनी त्याने गृहकृत्यासाठीं द्रव्यसंग्रह केला. या द्रव्य उकळण्याच्या कामावर त्यानें पांच दिविरांची ( चिटणीसांची ) निरनिराळ्या ठिकाणीं नेमणूक करून त्यांवर लवट नांवाचा शकच उपपदधारी गंजवर ( खजिनदार ) ठेविला होता. येणेंप्रमाणें या मूर्ख राजाने भावी राजांच्या किंवा कामगारांच्या हितासाठीं स्वतःच्या दुष्ट आचरणाने आपल्याला नरकाची प्राप्ति करून घेतली."

या वर्णनावरून शंकरवर्म्याच्या द्रव्य उकळण्याच्या मार्गाची नीट कल्पना येईल. त्यानें चालू केलेली रूढभारोढि ऊर्फ गांवची बिगार तेथें अगदीं अलीकडे पर्यंत सुरू होती त्याची देवळांतून व गांवकऱ्यांपासून द्रव्य उकळण्याची रीत हिंदुस्थानांत सर्वच लोभी राजांनीं उचललेली दिसते.

# प्रकरण ८ वें.

—:o:—

## वलभीच्या मैत्रक वंशाचा वृत्तान्त,

[ पंजाब, राजपुताना आणि त्याच्या पूर्वेकडील गंगायमुनांच्या खोऱ्यांतील प्रदेश इतके मिळून वास्तविक " हिंदुस्थान " म्हणून ज्याला म्हणतात तो देश होतो. तथापि या प्रदेशांचा इतिहास सांगण्यापूर्वी पश्चिम भागांतील व दक्षिणेंतील महत्वाच्या राज्यांचा वृत्तान्त सांगणे इष्ट आहे त्यांत वलभी व भरुकच्छ ह्मणजे भडोच यांचा प्रमुख निर्देश ह्युएनत्संगानें केलेला आहे. वलभीच्या इतिहासाची सांप्रत उपलब्ध असलेली साधने म्हणजें कोरीव लेख व विशेषेंकरून ताम्रपट हेच होत. पण हीं साधनें विपुल असून त्यांवरून पुष्कळच महत्वाची माहिती मिळण्यासारखी आहे, व ती मुंबई गॅझिटीवर मधील गुजराथच्या वृत्तांतांत एकत्र जुळवून दिलेलीहि आहे. तिच्याच आधारावर मुख्यत्वेकरून पुढे आम्हीं वलभीचा म्हणजे पूर्व सौराष्ट्राचा इतिहास देत आहों. त्यांत वादाचा प्रश्न म्हणजे मैत्रकवंशाच्या मूळाविषयींचा असून त्या बाबतींत बहुतेक युरोपीय पंडितांच्या मतांशी व तशींच अनुमाने काढणाऱ्या एतद्देशीय पंडितांच्या मतांशीं आमचा विरोध असल्यामुळें आमचे म्हणणें आम्हाला निराळें विस्ताराने मांडावे लागणार आहे. ]

वलभीचें राज्य प्राचीन सौराष्ट्र देशांत म्हणजे हल्लींच्या काठेवाड प्रांतांत मोडत असे. हें जुनें वलभीनगर अलीकडे सांपडलें असून तें भावनगरच्या वायव्येस कांहीं मैलांवर आहे. वलभीचें राज्य जरी लहान होतें, तरी ह्युएनत्संगाच्या दृष्टीनें तें महत्वाचें असल्यामुळें तेथें तो इ. स. ६४० च्या नवंबर महिन्यांत गेला होता. ( कनिंगहॅमकृत त्याचें प्रवास वृत्त पहा ) त्यानें या राज्याविषयीं पुढील गोष्टींचा प्रामुख्यानें उल्लेख केला आहे; तेथील राजा ध्रुवसेन नांवाचा क्षत्रिय होता, व तो कनोजाधिपति सार्वभौम हर्षराजाचा

जांवई होता. या दोन्ही गोष्टी तत्कालीन शिलालेख व ताम्रपट यांतील वृत्तान्ताशीं बरोबर जुळत असून, वलभीराजांच्या मूळ-पीठिकेसंबंधानें उदेपूरच्या शिसोदे घराण्यांत जी परंपरागत कथा चालू आहे तिच्याशींहि त्यांचा मेळ बसतो. शिसोदे घराण्यांतील राजे आपल्याला अयोध्येच्या श्रेष्ठ अशा सूर्यवंशांतील रामाचे वंशज समजतात, व सर्वांनुमतें देखील त्यांचें घराणें हिंदुस्थानांतील प्राचीन क्षत्रियांपैकीं श्रेष्ठ प्रतीचें ठरलेलें आहे. असें असल्यामुळें ज्या अर्थी शिसोदे आपली पीठिका वलभी घराण्याशीं जोडतात त्या अर्थी ह्युएनत्संगानें लिहिलेली क्षत्रियत्वाची हकीकत खरी आहे असें सिद्ध होतें.

पण कांहीं विलक्षण पूर्वग्रहानें दूषित झालेले यूरोपीय पंडित वलभी राजांना गूर्जरवंशीय आणि अतएव परदेशीय समजून ते इ. स. ५०० च्या सुमारास आलेल्या हूणांबरोबर या देशांत आले व गुप्ताच्या लयानंतर वलभीस त्यांनीं राज्य स्थापिलें, असें दाखविण्याचा अट्टाहास करितात. पण जरा विचार केल्यास पाश्चात्य पंडिताचे हें मत अगदींच निर्मूल आहे असें स्पष्ट दिसून येईल. वलभी राजांच्या दानपत्रांच्या आरंभीं ' स्वस्ति श्री प्रसभ-प्रणतामित्राणां मैत्रकाणां अतुलबलसंपन्नमण्डलाभोगसंसक्त-प्रहार-शतलब्धप्रतापात् प्रतापोपनत–दानमानार्जवोपार्जितानुरागात् अनु-रक्त–मौलभृतश्रेणी–बलावाप्तराज्यश्रियः परममाहेश्वर–श्रीभट्टार्कात्' असे शब्द नेहमीच असून त्यांवरून वलभी राजे मैत्रक वंशीय श्रीभट्टार्काचे वंशज होत असें दिसून येतें. आतां यांत जो मैत्रक शब्द आला आहे त्यांतील मित्र म्हणजे सूर्य, आणि मित्र हें मिहिराचें रूपान्तर असा कोटीक्रम लढवून पाश्चात्य पंडितांनीं या मैत्रकांना परदेशीय मिहिर असें ठरविलें आहे !!! पण वस्तुतः मौखरि, चालुक्य, पल्लव इत्यादि नांवांप्रमाणें मैत्रक हेंहि कुल-

नामच असल्यामुळें त्याची व्युत्पत्ति लावून तर्कानें कांहीं तरी त्याचा अर्थ करणें हेंच मुळीं चुकीचें आहे. तथापि जर अर्थ करणेंच असेल तर मैत्रक म्हणजे मित्रवंशीय अथवा सूर्यवंशीय असें कां म्हणूं नये ? पण खरें ह्मटल्यास या पाश्चात्य पंडितांच्या पूर्व-ग्रह-दूषित वितंडवादांत न पडतां आम्हीं आमचें म्हणणें काय आहे तेंच सांगणें बरें. हर्षाच्या काळीं म्हणजे इ. स. ६२० च्या सुमारास वलभीचे राजे म्हणजे उत्तम क्षत्रिय होत असा समज होता यांत शंका नाहीं. ह्युएनत्संगानें प्रत्यक्ष माहितीवरून त्यांच्या विषयीं तसें स्पष्ट लिहिलें आहे, व हर्षाला त्यानें वैश्य ह्मटलेलें असल्यामुळें क्षत्रिय व वैश्य यांतील भेद तो जाणत होता असें उघड दिसतें. वलभीचें घराणें अस्सल क्षत्रिय होतें याला आणखीहि एक प्रमाण सांगतां येण्यासारखें आहे. हर्षानें आपली कन्या वलभी राजाला दिली होती हें आतां माहित झालेलें आहे. तत्कालीन क्षत्रिय राजे राज्यपदारूढ वैश्यांच्या कन्यांशीं विवाह करीत आणि जातिदृष्ट्या क्षत्रियांहून कमी मानिलेले हे वैश्य आपल्या मुली क्षत्रिय घराण्यांत द्यावयास फार उत्सुक असत. हर्षाची बहीण राज्यश्री याच कारणास्तव कनोजच्या मौखरी घराण्यांतील ग्रहवर्म्याला दिलेली होती हें पूर्वी सांगितलेंच आहे. ' वराचे दुसरे पुष्कळ गुण असले तरी त्यांत कुलाच्या मोठेपणालाच सुज्ञ लोक प्राधान्य देतात ' असें त्या संबंधांत बाणभट्टानेंहि म्हटलें आहे. म्हणून हर्षानें आपली कन्या जी वलभीच्या ध्रुवसेनाला दिली ती त्याकाळीं तें घराणें उत्तम क्षत्रियांचें मानिलेलें असल्यामुळेंच दिली असें मानावें लागतें. हर्षकालीन क्षत्रिय घराण्यांतील राजांना आपल्या वंशाची पीठिका पुराणें व रामायण-महाभारतादि राष्ट्रीय ग्रंथांत सुप्रसिद्ध असलेल्या सूर्य किंवा सोमवंशाला जोडून देण्याचीहि मोठी इच्छा असलेली दिसून येते. हर्षाचें वर्णन

करतांना बाणभट्टानें 'तुमच्या एवढया चंद्रसूर्यवंशांत तरी असला वैभवशाली राजा असल्यास दाखवा' असे शब्द योजिले आहेत, व त्यांवरून चंद्रसूर्यवंशांशीं आपली पीठिका जोडणारीं क्षत्रिय घराणीं हर्षकालीं म्हणजे इ. स. ६०० च्या सुमारास अस्तित्वांत होती हें निःसंशय ठरतें. म्हणून आमच्या मतें इ. स. ५०० च्या सुमारास म्हणजे हर्षापूर्वी केवळ १०० वर्षें येथें परदेशांतून येऊन राहिलेल्या म्लेंच्छादि परकीय राजवंशांना १०० वर्षांच्या अवधींत उत्तम क्षत्रिय म्हणून लोक समजूं लागले असतील ही गोष्ट सर्वथैव असंभवनीय आहे. प्रतापवर्धनादि एतद्देशीय राजांचा वर्णसंकर होऊं न देण्याकरितां सारखा प्रयत्न चालू असता तर तसें होणें शक्यच नव्हतें. या परकीय राजांनीं क्षत्रिय नांवें धारण करून क्षत्रिय मंडळांत शिरण्यासाठीं केलेला प्रयत्न सिद्धीसहि गेला असेल; परंपरागत हिंदु रीतीप्रमाणें त्यांना एक प्रकारचे व्रात्य क्षत्रिय समजून शेंकडों क्षत्रिय घराण्यांपैकीं त्यांचा आणखी एक घराणें म्हणून फार तर समावेश करण्यांत आला असेल; पण ते क्षत्रियोत्तम मानले जाणें शक्य नाहीं.

शिवाय वलभीराजांचा जो परंपरागत इतिहास उपलब्ध आहे तोहि स्वाभाविकपणें घडून येणाऱ्या गोष्टीशीं विरुद्ध नसल्यामुळें वलभीचें राज्य परकीय लोकांनींच स्थापिलें असलें पाहिजे असें मानणें कांहीं अवश्य होत नाहीं. त्या घराण्याची परंपरागत हकीगत अशी आहे कीं, अयोध्येच्या सूर्यवंशांतील कनकसेन नांवाचा कोणी पुरुष प्रथम लोहकोट ( लाहोर नव्हे ) येथें येऊन तेथून पुढें सौराष्ट्रांत वीरनगरला गेला, व तेथें इ. स. १४४ त त्यानें परमार राजापासून तेथील राज्य हस्तगत केलें. या नंतर चार पिढ्यांनीं त्याच्या वंशांतील विजयसेन नामक राजानें विजयपु

म्हणजे हल्लींचें घालका शहर वसविलें व पुढें त्या घराण्यानें वलभीपुर येथें आपली स्थापना केली. (टॉडचें राजस्थान.) या हकीगतीचा प्राचीन लेखांतील वर्णनाशीं मुळींच विरोध येत नाहीं. धाडशी क्षत्रिय पुरुष जेथें कोठें राज्य-प्राप्तीची संधि उपलब्ध होई तेथें जावयास एका पायावर तयार असत. त्याप्रमाणें कनकसेनाला संधि मिळाल्यावर तो इ. स. १४४ त काठेवाडांतील शक राजाच्या हाताखालीं ठाकुर होऊन रहावयाला तयार झाला असेल. पुढें शकराजे जाऊन गुप्त साम्राज्याची स्थापना झाल्यावर कनकसेनाचे वंशज गुप्तांचे अंकित झाले असावेत. वलभी राजघराण्याचा मूळ पुरुष जो भटार्क त्याला प्राचीन ताम्रलेखांत सेनापति म्हटलेलें आहे. म्हणजे तो गुप्त सम्राटाच्या सैन्यांतील एक सरदार असून सौराष्ट्र, पंजाब वगैरे प्रान्तांत साम्राज्यासाठीं त्यानें युद्धें केलीं असावींत. पुढें जेव्हां गुप्त साम्राज्याचा विलय झाला, तेव्हां स्वाभाविकपणें तो वलभीच्या जहागिरीचा स्वतंत्र राजा बनला, आणि पूर्वीपासून चालत आलेलें सेनापतीचें नांव त्यानें बहुमानास्पद म्हणून कायम ठेविलें. साम्राज्याच्या लयानंतर स्वतंत्र लहान लहान राज्यें स्थापन होण्याची क्रिया प्राचीनकाळापासून अगदीं अलीकडच्या काळापर्यंत हिंदुस्थानांत अशीच चालू आहे, व असे स्वतंत्र बनलेले राजे आपली जुनी पदवीहि कायम ठेवीतात. अयोध्येचे वजीर, हैदराबादचे निजाम, किंवा पुण्याचे पेशवे हीं असल्या प्रकारचीं उदाहरणें होत. हीं नांवें पूर्वीच्या राज्यांत जे हुद्दे ते चालवीत असत त्यांचीं आहेत, व स्वतंत्र झाल्यावर देखील त्याच नांवानें संबोधिलें जाणें त्यांना बहुमानाचें वाटे. एवढ्या विवेचनावरून या मैत्रक घराण्यांतील भटार्कानें 'सेनापति' व 'प्रहारशत लब्धप्रताप' इत्यादि जीं विशेषणें आपल्याला लावून घेतलीं होतीं

त्यांचा उलगडा* होईल. वरील उताऱ्यांत 'अनुरक्त-मौलभृत श्रेणी-बलावाप्त-राज्यश्री' असें जें पद आलें आहे त्यावरून भटार्क हा राजकुलांत जन्मलेला असून पिढ्यानुपिढ्या राजघराण्याची सेवा केलेले अनेक क्षत्रिय त्याचे अनुयायी होते असें दिसून येतें; म्हणजे त्याच्याबरोबर दुसरेहि कांहीं पुरुष वलभीकडे येऊन योग्यतेस चढले होते असें सिद्ध होतें.

हें आमचें म्हणणें नवीन नसून पुष्कळ वर्षांपूर्वी मेजर वॅटसन यानें तें प्रथम पुढें मांडिलें व कनिंगहॅमला देखील तें मान्य होतें हें लक्षांत ठेविलें पाहिजे. पण पुढें वलभी राजांना गुर्जरवंशीय बनविण्याची कल्पना निवल्यानें हें जुनें मत पुढील पुस्तकांत समाविष्ट करण्यांत आलें नाहीं. मध्यप्रांत आर्के. सर्व्हे. रि. पा. २८ यांत कनिंगहॅम लिहितो. 'मेजर वाटसननें परंपरागत हकीगतीवरून सेनापति भटार्क हा स्कन्दगुप्ताच्या साम्राज्यांत सौराष्ट्र देशावरील अधिकारी होता असें जें म्हटलें आहे तें मला मान्य आहे. पुढेंहि ज्याअर्थी त्याच्या मुलानें म्हणजे धरसेनानें तेंच साधें उपपद कायम ठेविलें त्यावरून तोहि नंतर बुधगुप्ताचे वेळीं केवळ मांडलिक म्हणूनच राहिला असावा असें मत आहे. पण त्याच्या दुसऱ्या मुलानें महाराज ही पदवी धारण केली इतकेंच नव्हे, तर गुप्तसम्राटानें वलभीच्या राजपदावर आपणच त्याला आरूढ केलें असेंहि त्यानें आपल्या लेखांत नमूद केलें आहे. शेवटचा गुप्त

* वरील दानपत्रांतल्या मैत्रक शब्दाचा संबंध प्रथम चुकीनें भटार्कांच्या शत्रूंशीं लावण्यांत येत असे. पण आतां ती चूक दुरुस्त होऊन तें विशेषण भटार्कांचेंच आहे असा वास्तविक अर्थ सर्वांनीं मान्य केला आहे. तरी त्या शब्दावरून भटार्कांच्या घराण्याचा बोध होत असून जातीचा होत नाहीं; म्हणजे तो मिहिर नव्हे हें वर सांगितलेंच आहे.

सम्राट जो बुधगुप्त त्यानें आपल्या पदवीला अनुरूप असें हेंच शेवटचें कृत्य केलें असलें पाहिजे. ही गोष्ट वलभी राज्याच्या नाण्यांचा निरीक्षणावरूनहि ठरत आहे. नंबर २३ च्या नाण्यावर, गुप्तलिपींत 'महाराज्ञो महाक्षत्र परमसामन्त महाश्रीभटाक्कस्स' असे शब्द असून दुसऱ्या कांहीं वर 'राज्ञो महाक्षत्र परमादित्यराज्ञो महाश्री भटार्कस्स' असे शब्द आहेत. नंबर २४ च्या नाण्यावर 'महाराज्ञो महाक्षत्र सामन्त महेश परमादित्य धरसेनस्स' असे शब्द आहेत. या सर्वांवरील महाक्षत्र शब्दावरून वलभीचे सेनराजे आपल्याला उत्तम क्षत्रिय समजत असत असें निर्विवाद सिद्ध होतें.

भटार्काच्या जातिकुलाविषयींच्या कुतर्कांचें येथवर निरसन केलें. आतां त्याच्या घराण्याचा ८ व्या शतकाच्या मध्यापर्यंतचा जो अविच्छिन्न इतिहास प्राचीन लेखांच्या आधारानें मिळाला आहे तो थोडक्यांत देण्याचा प्रयत्न करूं. हा इतिहास असंदिग्ध असल्यामुळें बांबे गॅझिटीयर मधील गुजराथ या ग्रंथांतील वर्णनावरून जशाचा तसाच देण्यास हरकत नाहीं. येथें एवढें सांगितलें पाहिजे कीं वलभी राजांच्या ताम्रपटावरील दानलेखांत गुप्त शकाचा इतका उपयोग केलेला आहे कीं त्यालाच वलभी शक असें दुसरें नांवहि पुढें मिळालें ( अलबिरुणीपहा ). वलभी घराणें मूळ गुप्तांचें मांडलिक असल्यामुळें सौराष्ट्रांत चालू असलेला गुप्त शकच त्यांनीं घेतला. दुसरें असें कीं त्यांच्या सर्व दानलेखा वरील मुद्रा एकसारखीच असून तींत बैलाच्या चित्राखालीं 'श्री भटाक्क' ( भटार्क याचें प्राकृत रूप ) असा शब्द आहे; व त्यावरून या वंशांतील राजांनीं आपला मूळ पुरुष जो भटार्क त्याविषयीं आदर कधींहि टाकिला नाहीं, असें दिसतें.

स्वतः भटार्काचा ताम्रलेख कांहीं उपलब्ध नाहीं, पण त्याच्या पुत्रापासूनचे लेख सांपडले आहेत. त्याचा पुत्र जो पहिला धरसेन त्याच्या लेखांत भटार्काला सेनापति म्हटलेलें आहे. भटार्काला चार पुत्र असून ते सर्व क्रमाक्रमानें सिंहासनारूढ झाले. त्यांचीं नांवें धरसेन, द्रोणसिंह, ध्रुवसेन आणि धरपट्ट अशीं होतीं. यापैकीं धरसेनाला सेनापति हीच पदवी असून द्रोणसिंहाला महाराज आणि 'चक्रवर्तीनें सिंहासनाधिष्ठित केलेला' अशीं विशेषणें लाविलेलीं आहेत. या विशेषणांवरून कांहीं स्पष्ट बोध होत नाहीं असें गॅझीटिअर मधील लेखकानें म्हटलें आहे. पण आमच्या मतें त्यांचा अर्थ उघड असून गुप्त सम्राटांनीं द्रोणसिंहाला वलभीचा राजा म्हणून मान्य केलें असा त्यावरून स्पष्ट बोध होतो. वलभी घराण्यांतील पहिले पहिले राजे गुप्त राजांना आपले चक्रवर्ती समजत व गुप्तसाम्राज्य लयास गेल्यावर मात्र ते आपणांस महाराजाधिराज म्हणवूं लागले. ध्रुवसेनाच्या ताम्रलेखांत 'महासामन्त' ही पदवी आढळून येत असल्यामुळें तेथपर्यंत ती कायम असल्याचेंच दिसून येतें. ध्रुवसेनानें बहुधा इ. स. ५२६ ते ५३५ पर्यंत राज्य केलें असावें. त्याच्यापूर्वी त्याचे दोन भाऊ गादीवर बसलेले असून धाकटा भाऊ जो धरपट्ट तो त्याच्या मागून राज्यपदारूढ झाला. धरपट्टाचा पुत्र गुहसेन (इ. स. ५३९ ते ५६९) याचे तीन ताम्रपटावरील दानलेख व एक शिलालेख असे सांपडले आहेत, त्यांवरून हाच प्रथम स्वतंत्र* राजा झाला असें दिसतें. त्याच्या मागून आलेल्या राजांच्या दानलेखांत भटार्कानंतर त्याचेंच नांव प्रथम आलेलें असतें. गुहसेनाच्या मागून त्याचा पुत्र द्वितीय धरसेन गादीवर आला.

* शेवटचा गुप्त चक्रवर्ती जो कुमारगुप्त तो इ. स. ५३० त सिंहासनावर आला (स्मिथचा इतिहास पा. २८१ पहा.)

त्याचे पांच दानलेख सांपडले आहेत. त्यांपैकीं दोहोंत त्याला महासामन्त अशी पदवी आहे; ती रूढीमुळें लाविलेली असावी किंवा गुप्त साम्राज्य अद्यापिहि मरणोन्मुख अवस्थेंत कसेबसे दिवस काढीत टिकून असल्यामुळें त्यांला ती टाकितां आली नसेल. धरसेनानें इ. स. ५६९ ते ५८९ पर्यंत राज्य केलें असें समजावयास हरकत नाहीं. त्याच्यानंतर त्याचा मुलगा शिलादित्य सिंहासनारूढ झाला. त्याच्या दानलेखांत त्याला परम माहेश्वर म्हणजे परम शिवभक्त असें विशेषण लाविलेलें आहे. तथापि बौद्धभिक्षूंना देखील त्यानें देणग्या दिल्या होत्या. त्याचा राज्यकाल इ. स. ५९० ते ६०९ असा कांहीं असावा. त्याच्या पाठीमागें त्याचा भाऊ खरग्रह राज्यारूढ झाला व त्यानें स. ६१५ पर्यंत राज्य केलें. याचे ताम्रलेख सांपडलेले नाहींत. त्याच्या मागें त्याचा पुत्र तृतीय धरसेन सिंहासनावर आला; व त्यानें पांच वर्षें राज्यकारभार केला. नंतर त्याचा भाऊ द्वितीय ध्रुवसेन राजा होऊन त्यानें इ. स. ६२० ते ६४० पर्यंत राज्योपभोग घेतला. हर्षाला दिग्विजयांत साहाय्य करणारा त्याचा सुप्रसिद्ध जांवई जो ध्रुवभट तोच हा होय. हा ह्युएन्त्संगानें वर्णिलेल्या प्रयाग येथील हर्षकृत प्रचंड दानसमारंभाचे प्रसंगीं हजर होता. ह्युएन्त्संगानें त्याचें ध्रुवपत्त असें जें नांव दिलें आहे, तें व ध्रुवभट हीं एकच होत. प्रथम हर्षराजानें त्याचा पराभव केला असतां भरुकच्छ(भडोच) यथील दद्द राजाचा आश्रय त्यानें केला होता असें भडोचच्या एका दानलेखावरून दिसून येतें. तो हर्षाचा जांवई होण्यापूर्वीची ही गोष्ट असावी. तो क्षत्रिय असल्यामुळें कदाचित् त्यानें हर्षाचा जांवई होण्याचें प्रथम नाकारिलें असेल; पण हर्षानें त्याचा पराभव केल्यावर रजपूत चालीप्रमाणें नंतर त्याला ती गोष्ट मान्य झाली असेल. आपल्या कारकीर्दीच्या शेवटीं तो पूर्णपणें बौद्ध-

मतानुयायी झाला होता, व याचें कारण त्याच्यावरील हर्षाचें वजन असण्याचा संभव आहे.

त्याच्या पश्चात् त्याचा पुत्र चतुर्थ धरसेन राज्यपदावर आला. हा सर्व वलभी राजांत बलिष्ठ होता असें दिसतें. गुप्तशक ३३० म्हणजे इ. स. ६४९ त लिहिलेल्या त्याच्या एका ताम्रपटावरून असें दिसतें कीं महाराजाधिराज इत्यादि मोठमोठ्या पदव्यां-बरोबर ' चक्रवर्ती ' पदवी देखील त्यानें धारण केली होती. कदाचित त्यानें साम्राज्य स्थापन केलेंहि असेल, पण त्याचे वंशज पुढें आपल्याला केवळ महाराजाधिराज एवढेंच म्हणवीत असत. या धरसेनाच्या वेळीं वलभी नगरींत भट्टिकवीनें आपलें सुप्रसिद्ध भट्टिकाव्य लिहिलें, व तसा त्या काव्याच्या शेवटीं निर्देशहि केलेला आहे.

या चतुर्थ धरसेनाला पुत्र-संतति नव्हती. म्हणून जवळच्या नातलगांपैकीं विंध्याद्रि जवळील खेडा जिल्ह्यावर अधिकार चाल-विणाऱ्या त्याच्या एका आप्ताचा मुलगा तृतीय ध्रुवसेन हें नांव धारण करून त्याच्या मागून राज्यावर बसला. त्यानें इ. स. ६५० ते ६५६ पर्यंत राज्य केलें. पेद्रपत्र नांवाचा गांव दान दिल्याबद्दल त्याचा लेख सांपडला आहे. हा गांव नवा-नगरमधोल वन्थली परगण्यांत होता. त्याच्यानंतर खरग्रह नांवाचा त्याचा मुलगा सिंहासनावर बसला. याचाहि एक दान-लेख सांपडलेला आहे. खरग्रहाच्या मागून त्याचा पुत्र तृतीय शीलादित्य राजा झाला, व त्यानें इ. स. ६६६ ते ६७५ पर्यंत राज्य केलें. परम भट्टारक, महाराजाधिराज, व परमेश या पदव्या त्यानें धारण केल्या होत्या आणि त्या पुढील राजांनींहि आप-ल्याला चालू केल्या. त्याचप्रमाणें शीलादित्य हें नांवहि या पुढें

वलभी राजांचें टोपण नांव बनून गेलें, व चालुक्य राजांना जसें वल्लभ म्हणत तसें वलभीराजांना शीलादित्य म्हणूं लागले. म्हणजे या पुढील राजे चतुर्थ शीलादित्य, पंचम शीलादित्य, षष्ठ, व सप्तम शीलादित्य याच नांवांनीं प्रसिद्ध असून शेवटच्या सप्तम शीलादित्याला मात्र ध्रुवभट असें आणखी नांव होतें. ध्रुवभटाचा इ.स.७६६त कोरलेला एक ताम्रपत्रावरील दानलेख सांपडला आहे.

या शेवटच्या ध्रुवभटाच्या काळीं वलभी घराणें लयास गेलें. त्याची हकीगत अलबिरुणीनें आपल्या ग्रंथांत दिली आहे. त्याच्या राज्यांतील रंक नांवाच्या कोणा पुरुषाचें राजाशीं न पटल्यामुळें त्यानें मनसुरहून अरब लोकांना मदतीला बोलाविलें मनसुर शहर तेव्हां सिंधप्रांताची राजधानी असून महंमद कासिमाच्या मुलानें त्याची स्थापना केली होती. हल्लीं तें अस्तित्वांत नाहीं. असो, रंकाच्या बोलावण्याला मान देऊन अरब लोक गलबतांत बसून सिंधुनदीच्या मार्गानें समुद्रांत आले, व तेथून भावनगरच्या खाडींत उतरून तेथून जवळच असलेल्या वलभी नगरावर त्यांनीं रात्रीचा हल्ला चढविला. त्यांनीं आपल्या नित्य वहिवाटीप्रमाणें शहराची लूट करून नंतर तें उध्वस्त केलें. ध्रुवभट तेथून पळून गेला व लोकहि वाट मिळाली तिकडे पळाले. याप्रमाणें भरभराटींत असलेल्या एका राज्याचा फितुरी व विश्वासघात याच ठराविक कारणामुळें नाश घडून आला. यानंतर वलभी शहर मोडकळीस आलेल्या स्थितींतच कांहीं शतकें जीव धरून होतें, व १० व्या शतकांतील अरब लेखकांनीं त्याचा निर्देशहि केलेला आहे. पण वलभीचें राज्य म्हणून जें होतें तें तेव्हांच नष्ट झालें व शेवटीं कांहीं शतकांनीं वलभी शहराचाहि मागमूस नाहींसा झाला, व त्याची जागा भावनगरनें पटकविली. अलिकडे कांहीं वर्षांपूर्वी भावनगर

नजीक वलभीचे मोडके अवशेष उपलब्ध झाले आहेत हें पूर्वी सांगितलेंच आहे.

याप्रमाणें इ. स. ५०९ पासून चालत आलेलें हें वलभीचें राजघराणें इ. स. ७७५ पर्यंत चालून त्यावर्षी त्याचें अस्तित्व संपलें. जवळ जवळ पावणें तीनशें वर्षेपर्यंत या घराण्याच्या राज्याखालीं उत्तर गुजराथ व पूर्व काठेवाड हे प्रांत सुखानें ऐश्वर्याचा उपभोग घेत होते. हा उत्कर्ष अर्थात् राजे व प्रजा दोहों मिळूनच घडून आला होता. गुजराथचे लोक आतांच्या प्रमाणेंच तेव्हांहि शांत स्वभावाचे, उद्योगप्रिय व काटकसरीनें वागणारे होते, व त्यांच्यावर राज्य करणारे राजेदेखील साधे, सरळमार्गी व निर्लोभी होते. प्रजेंत संतोष राखण्यासाठीं ते झटत असत व असें करणें हें कालिदासाच्या वचनाप्रमाणें राजांचें कर्तव्यच होतें. ( राजा प्रकृतिरंजनात् । रघु० ). पुढें या प्रकरणाच्या परिशिष्टांत दिलेल्या दानलेखांतहि अशाच अर्थाचे शब्द आलेले आहेत. वलभीचा राज्यकारभार अगदीं व्यवस्थित व पद्धतशीर होता. त्यांतील निरनिराळीं खातीं व त्यांवरील अधिकारी यांचीं नांवें प्रथम भागांत सांगितलींच आहेत. वलभी राजांच्या दानलेखांवरूनच हीं सर्व उपलब्ध झालेलीं आहेत. सोईसाठीं पुनः तीं थोडक्यांत येथें सांगतों. आयुक्तक, द्रांगिक ( द्रंग-नगर ), महत्तर, चाटभट ( नगररक्षक पोलीस ), ध्रुव ( गांवचा वतनदार कुळकर्णी, हें नांव अद्यापि गुजराथेंत चालू आहे ), आधिकरणिक ( न्यायाधीश ), राजस्थानीय, अमात्य, शौल्किक ( शुल्क-दस्तुरी ), भोगिक ( भोग-जमीन महसूल ), वर्त्मपाल, प्रतिसारक, विषयपति ( मामलतदार ), राष्ट्रपति ( सुभेदार ) इत्यादि. या राज्यांतील जमीन पूर्णपणें लागवडीस आणलेली असून, प्रत्येक क्षेत्र मोजून त्याला नांव

दिलेलें होतें. जमीन महसूल धान्य रूपानेंच घेत व त्याला भोग अशी संज्ञा असे. इतर प्रांतांतहि हाच शब्द पूर्वकाळीं या अर्थानें रूढ असून, गुजराथेंत अद्यापिहि तो आढळून येतो. या राजांनीं आपल्या दोन लेखांवर स्वहस्तानें सही घातली आहे. काश्मीरी राजाप्रमाणें ते विषयासक्त किंवा जुलमी असल्याचें दिसत नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें तर ज्या रामराजाशीं ते आपली परंपरा नेऊन भिडवीत त्याच्या नमुनेदार आचरणाचा आदर्श पुढें ठेवून वागण्याचें आपले कर्तव्य त्यांनीं केंव्हांहि दृष्टीआड केलें असेल असें वाटत नाहीं.

वलभीच्या राज्याचा विस्तार कांहीं फारसा मोठा नव्हता. तथापि त्यांत काठवाडचा बराच भाग, गुजराथेंतील खेडा जिल्हा, व पश्चिम माळव्यांतील कांहीं प्रदेश इतक्यांचा समावेश होत होता; ही गोष्ट पुढें दिलेल्या दानलेखावरून दिसून येईल. वलभी घराण्याचा लय इतक्या लवकर कसा झाला याचा विचार करतां रंकाची फितुरी व विश्वासघात हें कारण प्रथम डोळ्यापुढें उभें रहातेंच; तथापि राज्याचें अल्पत्वहि कांहीं अंशांनीं त्यांत भागीदार असलें पाहिजे असें वाटतें. या शिवाय तिसरें हि एक कारण सांगतां येण्यासारखें आहे. तें असें कीं, त्यांतील लोक मान देणारे बौद्ध धर्मांतील अहिंसेच्या तत्वाला पुढें पुढें असल्यामुळें त्यांच्यांत बाणेदार क्षात्रवृत्ति पुष्कळशी कमी झालेली होती. आज मितीसहि गुजराथ प्रांत म्हणजे अहिंसा तत्वाच्या आचरणाचें नाकेंच आहे. पोलापोच्या शीलादित्यांच्या कारकीर्दींचें ह्युएनत्संगानें केलेलें वर्णन पूर्वी आलेंच आहे.

## वलभी राजांचा वंशवृक्ष ( इ. स. ५०९ ते ७६६ )



## टीप्पणी.

### वलभीच्या ध्रुवसेनाचा एक ताम्रपटावरील दानलेख.

ओम् स्वति विजयस्कन्धावारात् वंदित पल्लीवासकात् प्रसभप्रणतामित्राणां मैत्रकाणाम् अतुलबल-संपन्नमण्डलाभोगसंसक्त-प्रहारशतलब्धप्रतापात् प्रतापोपनतदानमानार्ज्जवोपार्जितानुरागात् अनुरक्त मौलभृतश्रेणीबलावाप्तराज्यश्रियः परममाहेश्वरश्रीभटार्क्कात् अव्यवच्छिन्नराजवंशात् मातापितृचरणारविन्दप्रणतिप्रविधौताशेषकल्मषः शैशवात्प्रभृति खड्गद्वितीयबाहुः एव समदपरगजघटास्फोटनप्रकाशितसत्वनिकषः तत्प्रभावप्रणनारातिचूडारत्नप्रभासंसक्तपादनखरश्मिसंहतिः सकलस्मृतिप्रणीतमार्गसम्यक्परिपालनप्रजाहृदयरंजनान्वर्थराजशब्दः रूपकान्तिस्थैर्यगांभीर्यबुद्धिसंपद्भिः स्मरशशांकाद्रिराजोदधित्रिदशगुरुधनेशान् अतिशयानः शरणागताभयप्रदानपरतया तृणवत् अपास्ताशेषस्वकार्यफलप्रार्थना धिकार्थ प्रदानानन्दितविद्वत्सुहृत्प्रणयिहृदयः पादचारी इव सकलभुवनमण्डलाभोगप्रमोदः परममाहेश्वरः श्रीगुहसेनः तस्य सुतः तत्पादनखसंतानविसृत जाह्नवीजलौघप्रक्षालिताशेषकल्मषः प्रणयिशतसहस्रोपजीव्यमानसंपद्रूपलोभात् इव आश्रितः सरभसमाभिगामिकैः गुणैः सहजशक्तिशिक्षाविशेषविस्मापिनाखिलधनुर्धरः प्रथमनरपतिसृष्टानाम् अनुपालयिता धर्म्मदायानाम् अपाकर्ता प्रजोपघातकारिणाम् उपप्लवानाम् दर्शयिता श्रीसरस्वत्योः एकाधिवासस्य संहता रातिपक्षलक्ष्मीपरिभोगदक्षविक्रमः विक्रमोपसंप्राप्तविमलपार्थिवश्रीः परममाहेश्वरः श्रीधरसेनः तस्य सुतः तत्पादानुध्यातः सकळजगदानन्दानात्यभ्दुतगुणसमुदयस्थगितसमग्रदिङ्मण्डलः समरशतविजयशोभासनाथमण्डलाग्रद्युतिभासरतरान् सपीठोदूढगुरुमनोरथमहाभारः सर्वविद्यापरावर–विभागाधिगम विमलमतिः अपि सर्वसुभाषितलवेन अपि सुखोपपादनीयपरितोषः समग्रलोकागाधगांभीर्य्यहृदयः अपि सुचरितातिशयसुव्यक्तपरमकल्याण स्वभावः खिलीभूतकृतयुग-नृपतिपथविशोधनाधिगतोदग्रकीर्तिः धर्मानुपरोधोज्जलतरीकृतार्थसुखसम्पदुपसेवानिरूढधर्मादित्य––द्वितीयनामा परममाहेश्वर

श्रीशीलादित्यः तस्य अनुजः तत्पादानुध्यात स्वयम् उपेन्द्रगुरुणा इव गुरुणात्यादरवता समभिलषणीयामपि राजलक्ष्मीं स्कन्धासक्ताम् परमभद्रः इव धुर्य्यः तदाज्ञासंपादनैकरसतयैवोद्वहन् मेदसुखरतिभ्याम् अनायासित सत्वसंपत्तिः प्रभावसंपद्वशीकृतनृपतिशतशिरोरत्नच्छायोपगूढपादपीठः अपि परावज्ञाभिमानरसानामनालिङ्गितमनोवृत्तिः प्रणतिम् एकाम् परित्यज्य प्रख्यातपौरुषाभिमानैः अपि अरातिभिः अनासादितप्रतिक्रियोपायः कृतनिखिलभुवनामोदविमलगुणसंहति--प्रसभविघटितसकलकलिविलसितगतिः नीचजनाधिरोहिभिः अशेषैः दोषैः अनामृष्टात्युन्नतहृदयः प्रख्यातपौरुषास्त्रकौशल्यातिशय गणतिथविपक्षक्षितिपतिलक्ष्मीस्वयंग्रह प्रकाशितप्रवीर पुरुष प्रथमसंख्याधिगमः परममाहेश्वरः श्रीखरग्रहः तस्य तनयः तत्पादानुध्यातः सकलविद्याधिगमविहितनिखिलविद्वज्जनमनःपरितोषातिशयसत्वसम्पदा त्यागौदार्येण च विगतानुसंधानाशमाहितारातिपक्षमनोरथाक्षभंगः सम्यगुपलक्षितानेकशास्त्रकलालोकचरितगव्हरविभागः अपि परमभद्रप्रकृतिः अकृत्रिमप्रश्रयविनयशोभाविभूषणः समरशतजयपताकाहरणप्रत्यलोदग्रबाहुदण्डविध्वंसित—निखिलप्रतिपक्षदर्पोदयः स्वधनुःप्रभावपरिभूतास्त्रकौशलाभिमानसकलनृपतिमण्डलाभिनन्दितशासनः परममाहेश्वरः श्रीधरसेनः तस्यअनुजः तत्पादानुध्यातः सच्चरितातिशयितसकलपूर्वनरपतिरतिदुस्साध्यानाम् अपि प्रसाधयिता विषयाणाम् मूर्तिमानिवपुरुषकारः परिवृद्धवद्ध गुणानुराग निर्भर चित्तवृत्तिभिर्म्मनुः इव स्वयम्अभ्यु (प) पन्नः प्रकृतिभिः अधिगतकलाकलापः कान्तिमान् अकलंककुमुदनाथः प्राज्यप्रतापस्थगितदिगन्तरालप्रध्वंसित ध्वान्तराशिः सततोदितः सविता प्रकृतिभ्यः परं प्रत्ययमर्थवन्तमतिबहुतिथप्रयोजनानुबन्धम् आगमपरिपूर्ण प्रविदधानः सन्धिविग्रहसमासनिश्चयनिपुणः स्थाने अनुरूपमादेशम् ददद् गुणवृद्धिविधानजनितसंस्कारः साधूनाम् राज्य सालातुरीयतन्त्रयोः उभयोः अपि निष्णातः प्रकृष्टविक्रमः अपि करुणामृदुहृदयः श्रुतवानपि अगर्वितः कान्तः अपि प्रशमी स्थिर सौहृदय्यः अपि निरसिता दोषवताम् उदयसमयसमुपजनितजनतानुरागपरिपिहितभवन समर्थितप्रथित बालादित्य द्वितीय नामा परममाहेश्वर श्रीध्रुवसनः कुशली सर्वानेव यथा सम्बन्धमानकान् समाज्ञापयति अस्तु वः संविदितं यथा मया

मातापित्रोः पुण्याप्यायनाय उदुम्बरगव्हरविनिर्गताय आनकाग्रहारनिवासि दशपुरत्रैविद्यसामान्य पाराशरसगोत्र माध्यंदिन वाजसनेयसब्रह्मचारि ब्राह्मण बुधस्वामिपुत्र ब्राह्मणदत्तस्वामी तथागस्तिकाग्रहारनिवासि उच्यमान चातुर्विद्य सामान्य पाराशरसगोत्र वाजसनेयसब्रह्मचारि ब्राह्मणबुधस्वामिपुत्र ब्राह्मण कुमारस्वामिभ्याम् मालवके उच्यमानविषये चन्द्रपुत्रकग्रामे दक्षिणसीम्नि भक्तिशत प्रमाण क्षेत्रम् यस्य आघाटनानि पूर्वतः धम्मणहडिडकाग्रामकङ्कटः अपरतःवीरतरमंडलिमहत्तरक्षेत्रमर्यादा उत्तर पश्चिमकोणे निर्गडीतडाकिका उत्तरतः वीरतरमंडली एवमेतत् चतुराघत्टन विशुद्ध (द्धं) भक्तिशतप्रमाणक्षेत्रं शोद्रङ्गं सोपरिकरणीयम् सभूतवातप्रत्यायम् धान्यहिरण्यादेयम् सदशापराधम् सोत्पद्यमानविष्टिकम् सर्वराजकीयानाम् अहस्तप्रक्षेपणीयम् पूर्वप्रत्तदेव ब्रह्मदेय ब्राह्मण विड्क्षतिरहितम् भूमिछिद्रन्यायेन आचन्द्रार्क्कार्णवक्षिति सरित्पर्वतसमकालीनम् पुत्रपौत्रान्वयभोग्यम् उदकातिसर्गेण धर्मदायो निसृष्टः यतः अनयोः उचितया ब्रह्मदेयस्थित्या भुंजतः कृषतः कर्षयतः प्रदिशतोर्वा न कैश्चिद्व्यासेधे वर्तितव्यमागामि भद्र नृपतिभिः अपि अस्मद्वंशजैः अन्यैःवा अनित्यानि ऐश्वर्याणि अस्थिरमायुष्यम् सामान्यं च भूमिदानफलम् अवगच्छद्भिः अयम् अस्मद्दायः अनुमन्तव्यः परिपालयितव्यः च इति उक्तं च बहुभिः वसुधा भुक्ता राजभिःसगरादिभिः। यस्य यस्य यदा भूमिः तस्य तस्य तदा फलम् ॥ यानीह दारिद्र्यभयान्नरेन्द्रैः धनानि धर्मायतनीकृतानि । निर्भुक्तमाल्यप्रतिमानि तानि को नाम साधुः पुनराददीत ॥ षष्ठिवर्षसहस्राणि स्वर्गे तिष्ठति भूमिदः । आच्छेत्ता चानुमन्ता च तान्येव नरके वसेत् इति । दूतकः अत्र राजपुत्रः श्रीखरग्रहः लिखितम् इदम् सन्धिविग्रहाधिकृतदिविरपतिवत्रभट्टिपुत्रदिविरस्कन्दभटेन । सं. ३००,२०,१ चैत्र व ३ स्वहस्तो मम ॥

# प्रकरण ९ वें.

## भडोच येथील गुर्जर.

[ हा वृतान्त गुर्जर राजांचा ताम्रलेखांच्या आधारानें बांबे गॅझीटीअर मधील गुजराथच्या वर्णनांत चांगला जुळविलेला आहे. दुसऱ्या कोरींव लेखांवरूनहि त्यांविषयीं कांहीं माहिती मिळते. तसे कांही पुराणांतून व विशेषतः स्कन्दपुराणांतून आलेल्या एतद्विषयक उल्लेखांचाहि आपल्याला उपयोग होणार आहे. ].

वलभीच्या राज्यांत सौराष्ट्राचा म्हणजे हल्लींच्या काठेवाडाचा बहुतांशीं अन्तर्भाव होतो हें पूर्वी सांगितलेंच आहे; त्याप्रमाणें भरुकच्छ म्हणजे भडोचच्या राज्यांत हल्लींच्या गुजराथ प्रान्ताचा बहुतेक समावेश होतो असें म्हणावयास हरकत नाहीं. भरुकच्छच्या गुर्जर राजांच्या ताम्रपटांवरून असें दिसून आलें आहे कीं त्या घराण्यांत सहा राजे झाले. त्यांचीं नांवें व त्यांच्या दानलेखांवरून कळलेली त्याच्या कारकीर्दीपैकीं कांहीं नक्कीं वर्षें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेतः—

१ दद्द (स. ५८० ); २ जयभट ( स. ६०५ ), ३ दुसरा दद्द ( स. ६३३ ); ४ दुसरा जयभट ( स. ६५५ ); ५ तिसरा दद्द ( स. ६८० ) ६ तिसरा जयभट ( स. ७०६–७३४ ).

या राजांनीं भडोच व नंदिपुर ( राजपिपला संस्थानांतील नांदोरी ) येथें सहाव्या शतकाच्या मध्यापासून ८ व्या शतकाच्या मध्यापर्यंत म्हणजे सुमारें २०० वर्षें राज्य केलें. ते आपल्याला गूर्जर म्हणवीत, व त्यांपैकीं शेवटच्या दोघांच्या दानलेखांत त्यांचा मूळपुरुष महाराज कर्ण म्हणून कोणी होता असें म्हटलें आहे. हा कर्ण कोण याचा निर्णय करतां येत नाहीं. बरेच विद्वान लोक

त्याला महाभारतांतील कर्णच समजतात. पण तें बरोबर नाहीं. कारण भारतीय कर्ण सूत म्हणजे मिश्रजातीय होता, व म्हणून त्याला महाराज म्हणणें शक्य दिसत नाहीं. कांहीं तरी वंशवृक्ष जुळवावयाचा तर अशा मिश्रजातीय कर्णालाच मूळपुरुष काय म्हणून कोणी मानील ? म्हणून आमच्या मतें हा कर्ण भारतीय नसून गुर्जर वंशांतीलच कोणी मोठा राजा असावा, पण त्याचा वृत्तान्त आज कांहीं उपलब्ध नाहीं. हे गुर्जर लोक इतक्या दक्षिणेकडे कसे आले हें सांगता येत नाहीं, पण ह्युएनत्संगाचे वेळीं गूर्जर राज्य म्हणून प्रख्यात असलेलें जें भिनमालचें राज्य तेथून ते खालीं आले यांत शंका नाहीं. भडोचचे हे गुर्जर राजे आपल्या दानलेखांत स्वतःला स्वतंत्र राजे म्हणवीत नसून सामन्त ह्मणवीत असत. यावरून ते बहुधा भिनमालच्या गूर्जर राजांचे मांडलिक असावे असें दिसतें.

गुजरात देश उत्तर व दक्षिण हिंदुस्थानाच्या मध्यें स्थित असल्यामुळें तेथें दोन्ही ठिकाणच्या लोकांची गांठ पडते. तेथील गुर्जर राजे उघड उत्तरेकडील आहेत. पण त्यांच्या दानलेखांत इ. स. २४९ त सुरू झालेला त्रेकूटक उर्फ कलचूरी शका चा उपयोग केलेला आहे. हे लेख गुजराथी वळणाच्या पण दक्षिणी अक्षरांनीं लिहिलेले असून त्याच्या खालीं राजांचा स्वहस्त मात्र उत्तरेकडील वळण्याचा असतो. या वरून हे राजे उत्तरेकडील, पण त्यांची जात सामान्यतः दक्षिणेकडील होती असें उघड होतें. या प्रान्तावर गुर्जरापूर्वी हैहयवंशीय त्रकूटकांचें राज्य होतें. या त्रैकूटिकांची राजधानी त्रिकूट हें हल्लीं कोठें आहे हें जरी अद्यापि समजलेलें नाहीं, तरी वाल्मिकि रामायण आणि कालिदासाचा रघुवंश यांत त्याचा निर्देश आलेला आहे.

गुजराथ प्रान्तांतून तापी, नर्मदा, मही आणि साबरमती या नद्या वाहत जाऊन समुद्राला मिळतात व त्यांच्या योगानें त्या प्रान्ताचे स्वाभाविकपणें तीन भाग होतात, असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांत नर्मदेपर्यंतच्या मुलखाला दक्षिण गुजराथ, तेथून महीपर्यंत मध्य गुजराथ आणि महीच्या पलीकडे उत्तर गुजराथ असें म्हणतां येईल. प्राचीनकाळीं यापैकीं दक्षिण भागाला परान्त व नंतर लाट अशीं नांवें मिळालीं होतीं. परांत नांव महाभारतांत आलें असून लाटाचा उल्लेख अनेक दानलेख व वराहमिराचे ग्रंथ यांत आलेला आहे. मध्य गुजराथेला पूर्वी आनर्त म्हणत. पण त्या नांवाचा मागमूस लवकरच नाहींसा होऊन त्याच्या जागीं भरुकच्छ हें नांव आलें. उत्तर गुजराथेला ह्युएनत्संगानें आनंदपूर म्हटलें आहे. दक्षिणेंतून येथें आलेला त्रैकूटक राजांचा अंमल या तीन भागांपैकीं दक्षिण व मध्य भाग यांवर होता. त्या मुळेंच भडोचच्या गुर्जर राजांच्या ताम्रलेखांत दक्षिणी अक्षरमाला व त्रैकूटक शक यांचा उपयोग केलेला आढळतो. पुढे गूर्जर राजांनीं दक्षिण गुजराथेवर देखील आपला अंमल बसविला. पण पुन: लवकरच दक्षिणेंतील चालुक्यांनीं तो भाग जिंकून नवसारी येथें आपल्यापैकीं एका घराण्याची स्थापना केली. हें गुजराथेंतील चालुक्य घराणे होय. या चालुक्यांचा एक ताम्रपट फार महत्वाचा आहे. त्यांत त्रैकूटक शकाचा उपयोग केलेला असून शिवाय सिन्धप्रान्त काबीज केल्यावर आरबांनीं इतर जवळचे प्रान्त जिंकण्याचा प्रयत्न केल्याबद्दल त्यांत सांगितलें आहे. या प्रयत्नापैकीं एका प्रयत्नांत त्यांची नवसारी येथें चालुक्यांशीं गांठ पडून त्यांना हार खावी लागली. हा उपरिनिर्दिष्ट ताम्रपट इ. स. ७३९ त ( त्रैकूटक शक ३९० ) कोरलेला असून पुलकेशीच्या नांवाचा आहे, व हिंदुस्थानच्या सामान्य इतिहासावरहि त्यानें किंचित् प्रकाश पडण्यासारखा आहे. त्यांत म्हटलें आहे:–' दारितोदित सैन्धव कच्छेल्ल सौराष्ट्र चावोटक मौर्य गुर्जरादि राज्ये नि:शेष दाक्षिणात्य क्षितिपति जिगीषया दक्षिणापथ प्रवेश प्रथममेव नवसारिका विषय प्रसाधनायागते समरशिरसि विजिते ताजिकानीके' इ० ( बां. गॅ. गुजराथ ). आर्य लोक आरबांना ताजीक म्हणत. या ताजिकांनीं सिंध, कच्छेल, सौराष्ट्र ( वलभी );

चावोटक, मौर्य ( याचें वर्णन पुढें येईल ). आणि गुर्जर या राज्यांवर स्वाऱ्या करून नंतर नवसारी मार्गानें सगळा दक्षिण भाग जिंकण्याच्या उद्देशानें चालुक्यांवर हल्ला केला असें वरील वर्णनांत म्हटलें आहे. या यादीवरून इ. स. ७३९ त सिंधप्रांत आणि नवसारी यांच्या दरम्यान कोणतीं राज्यें होतीं हें समजतें. त्यांत आलेले गुर्जर राज्य म्हणजे नर्मदे- पलीकडील सर्व गुजराथ प्रान्त होय असें आम्हाला वाटतें. मध्य गुजराथचे कांहीं भाग जरी क्वचित् वलभीच्या राज्यांत मोडत तरी सामान्यपणें तो भाग दद्दांच्या भडोच येथील घराण्याच्याच ताब्यांत होता. पण आनन्द- पुर आणि कच्छ हे भाग ह्युएनत्संगाचे वेळीं मालव राज्यांत समाविष्ट झालेले होते. असो, पूर्वी सांगितल्याप्रमाणे गुर्जरवंशाचें राज्य एकंदर २०० वर्षें चालल्यावर भडोचचें घराणें नामशेष झाले ८ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास हा प्रकार झाला असावा, पण तो कसा घडून आला याविषयीं कांहीं ऐतिहासिक माहिती उपलब्ध नाहीं. त्याचा नाश अरब लोकांकडून झालेला नाहीं एवढें खास. मग तो चालुक्यांनीं केलेला असो वा चावोटकांनीं केलेला असो, त्याविषयीं निश्चित कांही सांगतां येत नाहीं. भडोचचें गुर्जर घराणें जरी नष्ट झालें, तरी त्याचे नांव सर्व प्रान्ताला मिळाल्यामुळें तें मात्र चिरंजीव झाले आहे याचें आश्चर्य वाटतें.

देशाला नांवें पडण्याचीं कारणे भिन्न भिन्न असतात. इंग्लड देशाला ने नांव मिळण्याचे कारण ॲंगल लोक पण ने तर एकंदर जनसमूहाचा अगदींच क्षुल्लक भाग होते. त्यांच्या बरोबरचे ब्रिटन, सॅक्सन, नॉर्मन, डेन इत्यादि लोक सर्व मागें पडून एकटे ॲंगलच नांवामुळे पुढें आले. भरतखं- डाला सांप्रत आपण सर्व लोक हिंदुस्थान म्हणतों, तथापि हें नांव त्याला कांहीं आपण स्वत: दिलेले नव्हे. ते परकीयांनीं दिलेलें आहे. पण तेंच आतां पुढें होऊन मूळचें आपण दिलेलें भरतखंड हें नांव लुप्तप्राय झालें आहे. पंजाबच्या नांवाची तीच स्थिति. त्याचें मूळचें नांव पंचनद. पण तें आतां केवळ वेद व महाभारत यांत मात्र राहिलें आहे; परकीयांनीं दिलेलें पंजाब हें प्रचारांत आलें आहे. गुजराथच्या नांवांतहि असाच कांहीं प्रकार झाला असावा असें आम्हाला वाटतें. म्हणजे गुजरात हें नांव मूळ

परकीयांनीं दिलेलें असून मग तेथील लोकांनीं त्याला गुर्जर राष्ट्र या रूपानें आपलेंसे केलें. वस्तुतः गुर्जरांची सामक्षा आतां तेथें कांहींच राहिलेली नाहीं. तेथील लोक गुर्जरांचें वंशज नसून त्यांपासून स्वरूप व स्वभाव या बाबतींत सर्वस्वी भिन्न आहेत. तेथील ब्राह्मणही गुर्जरवंशीय नाहींत. नागर ब्राह्मणांना जरी कित्येक पुराणेतिहासविशारद पंडित गुर्जर अतएव परकीय समजतात तथापि वस्तुतः ते तसे नाहींत. त्याप्रमाणेंच भार्गव आणि औदीच्य ब्राह्मण हेही गुर्जरांनंतर पुष्कळ काळाने तेथें आलेले असून ते स्वतःला द्रविडेत म्हणूनच समजतात ब्राह्मणांप्रमाणे गुजरातेंतील क्षत्रिय वर्णहि गुर्जरवंशीय नाहीं. त्यांच्यांतील वळ, चावडे, गोहिल, सोळुखी इत्यादि क्षत्रिय आपल्याला गुर्जर म्हणवीत नाहींत. त्यांच्या या स्वतःच्या समजा विरुद्ध, व त्यांच्यांतील परंपरागत हकीगती विरुद्ध कांही पंडित त्यांना परदेशस्थ गुर्जर म्हणतात. पण या पंडितांच्या मतापेक्षां त्या लोकांची परंपराच अधिक ऐतिहासिक अतएव अधिक विश्वसनीय होय. या संबंधानें आणखी विवेचन प्रसंगानुसार पुढें येईल. तात्पर्य गुजरातेंतील ब्राह्मण व क्षत्रिय वर्गांतील लोक तसेंच इतरहि जातीचे लोक स्वरूपदृष्ट्या व इतिहासदृष्ट्या गुर्जर नाहींत. पण असे असूनहि त्या प्रांताला गुजरात असें नांव मिळालें याचे कारण, तेथे आपणाला गुर्जर म्हणविणारें घराणे २०० वर्षे म्हणजे इ. स. ५५० पासून इ. स. ७५० पर्यंत राज्य करीत होते हेच होय असे आम्हाला वाटते. या गुर्जरवंशाने आनर्त व लाट हीं प्रान्ताची जुनी नांवें मागे सारून स्वतःचे नांव पुढें केलें; व तसेंच तें त्याच्या मागेंहि राहिलें आहे त्यांचा या प्रान्तावरील अंमल यशस्वी व वलभी राजांच्या सारखाच सुखदायक झालेला दिसतो. त्यांच्या राज्यांत नमूद करण्यासारख्या मोठमोठ्या घडामोडी घडून आल्या नाहींत याच गोष्टीवरून खरें म्हटलें तर त्यांचें राज्य एकमार्गी सुखाचें होतेसें दिसतें व त्यामुळेंच कदाचित त्यांचे नांव प्रांताच्या नांवांत चिरस्थायि झालें असावें.

गुर्जर राजांनीं आपल्या भाषेचा पगडा त्या लोकांवर बसविल्यामुळेंहि कदाचित् त्या प्रान्ताला त्यांचें नांव मिळालेलें असेल. गुजराती भाषेचें स्वरूप उत्तरेकडील असून ती भाषा महाराष्ट्रीपेक्षां शौरसेनीशींच निकट

आहे यांत संशय नाहीं. तथापि पूर्वी एकदां महाराष्ट्री देखील गुजराथेंत प्रबळ होती. त्रैकूटकांच्या राज्याचे वेळीं तेथील लोकांवर महाराष्ट्री भाषेची छाप न पडणे अशक्य होतें. त्रैकूटकांची लिपि व त्यांचा शक तर गुर्जर-राजांच्याहि दानलेखांत आढळत असल्याबद्दल पूर्वीं सांगितलेंच आहे. शिवाय काठेवाड आणि गुजराथेंतील जैन लोकांचें धार्मिक वाङ्मय महाराष्ट्रींत आहे, आणि अजूनहि धर्मग्रंथांचें लिहिण्यांत तेथील जैन महाराष्ट्रीचाच उपयोग करतात. या गोष्टीवरूनहि वरील विधानाची साक्ष पटते. म्हणजे एका काळीं गुजराथेंतील सामान्य लोकांची भाषा महाराष्ट्री किंवा तत्सदश होती असेंच अनुमान करावें लागतें. कदाचित् दक्षिणी जैन सहाव्या शतकाच्या पूर्वीं सर्व हिंदुस्थानांतील जैनांत अग्रगण्य असल्यामुळें गुजराथी जैनांनी त्यांच्यापासून आपला धर्म व त्याबरोबर धर्म ग्रंथांची भाषा म्हणून महाराष्ट्री यांचा स्वीकार केला असेल. कारण कांहीं असो, बौद्ध धार्मिक ग्रंथ जसे पाळींत आहेत तसे जैन महाराष्ट्रीय आहेत. भाषेचा हा प्रश्न येथे इतकांच सोडून एवढे सांगणें पुरे आहे कीं, ती भाषा उत्तरे-कडील गुर्जरांच्या भाषेवरून बनलेली असल्यामुळे ती शौरसेनीशीं निकट संबद्ध आहे. म्हणजे गुजराती भाषा व प्रान्ताचें गुजरात हें नांव इ-सनाच्या आठव्या शतकापासून प्रचलित आहेत असें ठरतें.

गुर्जरांच्या ताम्रपटांवरून पहातां ते सूर्योपासक असावेत असें दिसतें, व त्यांत कांहीं आश्चर्यहि नाहीं. त्यांच्या मूळ ठिकाणीं म्हणजे भिनमाल येथें सूर्याचें मंदिर होतेंच. ते सूर्योपासक होते एवढयावरून त्यांना परकीय देशस्थ मानण्याचे कांहीं कारण नाहीं. खरोखर पहातां सूर्योपासना भरतखंडांत वेदकालापासून प्रचलित असून ब्राह्मणांचा अति पवित्र जो गायत्री मंत्र त्याची देवता सूर्यच आहे. अलीकडील काळांत शिव व विष्णु यांच्या उपासनेने अग्रस्थान पटकाविल्यामुळें जरी सूर्योपासना मार्गे पडली आहे, तरी ती केंव्हांहि समूळ नष्ट झालेली नाहीं. इ स पू. ४०० च्या सुमारास टोसियस नामक ग्रीक लेखकानें असें लिहिले आहे कीं अबूपासून पंधरा दिवसांचे वाटेवर एका ठिकाणीं सूर्यचंद्राच्या उपासनेचें एक मोठें क्षेत्र आहे. हें स्थान मारवाडांत कोठें तरी असावें ( बाँबे गॅझिटी-

मर, गुजरात, पा. ५३२ ). या लिहिण्यावरून पारशी लोकांचा हिंदुस्थानाला संपर्क होण्यापूर्वीपासूनच येथें सूर्योपासना चालू होती हें उघड होतें. मारवाडांतील भिनमालचें सूर्यमंदिर हें अर्थात् फार जुनें असलें पाहिजे. त्याप्रमाणें प्रभास येथील चंद्रोपासनाहि बरीच प्राचीन आहे. प्राचीन राजांना अनेकवार मोठे सूर्योपासक म्हटलेलें आढळतें, व ठाणेश्वराच्या वर्धन घराण्यांत आणि काठेवाडांतील वलभी घराण्यांतहि असे सूर्योपासक राजे दिसून येतात. कित्येक राजांनीं पूर्वीची सूर्योपासना सोडून दुसरीचा स्वीकार केलेला असल्यामुळें त्यांना त्याप्रमाणे माहेश्वर व भागवत अशीं विशेषणे लाविलेलीं दिसतात. अद्यापिहि आमच्या पंचायतन पूजेंत सूर्योपासना शिल्लक आहेच. एका विशिष्ट प्रकारचे सूर्योपासक म्हणून परदेशस्थ मग नामक लोकांचा हिंदुसमाजांत प्रवेश होऊन त्यांत ते समाविष्ट झाले म्हणून हरतऱ्हेच्या येथील सूर्योपासकांना परदेशीय मग समजणें गैर आहे. पूर्वी सांगितल्याप्रमाणें आर्यांच्या दुसऱ्या स्वारींत आलेल्या सोमवंशीय टोळ्यांपैकीं गुर्जर हे असून त्यांची वृत्ति गीतेत सांगितलेल्या वैश्यांची होती; म्हणजे ते कृषि व गोरक्ष्य हे धंदे प्राधान्यें करून करीत. पंजाबांतील आपल्या मूळ स्थानांतून ते प्रथम मारवाडांत भिनमाल येथे कां व कसे आले तो इतिहास पुढे योग्य स्थळीं सांगतां येईल.

स्कंदपुराणांत ( आमच्या मतें या पुराणाचा काळ ८ वें शतक होय ) गुजराथ व काठेवाड यांपैकीं तीन चार सुप्रसिद्ध तीर्थ-स्थानांचा उल्लेख असून त्यांच्या उत्पत्तीविषयीं त्यांत कांही काल्पनिक पण गमतीच्या कथा दिलेल्या आहेत. त्यांचा विचार पुढें यथा प्रसंग होईल, येथें एवढेंच सांगावयास पाहिजे कीं नर्मदातीरावरील भरुकच्छ ( भृगु आश्रम ), स्तंभपुर उर्फ खंबायत जवळील महीसागर संगम व कुमारी तीर्थ, नागर ब्राह्मणांचे आनन्दपुर आणि प्रभास म्हणजे सरस्वतीनामक एका काल्पनिक नदीच्या समुद्राशीं झालेल्या संगमाजवळील तीर्थ, तसेंच सोमनाथाचें सुप्रसिद्ध देवालय इत्यादि पवित्र स्थानें ७ व्या शतकांत फार प्रसिद्ध व सर्वांना पूज्य अशीं होतीं.

हें प्रकरण पुरें करण्यापूर्वी भडोच, खंबायत आणि प्रभास या गुजराथेंतील बंदरांचा प्राचीन काळापासून इतर ठिकाणांशीं दर्यावर्दी व्यापार कसा

चालत असे, याचे दिग्दर्शन करणें अवश्य आहे. पृथ्वीपर्यटनवर्णनात्मक पेरिप्लस नांवाच्या ग्रंथांत भडोच बंदरांत बाहेरून येणाऱ्या मालांत मध, पितळ, कथील, शिसें, पोवळी, अशुद्ध सोनें, विविध कापड, चिटें, डीक, सोन्यारुप्याचीं नाणी, मलमें, सुगंधि द्रव्यें, व राजे लोकांच्या उपयोगाचीं निरनिराळीं वाद्यें आणि त्यांच्या जनानखान्यासाठीं तरुण यवनी कन्या व उंची वस्त्रें यांचा निर्देश केलेला असून, बाहेर जाणाऱ्या मालांत हस्तिदंत, मातीचीं भांडीं, कापूस, रेशीम, मिरची इत्यादि पदार्थ सांगितले आहेत. हे वर्णन इ. स. २०० च्या सुमाराचे आहे. आठव्या शतकांतील आरब लोकांनी केलेल्या वर्णनाशीं हें ताडून पहातां असे दिसते की, त्यावेळीं काठेवाडांत व गुजराथेंत सोन्यारुप्याच्या खाणीचें काम चालत असे. तथापि उत्तम सोन्याचीं नाणीं कशी पाडावीं हे तेथील लोकांस चांगलेंसे माहीत नव्हतें. म्हणूनच मुबलक सोनें व रुपे देशांत पैदा होत असूनहि त्यावेळीं सोन्यारुप्याची नाणी त्या लोकांना बाहेरून आणणे युक्त वाटे. गुजराथेंत दीन्नार नाणें चालत असे व तें परदेशी होतें. दीन्नार हा शब्दच परकीय आहे. वरील बंदरांशिवाय सिंदन ( आजचे संजाण ) बंदरांतून सागाचें लांकूड-बांबूच्या काठ्या हा मालहि बाहेर रवाना होई. भडोच येथील भाल्यांचीं दांडे बाहेर ठिकाणीं फार खपत. तसेंच खंबायतचे जोडे प्रसिद्ध असत ( अजूनही तसे आहेत. ) पाचूचे खडेहि गुजराथेतून बाहेर देशीं जात पूर्वीं गुजराथेतील राजांच्या जनानखान्यासाठीं यवनी तरुणी इकडे येत, पण तो प्रकार पालटून आठव्या शतकांत अरब सरदारांसाठीं गुजराथेतून तरुणी तिकडे नेऊं लागले ! ! या सुमारास मुसलमानी देशांतून म्हणजे विशेषतः अरबस्तान व इराण यांतून घोडेहि इकडे आणीत असत. महाभारतकालापासून प्रसिद्ध असलेलीं भडोचची कापसाचीं वस्त्रे व कापूस हीं अद्यापि तशींच असून त्यांचीहि बाहेरदेशीं रवानगी होत असे.

# प्रकरण १० वें.

## बादामीचें चालुक्य घराणें.

[ या घराण्याच्या इतिहासाची ताम्रलेख, शिलालेख इत्यादि साधन विपुल असून त्यांवरून कळून येणारा त्याचा इतिहास डॉ. सर रामकृष्ण भांडारकर यानी आपल्या दक्षिणच्या इतिहासांत दिलाच आहे. त्यावरून मुख्यत्वे हें प्रकरण लिहिले असून रामायण, महाभारत व ताम्रपटादि लेख यांच्या परिशीलनानें झालेलीं तद्विषयक आमचीं मतेंहि यथाप्रसंग आम्हीं नमूद केलीं आहेत. ]

दक्षिण हिंदुस्थानांतील ह्युएनत्संगानें पाहिलेलीं व वर्णिलेलीं मुख्य राज्यें म्हटलीं म्हणजे महाराष्ट्र, कांची आणि कोंकणपुर हीं होत. त्यांतहि महाराष्ट्रानें इतर सर्वांना आपले अंकित करून सर्व दक्षिण भागावर साम्राज्य स्थापिलें होते. या राज्यांचा जो कांहीं इतिहास प्राचीन कोरींव लेखांवरून दिसून येण्यासारखा आहे तो येथें देण्याचा प्रयत्न आम्ही करीत आहों.

या तीन्ही राज्यांतील राजघराणीं ज्यांना आज आम्हीं मराठे म्हणतों, त्या जातीचीं होतीं असें आमचें मत आहे. कित्येकांस हें मत चमत्कारिक वाटेल. पण वस्तुस्थितीच तशी असल्यामुळें ही गोष्ट नाकबूल करून चालणार नाहीं. त्या राजघराण्यांचे सांप्रतचे प्रतिनिधि मराठेच आहेत. त्यावेळचे चालुक्य म्हणजे आजचे चाळके किंवा सोळुंखी होत. कांचीचे पल्लव आज पालवे म्हणून आणि कोंकणपुर अथवा बनवासी येथील कदम्ब हे कदम या नांवानें आज प्रसिद्ध आहेत. म्हणजे ७ व्या शतकाच्या

आरंभीं दक्षिणेंत असलेल्या मुख्य तीन्हीं राज्यांतील राजे महाराष्ट्री ऊर्फ मराठेच होते. वंशदृष्टीनें ते मिश्र आर्य असून प्रथमतः ते गोदावरीच्या आसपास रहात आणि महाराष्ट्री नांवाची प्राकृत भाषा बोलत.

अशी ही वस्तुस्थिति आजवर कोणाच्या लक्षांत आलेली दिसत नाहीं; म्हणून कित्येकांनीं बादामीच्या चालुक्यांना कानडी म्हणजे द्रवीड ठरविलें आहे. पल्लवांचें तर बहुतेकांना कोडेंच पडलें असून कदम्ब म्हणजे कोणी मूळचे द्रवीड-वंशीय ब्राह्मण असावे असें आजवर समजत आलेले आहेत. पण हा सर्व भ्रम आहे. हीं सर्व घराणीं मूळ आर्यवंशीयच होत. कालान्तराने दक्षिणेंतील मूळच्या द्रवीड राजवंशाशीं त्यांचा शरीरसंबंध घडून त्यांच्यांत पुढें मिश्रण झालें असावें. तथापि त्यांनीं आपला मूळचा आर्यस्वभाव आणि आर्यधर्म व आर्यभाषा न सोडतां तशींच कायम ठेविलीं होतीं. त्या सर्वांचा इतिहास नीट लक्षांत येण्यासाठीं आर्यलोकांचा दक्षिणेंत प्रथम प्रवेश झाला, तेव्हांपासून दक्षिणच्या इतिहासाचें विहंगमदृष्ट्या निरीक्षण करणें अवश्य आहे.

आर्य लोकांनीं दक्षिणेंत उतरून तेथें वसाहती केल्या, याबद्दल आतां कोणता वादच राहिलेला नाहीं. डॉ. भांडारकरांचे मतें हा वसाहतकाल पाणिनि व कात्यायन या दोन प्रसिद्ध वैयाकरणांच्या मध्यें केव्हां तरी म्हणजे इ. स. च्या पूर्वी ९ व्या आणि ४ थ्या शतकांच्या दरम्यान असावा. ( आमच्या मतें तो याहूनहि प्राचीन असूं शकेल. पाणिनीनें एका सूत्रांत अश्मकी हें राजनाम तसेंच राजपुत्रनामहि हेंच आहे असें सांगितलें असून, अश्मक म्हणजे आमच्या मतें हल्लींच्या पैठणच्या आसपासचा प्रान्त असावा. पाणिनीहून प्राचीन कालच्या ग्रंथांत अश्मक हें उत्तरेकडील

प्रान्तांचें व लोकांचें नांव म्हणून सांगितलेलें आढळतें. ) आर्य लोकांची दक्षिणेंतील पहिली वसाहत विदर्भ देशांत म्हणजे आजच्या वऱ्हाडांत झाली, व तेथून पुढें ते गोदावरीतीरावरील प्रतिष्ठान ऊर्फ पैठणपर्यंत पसरले. गोदावरीच्या कांठचा मुलूख या विजयशाली आर्यांना फारच आवडला, व सर्व जगांत उत्तम प्रांत असें त्यांचें त्यांनीं पुराणांत वर्णन करून या श्रेष्ठपणाला कारणीभूत झालेल्या गोदावरीला उत्तरेकडील गंगेच्या जोडीस बसविलें. नवीन वसाहतीच्या राजधानीला देखील त्यांनीं प्रतिष्ठान असें जुनेंच नांव दिलें. आज ज्याला प्रयाग म्हणतात. त्याचेंहि प्रथम प्रतिष्ठान असेंच नामकरण पूर्वींच्या आर्यांनीं केलें होतें, व त्याच नांवाची दक्षिणेंत पुनरावृत्ति झाली. प्रतिष्ठानाच्या स्थापनेनंतर हे वसाहतवाले पुढें आणखी निरनिराळ्या प्रान्तांत राहूं लागले; आणि त्या प्रान्तांना त्यांनीं राष्ट्र असें नांव दिलें. या राष्ट्रांचीं नांवें पांडुराष्ट्र, गोपराष्ट्र, आणि मल्लराष्ट्र अशीं महाभारतांतहि लिहिलेलीं असून हीं तीन व अश्मक मिळून आजचा महाराष्ट्र झालेला आहे. प्रान्त किंवा देश या अर्थी राष्ट्र हा शब्द महाराष्ट्रीयांचा फार आवडता होता असें पुढें आम्हीं दाखविणार आहों. या राष्ट्राशिवाय आणखी दक्षिणेंत कृष्णेच्या उगमाजवळ कुंतल देश म्हणून होता. महाभारतांत कुंतल हें नांव उत्तरेकडील व दक्षिणेकडील अशा दोन्ही देशांच्या यादींत आलेलें आहे. म्हणजे आर्यांच्या अमलाखालीं असलेल्या प्रान्ताच्या यादींत तें असून शिवाय दक्षिणेकडील अनार्य देशांतहि तें होतें. कदाचित तें दोघांच्या सरहद्दीवर असल्यामुळें असा प्रकार झालेला असेल * असो. कुंतल देशापर्यंत म्हणजे कृष्णानदीपर्यंत आर्यांचा दक्षिणेंत प्रवेश झाल्यावर तेथें पुढें त्यांना अटकाव झाला. तुंगभद्रेच्या

* महाभारतांतील देशाची यादी एका ठिकाणी दिली आहे ती पहा.

पलीकडे त्यांना जातां आलें नाहीं. या नद्यांच्या दक्षिणेकडील देशांचीं व लोकांचीं नाममाला महाभारतांत स्वतंत्र दिलेली असून द्रविड, चोल, पांडय, केरल अशीं तिला नेहमीप्रमाणें सुरुवात झालेली आहे. हे लोक व त्यांचीं राज्यें निःसंशय दक्षिणेंतील मूळ अनार्य होत.

आतां या संबंधांत असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, महाराष्ट्राचा प्रांत हा एक अगदीं विरल वस्तीचा कां होता? दक्षिणेंत तुंगभद्रेच्या खालीं तर लोकवस्ती पुष्कळ होती; असें असतां तिच्या जवळचा महाराष्ट्र अगदीं विरळ वस्तीचा कां असावा ? या प्रश्नाचें उत्तर रामायण कथेचा ऐतिहासिक दृष्ट्या विचार केल्यास मिळण्यासारखें आहे. या विस्तीर्ण प्रदेशावर त्या वेळीं जंगलें पसरलेलीं असून त्याला तेव्हां दंडकारण्य असें नांव होतें. चित्रकूट पर्वतापासून तों खालीं मलय पर्वताच्या ऋष्यमूक शिखरापर्यंत म्हणजे हल्लींच्या रेवा संस्थानापासून तों म्हैसूरपर्यंत सर्व प्रदेश दंडकारण्यांत मोडत असे. रामाने आपला पहिला मुक्काम चित्रकूटावर केला त्याचें कारण तेथपर्यंत दंडकारण्याची हद्द होती हेंच होय. दंडकारण्याचा हा प्रदेश प्राचीन काळीं म्हणजे इ. स. पूर्वी १००० वर्षांच्या सुमारास सर्वत्र अरण्यावृत्त होता यांत कांहीं आश्चर्य नाहीं. अगदीं अलीकडे म्हणजे ब्रिटिश अमदानीच्या आरंभीं देखील त्याचा बराच भाग तसा असून विंध्य, सातपुडा आणि महेन्द्र पर्वतांजवळील प्रांत अगदीं स. १८५८ पर्यंत अरण्यमय होते. ही वस्तुस्थिति झाली. पण पुढे प्रश्न असा आहे कीं, वऱ्हाड, पैठणचा मुलूख, तसेंच दक्षिणे-कडील आणखी भाग हे सर्व सपाट असूनहि अरण्यमय कां असावे? डोंगराळ देशांत लोकवस्ति न वाढणें बरोबर आहे, पण येथें तसें कां व्हावें ? या प्रश्नाचा खुलासा असा आहे कीं, या प्रदेशांत

त्यावेळीं राक्षसांचा किंवा प्रचलित इतिहासाच्या भाषेंत बोलावयाचें तर मनुष्यभक्षकांचा फार उपद्रव असे. समाजशास्त्रावरून असें दिसून आलें आहे कीं, नरमांसभक्षक लोकांची प्रजा फारशी कधीं वाढत नाहीं. दंडकारण्यांत असेच लोक त्या वेळीं विशेषतः असल्यामुळे त्यांतील वस्ति अगदीं तुरळक होती. नरमांस-भक्षकांखेरोज मृत प्राण्यांच्या मांसावर उपजीविका करणारे महार व मांग हेही लोक दंडकारण्यांत रहात असत. आर्य लोक उत्तरेकडून खालीं येऊं लागले तेव्हां त्यांनीं तेथील जंगले तोडून जमीन साफ केली व ती लागवडीस आणिली. महार व मांग लोकांना त्यांनीं हांकून न देतां अस्पृश्य समजून वेगळें राहूं दिले. या गोष्टीचा विचार केल्यास आर्यांनीं दक्षिणेकडील हा दंडकारण्याचा भाग कोणापासून जिंकून घेतला असें म्हणण्यापेक्षां त्यांना तो रिकामा सांपडून त्यांनीं तेथें वसाहती केल्या असें म्हणणेच अधिक जुळेल. जे कोटे कोठें नरमांसभक्षक त्यांना तेथें आढळले त्यांचा अर्थातच त्यांनीं नाश केला, झाडे तोडून जमीन साफ केली, नगरे व ग्राम यांची रचना केली व महार व मांग यांना गांवाबाहेर अस्पृश्य म्हणून रहावयास लाविलें. दक्षिणेतील शेतकरी वर्ग मुख्यत्वें करून आर्यवंशीय असण्याचें हेंच कारण होय. या गोष्टीचे विशेष महत्व काय आहे याचा विचार पुढें येईल. हे लोक बहुधा शुद्ध आर्य नसून आर्यांच्या दुसऱ्या प्रवेशाचे वेळीं या देशांत आलेल्या यदुवंशीय टोळ्यांपैकीं मिश्र आर्य असावे. त्यांनीं प्रथम कुरुक्षेत्र, शूरसेन, व सौराष्ट्र या बाजूला आपल्या वसाहती केल्या आणि तेथील मूळच्या नाग लोकांच्या कन्यांशीं विवाह केल्यामुळें ते पुढें मिश्र आर्य बनले.

महाराष्ट्र देश पूर्वी विरळ वस्तीचा असण्याचें आणखीहि एक कारण सांगतां येण्यासारखें आहे. तें असें कीं, कोणत्याहि

समुद्रकांठचा प्रदेश आंतील उंच भागापेक्षां आरोग्यदृष्ट्या कमी प्रतीचा असला, तरी ही उणीव साधारणतः त्याच्या सुपीकपणानें भरून काढिलेली असते; त्याचप्रमाणें इतर देशाशीं समुद्रांतून त्याला व्यापार करतां येत असल्यामुळें आंतील डोंगरसपाटीच्या प्रदेशापेक्षां तो भरभराटलेला असतो. याच कारणास्तव दक्षिण हिंदुस्थानच्या पूर्व पश्चिम किनाऱ्यावरील द्रविड प्रजा भरभराटींत असल्यामुळें आंत दूरवर राहणाऱ्या लोकांपेक्षां त्यांची संख्या पुष्कळ वाढून इतर देशांतील लोकांच्या संघट्टणामुळें पुष्कळ बाबतींत सुधारलेलीहि होती. असें असल्यामुळें महाभारतांत म्लेंच्छ नांवानें उल्लेखिलेले द्रविड लोक दक्षिणापथाच्या दोन्ही किनाऱ्यांवरील चोल, द्रविड, पाड्य, आणि केरल नांवांनीं सारखे लागून गेलेले आढळून येतात. यांशिवाय पूर्व किनाऱ्यावर कलिंग व आंध्र हे असून पश्चिम किनाऱ्यावर उत्तरेकडे कोंकण प्रांत होता. यांपैकीं कलिंग देश महाभारतापूर्वीच आर्यांच्या कह्यांत बहुतेक आलेला होता; व जरी तेथें त्यांनीं सर्वत्र वसती केली नव्हती तरी उत्तरेकडील आर्यांच्या देशनाममालेंत त्याची गणना होण्यापुरेशी आर्यांची छाप त्यावर पडली होती. महाभारताचे काळीं कोंकण प्रांत मात्र आर्य वर्चस्वाखालीं आलेला नसल्यामुळें त्याची गणना उघडच दक्षिणेकडील देशांच्या नाममालेंत झाली. कोंकणापैकीं उत्तर भाग म्हणजे अपरान्त हा मात्र उत्तरेकडील आर्य देशांत मोडत होता.

महाभारताचे शेवटचें संस्करण होण्याचे वेळीं म्हणजे इ.स. पूर्वी तिसऱ्या शतकाचे आरंभी दक्षिणापथाची अशी स्थिति होती. पुढेंहि कित्येक शतकेंपर्यंत ती तशीच होती. अशोकाच्या शिलावरील आज्ञालेखांत आलेले राष्ट्रिक, पेदनिक आणि अस्सक हे सर्व दाक्षिणात्य आर्य होते, व त्यांनाच

पुढें महारथ किंवा महारट्ट म्हणूं लागले, असें नाशिकच्या लेण्यांतील लेखांवरून दिसून येतें. पेरिप्लस ग्रंथांत व टालेमीनेंहि या प्रांताला एरियाके म्हणजे आर्यदेश असें नांव दिलेलें असून त्याचे कुंकण ( कोंकण ), महाराष्ट्र, आणि कुंतल असे तीन भाग देखील सांगितले आहेत. कोकण किनारा त्यावेळीं आर्यांच्या वर्चस्वाखालीं आलेला असून आर्यभाषेची छापहि त्यावर पडली होती. महाराष्ट्र व कुंतल हीं नांवें पुढील संस्कृत ग्रंथांत दक्षिणापथाच्या भागांचीं म्हणूनच आलेलीं असून त्यांचीं मुख्य शहरें पैठण आणि कोल्हापुर अथवा करहाट अशी अनुक्रमें होतीं. तेथील राजे वसाहतेच्या वेळेपासून तों अशोकापर्यंत आर्य व महारथ होते. पण इ. स. पूर्वीच्या पहिल्या शतकापासून इ. स. ३ ऱ्या शतकापर्यंत कोंकण, महाराष्ट्र व कुंतल या सर्व भागांमिळून बनलेल्या विस्तीर्ण प्रदेशावर किंबहुना बनवासीपर्यंत पुढील देखील दक्षिण प्रान्तावर सातवाहन ऊर्फ आंध्रभृत्य यांचें अधिराज्य स्थापन झालेलें दिसून येतें.

आतां हे सातवाहन कोणत्या जातीचे होते असा प्रश्न आहे. ते आर्य कीं अनार्य ? मराठे कीं द्रविड ? या प्रश्नाचा निर्णय करणें कठीण असले तरी तें काम महत्वाचें आहे. अद्यापि या प्रश्नाचें उत्तर कोणी निश्चित दिलेलें नाही. तथापि पूर्वीचा महाराष्ट्रांतील विरल वस्तीचा प्रश्न जसा रामायणाच्या साहाय्यानें सोडवितां आला, तसा इतर पुराणें व दुसरे प्राचीन लेख यांच्या आधारानें याहि प्रश्नाचा निर्णय करण्याचा आम्ही प्रयत्न करतों. सातवाहन ऊर्फ आंध्रभृत्य यांना पुराणांत शूद्र म्हटलें आहे. सातवाहन ऊर्फ शालिवाहन हा ब्राह्मण स्त्रीपासून शेषाला ( नागाला ) झालेला पुत्र होय, अशी दंतकथा प्रचलित आहे. असल्या दंतकथा जरी वरकरणी वेडेपणाच्या दिसल्या तरी त्यांत कांही तथ्यांशहि असतो. आंध्रलोक इतर द्रविड लोकांहून अगदीं निराळे दिसतात. द्रविडांपूर्वी पुष्कळ शतकें ते आर्यांच्या संस्कृतीशीं संबद्ध झालेले असल्यामुळें त्यांचा देश महाभारतांतील देशनामांच्या मालेंत उत्तरेकडील मिश्र-आर्य-देशांत गणिलेला असून दक्षिणेकडील म्लेंच्छ देशांत सांगितलेला नाहीं. मग हे आंध्र लोक नागवंशीय मानावे कीं काय ?

आजमितीस आंध्र देशाच्या म्हणजे तैलंगणाच्या निकट असलेल्या नागपूर प्रान्तांत नाग लोकांची पुष्कळच वस्ति आहे. तेलंगी ब्राह्मण निःसंशय आर्यवंशीय असून त्यांचे महाराष्ट्र ब्राह्मणांशीं अजून शरीरसंबंधहि होत आहेत. पण तेलंगी क्षत्रियांचे मात्र मराठा क्षत्रियांशीं विवाहसंबंध होत नाहींत. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां सातवाहन घराणे नागवंशीय असून त्यानें इ. स. पूर्वी पहिल्या शतकाच्या मध्याच्या सुमारास पाटलिपुत्राच राज्य जिंकून तेथें आपले वर्चस्व स्थापिलें, व पुढें महाराष्ट्रावर स्वारी करून तेथेंहि आपला अंमल बसविला असे अनुमान करावयास हरकत नाहीं. त्याची राजधानी प्रतिष्ठान म्हणजे पैठण येथे असून ती पूर्वींहि महाराष्ट्राची राजधानी होती. पैठण शहराचें हे महत्व अशोक व त्याच्या पूर्वींच्याहि कित्येक राजांपासून चालू होते, व सातवाहनांच्या कारकीर्दीत ते त्यांच्या विस्तीर्ण साम्राज्याचे केन्द्रस्थान बनल्यामुळे तर आतां ते अधिकच वाढले असले पाहिजे. तथापि सातवाहन आपल्याला धनकटक येथील आंध्रराजघराण्याचे अंकित समजून आंध्रभृत्य असे म्हणवीत. उत्तरेकडे पाटणापासून दक्षिणेकडे म्हैसूरपर्यंत पसरलेल्या अफाट साम्राज्याची राजधानी या नात्यानें यापुढे पैठण शहर फारच प्रसिद्धीस येऊन व्यापार व कलाकौशल्य यांचे माहेरघर बनले. याच कारणास्तव त्याची टालेमीच्या वेळी पाश्चात्य देशांतहि प्रसिद्धि होती, व मराठीतील पैठणी नामक स्त्रियांच्या उंची जरीकांठीं रेशमी वस्त्राच्या नांवांत त्याचा मोठेपणा आजहि दिसून येत आहे. सातवाहन घराण्यांतील राजे स्वतः विद्वान असून, विद्वानांचे आश्रयदातेहि होते. त्यामुळे काशी शहराच्या खालोखाल सुप्रसिद्ध विद्यापीठ अशीहि पैठण शहराची ख्याति झाली. पैठणचें हें वैभव पुढहि बरीच शतके म्हणजे अगदीं मुसलमानी अमदानीच्या अखेरपर्यंत चालू होते. सातवाहनानंतर जरी पैठणास कोणा मराठाराजांनी राज्य केले नाही, तरी त्यामुळें त्याचें महत्व कमी झालें नाही. वातापी म्हणजे बादामी, मानखेड, कल्याण, व देवगिरी या मराठ्यांच्या पुढील राजधान्या पैठणाच्या बरोबरीला आल्या नाहींत, आणि पैठण हेंच विद्येचें व कलाकौशल्याचे केन्द्र नेहमीं राहिले.

इतकें कीं, मुसलमानांच्या व मराठयांच्या अमदानींत देखील विशेष भानगडीचे विवाद पैठण येथील विद्वत्सभेपुढेच निर्णयार्थ पाठविण्यांत येत असत. या सर्व वैभवाला कारण पैठण हे सातवाहनांच्या विस्तीर्ण साम्राज्याची राजधानी होतें हेंच असून, त्यावरून सातवाहन राजे पूर्णपणें प्राचीन ब्राह्मणी ऊर्फ वैदिक धर्माचे अभिमानी असले पाहिजेत असे उघड होते.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें सातवाहन मूळचे नागवंशीय होत. पण पुढे त्याच क्षत्रियांशीं शरीरसंबंध होऊं लागले. नर्मदेच्या पलीकडे उज्जनी येथें शक नांवाचे मूळ परदेशस्थ पण यावेळी सर्वथा हिंदु बनलेले राजे राज्य करीत होते; त्यांपैकी रुद्रदामन् राजाच्या कन्येशीं एका सातवाहन राजानें विवाह केल्याचे प्राचीन लेखांवरून दिसून येते; व त्यांत कांहीं आश्चर्यहि नाही. पूर्वी चंद्रगुप्तानें एका यवन कन्येचे पाणिग्रहण केलें होते. तो शूद्र होता, तथापि तसे करावयास क्षत्रिय राजांना सुद्धां अडचण नव्हती. असो. सातवाहन या नागवंशीय राजांना आर्य क्षत्रिय आपल्या मुली देत, हें जरा चमत्कारिक वाटतें. तथापि चमत्कारिक वाटले तरी ते खरें आहे. या सातवाहनांच्या दानलेखांत राजांच्या नांवांना गोतमीपुत्र, वासिष्ठीपुत्र इत्यादि जी विशेषणें लाविलेली आढळतात, त्यांवरून ही गोष्ट स्पष्ट होते. या शब्दांचा अर्थ गोतम किंवा वसिष्ठ या गोत्रांतील राजस्त्रियांचे पुत्र असा आहे हे उघड आहे. पण या स्त्रियांच्या गोत्राचे महत्त्व काय? त्या जर ब्राह्मणांच्या मुली असत्या, तर त्यांच्या गोत्राचा निर्देश करण्याची तादृश अवश्यकता नव्हती. म्हणून या संबंधानें आमचा तर्क असा आहे कीं, त्या दक्षिणेतील सुप्रसिद्ध क्षत्रिय राजघराण्यांतील स्त्रिया होत्या. सातवाहनांचा सामाजिक दर्जा क्षत्रियांपेक्षां अर्थातच कमी प्रतीचा होता, व त्यामुळें त्यांना आपल्या मातृवंशाचें गोत्र मिरविण्यांत बहुमान वाटत असला पाहिजे. शिवाय मातृगोत्राचा आपल्या नांवांत निर्देश करण्याची चाल म्हणजे कांहीं नवी होती, असेंहि नाहीं. बृहदारण्यकोपनिषदांत वंशकथनामध्ये पुष्कळांच्या मातृगोत्रांचा उल्लेख केलेला आहे. उदाहरणार्थ, त्या उपनिषदाच्या शेवटच्या अध्यायाच्या शेवटच्या ब्राह्मणांत पौतिमाषीपुत्र, कात्यायनीपुत्र, भारद्वाजी-

पुत्र, कौशिकीपुत्र, आत्रेयोपुत्र, अशीं अनेक नांवें सांगितलीं आहेत. ( बृ. ६,५ ). अलीकडच्या काळीं सुद्धां रजपूत राजे आपल्या राण्यांना राठोडणी, चोहानी, इत्यादि पैतृक नांवें बहुमानास्पद म्हणून देत आले आहेत. राजघराण्यांत जन्मलेल्या स्त्रीला परकी घराण्यांत लग्न होऊन गेल्यावर आपल्या पितृगोत्राचा निर्देश अवश्य वाटणें स्वाभाविक आहे. म्हणून आम्हांला असें वाटते कीं, सातवाहन राजांनीं क्षत्रिय कन्याशीं विवाह केल्यामुळें त्यांचे पुत्र आपल्या मातृगोत्राचा बहुमानानें उल्लेख करीत. यावरून आणखीहि एक गोष्ट दिसून येते. ती अशी कीं दक्षिणेंतील मराठा क्षत्रिय घराण्यांत कांहीं विशिष्ट गोत्रें असून तीं त्यावेळीं सुद्धां काळजीपूर्वक संभाळून लक्षांत ठेविलेलीं होतीं. सातवाहनांच्या या विवाहसंबंधावरून मराठा क्षत्रियांमध्ये जी सूर्यवंश,सोमवंश,व नागवंश अशीं तीन वंशनामें चालत आलेलीं आहेत, त्यांना फार प्राचीन काळाचा म्हणून महत्वाचा आधार मिळतो. सातव्या शतकांतील मराठा क्षत्रियांमध्ये सुद्धां नागवंश चालू होता हे पुढें दिसून येणार आहे.

आतां बादामीच्या चालुक्यांच्या इतिहासाकडे वळूं.सातवाहनांचा अंमल कसा नष्ट झाला हे सांगतां येत नाहीं. एवढें खरें कीं इ. स. पूर्वी पहिल्या शतकापासून तों इ. सनाच्या दुसऱ्या शतकाच्या अखेरीपर्यंत म्हणजे सुमारें तीनशें वर्षे पैठण येथें राज्य केल्यावर सातवाहन घराण्याचा ऱ्हास होऊं लागला. एकच घराणें दोन तीनशे वर्षांहून अधिक काळ टिकून राहिल्याचें बहुधा इतिहासांत दिसून येत नाहीं; व या साधारण नियमानुसारच सातवाहनांची गति झाली. त्यानंतर तीनशे वर्षे म्हणजे ५ व्या शतकापर्यंत महाराष्ट्राचा इतिहास कसा काय होता, हें सांगता येणें कठीणच आहे. डॉ. भांडारकरांच्या मतें सातवाहनानंतर महाराष्ट्रांत मराठ्यांचीं अनेक लहान लहान राज्यें होतीं, त्यांत राष्ट्रकूट नांवाच्या घराण्याकडे एक राज्य चालत होतें. राष्ट्रकूटांची हकीगत पुढें क्रमानुसार येईल.

पण या तीनशें वर्षांच्या इतिहासासंबंधानें आणखीहि एक तर्क संभवतो. आम्हांला तर असें वाटतें कीं या काळांत महाराष्टाचा मुख्य भाग म्हणजे विशेषतः पैठण आणि अश्मक हे प्रान्त वाकाटक नांवाच्या आर्य राजवंशाच्या अमला खालीं होतें. वाकाटकचें राज्य हल्लींच्या मध्य प्रान्तांत होतें. यांचा पहिला राजा विंध्यशक्ति नांवाचा होता, त्याचा पुत्र प्रवरसेन त्याच्या मागून राज्यावर आला. वाकाटकचें घराणें महाराष्ट्रांत राज्य करीत होतें याचा महत्वाचा पुरावा अजिंठ्याच्या लेण्यांवरून मिळाला आहे. हीं लेणीं कोणी खोदिलीं, या प्रश्नाचें उत्तर अद्यापि निश्चयात्मक कोणी दिलेलें नाहीं. ह्युएनत्संगाचे वेळीं तीं अस्तित्वांत होतीं, कारण आपल्या प्रवास वर्णनांत त्यानें त्यांचा निर्देश केलेला आहे. अर्थात चालुक्यांच्या अमदानीपूर्वींच त्यांची रचना झालेली असली पाहिजे. हीं लेणीं बौद्ध तऱ्हेचीं असून त्यांतील शिलालेखांत विन्ध्यशक्ति आणि प्रवरसेन अशीं नांवें आढळतात. डॅा भाऊ दाजी यांनीं आपल्या एतद्विषयक निबधांत ही गोष्ट प्रथम निश्चित केली. चालुक्यांच्या वेळीं या लेण्यांत कांहीं भर पडली असेल, नाहीं असे नाहीं. पण यांतील मुख्य मुख्य लेणीं बरींच प्राचीन आहेत, यांत शंका नाहीं. ( जर्नल आफ् धि बॅाम्बे बॅंच. रा. ए. सो. पुस्तक ७). या गोष्टीचा विचार केल्यास सातवाहनांनंतर चालुक्यांपर्यंतच्या तीनशें वर्षांचा जो महाराष्ट्राचा इतिहासांत खंड पडल्यासारखा दिसतो, त्याचा उलगडा होईल. तो असा कीं, या कालांत हिंदु राज्य महाराष्ट्रांत वाकाटक परिव्राजकांचें होतें. फ्रेंच विद्वान डुब्रिउल यानेंही आपल्या नवीन पुस्तकांत असाच तर्क केला आहे. अजिंठ्याच्या लेण्यांत अश्मक राज्याचाहि उल्लेख आलेला आहे. या काळांत लोक व राजांचे प्रधान पुष्कळसे बौद्ध असल्यामुळें, त्यांनीं आपापल्यापरीनें

बौद्ध भिक्षूंसाठीं हीं लेणीं खोदविलीं. पुढें या बौद्धधर्मीयांच्या मताविरुद्ध हिंदुधर्मी मराठा क्षत्रिय घराण्यांची साहव्या शतकाच्या आरंभापासून चळवळ सुरू झाली; व त्यांनीं थोड्या काळानें-बौद्ध-मत प्रवण वाकाटकांचा अमल नष्ट करून, महाराष्ट्रांत आपलें वर्चस्व स्थापन केलें. या घराण्यांत राष्ट्रकूट व चालुक्य हीं नांवें प्रमुखपणें आढळून येतात. चालुक्यांच्या मूळ पुरुषानें अश्वमेध करून बौद्धधर्माविरुद्ध आपलें जें वर्चस्व झाल्याचें दाखविलें, त्या गोष्टीचेंहि रहस्य व महत्व या वरील तर्कावरून चांगलें लक्षांत येईल.

चालुक्यांचें घराणे महाराष्ट्रीयच होतें, कीं त्यांच्या कांहीं दानलेखांत म्हटल्याप्रमाणें अयोध्येकडील कोणा क्षत्रिय पुरुषानें इकडे येऊन त्याची स्थापना केली, याचा बरोबर निर्णय होत नाहीं. त्यांच्या पहिल्या पहिल्या दानलेखांवरून ते मानव्यगोत्री व हारीतीपुत्र होते, एवढेंच दिसून येतें. हारीतीपुत्र शब्दाचें महत्व पूर्वी गौतमीपुत्र व वासिष्ठीपुत्र शब्दाविषयीं जें विवेचन केले आहे त्यावरून समजून येईल. आम्हांला तर असें दिसतें कीं हारीतीपुत्र या विशेषणावरून पहातां चालुक्यांचीही नामविषयक परंपर सातवाहनांपासून आलेली असावी. चालुक्य घराणें दोन्ही बाजूंनीं म्हणजे मातृवंश व पितृवंश दोहोंकडून क्षत्रिय होतें. त्याच्या मूळ पुरुषाचे पितृगोत्र मानव्य असून मातृगोत्र हारीत होतें, व म्हणूनच दोन्हीं गोत्रांचा अभिमानपूर्वक उल्लेख करणें त्यांना अवश्य वाटलें. राष्ट्रकूटांपैकीं गोविन्द नामक राजाचा पराभव केल्यावर तें उदयास आलें, असें त्यांच्या जुन्या दानलेखांत नमूद केलेलें आहे. त्यांचा महाप्रतापी राजा जो पहिला पुलकेशी त्यानें क्षत्रिय धर्माला व सत्तेला अवश्य वाटणारा असा अश्वमेध केला. या अश्वमेधावरून पूर्वीं सांगितल्याप्रमाणें चालुक्यांनीं आपली-

सत्ता बौद्ध धर्मीयांचा पाडाव करून स्थापिली होती, असें दिसून येतें. उत्तरेकडे मगध देशांत बौद्धांचा पाडाव करून तेथें प्राचीन वैदिक धर्माची पुनरपि स्थापना केल्याची खूण म्हणून वैश्य गुप्त राजांनींहि अश्वमेध केला होता. त्याचप्रमाणें दक्षिणेंत चालुक्यांपैकीं या पुलकेशीनें आपल्या वर्चस्वाची साक्ष म्हणून अश्वमेध केला, व त्या संबंधानें पुढें वंशांत अभिमानपूर्वक उल्लेख नित्य केलेला आढळतो.

चालुक्यांची राजधानी बादामी होती, एवढ्यावरून ते द्रविड किंवा कानडी असावे असें कोणाला वाटण्याचा संभव आहे. † पण ह्युएनत्संगानें पुळकेशी क्षत्रिय असून तो महाराष्ट्रावर राज्य

† चालुक्य पहिला पुलकेशि वगैरे राजे कानडी होते, अशा प्रकारचा समज प्रान्ताभिमानाने प्रेरित झालेल्या कित्येक कानडी लेखकांनीं धरला आहे, हें पाहून हसूं आल्यावांचून राहत नाही. आत्म्याचें देहाशीं तादात्म्य करून, आपला मूळभाव विसरून, मी अंध, मी काणा, मी काळा, मी गोरा अशी भावना मनुष्य धरतो असे वेदान्त प्रतिपादन करतात, त्याची येथें आठवण होते. मी कानडी, मी महाराष्ट्री, अशा प्रकारचा भेद भाषेच्या अभिमानानें करणे अनैतिहासिक आहे. प्रश्न भाषेचा नाही, वंशाचा आहे. आणि वंश आर्य आणि द्रविड असेच आहेत. कर्नाटकांत किंवा आन्ध्रदेशांत किंवा तामीळ देशांत गेलेले आर्य म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, तेथील लोकसंख्येच्या मानानें थोडे असल्याकारणानें भाषेने द्रविड झाले आणि महाराष्ट्रामधील आर्य द्रविड वंशाचे लोक येथे थोडे असल्याने भाषेनें आर्य राहिले. यामुळे चमत्कार असा झाला आहे कीं, कानडी बोलणारे आर्य म्हणजे ब्राह्मणादि आपल्यास महाराष्ट्राहून भिन्न समजून, त्यांच्याशी स्पर्धा व भेदभाव मानूं लागले आहेत. वंशपूर्वापारपरंपरा आणि प्रत्यक्ष विवाहसंबंध अजून महाराष्ट्राशीं असून हा त्याचा भ्रम व या भ्रमामुळें इतिहासाला सुद्धां निराळें वळण देण्याची त्यांची उत्कट इच्छा पाहून, उद्वेग आणि आश्चर्य, रडें आणि हसूं एकाच वेळीं येतें.

करीत होता, असें स्पष्ट म्हटलेलें असल्यामुळें असा संशय घेण्याचें कारण नाहीं. एका साम्राज्याचा लय होऊं लागला म्हणजे त्यांतील प्रांताधिकारी आणि मांडलिक आपआपल्या भागापुरते स्वतंत्र राजे बनतात, असा इतिहासांतील नित्याचा अनुभव आहे. महाराष्ट्रांत राष्ट्रकूट, चालुक्य, कदंब, पल्लव इत्यादि मराठी भाषा बोलणाऱ्या क्षत्रिय घराण्यांचा जो एकदम उदय झालेला दिसतो त्याचें कारण तरी याच प्रकारचें होतें. या घराण्यांपैकीं कदंब व चालुक्य हीं दोन्ही मूळ एकाच वंशांतील होत. दोन्हींतील राजे आपल्याला मानव्यगोत्री व हारीतीपुत्र म्हणवीत असत. अर्थात त्यांचे परस्परांत विवाहसंबंध शक्य नव्हते, ते त्यांना इतर राज घराण्याशींच करावे लागत. त्यांच्यांतील आणखी कांहीं दंतकथांचाहि विचार येथें केला पाहिजे. हे कदंब बनवासी व कोंकणपुर येथें राज्य करीत. पल्लव घराणें आपल्याला केवळ भारद्वाज-गोत्री म्हणवीत व त्याचा अंमल वेंगी आणि सातवाहनांच्या राज्यापैकीं पूर्वेकडील प्रांत यांवर होता. या पल्लवाचें वर्णन पुढील प्रकरणांत येणार आहे. प्रस्तुत प्रकरणांत आतां चालुक्यांच्या पुढील दानलेखांवरून व परंपरागत हकीकतीवरून त्यांच्या पूर्वपीठिकेविषयीं काय माहिती मिळते ती येथें पाहूं.

चालुक्यांची ही कुलपरंपरा वेंगी येथील चालुक्य शाखेच्या दानलेखांत आढळून येते. उत्तर चालुक्य राजांच्या वेळीं बिल्हण पंडितानें लिहिलेल्या विक्रमांक-देवचरितांत चालुक्यकुलाच्या उत्पत्तीविषयीं जी दंतकथा दिली आहे, ती केवळ अलंकारिक व काल्पनिक असल्यामुळें जमेस धरण्यासारखी नाहीं. बिल्हणानें चालुक्य नांव बदलून आपल्या काव्यप्रतिभेनें त्याला चौलुक्य असें बनविलें. चुलुक म्हणजे ओंजळ व तीपासून झालेले ते चौलुक्य अशी त्याची व्युत्पत्ति आहे. कलियुगांत अधर्म फार झाल्यामुळें त्याचें निराकारण करण्यासाठीं कोणी क्षत्रिय वीर निर्माण करावा अशी ब्रह्मदेवाची प्रार्थना करण्यासाठीं इन्द्र ब्रह्मदेवाकडे गेला असतां, तो अर्घ्यप्रदान देत होता. त्यानें

इन्द्राची विनंति ऐकून आपल्या चुळुकांतून एक वीर निर्माण केला; तोच चालुक्यांचा मूळ पुरुष होय असें बिल्हणाचें काव्य आहे. पण पूर्वेकडील चालुक्यांमध्यें प्रचलित असलेली कुलपरंपरा अशी कल्पनामय नसून दिसण्यांत तरी ऐतिहासिक आहे. ती त्यांच्या कोरींव लेखांत आढळून येत असून तिचा सारांश पुढीलप्रमाणें आहे ( विमलादित्याचा रणस्तुति दानलेख नंबर ३६ एपिग्रॅफिका इंडिका, पु. ६ ). प्रथम त्यांत चंद्रवंशाची वंशावळ चंद्रापासून तों पांडवांपर्यंत व पांडवांपासून पुढें उदयनापर्यंत दिली आहे. पुढें उदयनापासून चक्रवर्त्ति राजांच्या ५९ पिढ्यांनीं अयोध्येस राज्य केल्यावर विजयादित्यनामक राजानें दक्षिणापथ जिंकण्याच्या हेतूनें त्यावर स्वारी केली. पण तेथें त्रिलोचन पल्लवाबरोबर त्याचें युद्ध होऊन तो त्यांत मारला गेला. त्यावेळीं त्याची राणी गरोदर होती. विष्णुभट सोमयाजी नामक एका ब्राह्मणाने प्रसूतीसाठीं आपल्या अग्रहारांत तिला आश्रय दिला. तेथें ती प्रसूत होऊन तिला पुत्र झाला. त्याचे नांव विष्णुवर्धन. विष्णुवर्धनाचे मानव्य गोत्रीय व हारीतीपुत्र अशा क्षत्रियांना उचित असे जातकर्मादि सर्व संस्कार विष्णुभट्टाने केले ( मानव्यसगोत्रहारीतीपुत्र स्वक्षत्र गोत्रकर्मोचितानि कर्माणि करयित्वा तमवर्धयत् ). पुढें त्या मुलानें आपल्या कुलाचा इतिहास सर्व समजून घेऊन **चालुक्यपर्वतावर** तपश्चर्या केली, आणि गौरी देवी, कुमार आणि नारायण या देवतांना प्रसन्न करून त्यांच्या कृपेनें श्वेत छत्र, एकशंख, पंच महाशब्द, प्रतिढक्का, वराहलांछन, पंचकान्त सिंहासन, मकरतोरण, कनकदंड, गंगा यमुना व आपल्या कुलांत पूर्वी चालू असलेलीं दुसरींहि राजचिन्हें प्राप्त करून घेतल्यावर कदम्ब, गंग व इतर राजांना युद्धांत जिंकून सेतूपासून नर्मदेपर्यंतच्या ७॥ लक्ष सर्व दक्षिणापथावर राज्य केलें. विष्णुवर्धनाला पल्लव-राजकन्येपासून विजयादित्य नामक पुत्र झाला. पुढें त्याचा पुत्र पुलकेशी वल्लभ व पुलकेशीचा कीर्तिवर्धन असे झाले. इतका मजकूर झाल्यावर ( हा मजकूर पूर्वीच्या दानलेखांहून अधिक आहे ).पुनः या लेखाला चालुक्यांच्या इतर दानलेखांप्रमाणें "स्वस्ति श्रीमतां सकलभुवन संस्तूयमानमानव्यसगोत्राणां इ० सत्याश्रयवल्लभस्य भ्राता कुब्जविष्णुवर्धनोऽष्टादशवर्षाणि वेंगीदेशमपालयत्" अशी सुरवात केलेली आहे. वर

सांगितल्याप्रमाणें प्रस्तुत दानलेखांत जो अधिक मजकूर आला आहे त्यांत विश्वसनीय भाग म्हणजे उदयनानंतर ५९ पिढयांनीं विजयादित्य हा अयोध्येहून दक्षिणेंत आला एवढाच दिसतो. उदयनाचा काल इ. स. पूर्वी ६०० धरिल्यास तेव्हांपासून ५९ पिढया म्हणजे दर पिढीला सरासरीनें २० वर्षे धरून ११८० वर्षें इ. स. ५८० च्या सुमारास होता. यांत व खऱ्या काळांत सुमारें १०० वर्षांचा फरक पडतो. दर पिढी २० वर्षांची सरासरीने समजून कोणताही काळ अगदीं निश्चितपणें समजणें शक्य नाहीं. म्हणून विजयादित्या-संबंधाचा वरील मजकूर अगदीं निश्चित नसला तरी बराच संभवनीय आहे असे म्हणावयास हरकत नाहीं.

पण याखेरीज इतर मजकूर मात्र केवळ कल्पित कथाच होय. पहिल्या चालुक्यांच्या लेखांत ते सूर्यवंशीं कीं चंद्रवंशी हे कांहींच सांगितलेलें नाहीं. पुढें पूर्वेकडील चालुक्य घराण्याने मात्र आपल्याला चंद्रवंशी म्हणून ठरविलें. पण शके ९३३ त म्हणजे इ.स. १०११ लिहिलेल्या सदरील दानलेखांतील चंद्रवंशाच्या निर्देशावरून त्यांतील हारीतीपुत्र या चालुक्यांच्या नित्य पदवीचा अर्थ कळत नाहीं. तो कळावयास पूर्वी आम्हीं केलेल्या तर्काचाच आश्रय करावा लागतो. प्रस्तुत लेखांत आणखी चालुक्य आणि पल्लव यांत आरंभीं युद्ध झाल्याचे म्हटलें आहे, तेंहि कल्पनेनेंच म्हटलेलें असावें. पुढील काळांत चालुक्य व पल्लव यांच्यांत पिढयानपिढया युद्ध-प्रसंग होत असल्यामुळे चालुक्यांच्या मूळ पुरुषालाहि पल्लवांशीं लढावें लागले, असा अदमास करून तसें वर्णन या लेखांत केलें असलें पाहिजे. या दोन्हीं घराण्यांत विवाह-संबंधहि पिढयानपिढया चालत होते; व त्यावरून चालुक्यांच्या मूळ पुरुषानेंहि तसेंच केलें असावें असें मागाहून ठरविण्यांत आलें असण्याचा संभव आहे. चालुक्य व पल्लव या घराण्यांत युद्ध-संबंध व विवाह-संबंध नेहमीं चालत असत, म्हणजे त्यांची स्थिति या बाबतींत मध्ययुगांतील इग्लंड व फ्रान्स यांच्या स्थितीसारखी जवळ जवळ होती. असो, सदर कथेंत आणखीही एक कल्पनेचा भाग दिसतो. राजघराण्याचा संस्थापक पुरुष आपल्या पित्याच्या मृत्यूनंतर माता संकटावस्थेंत असतां

जन्मास येऊन पुढें देवताप्रसादानें वैभवास चढल्याची कथा बहुधा पुष्कळ घराण्यांत आढळून येते. अर्थात तींत ऐतिहासिक सत्यापेक्षां सांप्रदायिक कल्पनांचाच भाग अधिक असतो. तात्पर्य वर सांगितलेल्या चालुक्यांच्या कुलपरंपरेच्या कथेंत त्यांचा मूळपुरुष अयोध्येहून इकडे आला, एवढा भाग मात्र वास्तविक असण्याचा संभव आहे; कारण असे अनेक क्षत्रिय सरदार उत्तरेकडून इकडे येऊन त्यांनीं येथें पूर्वीं राज्यें स्थापिलीं आहेत, व शिवाजीचे पूर्वजहि अशाच हेतूनें उत्तरेकडून खालीं महाराष्ट्रांत आले होते. पण याशिवाय इतर सर्व भाग अशक्य नसला तरी ऐतिहासिक मानण्याच्या योग्यतेचा नाहीं. शिवाय ही हकीकत पुढील दानलेखांतच आढळत असल्यामुळे तीवर अवलंबून न रहातां पहिल्या पहिल्या चालुक्य राजांच्या लेखांवरून त्याविषयीं काय माहिती मिळते तीच आतां देण्याचा प्रयत्न करूं.

एकंदरींत चालुक्य घराणें मराठा क्षत्रियांचें असून त्याचें गोत्र मानव्य होतें, व त्यांचा मूळपुरुष हारीतीपुत्र म्हणजे हारीत गोत्रांतील राजकन्येचा पुत्र होता. ऐहोळे येथील चालुक्यांच्या लेखांत याचें सविस्तर वर्णन आहे; त्यावरून असें दिसतें कीं, या घराण्यांतील जयसिंहनामक पुरुषानें राष्ट्रकूटांचा पराभव करून वैभव संपादिलें. त्याचा पुत्र रणराग व रणरागाचा पुत्र पहिला पुलकेशी. या पुलकेशीनें महाराष्ट्रांत राज्य स्थापन करून अश्वमेध केला. यानें दुसरे कित्येक प्रांत जिंकून साम्राज्य स्थापिलें व वातापी नगरी त्यानें आपली राजधानी केली. सत्याश्रय पृथ्वीवल्लभ अशी पदवीही त्यानें धारण केली. तीपैकीं वल्लभ हा शब्द सर्व महाराष्ट्रीय राजे पुढें आपल्याला लावूं लागले, व परकीयांना सुद्धां तो आवडूं लागला. आश्रय शब्द देखील मागें कांहीं नाम लावून या राजे लोकांच्या पदवींत दाखल झाला. श्रयाश्रय, जनाश्रय इत्यादि अशीं दुसरीं नांवें आढळून येतात. हा पहिला पुलकेशी शके४८९ म्हणजे इ. स. ५६७ त मरण पावला असें दिसतें. त्याच्यामागून

त्याचा पुत्र कीर्तिवर्मा सिंहासनावर आला. त्यानें उत्तर कानडा येथील कदंबांचा आणि उत्तर कोंकणांतील मौर्यांचा, युद्धांत पराभव केला आणि त्यांवर आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें. त्याच्यानंतर त्याचा बंधु मंगलीश राज्यारूढ झाला. त्यानें जबलपूर जवळील त्रिपुरच्या चेदींना जिंकून पूर्वापर समुद्रांमधील सर्व प्रदेशावर आधिराज्य स्थापिलें. तो इ. स. ६१० त मृत्यु पावला व नंतर दुसरा पुलकेशी राज्यावर आला. तो कीर्तिवर्म्याचा पुत्र असून चालुक्य घराण्यांपैकीं सर्वांत मोठा राजा झाला. ऐहोळेच्या दान-लेखांत त्याच्या पराक्रमाचें वर्णन केलें आहे. त्यानें कांचीच्या पल्लवांस देखील जिंकल्यामुळें नर्मदेपासून कन्याकुमारीपर्यंत सर्व दक्षिणापथाचा तो सम्राट झाला होता. "९९००० ग्रामांच्या तीन महाराष्ट्रांवर त्याचा प्रत्यक्ष अधिकार चालत असे." त्याच्या कार-कीर्दीतील मोठी महत्वाची गोष्ट म्हणजे त्यानें उत्तरेकडील तत्का-लीन सम्राट् जो हर्षवर्धन त्याचा पराभव केला. ह्युएनत्संगानें त्याच्या दरबाराला भेट दिली असून त्यानें केलेलें पुलकेशीचें व त्याच्या मराठ्यांचें गौरवपर वर्णन प्रथम भागांत दिलेंच आहे. खरोखरच मराठ्यांच्या प्राचीन इतिहासांत हाच फार भरभरा-टीचा काळ होता. पुलकेशीनें पश्चिम भागांतील अनेक राजांना पादाक्रान्त करून लाट, गुर्जर व मालव येथील राजेहि आपले अंकित केले. कुब्ज विष्णुवर्धन नामक आपल्या भावाला पूर्व किनाऱ्यावरील वेंगी प्रांताचें राज्य त्यानें दिलें, व ते तेथें बराच काळपर्यंत अमल करीत होते. दुसऱ्या जयसिंह नामक भावाला त्यानें लाटदेशाच्या सिंहासनावर बसवून तेथें गुर्जर चालुक्य घराण्याची स्थापना केली, व हल्लींच्या गायकवाडच्या राज्या-प्रमाणें तेंहि राज्य बरेच दिवस गुजराथेंत चाललें. पुलकेशीचा वडील पुत्र चंद्रादित्य हा सावंतवाडी व गोवा या प्रांतांवर राज्य-

करीत होता, व तेथें त्याच्या राणीनें दान केलेल्या गांवांची नोंद ताम्रपटांवर केलेली आहे. पुलकेशीचा दुसरा पुत्र कृष्णा व तुंग-भद्रा यांमधील कर्नाटकाच्या भागावर राज्य करीत असे. पुलके-शीनें आपला मामा सेनानंदराज याच्या विनंतीवरून केलेल्या ग्रामदानाविषयींचा ताम्रपट सांपडलेला आहे. ह्या राजाचें सेन्द्रक घराणें प्रसिद्ध असून हल्लीं ग्वाल्हेर येथील शिंदे घराणें व हें सेन्द्रक मूळचीं एकच असावीं. सारांश पुलकेशीचें इ. स. ६३६ मधील साम्राज्य अलीकडच्या शाहूच्या इ. स. १७३६ मधील साम्राज्याची प्रतिकृतिच होती. असें म्हणावयास हरकत नाहीं. म्हणजे एक हजार वर्षांनीं पुनः जवळजवळ तेंच ऐश्वर्य महारा-ष्ट्राला प्राप्त झाल्यामुळें इतिहासाचें पुनरावर्तन होतें अशी जी म्हण आहे तिचा प्रत्यय येतो.

पुलकेशीची कारकीर्द परदेशांशीं घडलेल्या दोन महत्वाच्या संबंधांमुळें विशेष संस्मरणीय झाली आहे. त्यानें इराणचा राजा दुसरा खुश्रू याजकडे वकील पाठविले व त्याला उत्तर म्हणून खुशरूनेंहि उलट आपले वकील पुलकेशीकडे पाठविले. त्यांच्या भेटीच्या प्रसंगाचें चित्र अजिंठ्याच्या लेण्यांत पहिल्या विहारांत पहावयास मिळतें. ही गोष्ट इ. स. ६२५ त घडून आली. दुसरी गोष्ट इ. स. ६४० त घडली व ती ह्युएनत्संगानें दिलेली भेट होय. ह्युएनत्संगानें मराठ्यांचें व विशेषतः पुलकेशीच्या अफाट सामर्थ्याचें भपकेदार वर्णन केलें असून सर्व प्रजा त्याच्या अर्ध्या वचनांत असे, असें त्यानें म्हटलें आहे.

सर व्हिन्सेंट स्मिथनें असें म्हटलें आहे कीं,पुलकेशीच्या कारकी-र्दीची स्थिति अखेर दुःखमय झाली. त्याचे शत्रु जे कांचीचे पल्लव यांनीं त्याला जिंकून त्याची राजधानी लुटून टाकिली व त्याला

स्वतःला बहुधा ठार मारिलें. या स्मिथच्या लिहिण्याला आधार म्हणजे पल्लवांचा एक लेख दिसतो. पण तो विश्वसनीय आहे कीं काय याबद्दल शंका आहे. डॉ. भांडारकरांनीं आपल्या दक्षिणच्या इतिहासांत ही गोष्ट सांगितलेली नाहीं. पुलकेशीच्या मागून त्याचा पुत्र पहिला विक्रमादित्य गादीवर आला, एवढेंच त्यांनीं लिहिलें आहे. विक्रमादित्यानें कांचीच्या पल्लवांना पुढें चांगलेंच वठणीस आणून त्यांची राजधानी हस्तगत करून घेतली; पण तेथें लुटालूट मात्र त्यानें केली नाहीं. इतकेंच नव्हे तर तेथील कित्येक मंदिरें त्यानें नीट करविलीं व कित्येक तर नवीनहि बांधविलीं. दक्षिण हिंदुस्थानांत कांचीचीं देवालयें अद्यापिहि सुप्रसिद्ध आहेत. तो मोठा विजयी राजा असून, सशस्त्र होत्साता चित्रकण्ठ नामक आपल्या अश्वावर आरूढ होऊन त्यानें शत्रूंना पादाक्रान्त केलें आणि आपल्या पित्याप्रमाणें समुद्रत्रयवेष्टित प्रदेशावर आपलें साम्राज्य स्थापिलें. यामुळें त्याचें विक्रमादित्य हें नांव अगदीं सार्थ होतें.

विक्रमादित्याच्या मागून त्याचा पुत्र विनयादित्य इ. स. ६८० त सिंहासनाधिष्ठित झाला. शके ६११, ६१३ व ६१६ म्हणजे इ. स. ६८९, ६९१ व ६९४ या वर्षांतील दानलेख सांपडले आहेत. ते अनुक्रमें त्याच्या कारकीर्दीच्या ९ व्या, ११ व्या व १४ व्या वर्षी कोरलेले असल्यामुळें विजयादित्याचा काळ अगदीं निश्चित झाला आहे. तोहि मोठा शूर व बलाढ्य राजा होऊन गेला. विजयादित्यानें पल्लवांशीं केलेल्या युद्धांत त्यांना पांड्य, चोल व केरल यांचें साह्य होतें, तरी विजयादित्यानें मर्दुमकीनें आपल्या पित्याला त्यांत विजय प्राप्त करून दिला. पुढें राज्यारूढ झाल्यावर त्यानें स्वतः देखील पल्लव, पांड्य, चोल, केरल यांना पादा-

क्रान्त करून आणखी कलभ्र, हैहय, नील, मालव,* गंग, अलूप आणि सिंहलद्वीपाचा राजा यांनाहि पराजित करून आपले कट्टे दोस्त बनविले. त्यानें उत्तरेकडीलही एका राजाचा पराभव केला होता, पण त्या राजाचें नांव कळत नाहीं ( या गोष्टीचा खुलासा करण्याचा प्रयत्न आम्हीं पुढें करणार आहों ). या सर्व गोष्टींचा निर्देश त्याच्या वंशजांच्या दानलेखांत केलेला आहे, व त्या बहुधा इ. स. ६९४ नंतर म्हणजे त्याच्या स्वतःच्या शेवटच्या दानलेखानंतर घडलेल्या असल्या पाहिजेत. तो इ.स. ६९६ त मृत्यु पावला.

विजयादित्यानंतर त्याचा पुत्र दुसरा विक्रमादित्य राज्यारूढ झाला. त्याचेहि अनेक दानलेख उपलब्ध असल्यामुळें त्याचा त्यांवरून बराच इतिहास कळून येतो. पल्लवांशीं त्यानें केलेल्या एका युद्धांत त्याला जय मिळाला असूनही कांहीं चमत्कारिक रीतीनें तो शत्रूंच्या हातीं सांपडला. तथापि तेथून युक्तीनें तो आपली सुटका करून घेऊन आपल्या राज्यांत परत आला व नंतर त्यानें जोमानें कारभार चालविला. पूर्वीं काश्मीरच्या इतिहासांत सांगितल्याप्रमाणें ही गोष्ट काश्मीरचा राजा ललितादित्य याच्या दक्षिणेंतील दिग्विजयाच्या पूर्वीं कांहीं काळ घडली असली पाहिजे. ललितादित्य वातापीस गेला नाहीं. कारण विजयादित्य त्यावेळीं शत्रूंच्या म्हणजे पल्लवांच्या बंदिवासांत असल्यामुळें, वातापि व महाराष्ट्र हीं दोन्हीं राज्यें पल्लवाकडेच होतीं. वरील दोन्ही गोष्टींचे काळ एकच आहेत. कारण विजयादित्य इ. स. ६९६ त राज्यारूढ झाला, आणि त्यानें इ. स. ७३२ पर्यंत म्हणजे एकंदर ३६

* हे मालव आमच्या मतें माळव्यांतील लोक नसून दक्षिणेकडीलच कोणी असावे. त्याचें नांव अलीकडील 'मालप' या मराठ्यांच्या आडनांवांत आढळून येतें.

वर्षें राज्य केलें. काश्मीरच्या ललितादित्याचा दिग्विजयाचा दौराहि पूर्वीं सांगितल्याप्रमाणें इ. स. ७०२ पासून इ. स. ७१० पर्यंत घडून आला. इ. स. ६९९ तील लेखांवरून असें दिसतें कीं, विजयादित्यानें त्या वर्षीं वातापि येथें ब्रह्मा, विष्णु व शिव यांची मंदिरें बांधिलीं. त्यांचे दानलेख त्याच्या कारकीर्दीच्या ४थ्या १० व्या व ३४ व्या वर्षांतील असून त्यांचे शक अनुक्रमें ६२२ ६२७ आणि ६५१ असे आहेत.

विजयादित्याच्या मागें त्याचा पुत्र द्वितीय विक्रमादित्य राज्यावर आला. तोहि आपल्या पित्याप्रमाणें पराक्रमी होता. कुलशत्रु जे पल्लव त्यांचा त्यानें पराभव केला. त्यावेळीं पल्लवांचा राजा नंदिपोतवर्मा नांवाचा होता. त्याचा पराभव केल्यावर विक्रमादित्यानें कांची नगरींत प्रवेश केला, पण तेथें लुटालूट न करतां उलट तेथील मंदिरांतील जें जड जवाहीर पुष्कळांनीं पूर्वीं लुटून नेलें होतें, त्याची त्यानें भरपाई करून दिली. त्यानें हैहय घराण्यांतील दोन बहिणी बहिणी असलेल्या राजकन्यांशीं विवाह केले; व त्या दोन राण्यांनीं पुढें वातापी येथें आपल्या स्मरणार्थ आपल्या नांवानें दोन देवालयें बांधविलीं. विक्रमादित्य १४ वर्षें राज्य करून इ. स. ७४७ त मृत्यु पावला असें दिसतें.

त्याच्यानंतर त्याचा पुत्र दुसरा कीर्तिवर्मा गादीवर बसला. हाच पूर्व चालुक्याचा शेवटचा राजा होय. शके ६७९ ( स. ७५७ ) तील त्याचा एक दान लेख सांपडलेला आहे. त्यावरून पहातां तोहि कर्तृत्वान् राजा असून त्याचाहि पल्लवांशीं पूर्वपरंपरेप्रमाणें झगडा झाला. पण त्याच्या स्वतःच्या एका मांडलिकानें म्हणजे दंतिदुर्ग नांवाच्या राष्ट्रकूटानें त्यास साम्राज्यहीन केलें. पण यानंतर वातापीस राष्ट्रकूट राज्य करीत होते, असें दिसत

नाहीं. म्हणून त्यांनीं चालुक्यांना आपले अंकित म्हणून वाता-पीचें राज्य चालवूं दिलें असावें असें मानण्यास हरकत नाहीं. ही गोष्ट शक ६७९ च्या पूर्वी झालेली असावी. कारण शके ६७५ तील दंतिदुर्गाच्या एका दानलेखांत त्यानें चालुक्यांचा पराभव केल्याचा उल्लेख आहे. याप्रमाणें चालुक्याचें दक्षिणेंतील पहिलें साम्राज्य इ. स. ६५३ पर्यंत म्हणजे सुमारें २०० वर्षें चाललें होतें. या कुळांतील सर्वच राजे प्रतापी व कर्तृत्वशाली होते असें दिसतें, व ही गोष्ट त्यांना भूषणास्पद असून विशेष संस्मरणीयहि आहे. इ. स. ७५३ नंतर २०० वर्षें जरी त्या घराण्याला निद्रावस्थेंत घालवावीं लागलीं, तरी त्यांच्यावरील परंपरागत गुणांमुळें त्यांनीं पुनरपि आपलें डोकें वर काढिलें, आणि महाराष्ट्रांत पुनः आपलें वर्चस्व स्थापून चालुक्यांचा उदार राजवंश सुरू केला. त्यांचा राष्ट्रकूटाकडून पराभव होण्याचें विशेष कारण राष्ट्रकुटाच्या इतिहासांत पुढील भागांत वर्णन करूं

चालुक्य घराण्यांतील आरंभीच्या राजांच्या कारकीर्दींत बौद्ध धर्माचा महाराष्ट्रांत फारसा बोलबाला दिसत नव्हता असें. डॉ. भांडारकरांनी सांगितलें आहे. तो धर्म महाराष्ट्रांत जरी त्या वेळीं चालू होता, तरी त्याला राजाश्रय किंवा फारसा लोकाश्रयहि नव्हता. इतकेंच नव्हे तर पूर्वी सांगितल्याप्रमाणें आम्हांला असें वाटतें की, वाकाटक घराण्याच्या अमदानींतील अजिंठ्याच्या लेण्यांवरून दिसून येणारें उत्तरोत्तर बौद्ध धर्माचें वर्चस्व नष्ट करून, जुन्या वैदिक धर्माची पुनः स्थापना करण्याचा महाराष्ट्रांत जो प्रयत्न झाला, त्याचेंच दृश्य फल म्हणजे या मराठा चालुक्य घराण्याचा विजय होय. पहिल्या पुलकेशीनें अश्वमेध करण्याचें कारण तरी त्या विजयोत्सवाचें प्रदर्शन हेंच होय. चालुक्य राजांच्या अमदानींत महाराष्ट्रांतील विद्वान ब्राह्मणांनीं श्रौत यज्ञविद्येचा अभ्यास करून तींत प्रावीण्य मिळविलें. अशा विद्वान श्रोत्रियांना स्वामी ही संज्ञा असे, असें डॉ. भांडारकर म्हणतात.

श्रौतसूत्रांवर त्या वेळीं कर्कस्वामी-प्रमुख पंडितांनीं भाष्यें लिहिली, ही गोष्ट खरी. पण तेवढ्यावरून अशा पंडितांना स्वामी हीच विशिष्ट पदवी होती असें दिसत नाहीं. आमच्या मतें श्रौतयज्ञ करणाऱ्या श्रौतविधिप्रवीण विद्वान ब्राह्मणांना दीक्षित अशी पदवी होती. श्रौतसूत्रांचें अध्ययन या वेळीं एकट्या दक्षिणेंतच सुरू झालें असें नाहीं. बौद्धधर्माचा या वेळीं हिंदुस्थानांत ऱ्हास होऊन, वैदिक धर्माचे जिकडे तिकडे पुनरुज्जीवन होऊं लागल्यामुळे वैदिक यज्ञविधींचा अनेक ठिकाणीं अभ्यास सुरू झाला होता. बाणभट्टाने आपले वडील व चुलते मोठे मीमांसक होते,असे म्हटले आहे. शबरस्वामी व कुमारिलभट्ट हे मीमांसक उत्तरेकडील होते; त्यांच्या संबंधाचे विवेचन पुढें येईल. एवढें खरे कीं,इतर ठिकाणांप्रमाणे दक्षिणेंतहि पुराण वैदिकधर्माभिमानी बुद्धिमान ब्राह्मणांनीं आपल्या बुद्धीचा मोर्चा बौद्धमतखंडणाकडे वळवून वैदिक यज्ञकर्माची बाजू उचलून धरिली, व पहिल्या चालुक्यांच्या अमदानींत त्यांना राजाश्रय मिळाल्यामुळे निदान राजघराण्यांतून तरी बौद्धधर्माची पूर्ण उचल बांगडी करण्याचे त्याचें काम यशस्वी झाले.

तथापि श्रौतयज्ञांविरुद्ध चालू असलेल्या अहिंसावाद्यांच्या गुप्त प्रयत्नांना पुढे बौद्धांपेक्षां जैनांच्या बाबतींत अधिक यश मिळालेले दिसते चालुक्यांच्या अमदानीचे अखेरीस जैनांनी लोकमतावर त्याचप्रमाणे राजांच्या मनावरहि छाप बसविलेली आढळून येते. आजमितीसहि दक्षिण महाराष्ट्रांत जैन धर्माचें बरेंच प्रस्थ आहे. महाराष्ट्राच्या अस्सल भागांत जैन धर्माचा फारसा प्रसार नाहीं कारण कोणत्याहि लोकांचा परंपरागत स्वाभाविक अभिमान पूर्वजांच्या धर्माविषयींच असतो त्यामुळें मराठे लोकांत प्राचीन वैदिक आर्यधर्माचेंच वर्चस्व राहिलें. पण दक्षिणेतील इतर लोकांत जैनमताचा बराच प्रसार झाला चालुक्यांपैकीं दुसऱ्या विक्रमादित्याचा जैनांकडे थोडा बहुत ओढा असे. त्याने एका जैनमंदिराचा जीर्णोद्धार करून विजय पंडित नांवाच्या एका जैन वादपटु पंडिताला जमिनीची देणगी देखील दिली. हा जैन पंडित वादकुशल असल्यामुळे त्याला एकवादि अशी पदवी प्राप्त झाली होती ( भांडारकर ). त्या

काळचे जैन विद्वान् ब्राह्मणवर्गांतूनच निर्माण होत असल्यामुळें, सहजच ते बुद्धिमान व वादनिष्णात असत. आणि अहिंसातत्वविषयक वादांत ते बहुधा जयच मिळवीत. पण दक्षिण महाराष्ट्रांतील आजच्या जैन लोकांत असे विद्वान् क्वचितच आढळत असून बहुतेक भरणा शेतकी करणाऱ्यांचा आहे. ब्राह्मणवर्गापैकी आतां नवीन भरती जैनधर्मात होत नाहीं. चालुक्यांच्या वेळीं अशी परिस्थिति नव्हती. तेव्हां जैन धर्मात नवीन भरती होत असे, व राजसभेंतहि त्या मताला मान्यता मिळत होती, असें दिसते

चालुक्य घराण्याच्या उदयाबरोबर जे प्राचीन वैदिक यज्ञमय धर्माचे पुनरुज्जीवन झाले, त्याबरोबर पौराणिक धर्माचा म्हणजे ब्रह्मा, विष्णु, महेश, देवी व कार्तिकेय यांच्या उपासनेचा प्रचार सुरू झाला; आणि पहिल्या चालुक्यांच्या अमदानीत या देवतांचीं अनेक मंदिरें ठिकठिकाणी बांधण्यांत आलीं. वैदिक यज्ञमय धर्माचा पौराणिक उपासनेशीं मिलाफ होऊन जो मिश्र धर्म दिसू लागला, त्याला हिंदुधर्म हे नांव द्यावयास हरकत नाही या हिंदुधर्माचा विजय सहजच चालुक्यानंतरच्या महाराष्ट्रांत राज्य करणाऱ्या राष्ट्रकूटांच्या अमदानीत विशेष झाला.

सामाजिकदृष्ट्या पाहिल्यास, चालुक्य राजे पुराणमताभिमानी अस्सल क्षत्रिय असून आर्य किंवा मिश्रआर्य यांपैकीं असलेल्या क्षत्रिय कुळांशींच त्यांचे शरीरसंबंध होत असत. हीं क्षत्रिय कुळे म्हणजे हैहय, राष्ट्रकूट, पल्लव नागवंशीय सेंद्रक ऊर्फ शिंदे आणि सातवाहन हीं होत. पांड्य, चोल, केरल या द्राविडकुलांशीं त्यांचे विवाहसंबंध घडत नसत. पूर्वी सांगितल्याप्रमाणे आमच्या मतें चालुक्य राजांच्या राण्या बहुधा महाराष्ट्रांतील व केव्हां केव्हां उत्तर हिंदुस्थानांतील पण क्षत्रियांच्या कन्या असत, व ह्युएन-त्संगानें त्यांना क्षत्रिय असें स्पष्टच म्हटलें आहे. त्यांना मानव्य सगोत्र व हारीतीपुत्र या पदव्या अत्यवश्य वाटत, व त्यांचे धार्मिकविधि वैदिकमतानुसारच चालत. ते आर्यक्षत्रिय नव्हते असे समजण्याला अद्यापि कांहींच कारण उपलब्ध झाले नसून, उत्तरेकडील आर्य रजपुतांच्या ते खरोखर बरोबरीचेच होते. उत्तरेकडील व दक्षिणेकडील या क्षत्रिय घराण्यांत

परस्पर शरीरसंबंध केव्हांपासून व कां बंद झाले, याविषयीं विवेचन पुढें करावें लागणार आहे.

विदर्भ, महाराष्ट्र व कुंतल या तिन्ही महाराष्ट्रांवर चालुक्यांचें राज्य होतें. आजकाल चालू असलेल्या नांवांचा विचार करतां या प्रदेशांत वऱ्हाड, मध्यप्रांतापैकीं मराठी जिल्हे, निजामच्या राज्यापैकीं मराठी जिल्हे, आणि गुजराथ व सिंध खेरीज मुंबई इलाख्याचा सर्व भाग इतक्या मुलखाचा समावेश होत होता. यांत लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, यांत मुंबई इलाख्यापैकीं कानडी मुलखाचा सुद्धां अन्तर्भाव होतो. हे कानडी जिल्हे अगदीं पूर्वीपासून महाराष्ट्राचा भाग म्हणून गणिलेले आहेत. महाराष्ट्रावर ज्या कोणाचें राज्य असेल, त्याचें या कानडी मुलखावरहि राज्य असावयाचेंच. या कारणास्तव त्याचें दक्षिण महाराष्ट्र हे नांव देखील अगदीं सार्थच दिसतें. विजापुरास मुसलमानांचे राज्य असतांना हे जिल्हे त्यांच्या राज्यांत मोडत; विजयानगरच्या राज्यांत मोडत नसत. दक्षिण हिंदुस्थानांचा पूर्व किनारा मात्र चालुक्यांच्या घराण्यांपैकीं वेंगी येथील शाखेकडे व आंध्राकडे चालत असे, व तो बहुतकरून महाराष्ट्रापासून स्वतंत्र असे. पण कित्येक प्रसंगी आंध्र देशहि महाराष्ट्राच्या राज्यांत मोडत असे. तिन्ही महाराष्ट्रांत मिळून ९९००० ग्रामसंख्या होती असें ऐहोळेच्या लेखांत म्हटलें आहे. आंध्र देशांतील ग्रामसंख्या १२००० होती. या संख्या परंपरागत ठरलेल्या असून इ. स. ६०० पासून १२०० पर्यंतच्या लेखांत त्यांचा निर्देश सर्वत्र आढळून येतो. दुसऱ्या पुलकेशीचें राज्य नर्मदेपासून कन्याकुमारीपर्यंत सर्व दक्षिणापथावर होते हें पूर्वी सांगितलेच आहे. हा प्रदेश ७॥ लाखांचा होता असेंही प्राचीन लेखांत लिहिलेलें आढळतें, पण या ७॥ लाखांचा अर्थ काय ते मात्र समजत नाहीं. कारण महाराष्ट्राबाहेरील, पल्लव, पांड्य, चोल, केरल, गंग, कदम्ब इत्यादि दक्षिणेंतील सर्व बारीकसारीक राज्यांतील ग्रामसंख्या महाराष्ट्रांच्या ९९००० संख्येंत मिळविली तरी सुद्धां ७॥ लाख इतकी ती भरणें केव्हांहि शक्य नाहीं. अर्थात् ७॥ लाख ही संख्या दक्षिणापथांतील ग्रामांची नव्हे. ती कसली आहे हे सांगतां येत नाहीं.

चालुक्य राजे आपल्या सर्व अमदानींत शालिवाहन शकाचाच उपयोग करीत. वराहमिहिराने आपला सिद्धान्तग्रंथ शके ४२२ त म्हणजे इ. स. ५०० लिहिला, व तेव्हांपासून सर्व दक्षिण हिंदुस्थानांत खरें पाहिल्यास बहुधा शालिवाहन शकाचाच प्रचार जिकडे तिकडे आढळून येतो. याचें कारण असें दिसते कीं, हिंदुस्थानांत ज्योतिषविषयक गणिताला आधारभूत असलेले जे सिद्धान्त ग्रंथ ज्योतिर्विदांनीं लिहिले, त्या सर्वांत शालिवाहन शकच उपयोगिला आहे. आमच्या मते हे सिद्धान्त ग्रंथ म्हणजे शकराजांच्या आश्रयाखालीं उज्जनी येथें ग्रीक ज्योतिषाच्या मदतीने जो त्या शास्त्राचा अभ्यास व शोध एतद्देशीय पंडितांनीं केला त्याचेंच फळ होय. आजचे आपले ज्योतिषशास्त्र म्हणजे प्राचीन आर्य ज्योतिष व ग्रीक ज्योतिष यांचें मिश्रण अथवा एकीकरण आहे हें आतां उघड झालें आहे. आर्यभट्ट, वराहमिहिर व त्यांच्यानंतरचा ब्रह्मगुप्त या ज्योतिर्विदांना ज्योतिष शास्त्राला नवीन चालन दिल्याचें श्रेय आहे. त्यांनी बसविलेली ज्योतिष पद्धति हिंदुस्थानांत सर्वत्र उचलण्यांत आल्यामुळें, तीबरोबर शालिवाहन शकाचाहि स्वाभाविकपणेंच या देशांत सर्वत्र प्रसार झाला. व त्याला सर्व मान्यता मिळाली. या सिद्धान्त ग्रंथांच्या नंतर चालुक्य उदयास आलेले असल्यामुळें त्यांनीहि विशेष भानगड न करतां शालिवाहन शकाचाच स्वीकार केला. हे सिद्धान्ग्रंतथ होण्यापूर्वी उत्तरेंत गुप्त शक चालू असल्यामुळें व गुप्तांनीं शकांचा पाडाव केल्यामुळें त्यांनी मात्र शालिवाहन शकाचा स्वीकार न करतां जुना आपला गुप्तांचा गणनाक्रमच चालू ठेविला. पुढें त्यांचे मांडलिक जे वलभीचे राजे त्यांनी आपल्या सम्राटांचाच क्रम चालवून, शककालाचा स्वीकार केला नाहीं. गुप्त साम्राज्य लयास गेल्यावर उत्तर हिंदुस्थानांत कांहीं ठिकाणीं हर्षकाल सुरू झाला होता. पण कालान्तराने हे दोन्ही काल मागें पडून उत्तरेकडे त्यांची जागा विक्रमकालाने पटकाविली. हा प्रकार कसा घडून आला, हें उत्तरहिंदुस्थानाचा इतिहास सांगतांना आम्हीं दाखविण्याचा प्रयत्न करणार आहों. दक्षिणेत सर्वत्र शककालाचा प्रचार असून ऐहोळे येथील लेखांत शककाल व कलियुगकाल असे दोन्ही सांगितलेले आहेत. या गोष्टीवरूनही नवीन ज्योतिष सिद्धान्त ग्रंथांची छाप या देशांत कशी बसली हें निदर्शनास येतें.

## पहिल्या चालुक्य घराण्यांची वंशावळ.

( मुंबई गॅझिटिअर, दक्षिण, पु. १ भा. २ चे आधारें )

जयसिंह–मूळपुरुष.

रणराग

( १ ) पुलकेशी ( पहिला–सत्याश्रय श्री पुलकेशी वल्लभ अदमासें सन ५५० राणी दुर्लभदेवी )

( २ ) कीतिवर्मा (पहिला) शक ४८९ ५१३ सन ५६७–५९१

( ३ ) मंगलीश–शक ५१३ ५३२सन ५९१–६१० पण कदाचित् ५९७–६०८.

( ४ ) पुलकेशी ( दुसरा ) सन ६०९–६४२ ह्युएनत्सं-गायचे दरबारांत स.६३९ त गेला.

कुब्जाविष्णुवर्धन दुसरा जयसिंह वेंगी घराण्याचा मूळपुरुष.सन ६१५-६३३

दुसरा जयसिंह गुजरार्थेतील चालुक्याचा मूळपुरुष.

( ५ ) विक्रमादित्य ( पहिला ) मृत्यु शक ६०२,–सन ६४२–६८०.

आदित्यवर्धन

जयसिंहवर्मा गुजरार्थेतील आणखी एका चालुक्य घराण्याचा मूळपुरुष.

( ६ ) विनयादित्य.. शक ६०२-६१९. सन ६८०-६९७.

( ७ ) विजयादित्य शक ७१०–६५५; सन ६९७–७३३.

( ८ ) विक्रमादित्य ( दुसरा ) शक ६५५–६६९; सन ७३३-७४७. यानें हैहय घराण्यांतील त्रैलोक्यपति आणि लोकमति या दोन कन्यांशीं विवाह कले होते.

( ९ ) कीर्तिवर्मा ( दुसरा ) शक ६६९–६७५; सन ७४७–७५३. याचें राज्य दंतिदुर्ग राष्ट्रकूटानें हिरावून घेतलें.)

# प्रकरण ११ वें.

## कांचीच्या पल्लव घराण्यांचा वृत्तान्त.

[ या घराण्याच्या इतिहासाचीं साधनें म्हणजे मुख्यत्वेंकरून दक्षिण हिंदुस्थानांतील कोरींव लेख व ताम्रपटांवरील दानलेख होत. हे पुष्कळच असून त्यांच्यावरून हा इतिहास हुल्श, वेंकय्या इत्यादि. पंडितांनीं व विशेषतः पांडिचरी येथील पुराण-विद्या-विशारद फ्रेंच पंडित डुब्रेल यानीं बऱ्याच सुसंगत रीतीनें जुळविण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि त्याच प्राचीन लेखांच्या आधारानें कांहीं महत्वाच्या मुद्यावर आम्हीं आपलें मत स्वतंत्रपणें देणार आहों ].

बादामीच्या चालुक्यांच्या बरोबरीचे दक्षिणेंतील दुसरे बलाढय राजे म्हटले म्हणजे कांचीचे पल्लव होत, व इ. सनाच्या ७ व्या व आठव्या शतकांत त्यांनीं दक्षिणापथाच्या चक्रवर्तित्वासाठीं चालुक्यांबरोबर अनेक वार झगडाहि केला. कांची म्हणजे ज्याला आज काजीवरम् म्हणतात, तेथें त्यांनीं आपली स्थापना केली असून हें ठिकाण द्रविड देशाच्या मध्यभागीं आहे. त्यांनीं चोल, पांड्य, केरल आणि कलभ्र या दंतकथेनें द्रवीड जातींत मोडणाऱ्या लोकांना पादाक्रान्त करून, त्यांवर आपलें वर्चस्व स्थापिलें होतें. पण ते स्वतः द्रवीड वंशीय नव्हते. द्रविड देशांत ते बाहेरून आलेले असून त्यांची भाषा सुद्धां द्रावीड नव्हती. ह्युएनत्संग कांची येथें इ. स. ६३९ त गेला होता. त्यानें स्पष्टच लिहिलें आहे कीं, कांचीचे हे लोक मध्यहिंदुस्थानांतील लोकांच्यासारखी भाषा बोलतात. दुसऱ्याहि एका गोष्टीवरून आमच्या म्हणण्याची सत्यता पटण्यासारखी आहे. पल्लव राजांचे सर्व दानलेख संस्कृत भाषेंत लिहिलेले असून, त्यांतील एकहि कोणत्याच द्राविडी भाषेंत नाहीं. पांड्य, चोल, केरल इत्यादि राजांचे लेख मात्र त्यांच्या द्राविडी

भाषांतच आहेत. पल्लवांचे अगदीं प्राचीन दानलेख, खरें पाहिल्यास, संस्कृतांतहि नसून प्राकृतांत आहेत हें आम्हीं दाखविणार आहों; व त्यावरून हे लोक मूळ द्राविडी वंशाचे नसून बाहेरून त्या देशांत गेले होते, हें उघड दिसतें. मग ते मूळचे कोणत्या वंशाचे व देशाचे असावे ?

पल्लव म्हणजे पुराणांत आलेले पल्हव, किंवा पारसी ग्रंथांतील पल्हव, अथवा शंकाबरोबर काठेवाडांत आलेले पल्हव होत, असे त्यांविषयीं बहुतेकाचे तर्क होते. पण आतां हे सर्व तर्क मावळले आहेत. कांहींनीं अशी कल्पना सुचविली होती कीं, नाशिकच्या लेण्यांतील लेखांत म्हटल्याप्रमाणें गौतमीपुत्र पुलुमायीनें इ. सनाच्या दुसऱ्या शतकांत जेव्हां शक, यवन, पल्हव या लोकांना महाराष्ट्रांतून हांकून लाविलें, तेव्हां त्यांपैकीं पल्हव हे उत्तरेकडे न जातां दक्षिणेंतच आणखी खालीं घुसले व कांची येथें त्यांनीं आपलें राज्य स्थापिलें. पण ही कल्पना केवळ नामसादृश्यावर लढविलेली असल्यामुळें,ती त्याज्य समजून तिच्या ठिकाणीं दुसरी अशी कल्पना आतां आली आहे कीं, हे पल्लव म्हणजे कृष्णा व गोदावरी या नद्यांच्या मधील प्रदेशांत राहणारे कोणी लोक होते. तेव्हां पल्लव म्हणजे पल्हव कां नव्हत यांचीं कारणें देण्याची वास्तविक आतां कांहीं गरज नाहीं. पण विषयपूर्तीसाठीं आणि अजूनही भ्रम कित्येकांचा असल्यामुळें ( Archological Surevy Report 1918 पहा.) त्या कारणांचा थोडक्यांत निर्देश करणें जरूर आहे. पहिलें कारण असें कीं, पुलुमायीनें जर पल्हवांना हांकूनच दिलें होतें, तर पुनः दक्षिणेंत आपल्याच राज्यांत त्यानें त्यांना काय म्हणून पुढें घुसूं दिलें असेल. त्याच्या वेळीं सातवाहनांचें राज्य दक्षिणेकडे म्हैसूरपर्यंत पसरलेलें होतें, हें पूर्वी सांगितलेंच आहे. दुसरें असें कीं, संस्कृत वर्णमाला पूर्ण असल्यामुळें तींत

पल्लव व पह्लव यांचा घोंटाळा होण्याचें कांहींच कारण नाहीं. मनुस्मृति व पुराणें यांत देखील पह्लव हें परकीय म्लेच्छ नांव हकारयुक्त पह्लव असेंच लिहिलेलें आहे व फारशी भाषेंतहि तें तसेंच स्पष्ट आहे. आतां कोणाला अशी शंका येईल कीं पह्लव शब्द प्राकृतांत येतांना त्याच्या हकाराचा लोप झाला असेल. पण तोहि प्रकार दिसत नाहीं. गौतमीपुत्र पुलुमायीच्या प्राकृत लेखांत देखील हें पह्लव असें हकारयुक्तच रूप आहे ( एपि. ग्रॅ. इंडिया. पु. ३ नाशिकच्या लेण्यांतील लेख ). तिसरें कारण असें सांगतां येतें कीं, जर पल्लव हे परकीय देशांतून आलेले पह्लव असून येथें आल्यावर त्यांनीं मध्यहिंदुस्थानांत चालू असलेल्या भाषेचा स्वीकार केला असता, तर त्या भाषेशीं त्यांचा परिचय अगदीं थोडा वेळच असल्यामुळें कांचीस गेल्यावर ती कायम ठेवणें त्यांना शक्य नव्हतें. कारण कांची सभोंवार द्राविड भाषांचें एवढें वर्चस्व होतें कीं, कोणत्याही नवीन भाषेला त्यांना मागें सारण्याची शक्ति होती. या कारणांचा विचार करतां पल्लव व पह्लव यांचें तादात्म्य होतें असें म्हणणें युक्त दिसत नाहीं. त्याचप्रमाणे कृष्णा गोदावरीच्या मधले ते कोणी मूळचे लोक होते असेंहि म्हणतां येणार नाहीं. कारण तसें असतें, तर त्यांची भाषा आर्यभाषांपैकीं असणें शक्य नव्हतें. त्यांची भाषा आर्य असल्यामुळें तेहि उत्तरेकडील आर्य लोकांपैकींच होते असें ठरतें.

याविषयीं आमचें मत असें आहे कीं महाराष्ट्रांत प्रारंभीं वसाहत करणाऱ्या आर्यांपैकींच पल्लव हे होते. अर्वाचीन इतिहासांत तंजावरच्या मराठी राज्याची स्थापना ज्या कारणानें झाली, त्याच कारणानें प्राचीन काळीं पल्लवाचें राज्य कांचीस स्थापन झालें. पल्लव लोक शेंकडों वर्षें महाराष्ट्री प्राकृत बोलणारे महाराष्ट्र आर्य असल्यामुळें कांचीस वसति केल्यावरहि त्यांनीं आपली

मूळ भाषा सोडली नाहीं, व द्राविडी भाषेचा स्वीकार केला नाहीं. ते आजच्या मराठ्यांच्या पूर्वजांपैकींच होते असेंहि म्हणावयास कांहीं हरकत नाहीं; कारण त्यांच्या नांवाचें थोडें प्राकृत रूपांतर होऊन बनलेले पालवे हें आडनांव मराठ्यांच्या आडनांवापैकीं एक आहे. आमच्या म्हणण्याच्या दृढीकरणार्थ आणखी असेंहि प्रमाण आहे कीं या पालवे आडनांवाच्या मराठ्यांचें गोत्र जें भारद्वाज तेंच पूर्वीच्या पल्लवांनीहि आपल्या दानलेखांत आपलें स्वतःचें म्हणून सांगितलें आहे. ह्युएनत्संग कांचीस गेला तेव्हांचा तेथील राजा नरसिंहवर्मा यास त्यानें क्षत्रिय म्हटलें आहे. यावरूनहि पल्लव हे आर्य असून मध्यहिंदुस्थानांतून खालीं सरकत सरकत महाराष्ट्रांतून दक्षिणेकडे जाऊन तेथें त्यांनीं वसाहत केली हें निःसंशय सिद्ध होतें.

याप्रमाणें पल्लवांचें आर्यत्व सिद्ध केल्यावर त्यांच्या ताम्रपटादि लेखांच्या आधारानें कळून येणारा त्यांचा वृत्तांत देण्याचा आतां प्रयत्न करूं. पल्लव घराण्याचा एकंदर इतिहास इ. स. २०० पासून ८०० पर्यंतचा असल्यामुळें तें घराणें अविच्छिन्न स्थितींत इतके दिवस चाललें असेल असें संभवत नाहीं. चालुक्याप्रमाणें त्याचेहि पहिले व मागाहूनचे असे दोन भाग पाडणें अवश्य असून त्यांचे इतिहासकार वेंकय्या यांनीं तसे भाग केले आहेत हें ठीकच झालें. या दोन भागांपैकीं आपल्या प्रस्तुत ग्रंथाच्या टापूंत येणारा दुसराच भाग आहे; व त्यांतील राजे चालुक्यांच्या पहिल्या घराण्यांतील राजांशीं समकालीन होते. तथापि पहिल्या भागांतील राजांचा इतिहास फारसा कोठें दिलेला नसल्यामुळें व विषयपूर्ततेसाठीं तो अवश्य असल्यामुळें तोहि प्रथम थोडा बहुत देणें इष्ट आहे. त्यावरून पल्लवांचा मराठ्यांशीं संबंध कसा पोंचतो तेंहि कळन येईल असें आम्हाला वाटतें.

## १. पूर्व पल्लव.

या पहिल्या भागांतील राजांना आपण पूर्व पल्लव असें म्हणूं. त्यांचा इतिहास पहातां प्रथम असें दिसतें कीं, त्यानीं आपल्या लेखांत प्राकृत भाषेचा उपयोग केलेला आहे. द्रविड देशांत प्राकृत भाषेचा लेखांत उपयोग करणें चमत्कारिक वाटतें. पण याचें कारण वर सांगितलेंच आहे. या पूर्व पल्लवांचे आजपर्यंत तीनच दानलेख उपलब्ध झालेले आहेत; त्यांतील नमुन्यासाठीं म्हणून एक लेख पुढें टिप्पणींत साग्र दिला आहे. या सर्व लेखांचा विचार करतां पैठणच्या सातवाहन राजांच्या प्राकृत लेखांचीच परंपरा त्यांत दिसून येते. प्रथम दोन्ही प्रकारच्या लेखांची भाषा प्राकृत असून एकमेकींना निकट आहे. दुसरे असें कीं, दोहोंतहि केलेले कालनिर्देश अशोकाच्या बौद्धपद्धतीला अनुसरून आहेत; म्हणजे त्यांत महिन्याचा नामनिर्देश कोठेंहि केलेला नाहीं. या देशांत रूढ असलेल्या तीन ऋतूंपैकीं चालू ऋतूचें नाव सांगून त्यांतील आठ पंधरवड्यांपैकीं जो असेल त्याचा क्रमांक देण्याची अशोककालीन पद्धति होती; महिन्याचें नांव देऊन त्यांतील शुक्ल किंवा कृष्णपक्षाचा निर्देश करीत नसत. अशोकाचे साम्राज्य महाराष्ट्रावरून पलीकडे दक्षिणेंतहि पुष्कळ पसरलेलें होतें हें प्रसिद्धच आहे. अशोकाचें बौद्ध साम्राज्य पुढें सातवाहनांकडे आलें व त्यानीं आपल्या लेखांत कालनिर्देशाची पूर्वीचीच पद्धत* ठेविली. आतां पूर्व पल्लवांच्या प्राकृत लेखांत याच पद्धतीचा म्हणजे ऋतुनाम व त्यांतील पक्षाचा क्रमांक देण्याच्या पद्धतीचा अवलंबन केलेला असल्यामुळें त्यांनी पैठणच्या सातवाहन आंध्रभृत्यांची परंपराच पुढे चालविली असे उघड होतें.

साम्राज्यांच्या घडामोडींच्या नित्यनियमानुसार आमचा असा तर्क आहे कीं, आंध्रभृत्य सातवाहनांचें राज्य इ. स. २०० चे सुमारास जेव्हां लयास

---

*नाशिकच्या लेण्यांतील लेखांत, नहपानाचा जांवई जो उशवदात त्याचे दोन लेख असून त्यांत मात्र शककाल, आणि महिन्याचें नांव व त्यांतील पक्ष (शुक्ल किंवा कृष्ण) असे सांगितले आहेत. यावरून ते परकीय पद्धतीचे म्हणजे महाराष्ट्राला नवीन असलेल्या पद्धतीचे होते, हें उघड होतें.

गेले तेव्हां पल्लव हे त्यांचे हाताखालीं दक्षिणेंत मंडलाधिपति ऊर्फ सुभेदार होते, व साम्राज्याच्या लयाच्या गडबडींत त्यांनीं संधि साधून तेथें स्वतंत्र राज्य स्थापिलें. पल्लवांविषयीच्या आपल्या छोटया पुस्तकांत डुब्रेल या फ्रेंच पंडितानेंहि असेंच अनुमान केलें आहे. त्याचें म्हणणें असें आहे:-- ' आंध्रांच्या मागून पल्लव सत्ताधीश झाले. त्यांच्या ताम्रपटांत सातहनी रठ या बेल्लारी जिल्ह्याच्या एका भागाचा उल्लेख आहे. म्हणजे यावरून पल्लवांचें दक्षिणेंतील साम्राज्य कारोमांडल किनाऱ्याच्या बाजूनें वरती कृष्णे-पर्यंत व पश्चिमेकडे तुंगभद्रेच्या तीरापर्यंत पसरलेले होते असें झालें " (पान १३). या ठिकाणीं आणखी एवढे सांगणें अवश्य आहे कीं देशविभागदर्शक रठ(राष्ट्र)आणि आहार हे शब्द खरोखर महाराष्ट्रीय पद्धतीचे आहेत. महाराष्ट्रांनीं राष्ट्र शब्दाचा उपयोग प्रान्त या अर्थीच केलेला आहे. अशोकाच्या आज्ञालेखांत त्यांना राष्ट्रिक, रठ अशीं नांवें दिलेली आहेत. दुसरें बप्प हें नांवहि महाराष्ट्रीय विशेषे करून असून तें पूर्व पल्लवांच्या वर उल्लेखिलेल्या एका प्राकृत ताम्रलेखांत आलेले आहे.

पूर्व पल्लवांपैकीं पहिला विशेष महत्वाचा * राजा वीरकूर्च नांवाचा असून एका लेखांत " नागराज कन्येच्या पाणिग्रहणा समवेतच सर्व राज्यलक्ष्मीचें ग्रहण करून तो सुप्रसिद्ध झाला" असें त्याविषयीं म्हटलेलें आहे. ( डुब्रेलकृत पल्लवांचे वर्णन पा. २३ ) ही नागकन्या म्हणजे कोणा सातवाहन राजाची कन्या असावी असा डुब्रेलचा तर्क आहे. ती कोणत्याहि नागवंशांतील असली तरी तात्पर्य एवढेंच कीं, आर्य क्षत्रियांपकीं असलेल्या या पल्लवांचे स्थानिक नागघराण्याशीं संबंध होऊन अर्थात पुनः मिश्रण झालें. म्हणजे चालुक्यांप्रमाणेंच पल्लवांच्या या मूळपीठिकेच्या वृत्तावरूनहि सांप्रत मराठ्यांत परंपरागत चालू असलेल्या सूर्यवंश, चंद्रवंश व नागवंश या तीन वंशांना ऐतिहासिक आधार मिळाल्यासारखा होतो.

वरील हकीगत वेल्लुरपल्लियरच्या ताम्रपटावरून घेतली असून त्यांत दुसऱ्याहि महत्वाच्या गोष्टी आहेत. त्याचें आम्हीं स्वतः निरीक्षण केल्यावरून

---

* यःफणीन्द्र सुतया सहाग्रहीद्राजचिन्हमखिलं यशोधनः ।

( पुराणवस्तु संशोधन खात्याच्या वृत्तांत भाग ५ वरून ) आम्हांला असें आढळून आलें कीं त्यांत वीरकूर्चाविषयींच्या श्लोकाखेरीज त्याचा नातू जो स्कन्दशिष्याचा पुत्र कुमारविष्णु त्याविषयीं ' गृहीतकांचीनगरस्ततोऽभूत् । कुमारविष्णुः समरेषु जिष्णुः ॥ असें म्हटलें आहे. त्यावरून पहातां वीरकूर्चाचा नातु कुमारविष्णु यानेंच प्रथम कांची शहर घेऊन तेथें राज्य स्थापन केलें असें होतें. ही गोष्ट कालक्रमाला देखील अनुसरूनच आहे. वेलूरच्या लेखांत जी पल्लवांच्या पूर्वजांची लांबच लांब नाममाला दिली आहे तींत छत्तीस राजांचा निर्देश आहे. त्यांपैकीं १९ वा विष्णुगोप नांवाचा असून ज्याला मगधदेशीय गुप्तानें जिंकिलें तोच हा विष्णुगोप असावा. समुद्र गुप्ताच्या प्रयाग येथील इ. स. ३३८ मधील प्रसिद्ध शिलालेखांत त्याचें नांव आलेलें आहे. पुढें ३४ वा राजा नरसिंहवर्मानांवाचा असून तो ह्युएनत्संग व इ. स. ६४०त चालुक्यांच्या गादीवर असलेला द्वितीय पुलकेशी यांचा समकालीन होता. विष्णुगोपापासून नरसिंहवर्म्यापर्यंत १५ पिढया होत असून नित्याच्या सरासरी मानाने त्यांचीं ३०० वर्षें होतात; व हा काल इ. स. ३३८ पासून ६४०पर्यंतच्या ऐतिहासिक काळाशीं चांगला जुळतो. आतां इ. स. ३३८ तील या १९ व्या विष्णुगोपापासून मागें जातां जातां ११ वा राजा वीरकूर्च येतो. हे ८ पिढयांचें अंतर १६० वर्षें धरिल्यास वीरकूर्चाचा काळ अदमासे इ. स. १७८च्या सुमारास येतो. हा काळ सातवाहनाच्या अमदानीचा आहे हे सांगावयास नकोच. त्याचा नातू कुमार विष्णु इ. स. २००च्या सुमारास कांचीचा राजा झाला असावा. परिशिष्टांत दिलेला उपरिनिर्दिष्ट मयदवोल्लयेथील प्राकृत दनलेख सदर राजनामावेलींतील १५ व्या राजाच्या म्हणजे कुमारविष्णूच्या नातवाच्या कारकीर्दींतील इ. स. २४० च्या सुमाराचा असला पाहिजे.

वरील विवेचनाचा निष्कर्ष काढतां पूर्वपल्लवांचा ससंगत इतिहास पुढें दिल्याप्रमाणे ठरतो. उत्तर हिंदुस्थानांतील किंवा महाराष्ट्रांतील पल्लव आडनांवाचा वीरकूर्च म्हणून कोणी आर्य सरदार दक्षिणेंत आला; व इ. स. १७८ च्या सुमारास त्यानें मर्दुमकी गाजवून तेथील नागवंशीय राजकन्येशीं विवाह केला. पुढें सातवाहनांच्या सत्तेचा ऱ्हास झाल्यावर पल्लवांचें हेंच राष्ट्र

बलाढ्य होऊन स्वतंत्र झालें, व वीरकूर्चाचा नातू कुमारविष्णु इ. स. २०० च्या सुमारास कांची शहर हस्तगत करून तेथें स्वतंत्र राजा बनला. हें राज्य पुढे इ. स. ३३८ त पाटलिपुत्राच्या समुद्रगुप्तानें जिंकिलें, व त्यामुळे कांहीं काळपर्यंत पल्लवांना नम्र व्हावें लागलें. पण पुनः त्यांनीं डोके वर काढून वैभव संपादिलें आणि सिंहविष्णूपासून उत्तरपल्लवांची राजमालिका सुरू झाली. तिचा वृत्तान्त पुढें दिला आहे.

हें पूर्व पल्लवांचें घराणें निःसंशय क्षत्रियच होते, हे पुनः सांगावेसें वाटते. एतद्विषयक कारणें पूर्वीं दिलीं आहेतच. पूर्व व उत्तर अशा दोन्ही पल्लवांच्या लेखांत ते आपल्याला भारद्वाजगोत्रीय म्हणवीत असत. क्षत्रिय राजांना आपला गोत्रनिर्देश करणे अवश्य वाटत होते असें यावरून दिसतें. चालुक्य राजेहि आपल्याला मानव्यसगोत्र असे नित्य म्हणवीत हें पूर्वीं सांगितलेंच आहे, पितृगोत्राखेरीज या राजांनीं आपल्या घराण्याच्या संस्थापकाच्या मातेचें गोत्र सांगण्यांतहि मुळींच आळस केलेला नाहीं; व त्यावरून मातृवंशानेहि आपण क्षत्रियच मुळचे आहो हें दर्शविण्याचा त्यांचा उद्देश उघड दिसतो. गौतमीपुत्र, वासिष्ठीपुत्र इत्यादि जे शब्द सातवाहनाच्या संबंधाने लेखांतून आलेले आहेत, त्याचा अर्थ काय समजावयाचा याचे पूर्वी विवेचन केलेच आहे. त्यावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, क्षत्रियांना आपलें गोत्र ही एक अभिमानास्पद गोष्ट होती. नाशिकच्या लेखांतील एतद्विषयक आणखी उदाहरण येथे देतों. त्यांत भवगोप नांवाच्या एका सेनापतीचें कौशिक गोत्र सांगितले असून एवढाच हा एक त्यांत गोत्रनिर्देश आहे. त्यांतील ‘ गोप ’ या अन्त्यपदावरून विष्णुगोप नांवाशीं त्याचे सादृश्य दिसतें, व तो सेनापति क्षत्रिय असला पाहिजे असे ठरते.

पृथ्वीचें रक्षण करणारा या अर्थाचे ‘ गोप ’ हें अन्त्यपद बहुधा जातीचे किंवा वर्णाचें वाचक असल्यामुळे फार महत्वाचें आहे; व त्यांतील गोत्रनिर्देश तर अधिकच महत्वाचा आहे. वरील लेखाच्या काळचाच एक प्राकृत लेख असून त्यांतील राजा व त्याचे ठिकाण यांची ओळख अजून कोणाला पटलेली नाहीं. पण त्यांत त्या राजाचे गोत्र बृहत्फलायन असें सांगितले आहे. ( कुडुवाहरांतील एक गांव जयवर्मा नांवाच्या राजाने दान दिल्या-

बद्दलचा हा लेख असून तो एपिग्रॅफिका इंडिकाच्या ६ व्या पुस्तकांत छापलेला आहे ( पा. ३१६ ). या लेखांत ' आहार ' हा प्रांत वाचक संस्कृत शब्दच आलेला असून ' नाडु ' हा द्राविड शब्द त्यांत योजिलेला नाही.). पूर्व पल्लवांच्या दान लेखांत त्यांच्या भारद्वाज गोत्राचा सर्वत्र उल्लेख केलेला असल्यामुळे ह्युएत्संगाने सांगितल्याप्रमाणे ते मूळचे खरे आर्यक्षत्रियच होत असें निःसंशय अनुमान होतें.

उत्तर पल्लवांच्या लेखांत त्यांच्या पूर्व पीठिकेचा जो वृत्तांत दिलेला आहे तो अर्थातच कल्पित कथा असल्यामुळे त्यावर मुळींच भिस्त ठेवतां येत नाहीं. पल्लवांचा महाभारत-प्रसिद्ध कोणावीराशीं संबंध जोडून देण्याच्या उद्देशानें ती कथा नित्याप्रमाणें मागाहून रचण्यांत आली. मध्यकालोत्तर राजांमध्ये साधारणपणें आपला संबंध महाभारतांतील कोणत्या तरी वीराशीं जोडण्याची जबर महत्वाकांक्षा दिसून येते.* चालुक्यांच्या पूर्वपीठिकेची असली दंत कथा पूर्वी सांगितलीच आहे. पल्लवांच्या उत्तर कालीन लेखांत आलेली कथा अशी आहे. पल्लवांच्या घराण्याचा वंशवृक्ष तींत ब्रह्मापासून सुरू केलेला असून ब्रह्मा ( १ ), अंगिरस् ( २ ), बृहस्पति ( ३ ) शंयु ( ४ ) भरद्वाज ( ५ ), द्रोण ( ६ ) अश्वत्यात्मा ( ७ ) आणि पल्लव ( ८ ) असा क्रम पुढे सांगितला आहे. शेवटचा पल्लव हा अश्वत्थाम्याचा एक अप्सरेपासून झालेला पुत्र असून वृक्षांच्या पल्लवांच्या शयनावर त्याला निजविल्यामुळें त्याला पल्लव म्हणूं लागले असे त्या कथेत म्हटलें आहे. नांवांची अशी मौजेची व्युत्पत्ति देण्यांत वैदिक ऋषींना देखील आनंद वाटत असावा असें दिसते. अयास्य, अंगिरस्, अत्रि इत्यादि नांवांचे जे अर्थ ब्राह्मण ग्रंथांत दिले आहेत ते पहातां वेदोत्तर कालीन कवीनीं चालुक्य, पल्लव इत्यादि नावांची व्युत्पत्ति सांगण्यासाठीं निर्माण केलेल्या कथांबद्दल आश्चर्य वाटावयास नको. या कथा काल्पनिक अतएव अग्राह्य असून पहिल्या पल्लव राजाचें राज्य संपूर्ण पृथ्वीवर चालत होते ही कथा हि त्याच नमु-

---

*यूरोपांत पूर्वी ग्रीक व रोमन राजांना सुद्धां इलियड किंवा आडेसी मधील एकाद्या प्रसिद्ध पुरुषाशी आपला संबंध जोडण्याची मोठी हौस असे.

ऱ्याची होय. तात्पर्य क्षत्रिय राजघराण्यांच्या नांवांची व्युत्पत्ति न शोधतां ती आहेत तशीच आपण घेऊन चालावें हेंच योग्य आहे.

पल्लव खरे क्षत्रिय असल्यामुळें ते प्राचीन वैदिक धर्माचेच अभिमानी होते. कुमारविष्णूचा पुत्र जो शिवस्कन्दवर्मा त्याचा प्राकृत दानलेख सांपडलेला असून त्यावरून त्यानें अश्वमेध केला होता असें दिसून येतें. हा अश्वमेध पाटलिपुत्राच्या गुप्त घराण्यांतील चंद्रगुप्तानें केलेल्या अश्वमेधापूर्वी झालेला होता असे व्हिन्सेन्ट स्मिथने म्हटले आहे व तें योग्यच आहे. इतर मराठ्यांप्रमाणें पल्लव हेहि मोठे शिवोपासक होते. त्यांनीं कांचीस मोठमोठीं शिवमंदिरें बांधिलीं. त्यांपैकीं कित्येकांनीं विष्णु-मंदिरेंहि बांधलीं, पण एकंदरींत शिवाकडे त्यांचा ओढा अधिक असून त्यालाच ते कुलदैवत मानीत. एका पल्लव राजानें अमरावती येथें बौद्धांना केलेल्या दानाविषयींचाहि लेख आढळतो असें म्हणतात. पण तेवढ्यावरून वरील विधानास बाध येत नाही. आर्यांपैकीं अनेक राजांनीं बौद्धधर्माविषयी दाखविलेलें निर्मत्सरत्व प्रसिद्धच आहे. बौद्ध व जैन या दोन्ही धर्मांना कांचीच्या राज्यांत जरी कोठें कोठें अनुयायी मिळत, तथापि एकंदर लोकसमूह व राजघराणें हीं सामान्यतः शैवमतानुयायीच होतीं. शैवमताचें दक्षिणेतील मुख्य पीठ कांची येथेंच असून तेथें अनेक शैव कवि व साधु होऊन गेले. याच कारणास्तव हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध सप्तपुरींत कांचीची गणना होऊं लागली असे आम्हाला वाटतें. मोक्षदायक अशा ज्या सात पुरींची नांवें आमच्या प्रातःस्मरणांतील श्लोकांत सांगितलीं आहेत, तीं अयोध्या, मथुरा, माया ( हरद्वार ), काशी, कांची, अवन्तिका ( उज्जनी ) आणि द्वारावती ( द्वारका ) अशीं आहेत. यांत आश्चर्याची गोष्ट अशी आहे कीं सातांपैकीं सहा नांवें उत्तरेकडील असून दक्षिणेच्या वांट्याला केवळ एकच नांव आलें, व तेंहि कांची. प्राचीन काळापासून महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध विद्यापीठ म्हणून गाजत आलेल्या प्रतिष्ठान म्हणजे पैठणला कांहीं तो मान मिळाला नाहीं. हे कांचीचें माहात्म्य पूर्व पल्लवांच्या अमदानींत जुन्या वैदिक धर्माची जी भरभराट झाली, व त्यांनीं जोपासना करून वाढविलेल्या शैव मताचे जे

अनेक साधु तेथें होऊन गेले, त्यांच्यामुळें तिला प्राप्त झालें असें म्हणावयास हरकत नाहीं.

प्रयाग येथील समुद्रगुप्ताच्या स्तंभ लेखांत, त्यानें वेंगीचा हस्तिवर्मा, पटक्कलचा उग्रसेन आणि कांचीचा विष्णुगोप याचा पराभव केला असें सांगितलें आहे. यांतील वेगी हें पूर्व किनाऱ्यावरील, व पटक्कल हें पश्चिम किनाऱ्यावरील अशीं दोन्ही राज्यें कांचीच्या पल्लवांच्या साम्राज्यांतच मोडत होतीं. वेगीला बहुधा वेंगीराष्ट्र असेंच लेखांत म्हणत असल्यामुळें तो प्रान्त पल्लवांच्या मराठा राज्यांत पहिल्यापासून अन्तर्भूत होता असें उघड होतें. वर आलेला हस्तिवर्मा राजा देखील पल्लव घराण्यापैकींच होता असें म्हणतात. पल्लवांचा ऱ्हास झाल्यावर वेगीराष्ट्र बादामीच्या चालुक्यांकडे आले, व तेथें चालुक्यांचें निराळें घराणे विष्णुवर्धन नामक राजानें चालू केले.

## २ कांचीचे उत्तरपल्लव.

कांचीच्या उत्तर पल्लव घराण्यांतील राजे पूर्व चालुक्यांचे समकालीन असून दोघांची संख्या सारखीच आहे. त्या परस्परांमध्ये वारंवार युद्ध प्रसंग होत असत. या दोन्ही घराण्यांतील समकालीन राजांची नांवे कालक्रमानुसार खालीं लिहिल्याप्रमाणे आहेतः- .

| पल्लवघराणे | चालुक्यघराणे. |
|---|---|
| सिंह वर्मा ( मृत्यु ) सन ५८२ | रणराग |
| १ सिंह विष्णु मृत्यु सन ५९० | पहिला पुळकेशी. |
| २ महेन्द्रवर्मा ( पहिला ) मृ. स. ६१८ | पहिला कीर्तिवर्मा. |
| ३ नरसिंहवर्मा ( पहिला ) सन ६४६ | दुसरा पुलकेशी. |
| ४ महेन्द्रवर्मा ( दुसरा ) सन ६६० | पहिला विक्रमादित्य. |
| ५ परमेश्वरवर्मा ( पहिला ) सन ६७४ | विनयादित्य. |
| ६ नरसिंहवर्मा ( दुसरा ) सन ७०० | विजयादित्य. |
| ७ परमेश्वरवर्मा ( दुसरा ) सन ७१५-- | दुसरा विक्रमादित्य. यानें नंदिपोतवर्म्याचा |
| ८ नंदिपोतवर्मा सन ७४२-- | ७४० त पराभव केला. |

पल्लव कुलाची सिंहविष्णूपासून दुसऱ्या परमेश्वरवर्म्यापर्यंतची परंपरा पुत्रद्वाराअसून ज्याचा विक्रमादित्य चालुक्याने पराभव केला तो आठवा राजा नंदिपोतवर्मा मात्र पल्लवांपैकींच पण दूरचा संबंधीं होता. त्याच्या कारकीर्दीबरोबर उत्तरपल्लवांची देखील अमदानी संपली.

याप्रमाणें सन ५५० पासून ७५० पर्यंत दोनशें वर्षें नर्मदेच्या दक्षिणेकडील हिंदुस्थानाच्या भागांत पल्लव व चालुक्य अशीं दोन महाराष्ट्रीय क्षत्रिय कुले दक्षिणापथाच्या म्हणजे समुद्रत्रयांकित भूप्रदेशाच्या स्वामित्वाबद्दल एकमेकांशीं झगडत होतीं. पल्लवांनीं द्रविड देशांतील पांड्य, चोल, केरल व कलभ्र या राजांना आधींच जिंकून आपले अंकित केल्यामुळें तें पुष्कळ वेळां पल्लवांसमवेत चालुक्याविरुद्ध युद्धांत पडत असत. चालुक्यांशीं झालेल्या युद्धांत अखेरीस पल्लवांना यश असें कधीं आले नाहीं. बहुधा चालुक्यांच्याच गळ्यांत विजयलक्ष्मी शेवटी माळ घालीत असे. तथापि एकंदरीत जयापजयाच्या चांचल्यामुळे कधीं कधी पल्लवांनां देखील जयप्राप्ति होतच असे. त्या जयपजयांचें सविस्तर वर्णन करण्याचे विशेष प्रयोजन नाही. दोन्ही कुलांतील राजांचे अनेक ताम्रपटादि लेख उपलब्ध असून त्यांत त्यांच्या जयापजयाविषयी कित्येक ठिकाणीं परस्पर–विरोधी वर्णनेंहि आढळतात. पण त्या सर्वांचा निष्कर्ष काढून विद्वान पंडितांनीं या उत्तर पल्लवांचा सुसंगत असा जो इतिहास जुळविला आहे, त्याचा सारांश असा.

उत्तर पल्लवांतील पहिला मोठा राजा सिंहविष्णु होय. त्याने पांड्य, चोल इत्यादि जवळच्या देशांखेरीज आणखी सिंहलद्वीपहि जिंकिलें होते. त्याचा पुत्र पहिला महेन्द्रवर्मा हर्षाचा प्रतिस्पर्धी जो द्वितीय पुलकेशी चालुक्य त्याने महेन्द्रवर्म्याचा युद्धांत पाडाव केला. ह्युएनत्संग कांचीस गेला तेव्हां तेथें महेन्द्राचा पुत्र नरसिंहवर्मा राज्य करीत होता. तो जरी नांवाने पुलकेशीचा मांडलिक होता, तरी पुढे त्यांचे इ. स. ६४२ त युद्ध होऊन त्यांत पुलकेशीचा त्यानें पराभव केला, आणि त्याची राजधानी वातापी नगरी हस्तगत करून लुटून टाकिली. पण याचा सूड पुलकेशीचा पुत्र पहिला विक्रमादित्य याने घेतला. त्याने कांचीवर स्वारी करून ती नगरी घेतली आणि चालुक्यांचा दरारा पुनः बसविला. त्यावेळीं पल्लवांचा राजा परमेश्वर

वर्मा असून ही गोष्ट विक्रमादित्याच्या दानलेखांवरून पहातां इ. स. ६७४ त घडली असावी. विक्रमादित्याचा पुत्र विनयादित्य याच्या शक ६१३ म्हणजे इ. स. ६९१ तील एका दानलेखांत ( इंडियन ॲंटिक्वरी पु. ६, पा. ८९ ) याविषयीं कांहीं महत्वाची माहिती आहे. त्यांत विक्रमादित्याला 'हिमकरकरविमल कुलपरिभव विलयहेतु पल्लवपति पराजयानन्तर गृहीत कांचीपुरस्य ' असें विशेषण लाविलेले असून त्याचा अर्थ चांगलासा कळत नाहीं. चंद्रकिरणांप्रमाणे विमल अशा कुलाची मानहानि करण्यास जो कारण झाला, त्या पल्लवाधिपतीचा पराभव करून ज्यानें कांचीपुर घेतले असे त्या विशेषणाचे डॉ. फ्लीटनें भाषान्तर केलें आहे. पण त्यांतील विलय शब्दाचा बरोबर अर्थ या भाषान्तरांत आला आहे की नाही याची आम्हांस शंका वाटते. कारण पल्लवाधिपाला त्यांत 'परिभवहेतु ' असे म्हटलें नसून 'परिभवविलयहेतु ' म्हटलें आहे. या विलय शब्दाकडे फ्लीटनें लक्ष दिलेले नाहीं. एकंदरींत हे विशेषण जरा गूढच दिसते. त्यांत चालुक्य घराणें चंद्रवंशी म्हणून मानिलेले दिसतें; व उत्तर चालुक्यांच्या लेखांत तसेंच ह्मटलेलें आढळतें. पण आम्हांला याविषयीं शंका आहे. तथापि त्यांतील मुद्दा मात्र स्पष्ट आहे. तो असा कीं, विक्रमादित्याने पल्लवांचा पराभव करून कांचीपुर घेतले. यानंतर प्रस्तुत लेखांत ' त्रिसमुद्र मध्यवर्ति मंडलाधीश्वरस्य ' असे दुसरे विशेषण विक्रमादित्याना लाविलेले आहे, व त्यावरून तीन समुद्रांमध्ये असलेल्या सर्व मांडलिकांचा तो चक्रवर्ती होता असे ठरते. 'त्रैराज्य पल्लव वलमवष्टभ्य ' असेहि आणखी त्यांत म्हटले आहे, व त्यावरून चालुक्यांच्या विदर्भ, महाराष्ट्र आणि कुंतल या तीन महाराष्ट्र राज्याप्रमाणे पल्लवांचींहि तीन राज्ये होती असे दिसते. हीं तीन राज्ये म्हणजे वेंगीराष्ट्र कांची व पलक्कड हीं असवीं. पण वेंगीराष्ट्र पल्लवांकडून या पूर्वींच निघून चालुक्य घराण्याच्या एका शाखेकडे आले होतें. तथापि पूर्वींपासून आलेलें म्हणून त्रैराज्य पल्लव हे पद कदाचित् तसेंच राहिले असेल.

चालुक्यांकडून अनेकवार पराजय झाला, तथापि पल्लवांनीं आपले राज्य बराच काळ राखून ठेविलेलें असून ते बलाढ्यहि होते. नंदिपोतवर्म्यांच्या कारकीर्दीत त्यांच्यावर विक्रमादित्य चालुक्याने जो आघात केला तो मात्र

शेवटचा असून त्यांतून पल्लवांना तगाव धरतां आला नाहीं. इ. स. ७४० त चालुक्यांनीं कांचःपुर घेऊन त्यांत प्रवेश केला. पण पूर्वीं सांगितल्याप्रमाणें याला पावित्र्य व विशिष्ट माहात्म्य प्राप्त झालेलें असल्यामुळें, त्यांत त्यांनीं लुटालूट न करतां, उलट पूर्वीं दुसऱ्यांनीं लुटून नेलेलें मंदिरांतील जवाहिर वगैरेची भरपाई करून वरती आणखीहि मूल्यवान देणग्या तेथील देवतांना दिल्या. पण तेव्हांपासून पल्लव घराण्याचा ऱ्हास झाला. नंदिपोतवर्म्यानें यापूर्वीं ५१ वर्षें राज्य केलें होते.

पूर्व पल्लवांप्रमाणेच उत्तर पल्लव देखील मोठे शिवोपासक असल्यामुळें त्यांनीं आपल्या देवतेसाठीं अनेक मंदिरे, लेणीं, इत्यादि बांधून ठेविलीं, व त्यांच्या करामतीविषयीं सर्व जग आज कौतुक करीत आहे. या बाबतींत त्यांनीं चालुक्यांवरहि ताण केली. या मंदिरांपैकीं, कांची येथील राजसिंहाने बांधिलेलें कैलासनाथाचें मंदिर फार प्रसिद्ध आहे. हा राजसिंह म्हणजे कोणाच्या मते पहिला नरसिंहवर्मा, तर कोणाच्या मतें दुसरा नरसिंहवर्मा असावा. पल्लवराजांची बिरुदावली म्हणजे पदव्यांची मालिका एवढी मोठी आहे कीं, त्या पदव्यांवरून राजा कोणता हें ओळखणें कठीणच आहे. हीं बिरुदें त्यांना त्यांच्या स्तुतिपाठकांनीं मनाला वाटली तशी दिलेलीं होतीं. वर सांगितलेल्या राजसिंहेश्वराच्या मंदिरांत 'अत्यन्तकान्त,' 'रणचंड' इत्यादि अनेक बिरुदें त्या राजाला लाविलेलीं आहेत. त्यांपैकीं त्यांना क्षत्रियवंशी ठरविणारें 'श्रीक्षत्रचूडामणि.' असेंहि एक आहे. मामल्लपुरच्या शिवमंदिरांत 'अतिरणचंड पल्लवेश्वर गृह' अशीं अक्षरें कोरलेलीं आहेत. कैलासनाथाच्या मंदिरांतहि एका कोरींव लेखांत पल्लवांची पूर्वपीठिका' १ ब्रह्मा, २ अंगिरा, ३ बृहस्पति, ४ शंयु, ५ भरद्वाज, ६ द्रोण, ७ अश्वत्थामा आणि ८ पल्लव अशीं दिली आहे. पल्लवाच्या वंशांत उग्रदंड नांवाचा पुरुष झाला व त्याने रणरसिकाचा ( हा बहुधा कोणी चालुक्य असावा ) पराभव केला. कांचीच्या कैलासनाथ मंदिरांतील कोरींव लेखांत ज्या उग्रदंड आणि लोकादित्याचा उल्लेख आला आहे ते डुब्रेलच्या मतें एकच असून पहिल्या परमेश्वरवर्मा पल्लवाचींच तीं नांवें होत; तसेच त्याच्या मते रण-रसिक म्हणजे पहिला विक्रमादित्य चालुक्य असावा. तसे असल्यास विक्रमादित्यानें प्रथम पल्लवांचा

पराभव केल्यावर उलट त्यालाहि कावेरीच्या तीरी कांची, सिंहलद्वीप व पांड्य ' या तीन राज्यांच्या संयुक्त सामर्थ्यापुढे इ. स. ६७४ त मान वांकवावी लागली असें निष्पन्न होतें. तसेंच राजसिंहेश्वर मंदिर बांधणारा राजसिंह म्हणजे इ. स. ७०० च्या सुमारास होऊन गेलेला दुसरा नरसिंहवर्माच ठरतो. मद्रास जवळ मामल्लपुर येथे ' सात पागोडा ' नांवाचे जे डोंगरांत कोरलेले देऊळ आहे तें, आणि महेंद्रवाडी आणि मामन्दुर येथील लेणीं हीं सर्व पहिल्या महेन्द्रवर्म्यापासून पुढील पल्लव राजांच्या आज्ञेवरून खोदण्यांत आलीं. मामल्लपुर* येथे तीन शिवाचीं व एक विष्णूचें अशीं मंदिरें आहेत. महेन्द्रवर्मा व त्याचा बाप हे दोघे कृष्णेच्या उत्तरेस तैलंग ऊर्फ आंध्र देशांत मूळ राज्य करीत होते, व तेथे अमरावतीस जशी मंदिरें व लेणीं तयार करण्यांत आली होतीं तशाच पद्धतीची मंदिरे वगैरे पुढे महेन्द्रवर्म्यानें कांची येथे आपली कारकीर्द सुरू झाल्यावर बांधण्याची सुरुवात केली, असे डुब्रेलचें मत आहे. म्हणजे त्याच्या मते ही खोदकामाची कला प्राचीन बौद्धकालीन असून मूळ ग्रीक लोकांपासून उचललेली आहे-

याप्रमाणें उत्तर पल्लव देवतांचीं मंदिरें बांधण्यांत फार प्रसिद्ध आहेत. त्यांतील राजसिंह ऊर्फ दुसरा नरसिंहवर्मा बरेच वर्षे गादीवर होता; ' पण त्याने शैव भिक्षुकांना मोठमोठ्या दक्षिणा देणें आणि शिव मंदिरें बांधणें याशिवाय कांहीं केलेलें दिसत नाहीं ' असे डुब्रेलने म्हटले आहे. सुप्रसिद्ध राजसिंहेश्वर ऊर्फ कैलासनाथ मंदिराखेरीज महाबलीपुर येथील समुद्रतीरावरील मंदिर आणि पनमलाई मंदिर हींहि त्यानेच बांधिली. कांची येथील ऐरावत मंदिरहि याच मालिकेत घातलें पाहिजे. हे पल्लव राजे विद्येचेहि चहाते होते. त्रावणकोर येथे एक मत्तविलास प्रहसन सांपडलें असून त्याचा लेखक पहिला महेन्द्रवर्मा हा आहे.या गोष्टीचे प्रत्यन्तर देखील मामदुरच्या लेण्यांतील शिलालेखांत मिळतें. त्यांत 'मत्तविळास' हें महेन्द्रवर्म्याचें एक बिरुद होतें. अनेक गोष्टींवरून महेन्द्रवर्म्याचें वैभव दिसून येतें. "त्यानें पल्लूर येथें चालुक्यांच्या स्वाऱ्यांचा चांगला बंदोबस्त केला; शैव मताला नवीन प्रोत्साहन दिले; त्याने

* हें नांव पहिल्या नरसिंहवर्म्याला जी महामल्ल अशी पदवी होती तीवरून या नगराला मिळालें.

काव्य व संगीत या विषयांना मोठा आश्रय दिला आणि स्वत: कांहीं गीतेंहि रचिलीं; कृष्णातीरावरील डोंगरांतील कोरींव लेण्यांसारखीं लेणीं तयार करण्याची अभिरुचि त्याने पालार आणि कावेरी यांच्या तीरावरील प्रदेशांत उत्पन्न केली; व मामन्दरांतील महेन्द्रवाडी येथे तसेच धलवमीर येथेहि तलाव बांधिले. याप्रमाणे महेन्द्रवर्म्यानें एके प्रकारे नवयुगालाच आरंभ केला व त्याची पूर्णावस्था त्याच्या पुत्राच्या म्हणजे पहिल्या नरसिंह वर्म्याच्या काळीं पहावयास मिळते." महेन्द्र वर्म्याच्या कारकीर्दीचें हें डुब्रेलनें केलेलें स्तोत्र अगदी योग्यच आहे. पुढे नरसिंहवर्म्याच्या वंशजांनी सुद्धां अशींच मंदिरे बांधिली. त्यांपैकीं राजसिंह ऊर्फ दुसरा नरसिंहवर्मा याचा उल्लेख वर केलाच आहे. त्याचा पुत्र परमेश्वरवर्मा पंडितांचा मोठा आश्रयदाता होता. परमेश्वर वर्म्याचा एक दानलेख त्याच्या विद्याभिरुचीचें प्रत्यंतर म्हणून व पल्लवकालीन सुंदर काव्याचा नमुना म्हणून पुढें परिशिष्टांत दिला आहे. त्यांत वरील गोष्टी शिवाय पल्लव आणि चालुक्य यांच्या विषयीं आणखीहि पुष्कळ ऐतिहासिक गोष्टी आढळून येतात; व त्यांवरून यूरोपांत इंग्लंड व फ्रान्स या देशांतील लोकांचा जो संबंध कांहीं शतकांपूर्वी होता, तोच संबंध पल्लव आणि चालुक्यांमध्ये या देशांत होता असें समजून येतें. पल्लवांनी संस्कृत विद्येलाच आश्रय दिला असून तामिल वाङ्मयाला त्यांचे कडून साह्य मिळाले नाहीं. पांडयराजांच्या अमदानींत प्रारंभीं मथुरा येथे तामिल वाङमयाचा उत्कर्ष झाला हें प्रसिद्धच आहे. पल्लवांची भाषा मध्यहिंदुस्थानांतील आर्यभाषा होती हें पूर्वीं दाखविलेंच आहे.

पल्लवकुलाचे सामाजिक सबंध देखील उत्तरेकडील आर्यक्षत्रियांशीं चालत असत. चालुक्यांच्या पहिल्या राजानें पल्लवराजकन्येचें पाणिग्रहण केल्याचें पूर्वी सांगिलेंच आहे. तसेंच बेल्लर येथील ताम्र लेखांत दंतवर्म्याची स्त्री कदम्बवंशांतील राजकन्या होती असें म्हटलें आहे.* दुसऱ्या एका दान लेखांत नंदिवर्मा यानें राष्ट्रकूट कुलांतील कन्येशीं विवाह केला असें सांगितलें आहे ( आसीत्संखाह्वया देवी तन्वङ्गी नन्दिवर्मण: । राष्ट्रकूटकुले जाता लक्ष्मीरिव मुरद्विष: ) या राणीचें नांव रेवा असून तिच्या पुत्राचें नांव

* प्रख्यातस्य कदम्ब वंशतिलकस्योर्वीपतेरात्मजा ( पुराण वस्तु संशोधन खात्याचा अहवाल भाग ५ वा.)

त्याच्या राष्ट्रकूट आजोबाच्या नांवावरून दंतिवर्मा ठेविलेलें होतें. पांड्य, चोल, केरल इत्यादि द्राविड कुळांशीं पल्लवांचे शरीर संबंध होत होते कीं नाहीं तें समजत नाहीं. पण झाले असतील तर त्यांत कांहीं आश्चर्य मानण्यासारखें नाहीं. महाराष्ट्रांतील आर्य क्षत्रिय कुलें सुद्धां नागवंशीय कन्यांशीं विवाह करीत. तेव्हांची कल्पना अशी होती कीं, क्षत्रियांनीं शूद्रापर्यंत वाटेल त्या जातीच्या स्त्रीशीं अनुलोम विवाह केला, तरी त्याची संतति क्षत्रिय जातीचीच रहावयाची या कल्पनेला अनुसरून महाराष्ट्रांतील क्षत्रियांप्रमाणें खालच्या दक्षिणेतील सोमवंशी आर्य क्षत्रियांनीं देखील नाग कुळांशीं मनमोकळेपणें शरीर संबंध करून मिश्र आर्य निर्माण केले असावेत असें दिसतें.

पल्लवांच्या दानलेखांत कोठेंहि शककालाचा मागमूस आढळत नाहीं. ते नेहमीं आपल्या स्वतःच्या कारकीर्दीच्या वर्षांचाच दानलेखांत निर्देश करीत व त्यामुळें त्यांचा काल-निर्णय करण्याचें काम निश्चितपणें होण्यास अडचण येते. शककालाचा संबंध त्यांच्या लेखांत न घेण्याचें कारण असें दिसते की, शककालाचा प्रचार करणारे ज्योतिष-सिद्धान्त ग्रंथ इ. स. ४०० च्या सुमारास निर्माण झाले; पण पल्लवांची परंपरा दक्षिणेंत त्याच्या फार पूर्वीपासून चालू होती. शककालाशीं कांहीं संबंध नसणाऱ्या सातवाहनांच्या काळापासुन खालीं दक्षिणेंत पल्लवांची वसाहत होती. चालुक्यांच्या पूर्वीच त्यांनी आपलें राज्य दक्षिणेंत स्थापिलें होतें; अर्थात् त्यांना शककालाचा उपयोग करण्याचें प्रयोजनच नव्हतें.

आतां शेवटीं पल्लवांच्या तिसऱ्या म्हणजे शेवटच्या राजमालिकेचा थोडासा वृत्तान्त देऊन हें प्रकरण पुरें करूं. या मालिकेंत चार राजे येत असून डुब्रेलनें त्यांना कालानुक्रम पुढील प्रमाणें ठरविला आहेः--

( १ ) नंदिवर्मा पल्लवमल्ल इ. सन ७१७-७७९. ( २ ) दंतिवर्मा इ. सन ७७९-७८०. (३) तेल्लरूचा नंदिवर्मा इ. सन ८३०-८६४. (४) नृपतुंग इ. स. ८६४-८८०. * अपराजित.

---

* कांहीं विद्वानांच्या मतें नृपतुंगाचेंच अपराजित असें दुसरें नांव होतें; व तें त्यानें पांड्यांचा पराभव करून प्राप्त करून घेतलें होतें. नांव कोणाचेंहि असलें तरी त्याच्या काळांत पल्लव कुल नामशेष झालें असल्यामुळें त्यांत सार्थकता मुळींच दिसून येत नाहीं.

यांपैकीं पहिल्या नंदिवर्म्याचा दुसऱ्या विक्रमादित्य चालुक्यानें इ. स. ७४५ त पाडाव केला हें पूर्वी सांगितलेंच आहे. पण पुढें चालुक्यांनाच मालखेडच्या राष्ट्रकूटांपुढें हार खावी लागल्यामुळें तेव्हांपासून पल्लव देखील राष्ट्रकूटांचेच अंकित झाले. इ. स. ८०३ त दंतिवर्म्याचा राष्ट्रकूटांनीं पराभव केला असें लिहिलेले आढळतें. नृपतुंगानंतर अपराजिताच्या कारकीर्दीत स. ९०० च्या सुमारास चोलांच्या आदित्य राजांनीं पल्लव कुलाचा उच्छेद केला; व तेव्हांपासून पल्लवांचें नांव इतिहासांत ऐकू येईनासें झालें. हे चारी राजे अर्थात् कांचीसच राज्य करीत असले पाहिजेत. त्या सगळ्यांचे अनेक दानलेख उपलब्ध आहेत. हे पल्लव राजे डुब्रेल व गोपिनाथराव यांच्यामतें गंगपल्लव नसावेत. कारण गंग हे म्हैसूरकडील कन्नड जातीचे अगदीं भिन्न राजे असून त्यांचा पल्लवांशीं कांहीं संबंध नाही. वर सांगितलेल्या शेवटच्या चार पल्लव राजांपैकीं दुसऱ्या नंदिवर्म्यानें तेल्लरू येथें पांड्यांचा पाडाव केल्यामुळें त्याला डुब्रेलनें तेल्लरूचा नंदिवर्मा म्हटलें आहे. पांड्यांनीं कावेरी तीरावरील पल्लवांच्या मुलखांत स्वारी केल्यामुळें त्यांच्याशीं नंदिवर्म्याचा हा संग्राम झाला होता. नृपतुंगाच्या दानलेखांवरून त्याचा अंमल तंजावर व त्रिचनापल्ली यांवरहि होता असे दिसतें; व येथेंच चोलांनीं त्याचा पाडाव करून आपले वर्चस्व स्थापन केलें. प्रस्तुत इतिहासाच्या तृतीय भागांत या चोलांचें वर्णन येणार आहे.

पडुकोटा संस्थानचे प्रस्तुतचे महाराज आपल्याला पल्लवांचे वंशज म्हणवितात, व त्याला आधारहि असेल, पण एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं चोलांचें वर्चस्व स्थापन झाल्यापासून पल्लवांचा उत्तरेकडील राजकुलांशीं संबंध बंद पडूं लागला. हे प्रसंग हिंदुस्थानच्या इतिहासाच्या उत्तर कालांतील असून त्यावेळीं बेटीव्यवहाराचे क्षेत्र सर्व देशांत अगदीं आकुंचित झालें हें पुढें आम्हीं दाखविणारच आहों; व त्यामुळें पल्लव म्हणा कीं पडुकोटाचे राजे म्हणा आतां सर्वस्वी द्राविडच झाले आहेत.

# टीपण्या.

## १–कुरम येथील पल्लवांचें दानपत्र.

## ( हुल्शकृत दक्षिणहिंदुस्थानांतील प्राचीन लेखसंग्रह पु. १ पा. १४८–१५० ).

स्वस्ति । पञ्चास्यस्त्रिशदर्द्धः प्रतिभयनयनश्चन्द्रमौलि स्त्रिशूली । भीमव्यालोपवीती दशभुजपरिघस्तत्वमात्रात्ममूर्तिः । दिव्यावेक्ष्यो मुकुन्द-प्रभृतिभिरमरैः सृष्टिकृन्मंत्रसिद्धः ॥ कर्ता नो मूर्तविद्या विहितपरयमस्त्रा-यतां विश्वमूर्तिः ॥ कार्यं व्यूह कलाक्रमस्थ परम व्योमामृत ज्योतिषो । त्रिद्वन्मानसचन्द्रकान्तपतिता मूर्च्छन्ति यस्यांशवः । भूतानां हृदयेषु चानयति यःशक्ति क्रियासाधनीं । त्रैय्यात्मा परमेश्वरः स जयति त्रैलोक्य चूडामणिः ॥ अब्रह्मण्यमसोमयागमयथाप्रस्थानदंडोद्यमम् । मिथ्यादान्त-मदानशूरमनृतव्याहारजिह्माननम् । जातं यत्र नरेश्वरं न शृणुमो युद्धेषु वा विक्लवं निर्विघ्नं पृथिवीन्निरीतमवतात्तत्पल्लवानां कुलम् ॥ ब्रह्मणोऽङ्गिरास्ततो बृहस्पतिस्तस्माद्भरद्वाजस्ततो द्रोणः । द्रोणादपरमित तेजोधामाश्वत्थामा । ततो निराकृतापल्लवः पल्लवः यतः सकल भुवन वल्लभपल्लवकुलम् । स्थेयात्पल्लवकुलं यत्र जातं नरेश्वरम् । अब्रम्हण्यमदातारमशूरं नानुशुश्रुम । तदुद्य धरणि-धर सोमादित्यस्याविनत मुख नृपतिमूर्द्धि चजोशने प्रतियन्ति राजगज यूथ सिंहस्य नृसिंहवर्मणः....मुहुरवजित चोळ केरल कलभ्र पाण्ड्यस्य सहस्र-बाहोरिव समरशत निर्विष्ट सहस्र बाहु कर्मणः परिमल मणिमंगळ शूरमार प्रभृति रणविदति पुलकेशि पृष्ठपद लिखित विजयाक्षरस्य कलशयोनेरिव विमथितवातापेः पौत्रो महेन्द्रस्य सुरचित सम्पदो महेश्वरवर्मणः सुप्रणी-तवर्णाश्रमधर्मस्य पुत्रः परमेश्वर इव सर्वाधिक दर्शनः परमेश्वरवर्मा भरत इव सर्वदमनः सगर इव कृतासमञ्जसत्यागः कर्ण इव पुष्कलाङ्गोयः प्रियकाव्यो ययातिरिव अनुनमतानां राज्ञां यस्याज्ञा भवति सर्वदा पीडा... ...(यापुढे एका तुंबल युद्धाचें खरोखरीचें पण काव्यमय वर्णन आहे)...... ...... विक्रमादित्यं कप्पटमात्र परिच्छदं एकाकि पलायितं...... तेन

परमेश्वरेण नाम मन्यवान्तरराष्ट्रे अष्टशत चतुर्वेद कुलसमृद्ध कूरग्रामनाम-मध्ये विद्याविनीत पल्लव परमेश्वरगृहे प्रतिष्ठापितस्य भगवतःपिनाकपाणेः पूज्यास्तवन कुसुम गन्ध धूप दीप हविरुपहार बलि शंख पटहादि प्रवर्तनार्थं अत्रैव उदकमग्नि भारतमाख्यानमणिकोट्टमध्ये पत्यानाम मन्यवान्तर राष्ट्रे । इत्यादि.

चालुक्यांच्या लेखांत विक्रमादित्यानें पल्लवांचा पराभव केला असें म्हटलें असतें, व या पल्लवांच्या लेखांत तर त्याला एकट्याला लंगोटी लावून रणांतून पळून जावें लागलें असें म्हटलें आहे. तथापि या दोन्हीहि गोष्टी खऱ्या असण्याचा संभव आहे.समबलांच्या युद्धांत जयापजयाचा क्रम अनेकदां पालटत असतो, व त्यामुळें विक्रमादित्यावर तसा एकदां प्रसंग आला असून पुनः त्यानें उलट फिरून पल्लवांचा पाडाव केला असेल. या लेखांतील आणखी महत्वाची गोष्ट म्हणजे परमेश्वरवर्म्याला त्यांत काव्याचा शोकी म्हटलें आहे ही होय. तसंच प्रान्तवाचक राष्ट्र शब्दहि त्यांत आलेला असल्यामुळें त्यावरून पल्लव महाराष्ट्रांतूनच दक्षिणेंत येऊन राहिले होते असें दिसून येते. या गोष्टीचा पुढें आणखी विचार करावयाचा आहे.

## २—नाशिकच्या लेण्यांतील कांहीं प्राकृत लेख.

### १ ( एपिग्रॅफिका इंडिका पु. ८. लेखांक २२ पा. ९३ )

सादवाहन कुले कन्हे राजिनि नासिककेन समणेन महामातेन लेण-कारित । ( मराठी अर्थः—सातवाहन कुलांतील कृष्ण राजाच्या कारकीर्दींत नाशिक येथील समणांच्या अधिकाऱ्यानें हें लेणें तयार करविलें. )

### २ ( सदर पुस्तक लेखांक २४ पा. ९४ )

सिधं राओ गोतमीपुतस सामिसिरीयण सातकणिस संवछरे सातमे हेमताण पखे ततीय ३ दिवसे पथमे कोसिकस महासेणापतिस भवगोपस भविजाय महासेणापतिणीय वासुयलेण बोपकि यति सुजमान अपयवसित समाने बहुकाणि वरिसाणि उक्कटे पयवसान नितो चातु दिस भिखुसंघस आवास दतो ति। ( मराठी अर्थः—सिद्धि असो. गोतमीपुत्र स्वामीश्री

शातकर्णी राजाच्या कारकीर्दीच्या सातव्या वर्षी हेमन्त ऋतूच्या तिसऱ्या पक्षांत तृतीया तिथीला कौशिक गोत्रांतील महासेनापति जो भवगोष त्याची पत्नी महासेनापतिनी महापतिनी वासु हिनें, धोपकि नांवाच्या जतीनें पुष्कळ वर्षे अर्धवट तयार केलेलें, हें लेणें, पुरें करवून चारी दिशांच्या भिक्षुसंघाला रहावयासाठीं दिलें आहे. )

## ३ ( सदर. लेखांक २९ पान ७३ )

सिध । गोवधने आमचस सामकस देये राजाणितो रओ गोतमीपुतस सातकणिस महादेवीयच जीवसुताय राजमातुय वचनेन गोवधने...च सामको अरोगवतवो ततो एवच वतवो एथ अम्हेहि पवते तिरण्हुम्हि अम्हदानें लेणे एतिवसातण पवजितान भिखून गामे कखडिसु पुवखेतं दत तच खेत...कसते सोच गामो न वसति एवंसातिय दानि एथ नगर सीमे राजकं खेत अम्हसतकं ततो एतेस पवजितान भिखूनं तेरन्हुकानं ददम खेतस निवतनसतं तसच रतेस परिहार वितराम अगावेस अनोमस अलोण-खादस अरठसविनयिक सवजातपरिहारिकच एवेहि न परिहारेहि परिहारेठ एवचस खेतपरिहारेच एथ निबधापेथ अवियेन आणत परिहारखिय लोटाय छतो लेखो सवछरे २४ वासान पख ४ दिवस पचमे ५ सुजीविना कटा-निबधो निबधो सवघरे २४ गिम्हाण पखे२ दिवसे १०

( मराठी अर्थ:—सिद्धि असो. गोवर्धनचा अमात्य सामक याला गोतमीपुत्र शातकर्णी राजाची तशीच पुत्रवती राजमाता महाराणी हिची यांची आज्ञा द्यावयाची कीं, सामकाला सरळपणे आज्ञा कळवून सांगावयाचे कीं, ' आम्ही या तिन्रहु पर्वतावर पूर्वी लेण्यांत रहाणाऱ्या भिक्षूंना कखडि गांवांतील शेत दान दिलें होतें. पण तें शेत आतां नांगरीत नाहींत व गांवांतहि वसति नाहीं. असें असल्यामुळें येथें आमच्या नगराच्या सीमेवर असलेल्या शेतापैकीं शंभर निवर्तनें जमीन तिरन्हु येथील भिक्षूंना देतों; व त्याबरोबर त्यांत कोणी अधिकाऱ्यानें कोणत्याहि कारणानें प्रवेश करूं नये, मिठासाठीं त्यांत खणूं नये इत्यादि सर्व प्रकारचे निर्बंध घालितो. हे सर्व निर्बंध व शेताचें दान बरोबर नोंदून ठेवावीं. ही आज्ञा तोंडीं दिली.

लेख लोटानें लिहिला. दानपत्र सुजीविन् यानें खोदविलें. वर्ष २४, वर्षाऋतूचा चौथा पक्ष पंचमीतिथि दशमी. )

### ४ ( सदर. लेखांक १२ चा आरंभ; पा. ८२ )

सिधं। वसे ४२ वेसाख मासे रायो क्षहरातस क्षत्रपस नहपानस जामातेन दीनीक पुत्तेन उषवदातेन संघस चातुदिसस इमं लेणं।

( अर्थः--४२ व्या वर्षी वैशाख महिन्यांत क्षहरात क्षत्रप नहपानाचा जांवई जो दीनीक त्याचा पुत्र उषवदात यानें हें लेणें चारी दिशांच्या संघाकरितां दिलें असे ).

## ३-विजयादित्य चालुक्याचें पलायन.

बादामीच्या चालुक्याचें घराणें, दुसऱ्या विक्रमादित्याचा पुत्र जो दुसरा कीर्तिवर्मा त्याच्या बरोबर लयास गेलें असे कांहीं दिसत नाहीं. कीर्तिवर्म्याचा वखलेरी येथील जो दानलेख उपलब्ध झाला आहे, त्यांत या कुलाविषयीं सविस्तर व महत्वाची माहिती आढळते. तो शके ६७९ त कीर्तिवर्म्याच्या कारकीर्दीच्या ११ व्या वर्षी कोरलेला असून ८ ( इंडियन ॲंटिक्करी पु. ८ पा. २३ ) त्यावरून बादामीचें राज्य त्यावेळीं वर्तमान होतें किंबहुना विस्तीर्ण प्रदेशावर पसरलें होते असें दिसून येतें. तो शके ६६८ त म्हणजे स. ७४६ त राज्यारूढ झाला. अर्थात् त्या वर्षी दुसऱ्या विक्रमादित्याची कारकीर्द संपली. या गोष्टीचा विचार करतां असें निश्चित म्हणावयास हरकत नाहीं कीं राष्ट्रकूटांनीं ज्या चालुक्याला पादाक्रान्त केलें तो दुसरा विक्रमादित्य नसून त्याचा पुत्र दुसरा कीर्तिवर्मा हा होय. विक्रमादित्य मोठा शूर व प्रतापी असल्यामुळें त्याजवर असला प्रसंग ओढवला असेल असें संभवत नाहीं. उपरिनिर्दिष्ट दानलेख विश्वसनीय नाहीं असें मानावयास कांहींच आधार नाहीं; व तो विश्वसनीय समजून विचारांत घेतल्यास त्यावरून बादामीच्या चालुक्य घराण्याचा सविस्तर व सुसंगत वृत्तान्त आपल्याला मिळण्यासारखा आहे. चालुक्यांच्या सर्व साधारण रीतीप्रमाणें याहि दानलेखाला 'मानव्यसगोत्राणां' इत्यादि शब्दांनीं आरंभ झालेला असून त्यांत पृथ्वीवल्लभ पहिला पुलकेशी याचें नांव सांगून त्यानें केलेल्या अश्वमेधाबद्दल त्याची मोठी स्तुति गाइली

आहे. पुढें त्याचा पुत्र जो पहिला कीर्तिवर्मा त्याचा निर्देश करून त्यानें बनवासीचें राज्य जिंकलें असे म्हटलें आहे. त्याचा पुत्र दुसरा पुलकेशी. त्यानें कनोजच्या हर्षवर्धनाचा पराभव करून मोठी कीर्ति व परमेश्वर ही पदवी प्राप्त करून घेतली. पुलकेशीचा पुत्र पहिला विक्रमादित्य यानें आपल्या चित्रकंठनामक अश्वावर आरूढ होऊन चेर, केरल, पांड्य व कलभ्र राजांना जिंकिले आणि ज्यांनीं तों पावेतों कोणापुढेंहि मान वांकविली नव्हती त्या पल्लवांनाहि त्यानें पादाक्रान्त करून आपल्या नांवाला भट्टारक असें पद जोडण्याचा अधिकार मिळविला. त्याचा पुत्र पहिला विनयादित्य यानें तर युवराज पदावर असतांच कुबेर, पारसीक व सिंहलद्वीप हीं जिंकून आपल्या अधिराज्याखालीं आणिलीं आणि उत्तर देशाधिपतीचाहि पराभव करून **पालिध्वजादि** चक्रवर्ति चिन्हें प्राप्त करून घेतलीं. त्याच्या मागून विजयादित्य आला. त्यानें आपल्या पितामहाच्या अमदानींतहि दक्षिणेतील राजांचा पराजय करून उत्तर देशाधिपतींशीं लढतांना आपल्या पित्याला साह्य केलें होते, आणि त्याला गंगायमुना, पालिध्वज, पटह, ढक्का, माणिक्य व मतंगज हीं साम्राज्य चिन्हे प्राप्त करून दिलीं. विजयादित्याचा कारकीर्दींतील एका मौजेच्या प्रसंगाचेहि या लेखांत वर्णन केलें आहे. या वर्णनांतील शब्दांचे बरोवर भाषान्तर न झाल्यामुळें यांतील महत्व नीट लक्षांत आलेलें दिसत नाहीं. ते शब्द असे आहेत: " परैःपलायमानैरासाद्य कथमपि विधिवशात्प्रतापादेव विषयप्रकोपं अराजकमुत्सारयन् वत्सराज इवानपेक्षितपरसहायकस्त...ग्रहान्निर्गत्य स्वभुजावष्टम्भ परसाधिताशेष विश्वंभरः " । यावरून एवढें स्पष्ट दिसतें कीं शत्रु दाणादाण होऊन पळत असतांना विजयादित्य हा चुकून दुर्दैवानें त्यांच्या हातीं लागून बंदींत पडला. पण पूर्वी उज्जनीहून वत्सराज जसा आपल्या अमात्याच्या युक्तीमुळे निसटून गेल्याचे कथासरित्सागरांत सांगितलें आहे, त्याप्रमाणें विजयादित्यानें युक्तीनें शत्रूच्या बंदिवासांतून आपली सुटका करून घेतली, आणि अराजक स्थितीमुळें त्रस्त झालेल्या आपल्या राज्यावरील संकटाचा परिहार केला. या संबंधांत दुःखाची गोष्ट एवढीच आहे कीं, कथासरित्सागरांत वत्सराजाच्या सुटकेचे किंवा काश्मीरच्या जया-

पीडाच्या नेपाळांतून झालेल्या सुटकेचे राजतरंगणींत जसें सविस्तर वर्णन आहे तसें विजयादित्याच्या या सुटकेचें वर्णन कोठे आढळत नाहीं. त्याला कोणी, केव्हां व कसें बंदिवान केलें हे जसें समजत नाही तसें त्यानें आपली सुटका कशी करून घेतली हेंहि कळत नाहीं. काश्मीरच्या ललितादित्यानें दक्षिणेंत स्वारी केली, तेव्हां म्हणजे इ. स. ७००–७१० च्या सुमारास हा प्रकार घडला असावा, असा आमचा तर्क आम्हीं पूर्वी सांगितलाच आहे. असो, प्रस्तुत दानलेखांत शेवटीं या विजयादित्याचा पुत्र जो द्वितीय विक्रमादित्य त्याच्या प्रतापाचा उल्लेख करून, त्यानें पल्लवांशीं असलेलें कुलपरंपरागत वैर साधण्यासाठीं कांचीपुर जिंकण्याचा आटोकाट प्रयत्न केला, त्यांच्या नंदिपोतवर्मानांवाच्या राजाला पादाक्रांत केलें, कांची नगरींत प्रवेश केला, तेथील ब्राह्मणांना देणग्या देऊन प्रसन्न करून घेतलें, राजसिंहेश्वराच्या मूर्तीपुढें सुवर्णाच्या राशी ओतल्या, पांड्य-चोल-केरल-कलभ्र या दक्षिणेंतील राजांना जिंकून आणि आणखीहि पलीकडे जाऊन कन्याकुमारीजवळ समुद्रतीरावर आपला जयस्तंभ उभारिला, इत्यादि गोष्टी सांगितल्या आहेत. यानंतर त्याचा पुत्र म्हणजे प्रस्तुत दानलेख लिहून देणारा जो कीर्तिवर्मा त्याची हकीगत असून त्याच्या पराक्रमाचे वर्णन करतांना त्यानें आपला कुलशत्रु जो कांचीचा पल्लव राजा त्यावर स्वारी केल्याचें सांगितले आहे. कांचीराजाला त्याच्यापुढे भरमैदानांत टिकाव धरण्याचे सामर्थ्य नसल्यामुळे त्यानें किल्ल्याचा आश्रय केला व त्यामुळे कीर्तिवर्म्यानें कांचींत प्रवेश करून तेथून पुष्कळ हत्ती, जवाहीर वगैरे लुटून नेलीं. त्यानें भीमरथीच्या ( भीमेच्या ) तीरीं मुक्काम असतांना पन्नगल विषयांतील ( हा प्रांत कोणता तें समजत नाहीं ) एका विद्वान ब्राह्मणाला एका गांवाचें दान केलें. त्या विषयींचा प्रस्तुत लेख आहे. पूर्व चालुक्यांच्या सर्व राजांच्या कारकीर्दीतील प्रमुख गोष्टींचा त्यांत निर्देश असल्यामुळे तो फार महत्वाचा आहे हें सांगावयास नकोच. या लेखानंतरचे दुसरे लेख उपलब्ध झालेले नसल्यामुळें बहुधा कीर्तिवर्म्याबरोबर पूर्व चालुक्यांचा भर संपला

---

* हें मंदिर नरसिंहपोतवर्म्यानें बांधिलें होतें.

असावा असें दिसतें. पण तें घराणें यावेळीं अगदीं नामशेष झालें नसून दोनशे वर्षांनंतर पुनः त्याचा जीर्णोद्धार झाला व उत्तर चालुक्यांच्या रूपाने तें पुनः भरभराटीस आलें.

## ४-शिवस्कन्दवर्मा नामक पल्लव राजाचा मयिदवोल्लू येथील दानलेख.

### ( एपिग्रॅफिका इंडिका पु. ६ पान ८६ प्राकृत लेख ).

[ कां ] चीपुरातो युवमहाराजो भारदाय सगोत्तो पलवानं शिवखंड-वम्मो धंनकडे वापतं आनपयति अम्हेहि दानी अम्हवेजयिके [ धं ] मायु-बलवधनिके य बह्मनानं अगिवेस सगोत्तस पुवकोटुजस अगिवेससगोत्तस गोनंदिजस अंधापति [ थि ] यगामो विरिपरं अम्हेहि उदकादि संपदतो एतस गामस विरिपरस सव ब्रह्मदेय परि(हा)रो वितराम अलोन [खा] दकं अरटसं ( वि ) नायिकं अपरंपरा बलिव ( दं ) अभडपपेसं अकूर चोलक विनासि खतासंवासं एतेहि अनेहिच सब ब्रह्मदेय मजादाय सवपरि-हारेहि परिहारितो परिहरथ परिहारापेथ च जो अह्मसासनं अतिछितून पीला बाधकरेज्जा [ वात ] कारापेज्जा वा तस अम्हो सारीरंसासनं करेजामो सवछरं दसमं १० गिम्हा पखो छठो ६ दिवसं पंचमी ५ आनति सयत्ति दत्ता पट्टिका.

# प्रकरण १२ वें.

## वेंगी व कलिंग येथील प्राच्य-चालुक्य-वंश.

( प्राच्य-चालुक्य राजांचीं पुष्कळ दानपत्रें व कोरींव लेख उपलब्ध असून दुसऱ्या ग्रंथावरूनहि त्यांच्याविषयीं माहिती मिळते. त्या सर्वांचा उपयोग करून पुढील वृत्तान्त लिहिला आहे. )

दुसऱ्या पुलकेशीच्या वेळीं बादामीच्या चालुक्यांचें साम्राज्य सर्व दक्षिण देशावर पसरलें होतें. त्यांनीं दिग्विजय करून पूर्वेकडील आंध्रांचें राज्य. दक्षिणेकडील पल्लवांचें राज्य, पश्चिमेकडील गुर्जर राज्य आणि उत्तरेकडील कोसलादि राज्यें जिंकलीं. या सुमारास चालुक्य घराण्याच्या दोन उप-शाखा फुटून एक पूर्वेकडे व दुसरी पश्चिमेकडे अशा नांदूं लागल्या. त्यांचे अधिपति पुलकेशीचे दोन बंधु असून मुख्य घराण्याचे अंकित म्हणून त्यांची पूर्वकिनाऱ्यावर वेंगी आणि गुजराथेंत नवसारी येथें पुलकेशीनें स्थापना केली. वेंगीचा पहिला चालुक्य राजा कुब्ज विष्णुवर्धन नांवाचा असून पल्लवांपासून वेंगी जिंकून घेतल्यावर तो तेथें राज्य करूं लागला. ही गोष्ट कांहीं विद्वानांच्या मतें इ. स. ६०५ झाली; पण दुसरे कांहीं पंडित ती इ. स. ६१५ त झाली असावी असें म्हणतात. एस्. कृष्ण-स्वामी अय्यंगार यांनीं हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासावर एक पुस्तक लिहिलें असून त्यांत त्यांनीं म्हटलें आहे "पल्लव सेनापतींनीं चालुक्यांच्या राजधानीवर चाल करून तिची इतकी धूळधाण केली कीं तेथें १३ वर्षेपर्यंत कोणी राजाच नाहींसा झाला. तेव्हां पल्लवांच्या सर-हद्दीवर शांतता राखावी या हेतूनें पुलकेशीनें वेंगी येथें आपल्या एका ठाण्याची स्थापना करून त्यावर आपल्या एका बंधूची योजना केली, व तोच बंधु वेंगी घराण्याचा स्थापक होय." पण एस्. कृष्णस्वामीचें हें म्हणणें चुकीचें दिसतें. कारण वेंगी येथें चालुक्यांची स्थापना उशीरां उशीरां म्हणजे निदान इ.स. ६१५ त झालेली असून पल्लवांनीं वातापीचा विध्वस इ.स.६ ४३

त केला. वेंगीचे संस्थान पल्लवांच्या बंदोबस्तासाठीं स्थापिलेलें नसून त्यांना जिंकल्यावर पुळकेशीनें स्वाभाविक भ्रातृप्रेमामुळें अथवा कांहीं राजकीय धोरणामुळें तें आपल्या बंधूच्या ताब्यांत देऊन एके प्रकारें त्यास वाटेस लाविण्यासाठीं स्थापिले होतें. दुसऱ्या बंधूची अशीच त्यानें गुजराथेंत ऊर्फ लाट देशांत नवसारी तेथें स्थापना केली. यांपैकीं वेंगीच्या राज्यावर बसविलेला कुब्ज विष्णुवर्धन विशेष भाग्यशाली दिसतो. कारण त्याचा वंश तेथें मूळ घराण्याहूनहि अधिक काळपर्यंत टिकून राहिला. वेंगीचे चालुक्य घराणे ७ व्या शतकाच्या आरंभापासून ११ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत म्हणजे सुमारें ५०० वर्षे येथे नांदत असून तेव्हां ते चोल घराण्यांत अन्तर्भाव पावले, कारण या चोल घराण्याचा संस्थापक या चालुक्यांच्या शेवटच्या राजाचा मुलीचा मुलगाच होता.

वेंगीच्या या प्राच्य चालुक्यांचे अनेक ताम्रपटावरील दानलेख व इतर कोरींव लेख उपलब्ध आहेत, व त्यांत बहुतेक ठिकाणीं सर्व राजांची नामावली त्यांच्या कारकीर्दीच्या वर्षांसह दिलेली आहे. त्यामुळें या वंशांतील राजांचीं नांवे व त्यांचे काल बऱ्याच निश्चित रीतीने जुळवितां येण्यासारखीं आहेत, व तशीं तीं 'दक्षिण हिंदुस्थानांतील प्राचीन लेख संग्रहा'च्या पहिल्या भागांत जुळवून दिलींहि आहेत ( हुल्शकृत द. हि. लेखसंग्रह ). त्यांत वाद काय तो पहिल्या राजाच्या म्हणजे कुब्ज विष्णुवर्धनाच्या कारकीर्दीच्या आरंभासंबंधाने आहे. हुल्शच्या मतें तो काल सन ६०५ हा असावा, व डॉ. फ्लीटच्या मतें स. ६१५ असावा. परंतु आम्हाला पहिलाच काल ग्राह्य दिसतो. स्मिथकृत ताम्रपटलेखांच्या पहिल्या भागांत या प्राच्य चालुक्यांचे पांच दानलेख आलेले आहेत. त्यांतील प्राचीन लेखांत पहिल्या पुळके-शीच्या पूर्वीचा चालुक्यवंशाचा इतिहास किंवा तत्संबंधीं कांहीं दंतकथा दिलेली नाही. पण त्यांतल्यात्यांत अर्वाचीन असा जो त्यांपैकीं पांचवा लेख त्यांत आणि विमलादित्याच्या रणस्तिपुंदि येथील दानलेखांत चालुक्यांच्या मूळपीठिकेची एक नवीन दंतकथा दिलेली आहे. ती कथा अर्थात् त्या वेळीं प्रचलित होती, व तिचा तात्पर्यार्थ आम्हीं पूर्वी दिलाच आहे. या दोन्ही लेखांत राजांच्या कारकीर्दीच्या वर्षांसह त्यांची नामावली सांगि-

तली आहे; तसेंच त्यांत आणखी शेवटच्या दोन राजांच्या राज्यभिषेकाचे कालहि शक वर्षांनीं सांगितले आहेत. अशा रीतीनें एकदां एक शेवटच्या टोंकाचा निश्चित काल समजल्यावर तेथपासून मागें मोजीत गेल्यास कुब्जविष्णुवर्धनाच्या कालांशीं आपल्याला जातां येईल; कारण प्रत्येक राजाच्या कारकीर्दीचीं वर्षे त्यांत दिलेलीं आहेतच. त्यांत अडचण एवढीच आहे कीं, या सर्व राजांचा मिळून काळ ५०० वर्षांचा होत असल्यामुळे एवढ्या दीर्घ काळाविषयीं अगदीं ठाम निश्चय करणें कठीण आहे. प्राचीन काळीं हिंदुस्थानांतील प्रत्येक राजघराण्यांत कुलाचा वंशवृक्ष फार जपून ठेविलेला असे; व काश्मीर आणि वेंगीयेथील राजघराण्यांत तर ते चांगलेच ठेविलेले दिसतात ही गोष्ट खरी. तथापि वेंगीच्या राज्यांत एकदां २७ वर्षांचा अराजकतेचा काल होऊन गेलेला असल्यामुळे त्यांतही संशयाला जागा राहिली आहे.

सदरील दोन लेखांत दिलेली राजनामावली खालीं लिहिल्या प्रमाणें आहे:—

| | राजनाम. | मागील राजाशीं नातें. | कारकीर्दीचा काल | |
|---|---|---|---|---|
| १ | कुब्ज विष्णुवर्धन | संस्थापक | १८ | वर्षे. |
| २ | जयसिंह वल्लभ | पुत्र | ३३ | वर्षे. |
| ३ | इंद्रराज | बंधु | ७ | दिवस |
| ४ | दुसरा विष्णुवर्धन | पुत्र | ९ | वर्षे |
| ५ | मंगि युवराज | पुत्र | २५ | वर्षे |
| ६ | जयसिंह | पुत्र | १३ | वर्षे |
| ७ | कोक्किलि | बंधु | ६ | महिने |
| | ( याला वडील बंधूनें पदच्युत केलें ) | | | |
| ८ | विष्णुवर्धन ( तिसरा ) | बंधु | ३७ | वर्षे |
| ९ | विजयादित्य | पुत्र | १८ | वर्षे |
| १० | चवथा विष्णुवर्धन | पुत्र | ३६ | वर्षे |
| ११ | विजयादित्य नरेन्द्र मृगराज | पुत्र | ४८ | वर्षे |

हा प्रसिद्ध राजा असून त्याचा एक दानलेख उपलब्ध आहे.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १२ | कलिविष्णुवर्धन (पांचवा) | पुत्र | १ ॰ | वर्षे |
| १३ | गुणक विजयादित्य | पुत्र | ४४ | वर्षे |
| १४ | चालुक्य भीम | पुतण्या | ३० | वर्षे |
| १५ | कल्लभि गंड विजयादित्य | पुत्र | ६ | महिने |
| १६ | अम्मराज | पुत्र | ७ | वर्षे |

याच्या अल्पवयीं पुत्राला बाजूला सारून राज्य बळकाविलेला दूरचा कोणी संबंधी

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १७ | ताडप | हा पदच्युत झाला. | १ | महिना |
| १८ | विक्रमादित्य | १४ व्या भीम राजाचा पुत्र | ११ | महिने |
| १९ | युद्धमल्ल | (१७ व्या) ताडपाचा पुत्र | ७ | वर्षे |

यालाहि पुढच्या राजानें पदच्युत केलें.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २० | भीम | (१६) अम्म राजाचा बंधु | १२ | वर्षे |
| २१ | दुसरा अम्मराज | पुत्र | २५ | वर्षे |
| २२ | धन नृप | सापत्न बंधु | ३ | वर्षे |

## यापुढें २७ वर्षांचा अराजकतेचा काल.

धननृपापासून या वंशाला खंड पडला. त्यानंतरचा राजा जो शक्तिवर्मा ते धनार्णवाचा पुत्र असें म्हटलेले आहे. हा धनार्णव म्हणजे धननृप हा वरील नामावलींतील शेवटचा राजाच असावा. शक्तिवर्म्यापासून पुनः जो क्रम सुरू झाला तो असाः--

| | | | |
|---|---|---|---|
| २३ | शक्तिवर्मा | धननृपाचा पुत्र | १२ वर्षे |
| २४ | विमलादित्य | बंधु | ७ वर्षे |
| २५ | राजराज | पुत्र | ४१ वर्षे |

हा सोमवंशीय असल्यामुळें सूर्यवंशीय राजेन्द्र चोडाच्या अम्हंगा नामक कन्येशीं यानें विवाह केला.

| | | |
|---|---|---|
| २६ | राजेन्द्र चोह | पुत्र |

राजेन्द्र हा शेवटचा राजा प्रथम वेंगीच्या सिंहासनावर बसला, व मागाहून केरल, पांडय, कुंतल इत्यादि राज्यें जिंकून सर्व दक्षिणापथाचा

चक्रवर्ती झाला. तेव्हां त्याला चोलांच्या राज्याचा अधिपति म्हणून अभिषेक झाला. त्यानें सूर्यवंशीय चोल कुलांतील मधुरान्तकी नामक राज्यकन्येशीं विवाह केला, व तिच्यापासून त्याला अनेक पुत्र झाले. या पुढील जी हकीगत वर सांगितलेल्या दानलेखांत दिली आहे, ती थोडी संदिग्ध वाटते. कारण तींत चोल व वेंगी या राज्यांची फार भेसळ केलेली आहे. शेवटच्या वीर चोल राजाला शके १००१ या वर्षी सिंह संक्रान्त असतांना शुक्लपक्षाच्या त्रयोदशीला वृश्चिक लग्नीं श्रवण नक्षत्रावर गुरुवारीं राज्याभिषेक झाला असे म्हटलें आहे. हा दानलेख चेल्लूरचा असून त्यांत गुद्दवती विषयांतील एक गांव वीरचोलानें विष्णुमंदिरासाठीं दान केल्याची हकीगत आहे. हे विष्णुमंदिर वीरचोलाच्या मेदर्य नांवाच्या मुद्गल गोत्रीय ब्राह्मण सेनापतीने बांधिले होतें. प्रस्तुत लेख विशेष महत्वाचा असल्यामुळें त्याचें थोडें अधिक वर्णन करणे अवश्य होणार आहे.

या लेखावरून पहातां वेंगीच्या राजांची नांवे त्यांच्या कारकीर्दीसह व राजांच्या परस्पर संबंधासह कशीं होतीं हे वर दिलेल्या नामावलीवरून दिसून आलेच आहे. पण त्यांचा सविस्तर इतिहास कळून येईल असा प्रत्यंतर पुरावा मात्र दुसरा कांहीं उपलब्ध नाही ही दुर्दैवाची गोष्ट आहे. प्राच्य चालुक्यांच्या इतर दानलेखांच्या आधारानें त्यांचा थोडासा सुसंगत इतिहास डॉ. फ्लीटनें तयार करून त्यांतील प्रत्येक राजाचा काळहि निश्चित करण्याचा यत्न केला आहे; व त्याबद्दल पुराणेतिहासशोधन-भोक्ते त्याचे ऋणीहि आहेत. या इतिहासाविषयींचे त्याचे निबंध इंडियन अँटिक्वरीच्या २० व्या पुस्तकांत पहावयास मिळतील. पण या प्राच्य चालुक्यांविषयींच्या कांहीं गोष्टीचा डॉ. फ्लीटलाहि उलगडा झालेला नाहीं, तो करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्यांतला पहिला बिकट प्रश्न वरील यादींतील सातवा राजा जो कोक्किलि त्याच्या संबंधाचा आहे. मंगि या ५ व्या राजाचा तो धाकटा पुत्र असूनहि मधल्या भावाला मागें सारून जयसिंहानंतर म्हणजे ज्येष्ट बंधूनंतर तो राज्यावर बसला. पण पुढें ६ महिने राज्य केल्यावर त्याला बाजूला करून मधला बंधू विष्णुवर्धन सिंहासनावर आला, आणि नंतर त्यानें ३७ वर्षेपर्यंत राज्य केलें.

कोक्किलीनें क्रम सोडून राज्य बळकावल्याच्या या हकीगतीचा खुलासा कसा करावयाचा ? याविषयीं पूर्वी आम्हीं जो तर्क केला आहे तोच योग्य दिसतो. या प्राच्य चालुक्यांचा मूळपुरुष पहिला विष्णुवर्धन इ.स. ६०५ त वेंगीचा राजा झाला असें मानिल्यास कोक्किलीचा ज्येष्ठ बंधु जो जयसिंह त्याच्या कारकीर्दीचा शेवट इ. स. ७०३ या वर्षी येतो. कारण विष्णुवर्धनापासून जयसिंहांच्या अंतापर्यंत ९८ वर्षे होतात. आतां आमची कल्पना अशी आहे कीं, काश्मीरच्या ललितादित्यानें दक्षिणेत जो दिग्विजय केला तो याच सुमारास असावा. त्यावेळीं जयसिंह नुकताच मृत्यु पावलेला असेल अथवा ललितादित्याशी झालेल्या युद्धांत मारला गेला असेल; जयसिंहाचा सख्खा धाकटा भाऊ विष्णुवर्धन आपल्या सापत्नमातेशीं कलह झाल्यामुळें वेंगी सोडून निघून गेला असेल. त्याची सापत्न माता रट्ट कुलांतील असून तिनें जयसिंहाच्या मागें ललितादित्याशीं युद्ध न करतां त्याला शरण जाण्याचें ठरविलें असे राजतरंगिणीत सांगितलें आहेच. याप्रमाणे विरोध दूर होऊन विजयी ललितादित्य तें राज्य जयसिंहाचा तेथें हजर असलेला सापत्न कनिष्ट बंधु जो कोक्किलि त्याच्या स्वाधीन करून निघून गेला. विष्णुवर्धन या मधल्या भावाच्या अभावी कोक्किलीला अभिषेक होणें योग्यच होतें. पण ललितादित्य निघून जाऊन वेंगीस पुनः शांतता झाल्या बरोबर विष्णुवर्धनानें परत तेथें येऊन व कनिष्ठ बंधु कोक्किलीला सिंहासनावरून काढून टाकून आपलें हक्काचें राज्य त्याजवळून घेतलें. कोक्किलि जयसिंहाचा सापत्न बंधु होता हें तर लेखांत स्पष्ट आलेंच आहे; व झालेल्या प्रकाराचा विचार करतां विष्णुवर्धन जयसिंहाचा सखा बंधु असावा म्हणजे एकंदरींत या सर्व प्रकरणांत सापत्न संबंधामुळें उद्भवलेल्या वैराचें बरेंच अंग होतें. पण पहिल्या विष्णुवर्धनाचा राज्याभिषेक काल इ. स. ६१५ हा होता असें मानिल्यास जयसिंहाचा मृत्युकाल इ. स. ६१५ + ९८ = ७१३ येतो, व ललितादित्याचा दिग्विजय तर इ. स. ७१२ त संपूनहि गेला होता. कारण इ. स. ७१२ त अरबांनीं सिंध प्रांत जिंकिला, व त्यापूर्वी ललितादित्याचा दिग्विजय होऊन गेला होता हें काश्मीरच्या इतिहासकथनांत आलेंच आहे. तेव्हां दुसरा काल खरा मानिल्यास ललितादित्याचा

दक्षिणेंत दिग्जिय झालाच नाहीं असें म्हणण्याची पाळी येते. यास्तव इ. स. ६०५ हाच विष्णुवर्धनाच्या राज्याभिषेकाचा काल असला पाहिजे. तथापि डॉ. फ्लीट जयसिंहाच्या कारकीर्दीला ३० वर्षें देत असल्यामुळें जरी त्यानें

* एतद्विषयक राजतरंगिणीतील श्लोक आहेत ते असे:—

तस्मिन्प्रसंगे रट्टाख्या कर्णाटी चटुलेक्षणा। अपासीन्नृपतिर्भूत्वा पृथुश्रीर्दक्षिणापथम्। विन्ध्याद्रिमार्गाः पर्वाप्ता निष्पर्यन्तप्रभावया। दुर्गयेव तया देव्या कृता विहतकण्टकाः। ललितादित्यपादाब्जनखदर्पणमण्डले। स्वमूर्तिं वीक्ष्य संक्रान्तां प्रणता साऽपि पिप्रिये॥ तरंग॥

तरंगिणीचा भाषान्तरकार डॉ. स्टीन यानें या श्लोकावरील एका टीपेंत या दक्षिणेंतील राणीला राष्ट्रकूट म्हणून म्हटलें आहे. पण ही चूक आहे, असें आम्हाला वाटतें. कारण. महाराष्ट्रांत अद्यापि चालुक्यांचेच वर्चस्व असून राष्ट्रकूटांचा उदय झालेला नव्हता. तो इ. स. ७५० नंतर पुढें झाला. ललितादित्याच्या वेळीं बादामीचा चालुक्य राजा विजयादित्य हा बहुधा कांची येथें पल्लवांच्या बंदिवासांत असावा. वरील श्लोकांत जो विंध्याद्रीच्या घाटांचा उल्लेख आला आहे त्यावरून ललितादित्य वेंगी देशांत उतरला तो पूर्वघाटांतून उतरला असला पाहिजे असें दिसतें. उत्तरेंतून दक्षिणेंत विजागापट्टनला यात्र-याचें म्हणजे ओरिसाच्या बाजूनें आलें काय किंवा रायपुराकडून आलें काय पूर्वघांट ओलांडावेच लागतात. वरील वर्णनांत जी रट्ट कर्णाटी राणी म्हणून म्हटली आहे ती बादामीच्या चालुक्यांपैकीं नसून वेंगीच्या प्राच्य चालुक्यां-पैकींच असली पाहिजे. कारण हे चालुक्य वंशानें महाराष्ट्रीय असून भाषेनें मात्र कर्नाट म्हणजे आजच्या रूढ शब्दांनीं सांगावयाचें तर दक्षिण महाराष्ट्रीय होते. आजच्याप्रमाणेंच तेव्हां सुद्धां उत्तरहिंदुस्थान व दक्षिणापथ यांत स्त्रियांच्या बाबतींत पडद्याचा फरक होताच. दक्षिणेंत पडदा नसल्यामुळें या रट्ट कर्नाट राणीने ललितादित्यासमोर जाऊन त्याला मुजरा केला यांत नवल मानावयाचें कारण नाहीं. राजतरंगिणीवरून पहातां ती राणी या वेळीं तरुण असावी. जयसिंहाची ती सापत्नमाता व कोकिलि या अल्पवयी राजाची सख्खी माता असल्यामुळें तरंगिणीच्या विधानाला चालुक्यांच्या लेखांवरूनही पुष्टि मिळते. (हुल्टशकृत दक्षिण हिंदुस्थानांतील कोरींव लेख, पुस्तक १ पान ४१ पहा).

कुब्ज विष्णुवर्धनाचा राज्यारंभकाल इ. स. ६१५ धरिला आहे तरी कोष्टक-लीचा राज्याभिषेक काळ त्या हिशोबानें इ. स. ७०९ हा येतो व तोहि ललितादित्याच्या दक्षिणेंतील दिग्विजय-कालाशीं जुळण्यासारखा आहे.

याच्या पुढचा वादाचा प्रश्न ताडपाच्या संबंधाचा आहे. १६ वा राजा अम्मराज याचा पुत्र अल्पवयी असल्यामुळें त्याला एकीकडे करून ताडप राज्यावर आला होता. त्याचा राजकुलाशीं निकट संबंध असलेला दिसत नाहीं. ८ व्या राजापासून १६ व्या पर्यंत बहुतेकांच्या कारकीर्दी लांबलचक असून त्यांची एकंदर वर्षे संख्या २२२ भरते. ती आठव्या राजाचा राज्या-रंभ काल जो इ. स. ७०३ त्यांत मिळविली म्हणजे ताडपानें राज्य बळका-विल्याचा काळ इ. स. ९२५ असा येतो. त्याला लवकरच एक महिन्याचे सुमारानें भीम या १४ व्या राजाच्या धाकट्या पुत्रानें गादीवरून काढून लाविलें. हा भीम पुत्र कांहीं गांवाच्या जहागिरीचा मालक सरदार असावा. यालाहि पुन: ११ महिन्यांनीं १७ व्या राजाचा पुत्र युद्धमल्ल यानें पदच्युत केलें. युद्धमल्लानें ७ वर्षें राज्योपभोग घेतल्यावर त्यालाहि १७ वा राजा जो अम्मत्याच्या बंधूनें म्हणजे युद्धमल्लाच्या चुलत्यानें हुसकून लाविलें. ही हकीगत देतांना ताम्रलेखांत ' तमुच्चाटय देशादम्मराजानुज: ' असे शब्द घातले आहेत- त्यांचें भाषान्तर " अम्मराजाच्या धाकट्या बंधूनें त्याला देशांतून हांकून लाविल्यावर " असे केलें आहे; पण ते चूक आहे. कारण याच प्रकारच्या पूर्वीच्या एका निर्देशांत ' तमुच्चाटय ' एवढेंच शब्द आहेत. म्हणून त्यांतील ' देशात् ' या पदाचा संबंध ' उच्चाटय ' या पदाशीं न घेतां पुढील पदाशीं घेतला पाहिजे. म्हणजे आमच्या मतें त्याचें भाषान्तर ' अम्मराजाच्या बंधूनें देशांतून येऊन त्याला काढून लाविलें' असे केलें पाहिजे. देशांतून म्हणजे चालुक्यांच्या मूळ देशांतून ऊर्फ महाराष्ट्रांतून. चालुक्य घराणें मूळचें महाराष्ट्रांतील असून अद्यापपावेतें त्यांचा मूळ घराण्याशीं दळण-वळण संबंध होता. तेव्हां अम्मराजाच्या बंधूनें तेथें जाऊन आपली सोय लाविली असेल. पण अम्मराजामृत्यु पावल्यावर जेव्हां त्याच्या गादी-संबंधानें वाद उत्पन्न झाला, तेव्हां त्यानें वेंगीस येऊन गादीवरचा आपला

हक्क सिद्ध केला. इ. स. ९२५ नंतर ८ वर्षांनीं म्हणजे स. ९३३ त ही गोष्ट घडून आली. त्याच्या नंतर पुनः तीन पिढ्यांपर्यंत चालुक्यवंश सरळ चालला. स्वतः भीमाने १२ वर्षे राज्य चालविलें; त्याच्यानंतर त्याचा पुत्र दुसरा अम्मराज गादीवर बसला व त्यानें २५ वर्षें तिचा उपभोग घेतला. अम्मानंतर भीमाचा दुसरा पुत्र व अम्माचा सावत्र बंधु धननृप राज्यारूढ होऊन त्यानें ३ वर्षें राज्य केलें. पण धननृप किंवा धनार्णव अम्माचा वडील बंधु असतांना तो अम्माच्यानंतर गादीवर कसा आला याचा उलगडा केला पाहिजे. आमच्यामते तो उलगडा असा होतो. दुसऱ्या अम्माचा बाप भीम चालुक्य हा महाराष्ट्रांतून वेंगीस येऊन पहिल्या अम्मानंतर राज्यारूढ झाल्याचें पूर्वी सांगितलेच आहे. तो महाराष्ट्रांत एखाद्या जहागिरीवर असावा. तेथून येतांना त्याने आपली ती जहागीर संभाळण्याचे काम आपला वडील पुत्र जो धननृप त्याच्याकडे सोंपविले असावें. पुढें वेंगीस येऊन तेथील सिंहासनावर स्थिर झाल्यावर त्यानें लोकमहादेवी नामक चोल घराण्यांतील एका राजकन्येशीं विवाह केला. तीपासून त्याला जो पुत्र झाला तो दुसरा अम्म या नांवानें त्याच्या मागाहून गादीवर बसला. हा दुसरा अम्म निपुत्रिकच मरण पावल्यामुळें, त्याची गादी त्याचा वडील भाऊ घननृप याजकडे आली; व ती घेण्यासाठीं तो महाराष्ट्रांतील आपली जहागिर सोडून वेंगीस आला. पण त्या राज्याचा त्याला तीनच वर्षें उपभोग घेतां आला. वेंगीच्या घराण्याचा चोलवंशाशीं शरीरसंबंध झाल्यामुळें तंट्याचें बीज उत्पन्न झालेलें होतें. तेव्हां चोलांनीं बंड करून धनार्णवाला गादीवरून काढून टाकण्याचा प्रयत्न केला. त्याचा परिणाम म्हणजे यापुढील २७ वर्षें पर्यंत वेंगीस अराजकतेची गेलीं हा होय. धनार्णव अम्माच्या नंतर गादीवर कसा आला व त्याच्या ३ वर्षांच्या कारकीर्दीनंतर २७ वर्षें पर्यंत वेंगीस कोणी राजाच नाहींसा कां झाला याचा खुलासा आमच्या दृष्टीनें हा असा आहे. या २७ वर्षांनंतर धनार्णवाचा पुत्र शक्तिवर्मा यानें पुनः वेंगीच्या राज्यावरील आपलें स्वामित्व प्रस्थापित केलें. (ही हकीगत देतांना दानलेखांत असें म्हटलें आहे कीं, " दैवदुर्विलासामुळें वेंगी देशाला २७ वर्षें अराजकतेचीं गेलीं " यापेक्षां जास्त कारण दिलेलें

नाहीं ) हा काल इ. स. ९३३ नंतर ४० वर्षांनीं म्हणजे भीमापासून धन-नृपापर्यंत राजांच्या कारकीर्दीनंतर इ. स. ९७३ यावर्षी सुरू होऊन इ. स. १००० त संपला. या अराजकतेचीं कारणें नक्की काय असावीं हें सांगतां येणें कठीण आहे. पण वेगीं राज्यावर स्वामित्व सांगणाऱ्या विरोधी हक्क-दारांमधील तंटयाचा तो परिणाम असावा असें म्हणावयास हरकत नाहीं. पण पुढें वेंगी व चोल घराण्याचा पुनः विवाह-संबंध घडून आल्यामुळें वेंगी राज्याची आयुष्य-मर्यादा थोडीशी वाढली, व धननृपाचा पुत्र जो शक्तिवर्मा त्यापासून पुनः वेंगीचा चालुक्य वंश सुरू झाला. त्यानें १२ वर्षे राज्य केल्यावर त्याचा भाऊ विमलादित्य सिंहासनारूढ झाला व त्यानें ७ वर्षे राज्य केलें. त्याच्यामागे त्याच्या राजराज नांवाच्या पुत्राने ४१ वर्षे राज्य केलें. या तीन कारकीर्दींचीं ६० वर्षे झालीं. म्हणजे राजराजाचा अंत इ. स. १०६० त झाला. राजराजाने चोलराजा जो राजेद्र त्याच्या अम्मंगा नामक कन्येशीं विवाह केला होता. तीपासून त्याला झालेल्या पुत्राचे नांव राजेन्द्रच होतें. या राजेन्द्राच्या मामानें १५ वर्षे व मामेभावाने १ वर्ष असा राज्याच्या कारभार केल्यावर तें राज्य त्याच्या वीरचोल नामक पुत्राकडे आलें. हा वीरचोल हि एका चोल राजकन्येचाच पुत्र होता. वीरचोल वरील हिशोबानें इ. स. १०७६ त सिंहासनावर आला असें होतें. पण दानलेखांत तें वर्ष शक १००१ म्हणजे इ. स. १०७९ असें दिलें आहे. हा दोन तीन वर्षांचा फरक प्रत्येक राजाच्या कारकीर्दींतील वर्षें सांगतांना जे कित्येक किरकोळ महिने व दिवस सुटले असतील त्यामुळेंहि पडला असण्याचा संभव आहे, व तो विशेष महत्वाचा नाहीं. एकंदरींत तात्पर्य एवढेंच कीं वेंगीच्या प्राच्य चालुक्य वंशाचा संस्थापक कुब्ज विष्णुवर्धन हा इ. स. ६०५ पासून ६१४ पर्यंत केव्हां तरी वेंगीच्या सिंहासनावर आरूढ झालेला असला पाहिजे यांत संशय नाहीं. ( पण विष्णुवर्धनाच्या कारकीर्दीच्या १८ व्या वर्षी सन ६३२ च्या श्रावणांतील ग्रहणानिमित्त त्यानें ग्रामदान केल्याबद्दलचा जो लेख आहे, त्यावरून त्याचा राज्याभिषेक काळ इ. स. ६१५ हाच अधिक विश्वसनीय ठरतो असें पुनः विधान आहे. इंडियन अँटिक्वरी; पु. २० पान १५ पहा. )

प्राच्य चालुक्य राजांचा राजकीय इतिहास पाहिला, तर त्यांत फारशी भानगड कोठें झालेली नसून एकंदरींत इ. स. ६०५ किंवा ६१५ पासून तो इ. स. १०७८ पर्यंत त्यांचें राज्य बहुतेक सरळ चालत आलेलें दिसतें; व १०७८ त तें नवीन उदयास आलेल्या चोलांच्या राज्यांत समाविष्ट होऊन गेलें. आजमितीस वेंगी हें लहानसें शहर असून तें पेद्द वेंगी म्हणून ओळखिलें जातें. पण तेव्हां वेंगीचें राज्य गोदावरी व कृष्णा या नद्यांमधील पूर्वेकडच्या बऱ्याच प्रदेशावर पसरलेलें होतें. गोदावरीच्या उत्तरेस कलिंग देशांवर ओढया प्रान्ताच्या सीमेपर्यंत वेंगी चालुक्यांचाच अंमल होता. तेथील राजमहेन्द्री हें शहर शेवटच्या अम्मराजानें वसविलें असें म्हणतात. त्या राजाचें राजमहेन्द्र असें बिरुद असल्यामुळें शहराला राजमहेन्द्री हें नांव मिळालें. तथापि कलिंगावर पहिल्या पहिल्या चालुक्यांच्या काळीं राज्य करणारें गंग कुलनांवाचें कलिंग राजघराणें होतें असें त्यांच्या लेखांवरून दिसून येतें. कलिंग हे नांव फार प्राचीन असून त्या मानानें वेंगी हें अर्वाचीन आहे. महाराष्ट्राप्रमाणें कलिंगांतहि तीन देश मोडत असून त्या सर्वांमिळून त्रिकलिंग असें नांव होतें. त्याचेंच प्राकृत रूपांतर होऊन सांप्रतचें तेलंग हें नांव झालें आहे. विजयादित्याच्या एका दानलेखांत त्रिकलिंग भीम चालुक्याच्या अमलाखालीं होतें असें स्पष्ट म्हटलें आहे. ( स-त्रिकलिंग-वेंगिमंडलमपालयत्-हुल्शाकृत दक्षिण हिं. कोरींव लेख; भा. १, पा. ४५ ). यावरून कलिंग व वेंगी हे देश भिन्न भिन्न होते आणि त्रिकलिंगावर वेंगीचा अम्मल होता. खास वेंगी राज्य गोदावरी आणि कृष्णा यांच्यामधील पूर्वकिनाऱ्यावरच्या प्रदेशाएवढेंच असून, त्रिकलिंग म्हणजे गोदावरीच्या उत्तरेकडचा कलिंग पूर्वघाटांवरचा आंध्र, आणि गंजम या प्रांतांमिळून झालेला देश होय. या विस्तृत प्रदेशांत अद्यापिहि तेलगू भाषा बोलत असतात. आंध्रांविषयींचें विवेचन पुढें स्वतंत्र टीपेंत केलें आहे. वेंगीच्या चालुक्यांचा अम्मल आजच्या मद्रास इलाख्यांतील कांहीं पश्चिमेकडील जिल्ह्यांवरहि होता. पण कृष्णेच्या दक्षिणेस मात्र त्यांचा शिराव झाला नाहीं. तेथें प्रथम पल्लवांचा व नंतर चोलांचा त्यांना विरोध असून होता. या प्रदेशावरील अधिकारासंबंधानें प्राच्य चालुक्य

आणि मालखेडचे राष्ट्रकूट ऊर्फ रट्ट राजे यांच्यांत पुढें पुढें लढा उत्पन्न झाला. राष्ट्रकूटांचें महाराष्ट्रांत त्यावेळीं प्राबल्य सुरू झालें होतें. तेव्हां वेंगीच्या चालुक्यांना एकीकडून कलिंगांतील गंग राजे व पश्चिमेकडील हे राष्ट्रकूट अशा दोघांशीं वारंवार संग्राम करावा लागला. भीम चालुक्यानें एकंदर १०८ लढाया केल्या, व १०८ शिवमंदिरें बांधिलीं असें एका दानलेखांत म्हटलें आहे. दुसऱ्या एका चालुक्याने कृष्णराजाची राजधानी जिंकून ती जाळून टाकिली असेहि वर्णन आहे. ( द. हिं. कोरींव लेख भाग १ पा. ३९ ). म्हणजे चालुक्यवंशाची शौर्याविषयींची ख्याति प्राच्य चालुक्यांनीं कायम ठेविली होती असें दिसून येतें.

प्राच्य चालुक्यांची भाषा बहुधा कानडी असून, त्रिकलिंग म्हणजे कलिंग, आंध्र व गंजम या प्रांतांतील लोक तेलगूंत व्यवहार करीत व खालीं दक्षिणेकडे तामिल भाषेचा प्रचार होता. पण आरंभीं आरंभीं चालुक्यांची भाषा कांहीं संस्कृतोद्भव प्राकृतच असली पाहिजे. त्यांचे शरीरसंबंध देखील महाराष्ट्रांतील व मध्य हिंदुस्थानांतील आर्यवंशीय कुलांशींच होत असत. या संबंधीं एक गमतीचा प्रकार दिसून येतो; तो असा कीं विजयादित्याच्या ( ११ वा राजा ) एका लेखांत ( द. हि. कोरीवलेख, भाग १ पा. ४० ) कुब्जविष्णुवर्धनाच्या काळापासून चालत आलेल्या पट्टवर्धन नामक कुलांतील एका सरदाराला एक गांव इनाम दिल्याची हकीगत आहे. पट्टवर्धन हें नांव महाराष्ट्रीय असून अजूनहि तें ब्राह्मण व दुसऱ्या कित्येक जातींमध्यें आडनांव म्हणून प्रसिद्ध आहे. पण सदर इनामाच्या सनदेंतील पट्टवर्धन कुल क्षत्रिय होतें हें त्यांतील सोमादित्य, कुंतादित्य इत्यादि नांवांवरून उघड होत आहे. म्हणजे तें पुष्कळ पिढ्यांचें शूर घराणें होतें असें झालें. त्याच चालुक्य राजाच्या दुसऱ्या एका दान लेखांत, 'आज्ञप्ता' म्हणजे लेखविषयक आज्ञा सर्वांस कळविण्याचें काम ज्याच्याकडे सोंपविलें होतें तो त्या राजाचा हैहय कुलांतील नृपरुद्र नांवाचा भाऊ होता असें म्हटलें आहे ( द. हि. को. ले. भाग १ पा. ३४ ). यांत भाऊ म्हणजे अर्थात मामे भाऊ किंवा आते भाऊ असा कोणी असला पाहिजे हें उघड आहे. म्हणजे यावरून चालुक्यांचे मध्य हिंदुस्थानांतील हैहय ऊर्फ कलचुरी घराण्याशीं

विवाह-संबंध होत असत हें सिद्ध होतें. पण चोल, पांड्य, केरल इत्यादि राजकुलांशीं संबंध करणें ते निषिद्ध मानीत होते असे अनुमान करण्याचें मात्र एवढयावरून कारण नाहीं. हीं पाड्यचोलादि द्राविड कुलें या वेळीं म्हणजे १० व्या शतकांत सूर्य किंवा सोमवंशांत सामील होऊं लागली होतीं, व शेवटच्या चालुक्य राजांनीं चोल कुलांतील कन्या वरिल्या होत्या हे मागे स्पष्ट झालेंच आहे. चोल घराणे आतां बलिष्ठ होऊन सूर्यवंशीय म्हणून गणण्यांत येऊं लागलें होतें. पण आरंभीं कांही काळपर्यंत वेंगीचे चालुक्य सुप्रसिद्ध आर्य क्षत्रियकुलांखेरीज कोणाशीं विवाह संबंध करीत नसत, व आपल्या अस्सल क्षत्रियत्वाचा त्यांना मोठा अभिमान वाटत होता असेंच दिसते.

आतां चालुक्यांच्या राज्य-व्यवस्थेविषयीं थोडासा विचार करूं. ही व्यवस्था मूळ उत्तर हिंदुस्थानांतील पद्धतीवरच बसविलेली होती. तींत जमीनमहसूल खात्यांतील लहान घटकाचे नांव विषय हें असून नाडु हा द्राविड शब्द त्यांत आलेला नाहीं. अमुक गांवअमुक विषयामध्यें आहे असें म्हणण्याची वहिवाट होती. दुसरी गोष्ट अशी दिसते कीं राजानें केलेल्या दानविषयींच्या आज्ञा प्रसिद्ध करण्याचें काम आज्ञप्ता बहुधा कोणी राजकुलांतील पुरुष करीत असे. पण एका दानलेखावरून तें काम पंचप्रधानांकडे सोंपविलें होतें असें आढळून येते. प्रधान शब्द अर्वाचीन महाराष्ट्राच्या इतिहासांत फार येतो; पण प्राचीन इतिहासांत हाच त्याचा प्रथम निर्देश होय. तथापि पुढील इतिहासांतील प्रधानांप्रमाणें हे प्रधान आठ नसून पांचच होते. त्यांचे हुद्दे व अधिकार काय असावे हे सांगतां येत नाहीं. मंत्रि, अमात्य, अध्यक्ष इत्यादि शब्द आतां मागें पडून त्यांना विशिष्ट संकुचित अर्थ प्राप्त झाले. या बाबतींत तिसरी एक विशेष गोष्ट दिसून येते ती अशी कीं, कांहीं दानलेखांतील आज्ञा राष्ट्रकूटप्रमुख कुटुंबीयांना केलेल्या आहेत. ' विषय-निवासिनो राष्ट्रकूटप्रमुखान् कुटुंबिनः इत्थमाज्ञापयति ' असें त्यांतील शब्द आहेत. यांतील ' राष्ट्रकूटप्रमुखान् ' हा शब्द विशिष्ट असून या प्राच्य चालुक्यांच्या दानलेखांशिवाय दुसऱ्या कोणाच्याहि प्राचीन दानलेखांत तो आम्हांस सांपडला नाहीं. आतां त्याचा

अर्थ काय असावा ? इंडियन अंटिक्वरींतील लेखकानें ' प्रान्ताचे प्रमुख अधिकारी ' असें त्याचें भाषान्तर केलें आहे. पण तें ग्राह्य दिसत नाहीं. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें विषय ( अथवा हल्लींची तहशील ) हा महसूल खात्यांतील लहान घटक असून त्याच्या वरचे विभाग राष्ट्र, भुक्ति असे क्रमाने होते. राष्ट्र हा शब्द या दानलेखांत क्रमराष्ट्र इत्यादि प्रयोगांत आलेला असून विषयाच्या वरचा राज्याचा विभाग असा त्याचा अर्थ स्पष्ट आहे. राष्ट्रकूट याचा सामान्य अर्थ वर सांगितल्याप्रमाणें प्रांताचा अधिकारी असा आहे. पण तो अधिकारी विषयांत किंवा ग्रामांत येऊं शकत नाहीं. राष्ट्रकूटप्रमुखान् इत्यादि शब्दप्रयोगावरून राष्ट्रकूट हें कोण्या कुलाचें सामान्य शिष्ट नांव नव्हतें हे तर उघड होते. तें कोणी कुलाचें विशेष नांव मानतात, पण ती चूक आहे. राष्ट्रकूट हें अधिकाराचे किंवा हुद्याचे नांव होय; व त्याचें काम अलीकडच्या देशमुखी सारखें होते. देशमुख आणि देशपांडे म्हणजे पाटील व कुळकर्णी यांवरील राष्ट्रनामक भागांतील अधिकारी होते; विषयांतील नव्हते. राष्ट्रकूट हे नांव मूळचें अधिकाराचें असून, प्रभु, देशमुख, सेनापति इत्यादि हुद्यांच्या नांवाप्रमाणें पुढें आडनांव बनले. हें पुढे राष्ट्रकूटांच्या इतिहासांत आम्हीं सांगणारच आहों. पण या ठिकाणीं विशेष सांगण्याचा मुद्दा असा आहे कीं, राष्ट्रकूट हे नांव विषयनामक भागांतील अधिकाराचे नसल्यामुळें ते प्राच्य चालुक्यांच्या पूर्वींपासूनच मराठ्यांचे एक आडनांव बनलेले असले पाहिजे. वेंगी येथील देशमुख बहुधा मराठेच असत, व प्राच्य चालुक्यांच्या अमलांत आन्ध्रदेशांतील गांवांची पाटीलकी महाराष्ट्रांतल्याप्रमाणेच राष्ट्रकूट आडनांवाच्या मराठ्याकुलांकडे सोंपविलेली असावी. या कारणास्तव प्राच्य चालुक्यांच्या दानलेखांतील आज्ञा विषयांत अन्तर्भूत होणाऱ्या राष्ट्रकूटप्रमुख रहिवाश्यांना उद्देशून काढिलेल्या आहेत. पण राष्ट्रकूट हे मराठा जातीचे असोत वा नसोत, एवढें खरें कीं, वेंगीच्या चालुक्यांच्या दानलेखांत आढळून येणाऱ्या या राष्ट्रकूट शब्दावरून तें नांव मूळ कसें वहिवाटींत आलें असावें याची चांगली कल्पना येते, व त्याचा मूळ अर्थ अलीकडील देशमुखासारखा जमीनमहसूलखात्यांतील अधिकारी एवढाच होता असें दिसून येतें.

वेंगीचे चालुक्य राजे शिवोपासक होते. त्यांपैकीं बहुतेकांनीं बरींच वर्षें सुखानें व न्यायानें राज्योपभोग घेतला असें वाटतें. कदाचित राजतरंगिणी-कारासारखा कोणी बारीक गुणदोष वर्णन करणारा बखरनवीस त्यांना न मिळाल्यामुळें दानपत्रादिकांवरून दिसून येणारी ही गोष्ट एकपक्षीयहि असण्याचा संभव आहे. ते हिंदुधर्मांचे आचार कडकरीतीनें पाळीत व वर्णाश्रमधर्मांची नीट जोपासना करण्याचा प्रयत्न करीत. ते बहुधा सुशिक्षित असत व त्यांपैकीं एक तर गणितशास्त्रपारंगत असल्यामुळें त्याला गुणक हे नांव मिळालें होतें. चन्द्रवंशापासून त्यांच्या कुळाची उत्पत्ति झाल्याची हकीगत १० व्या शतकापर्यंतच्या त्यांच्या दानलेखांत आढळून येत नाहीं. पण त्या सुमारास सूर्यवंशीय म्हणून प्रख्यातीस येऊं लागलेल्या चोल घराण्याशीं त्यांचे शरीरसंबंध सुरू होऊन त्यांची चन्द्रवंशापासून उत्पत्ति झाल्याची कथा प्रचलित होऊं लागली. ही मूळ कुलोत्पत्तीची कथा महाभारतांतून किंवा भागवतांतून घेतलेली नाहीं. ती कोठून आणिली हे एक गूढच आहे, व त्याचा थोडासा विचार पुढें टिप्पणींत केला आहे.

हे प्राच्य चालुक्यकुलांतील राजे बहुधा आपल्याला महाराज म्हणवीत व कांहीं महाराजाधिराज, परमेश्वर, परमभट्टारक हीं उपपदेहि धारण करीत. त्यांचें आवडतें विरुद्ध 'विषमसिद्धि' हें असून ते त्यांच्या विष्णुवर्धन या मूळ राजानेंच धारण केलें होतें; व त्याचा अर्थ दुर्गमस्थळें जिंकणारा असा आहे. बदामीच्या चालुक्यांप्रमाणे कधीं कधीं ते आपल्याला कसला तरी 'आश्रय' कल्पून तसेंहि नांव धारण करीत; पण पूर्वकालीन चाळुक्यांमध्ये प्रचलित असलेलें 'वल्लभ' उपपद मात्र त्यांनीं सोडून दिलें. तें पुढें राष्ट्रकूट घराण्यांतील राजांनीं उचलेलें व आपलेसें केलें.

शेवटीं या वेंगीच्या प्राच्य चालुक्यांविषयीं डॉ. फ्लीटनें ज्या आणखी कित्येक गोष्टी सांगितल्या आहेत त्यांचा विचार करूं. या गोष्टी इंडियन ॲंटिक्वरीच्या २० व्या पुस्तकांत निबंधरूपानें फ्लीटनें सांगितल्या आहेत. पहिली गोष्ट अशी कीं प्राच्य चालुक्यांच्या मुद्रेवर 'श्रीत्रिभुवनांकुश' असा मायना नित्य आढळून येतो. त्यांपैकीं पण वीरचोल राजाच्या शेवटच्या दानलेखांतील मुद्रेवरील मायन्याशिवाय वरती अर्धवट बसलेल्या वराहाचें

चित्र, डावीकडे चंद्रसूर्य, छत्र, शंख, दुहेरी भेरी, दोन चौऱ्या हीं चिन्हे आणि खाली हत्ती, प्रफुल्ल कमळ आणि 'य'च्या आकाराची वेल अशीं दिसून येतात. इतर लेखांत या इतर गोष्टी आढळत नाहींत. वीरचोलाच्या चेल्लूर येथील लेखांत चालुक्यांच्या राजचिन्हांची जी नामावळी दिलेली आहे, तीत श्वेत छत्र, एकेरी शंख, पंचमुख शब्द, पालिकेतन, दुहेरी भेरी, मयूर पिच्छ गुच्छ, भाला, सिंहासन, मकरतोरण, सुवर्णदंड, गंगायमुना* इत्यादि नांवे आली आहेत. कलिंग नगरच्या गंगांच्या दानलेखांतहि अशाच प्रकारची यादि दिलेली आहे. या नांवांचा अर्थ काय व त्यांचें महत्व तरी काय असा डॉफलीट आदिकरून पुष्कळ विद्वानांनां जो प्रश्न पडलेला आहे त्याचें उत्तर देण्याचा पढे योग्यस्थलीं आम्हीं प्रयत्न करूं. वेंगीच्या प्राच्य चालुक्यांचीं नाणीं आराकान येथेहि सांपडलीं आहेत.

वेंगीच्या प्राच्य चालुक्याचा चालुक्य वंशाचे पुढे काय झालें असावें याचा विचार करतां असे दिसते की, चोलांचे वर्चस्व झाल्यावर हें चालुक्य कुल मागे पडले. राजेन्द्रचोलानंतरहि कांही चालुक्य राजांनीं वेंगी येथें राज्य केलें. त्यांचें घराणे पहिल्या अम्माच्या ज्या अल्पवयी मुलाला ताडपानें पदच्युत केलें होते त्याच्यापासून सुरू झालेले होते असे ते म्हणत. त्या मुलाला ताडपानें कांहीं ठार केलेले नव्हते, व पदच्युत झाल्यावर तो दुसरीकडे रहावयास जाऊन तेथें त्याच्या कित्येक पिढ्याहि झाल्या. शेवटच्या मल्लविष्णुवर्धनाचा इ. स. १२०२ तील एक लेख उपलब्ध झालेला आहे. तुंगभद्रेच्या दक्षिण भागांत पश्चिमेच्या बाजूला हि कांहीं लहानसहान चालुक्य राजाचा अथवा मांडलिकांचा अंमल होता.

---

चेल्लूरच्या दानलेखांतील एतद्विषयक मजकूर येथे देतों.

* चालुक्यांचा मूळ पुरुष जो विष्णुवर्धन तो आपल्या बापाच्या पश्चात् हारीती नामक राणीला झालेला असून त्याच्या हकीगतीपासून वरील लेखांत मजकूर आहे, तो असाः—सच मात्रा विदितवृत्तान्तःसन् निर्गत्य चालुक्यगिरौ नंदाभगवती गौरीमाराध्य कुमारनारायणमातृगणांश्च सन्तर्प्य श्वेतातपत्रैकशंख पंचमहाशब्द पालिकेतन प्रतिढक्का वराह लांछन पिच्छ कुन्त सिंहासन मकर तोरण कनकदंड गंगायमुनादीनि स्वकुलक्रमागतानि निक्षिप्तानि साम्राज्यचिन्हानि समादाय कदम्बगंगादि भूमिपान्निर्जित्य सेतुनर्मदामध्यं सार्धसप्तलक्षं दाक्षिणापथं पालयामास। ( दक्षिण हिंदुस्थानांतील कोरीव लेख—हुल्शकृत भा. १ पा. ५४)

## वेंगीच्या चालुक्य राजांची वंशावळ.

(पुढील वंशावळ हुल्शनें आपल्या पुस्तकांत दिलेल्याप्रमाणें असून तिच्या जोडीला डॉ. फ्लीटनें सुचविलेले वर्षांचे दुसरे आंकडेहि दिले आहेत ).

( बादामी घराण्यांतील ) कीर्तिवर्मा मृत्यु शक ४८९ स. ५६७.

दुसरा सत्याश्रय पुलकेशी; चालुक्यांपैकीं महाबलाढ्य राजा. शक ५३२. इ. स. ६१०

१ कुब्जविष्णु वर्धन, १८ वर्षें. शक ५२६–५४४ ( हु. ) ५३८–५५६ ( फ्ली. );

२ पहिला जयसिंह; ३३ वर्षें शक ५४४–५७७ ( हु. ); ३० वर्षें, सन ७७६–५८५ ( फ्ली. )

३ इंद्रराज ६ महिने

४. दुसरा विष्णुवर्धन; ९ वर्षें शक ५७७–५८६ (हु.); ५८५–५९४ (फ्ली.)

५. मंगि युवराज; २५ वर्षें शक ५८६–६११ (हु.); ५९४–६१९ (फ्ली.)

६. दुसरा जयसिंह १३ शक ६११–६२४. (ह,) ६१९–६३२ ( फ्ली. )

८. तिसरा विष्णुवर्धन; ३७ व. शक ६२५–६६२ ( हु. ) ६३२–६६९ ( फ्ली. )

७. कोक्किलि. ६ म. श. ६२५; (फ्ली,) ६३२ स. ७०९;

९. पहिला विजयादित्य भट्टारक; १८ वर्षें शक ६६२–६८० ( हु ); ६६९–६८७ ( फ्ली. )

१०. चवथा विष्णुवर्धन; ३६ वर्षें. शक ६८०–७१६ ( हु. ); ६८७–७२२ ( फ्ली. )

११. दुसरा विजयादित्य, ऊर्फ नरेन्द्र मृगराज; ४८ वर्षे
शक ७१६–७६४ ( हु ); ४४ वर्षें, ७२२–७६६ ( फ्ली. )

१२. पांचवा कलिविष्णुवर्धन; दीडवर्ष
शक ७६४–८६६ ( हु. ); ७६६–७६७ ( फ्ली. )

१३ तिसरा विजयादित्य. गणक; ४४ वर्षे शक ७६६ ८०९ ( हु. ) ७६७-८११

युवराज विक्रमादित्य

१४ चालुक्य भीम द्रोहार्जुन ३० वर्षें; ८०९–८३९ ( ह. ); ८११-८४१ ( फ्ली )

१८ तैलप, महिना शक ८४८

२१. युद्धमल्ल; ७ वर्षें शक ८४८–८५५.

१५. चवथा विजयादित्य कोल्लभिगंड ऊर्फ कलियर्त्यांक ६ महिने.
श. ८४० ( हु. ); ८४१ ( फ्ली. )

१९. विक्रमादित्य; वर्ष ८४७-८४८ ( हु ). ८४९ ( फ्ली. )

१६. पहिला अम्म, ६ वा विष्णुवर्धन ऊर्फ राजमहेन्द्र, वर्षे ७ शक, ८४०-८४७(हु ); ८४१–८४८ ( फ्ली ).

२२. दुसरा चालुक्य भीम, ऊर्फ ७ वा विष्णुवर्धन गंडमहेन्द्र–राणी मेलम्बेचा पुत्र वर्षे १२ शक ८५५-८६७(हु.)

१७. विजयादित्य, अल्पवयी असून त्याला तैलपानें पदच्युत केलें. शक ८४८.

२० भीम

२४. धनार्णव ऊर्फ धननृप; ३ वर्षें
शक ८९२–८९५ ( हु. )

२३. दुसरा अम्म, ऊर्फ विजयादित्य लोकमहादेवीचा पुत्र;
२५ वर्षे शक ८६७–८९२( हु. )
२७ वर्षांचा खंड.

धनार्णवापर्यंत आल्यावर वेंगी चालुक्य घराण्याचा पूर्वभाग संपला असें म्हणावयास हरकत नाहीं. इतके राजे बहुतांशीं दक्षिण महाराष्ट्रीय म्हणजे कानडी मराठी होते. यांतील दुसऱ्या अम्माचा राज्याभिषेक काल शक८६७ मार्गशीर्ष वद्य १३ शुक्रवार असा त्याच्याच एका दानपत्रांत स्पष्ट दिलेला आहे, व तो इ. सनाचे मानानें शुक्रवार ५, डिसेंबर ९४५ असा आहे.

आतां वेंगी चालुक्य घराण्याच्या उत्तर भागाकडे वळूं.

**पूर्व भागांतील २४ वा राजा धनार्णव**

२५. शक्तिवर्मा ऊर्फ चालुक्य चन्द्र, १२ वर्षे शक ९२५–९३७ (हु.); ९२६–९३८ (फ्ली.)

२६. विक्रमादित्य–यानें सूर्यवंशीय राजेन्द्र चोलाच्या भगिनीशीं विवाह केला; ७ व शक ९३७–९४४ (हु.); ९३८–९४५ (फ्ली)

२७. पहिला राजराज, ऊर्फ आठवा विष्णुवर्धन–यानें राजेन्द्रचोलाच्या अंमगादेवीनामक कन्येशी विवाह केला; ४४ वर्षें; शक ९४४–९८५ (हु.) ९४५–९८६ (फ्ली.)

२८. सातवा विक्रमादित्य, याला राजेन्द्रचोल या आपल्या पुतण्यापासून वेंगीचें राज्य मिळालें; १५ वर्षें; ९८५–१००० (हु.)

राजेन्द्रचोल, ऊर्फ कुलोत्तुंगदेव, याला कांचीचें चोल राज्य मिळालें: त्यानें राजेन्द्र चोलाच्या मधुरान्तकीनामक कन्येशीं विवाह केला; व वेंगीचें राज्य आपल्या विक्रमादित्यनामक चुलत्याला दिलें. (यानें शक ९८६पासून १०३५ पर्यंत ४१ वर्षे कांचीस राज्य केलें.

विक्रमचोल चोल वंशांत गेला.

२९. दुसरा राजराज, वर्ष १ शक १०००–१००१ (हु:)

३० वीर चोल ऊर्फ ९ वा विष्णुवर्धन हा शके १००१ मध्यें गादीवर बसला, त्याचा १०२२ मधील लेख उपलब्ध आहे.

चेल्लूरच्या दानलेखांत वीरचोलाच्या राज्याभिषेकाचा काल शके १००१, भाद्रपद वद्य १३ गुरुवार म्हणजे इ. स. १०७८, आगष्ट तारीख २३ असा दिला आहे. पहिल्या राजराजाच्या राज्यारोहणाचाहि काल एका लेखांत दिलेला असून तो इ. सनाप्रमाणें १० आगष्ट १०२२ असा येतो.*

* डा फ्लीटनें या राजांचीं नांवे इ. सनाच्या वर्षांसह ( हीं वर्षें प्रत्येक राजाच्या कारकीर्दीच्या अंताचीं आहेत ) दिलीं तीं अशीः—

१ विष्णुवर्धन इ. स. ६३३
२ जयसिंह ,, ६६३
३ इन्द्रराज ,, ६६३
४ दुसरा विष्णु वर्धन ,, ६७२
५ मंगि युवराज ,, ६९६
६ दुसरा जयसिंह ,, ७०९
७ कोक्किलि ,, ७०९
८ तिसरा विष्णु वर्धन ,, ७४६
९ विजयादित्य ,, ७६४
१० चवथा विष्ण वर्धन ,, ७९९
११ नरेन्द्र मृगराज ऊर्फ दुसरा विजयादित्य ,, ८४३
१२ पांचवा (कलि) विष्णुवर्धन ,, ८४४
१३ तिसरा विजयादित्य (गणक) ,, ८८८
१४ चालुक्य भींम ,, ९१८
१५ कोल्लभिगंड ऊर्फ चवथा विजयादित्य ,, ९१८
१६ अम्म, ऊर्फ सहावा विष्णुवर्धन ,, ९२५
१७ वेट उर्फ ६ वा विजयादित्य ,, ९२५
१८ तैलप ,, ९२५
१९ दुसरा विक्रमादित्य ,, ९२६
२० दुसरा भीम ,, ९३७
२१ युद्धमल्ल ,, ९३४
२२ दुसरा अम्म ऊर्फ सहावा विजयादित्य ,, ९७०
२३ धनर्णव इ. स. ७७३ ३० वर्षांचा खंड, १००३
२४ शक्तिवर्मा इ. स. १०१५

( इं. ॲंटिक्वरी भा. २०, पा २८३ )

# टिप्पण्या

## १ चालुक्य कुलाची चन्द्रवंशापासून उत्पत्ति

इपिग्रॅफिका इंडिकाच्या ६ व्या भागांत ( पा. ३५१ ) दिलेल्या विमलादित्याच्या रणास्ति पुंडि येथील दानलेखांत चंद्रवंशाची परंपरा खालील प्रमाणें दिली आहे:–१ ब्रह्मा, २ मानसपुत्र अत्रि, ३ चंद्र, ४ बुध, ५ पुरूरवा, ६ आयु, ७ नहुष, ८ ययाति, ( चक्रवर्ति वंशकर्ता ), ९ पुरु चक्रवर्ती, १० अश्वमेधत्रितय कर्ता जनमेजय, ११ प्राचीश, १२ सैन्ययाति, १३ हयपति, १४ सार्वभौम, १५ जयसेन, १६ महाभौम, १७ ऐशानक, १८ क्रोधानन, १९ देवकि, २० रिचुक, २१ ऋक्षक, २२ मतिनार सत्रयागयाजी, सरस्वती नदीनाथः, २३ कात्यायन, २४ नील, २५ दुष्यन्त, २६ भरत–यानें गंगायमुनांच्या तीरीं सारखे यूप रोंवून आणि अश्वमेध नांवाचे महायाग करून, महाकर्म भरत असें नांव प्राप्त करून घेतलें, २७ भुमन्यु, २८ सुहोत्र, २९ हस्ती, ३० विरोचन, ३१ अजमील, ३२ तपनसुता तपतीपासून झालेला संवरण, ३३ सुधन्वा, ३४ परीक्षित, ३५ भीमसेन, ३६ प्रदीपन, ३७ शन्तनु, ३८ विचित्रवीर्य, ३९ पाण्डु, ४० धर्मआदि पांडव ( अर्जुनाची येथे स्तुति आहे ), ४१ अभिमन्यु, ४२ परीक्षित्, ४३ जनमेजय, ४४ क्षेमुक, ४५ नरवाहन, ४६ शतानीक, ४७ उदयन, यानंतर अयोध्येच्या सिंहासनावर एकुणसाठ चक्रवर्ती राजे अविछिन्न मालिकेनें बसल्यानंतर विजयादित्य नांवाचा राजा झाला.

या राजनामावलीची महाभारतांतील नामावलीशीं तुलना करतां पुष्कळ नांवें दोन्हींत हि आढळून येतात ही गोष्ट खरी, पण त्यांत महत्वाचा भेदहि दिसतोच. तो असा:—महाभारतांतील वंशावलीला मनु–इला–पुरूरवा अशी सुरवात करून पुढें आयु, नहुष, ययाति आणि पूरु अशीं नांवें दिलीं आहेत. पुढें तीन अश्वमेध करणाऱ्या जनमेजयापर्यंत ही वंशावळ गेल्यामुळें तो जनमेजय शतपथ ब्राह्मणांत आलेला जनमेजयच ठरतो. पण वस्तुतः शतपथ ब्राह्मणांतील अश्वमेधत्रय-

कर्ता जनमेजय पारिक्षित म्हणजे परीक्षिताचा पुत्र असून या भारतीय यादींतील जनमेजय पूरूचा पुत्र आहे. महाभारतांतील यादींत पुढे प्राचीन्वान्–संयाति–अहंयाति असे आले आहेत. त्यांपैकीं शेवटच्या दोहों-बद्दल वाचणाराच्या चुकीमुळें दानलेखांत सैन्ययाति आणि हयपति असे होण्याचा संभव आहे. त्यानंतर सार्वभौम, जयसेन, अवाचीन, अरिह व महाभौम अशीं जीं नांवें महाभारतांत आहेत त्यांतील अर्वाचीन आणि अरिह हीं चालुक्य दानलेखांत गाळलेलीं आहेत. त्या पुढील भारतांतील नांवे अयुतनाभि, अक्रोधन, देवातिथि, अरिह, ऋक्ष, मतिनार अशीं असून त्यांपैकीं पहिल्या चारांबद्दल सदर लेखांत ऐशानक, क्रोधानन, देवकि, रिचुक हीं असून तीं वाचण्याच्या चुकीमुळें उत्पन्न झालेलीं दिसत नाहींत. यांतील शेवटचा जो मतिनार त्यानें सरस्वतीशीं विवाह केला असें दोन्हीं ठिकाणी म्हटलें आहे. त्यांच्यानंतर भारतांत तंसु, इलिन, दुष्यन्त, भरत अशीं नांवे असून पहिल्या दोहोंबद्दल कात्यायन आणि नील हीं प्रस्तुत दानलेखांत सांगितलीं आहेत. गंगायमुनांच्या तीरीं भरतानें अश्वमेध केला हें दोन्ही ठिकाणी सांगितलें असून ती गोष्ठ शतपथ ब्राह्मणांतील कथेची पुनरावृत्तिच आहे. भरतापासून भुमन्यु, सुहोत्र, हस्ति, विकुण्ठन, अजमीढ, संवरण, कुरु येथपर्यंतचीं हीं नांवें दोन्ही ठिकाणीं जवळ जवळ सारखींच आहेत, पण वरील यादींत कुरु मात्र अजिबात वगळला आहे याचें आश्चर्य वाटते. कुरूपासूनच्या विदुर, अनश्वा, परिक्षित, प्रतीप शंतनु या नांवांपैकीं दान-लेखांतील यादींत विदुर आणि अनिश्वा हीं गाळलेलीं असून कुरूच्या ऐवजीं सुधन्वा असें आहे. शंतनूच्या पुढें विचित्रवीर्य, पाण्डु, अर्जुन, अभिमन्यु, परीक्षित्, जनमेजय हीं नांवें दोहींकडे सारखींच आहेत. जनमेजयाच्या पुढें मात्र दोहोंमध्यें मुळींच मेळ नाहीं. महाभारतांतील जनमेजय, शतानीक, अश्वमेधदत्त यांबद्दल लेखांतील यादींत जनक्षेमुक, नरवाहन, शतानीक अशीं आहेत, व शतानीकापासून एकदम इ. सनापूर्वीच्या सहाव्या शतकांतील बुद्धकालीन उदयनापर्यंत त्यांत उडी मारिली आहे. उदयनराजा हा कथा-सरित्सागरावरून प्रसिद्ध असून त्यानें प्रद्योतनामक उज्जनीच्या राजाची कन्या वासवदत्ता पळवून नेल्याची कथा सर्वश्रुतच आहे. त्याचा यौगंधरायण

नांवाचा अमात्यहि प्रसिद्ध आहे. आतां प्रस्तुत १० व्या शतकांतील या चालुक्याच्या दानपत्रांत जी वंशावळ दिली ती कोठून घेतली असावी हा प्रश्न शिल्लक रहातो. ती बहुधा कोणत्या तरी पुराणांतून घेतली असली पाहिजे; व म्हणूनच भारतांतील वंशावळीहून ती इतकी भिन्न आहे.

## २–आंध्र.

आंध्र हे कोण व त्याचें वास्तव्यस्थान कोणतें हे प्रश्न महत्वाचे असून त्यांचीं उत्तरें आमच्या दृष्टीनें आजपर्यंत दिलेल्या उत्तरांहून थोडीं भिन्न आहेत. इ. सनापूर्वी ३०० च्या सुमारास म्हणजे महाभारताच्या अंतिम संस्करणाचे काळीं आंध्रलोक सुप्रसिद्ध असून द्रविडांहून अगदीं भिन्न असे मानिलेले होते. महाभारताच्या भीष्मपर्वांत जीं हिंदुस्थानांतील निरनिराळ्या लोकांचीं नांवें आलेलीं आहेत, त्यांत आंध्राचें नांव आलेलें असून त्यांची गणना उत्तरेकडील आर्य किंवा मिश्र आर्य यांमध्येंच केलेली आहे; दक्षिणेकडील द्रविड, चोल, केरल इत्यादि म्लेच्छ जातींत नाहीं. म्हणून आमचें असें मत आहे कीं इ. सनापूर्वी ३०० च्या सुमारास आंध्रदेश आर्यांच्या संस्कृतींत पूर्णपणें आलेला असून कृष्णेच्या दक्षिणेकडील प्रदेश तसा आलेला नव्हता. आंध्रदेश म्हणजे गोदावरी व कृष्णा यांच्या मधील पूर्वकिनाऱ्यावरचा प्रदेश असें हल्लीं समजतात. पण महाभारतकालीं पूर्वघांटाच्या वरच्या प्रदेशाला आंध्र हें नांव होतें. कोसल म्हणजे नागपूर व राजपूर या प्रदेशांतून येऊन आर्यांनीं तेथें वस्ति केली होती. या वसाहतवाल्यांत ब्राह्मण आणि क्षत्रिय हेच जरी विशेषेंकरून होते, हे लोक प्रारंभीं संस्कृतोत्पन्न आर्य प्राकृत भाषा बोलत होते असा आमचा सिद्धान्त आहे. तो आम्हीं एका लेखांत नुसताच नमुद केला आहे त्यांच्या अलीकडील भाषेला त्रिकलिंग ऊर्फ तेलंगण या देशनामावरून नांव मिळालें आहे. कलिंग देश आंध्रापूर्वीच आर्यमय झालेला असल्यामुळें कलिंगांतूनच आर्य आंध्रांत उतरले असें म्हणतां येईल. पण आमच्या मतें, कोसलच्या बाजूनें आंध्रांत( वारंगळांत ) उतरतांना डोंगरांचा अडथळा नसल्यामुळें आर्यांनीं तोच मार्ग स्वीकारला असण्याचा अधिक संभव आहे. ह्युएनत्संगाच्या वेळचा आंध्र देश म्हणजे पूर्वघांटाच्या वरचाच प्रदेश होता; व गोदावरी आणि कृष्णा यांच्या मधल्या

जो वेंगीचा पट्टा त्याला त्यानें धनकट ( अमरावती ) असें म्हटलें आहे. तात्पर्य वेंगी देश त्रिकलिंगाहून भिन्न होय.

आंध्र म्हणजे पूर्वघांटावरचा देश असें याप्रमाणें सिद्ध केल्यावर आंध्रलोक हे मुख्यत्वे आर्य होते असें म्हणणें ओघासच आलें. आज मितीसहि त्या प्रदेशांतील ब्राह्मण व उच्च जातींचे शूद्र शरीररचना दृष्टया स्पष्टपणें आर्यच दिसतात. तैलंगणांतील ब्राह्मण कुलांचा अद्यापि महाराष्ट्रीय ब्राम्हणकुलांशीं शरीर-संबंध होतो, याचा विचार करतां दक्षिणी म्हटल्या जाणाऱ्या ब्राह्मणांतच त्यांचा पूर्वी अन्तर्भाव होत असला पाहिजे. ज्या आंध्र राजांनीं बलाढ्य होऊन पाटलिपुत्र जिंकिलें, ते अर्थात् द्रविड नसून मिश्र आर्यच होते. त्यांनीं पुढें पैठण आणि महाराष्ट्र यांसहि आपल्या ताब्यांत आणिलें. त्यांची राजधानी धनकट येथें असल्यामुळें तोहि प्रदेश त्यांनीं जिंकिलेला होता, व पुढें तो आंध्रांत समाविष्ट झाला असें निष्पन्न होते. म्हणून आम्हीं दक्षिणेकडील द्रविडांहून आंध्रांना भिन्न समजून त्यांतील ब्राह्मणवर्ग आणि शूद्रांपैकीं वरिष्ठवर्ग हे सर्व द्रविडांपेक्षां अधिक आर्यमय झालेले होते असें मानितों.

वेंगीच्या चालुक्यराजांच्या आश्रयानें आंध्रांनीं स्वतःच्या वाङ्मयाचा चांगला परिपोष केला. त्यांचा प्राचीन ग्रंथ म्हणजे महाभारताचें तेलगू भाषेंतील रूपान्तर हा असून तो इ. सनाच्या १० व्या शतकांत लिहिण्यांत आला. काव्यदृष्टया तो चांगला उतरला आहे असें म्हणतात. पलीकडील म्हणजे दक्षिणेकडील तामिळांप्रमाणें आंध्रांनीं विद्येंत चांगला लौकिक मिळविला. सांप्रतहि त्यांमध्यें उत्तम वैदिक आढळतात. ते सामान्यत: शिवोपासक असून वैष्णवमताचा प्रसार त्यांच्यांत फारसा नाहीं. असें कां याचा विचार पुढें प्रसंगानुसार येणार आहे.

# प्रकरण १३ वें

## ओढ्या देशांतील केसरी घराणें.

( प्राचीन वाङ्मयांत ओड्र नांवानें प्रसिद्ध असलेला जो ओढ्या देश त्याचा इतिहास प्रस्तुत प्रकरणांत कथन करावयाचा आहे. सर विल्यम हंटर या सुप्रसिद्ध ऐतिहासिक लेखकाने या देशाचा इतिहास फार मनोरंजक रीतीनें लिहिलेला आहे; व कांहीं बाबती सोडून आम्हीं येथें त्याचाच अनुवाद करणार आहो. त्याने शक्य तितका बारीक शोध करून आपला इतिहास लिहिला आहे व त्याच्या वर्णन शैलीत उच्च प्रकारची लेखनशैली दिसून येते. ओढ्याप्रांताच्या या इतिहासांत हंटरने तेथील अतिप्रसिद्ध अशा जगन्नाथाच्या देवालयांतील ताडपत्रांवरील प्राचीन लेखांचा विशेषतः उपयोग केला आहे हे सांगावयास नकोच. )

ओढ्या हें नांव हंटर साहेबाच्या मते ओड्रदेश या प्राचीन प्राकृत नांवावरून आलेले आहे; व तें वाजवीहि दिसतें. ओढ्यादेश म्हणजे पूर्वेकडे बंगालचा समुद्र आणि पश्चिमेस विंध्य पर्वत याच्या मध्यें असलेला पट्टा होय. त्याची लांबी उत्तरेकडे गंगानदीच्या पश्चिम मुखापासून तों दक्षिणेकडे चिल्कानामक प्रसिद्ध सरोवरापर्यंत आहे. या सरोवराचा विशेष असा आहे कीं, तें भरतीच्या वेळीं समुद्राचें पाणी आंत येऊन बनलेलें आहे; इतका त्याचा प्रदेश समुद्र सपाटीच्या मानानें खोलगट आहे. पश्चिमेकडील पर्वतराशींवरून वहाणाऱ्या महानदीसारख्या मोठमोठया नद्यां बरोबर वाहून आलेल्या गाळाचा जो अरुंद थर बसला आहे तोच काय तो समुद्र व हें सरोवर यांची हद्द होय. हा जमिनीचा पट्टा फार सुपीक असल्यामुळें प्राचीन काळापासून वेळोवेळीं येथें बाहेरून येऊन लोकांनीं वसाहती केल्या आहेत. दंडकारण्यासारखा निबिड प्रदेशांतहि वसाहतीकरण्यांत हौस मानणाऱ्या आर्यांचे धुरीण जो ब्राह्मणवर्ग तोच येथील पहिला वसाहत करणारा होय. या आर्यांनीं येथें आल्यावर आपला धर्म आणि भाषा मूळच्या

अनार्य लोकांना स्वीकारावयास लाविलीं, व अशा रीतीनें त्यांच्यावर आपला पगडा बसविला. हे अनार्य लोक बहुतेक कैवर्त म्हणजे मच्छमारी वर्गांपैकीं होते. आर्यांनी तेथें वसाहत केल्यापासून हा प्रान्त भरभराटावयास लागला. तथापि अंग, वंग आणि कलिंग या प्रदेशांप्रमाणेंच तोहि शुद्ध आर्यांच्या वसतीला निषिद्धप्लवीं असाच मानीत असत. मनुस्मृतीमध्यें (१०,४४) ओड्रांना म्लेच्छ म्हटले असून आर्यांनीं तेथें जाणें अप्रशस्त मानिलें आहे.

आर्यांच्या मागाहून ओढ्या प्रांतांत वसाहतीसाठी आलेले लोक बौद्ध होत. अशोकानें ओढ्याच्या पलीकडे दक्षिणेकडील कलिंग देश जिंकून तेथील अनेक लोकांचीं कत्तल केली, व तेव्हांपासून त्याला उपरति होऊन तो अहिंसावादी धर्माचा अनुयायीच बनला, हें प्रसिद्धच आहे. अशोकापासून म्हणजे इ. सनापूर्वी २५० पासून पुढें कित्येक शतकेपर्यंत ओढ्या देशावर बौद्ध धर्मांचें वर्चस्व होतें. पुढे इ. स. ३२० च्या सुमारास रक्तबाहु नांवांच्या कोणा राजानें तेथे येऊन बौद्धधर्मीयांचा पाडाव केला व तेथें आपलें राज्य स्थापिलें, आणि त्याचा वंश तेथें इ. स. ४७४ पर्यंत नांदत होता, असे सर विल्यम हंटरनें ताडपत्र लेखांच्या आधारान लिहिले आहे.

आतां हा रक्तबाहु राजा कोणत्या जातीचा व वंशाचा होता हे पहावयाचें. तो यवन जातीचा होता, असें जगन्नाथाच्या मंदिरांतील लेखसंग्रहांत म्हटलें आहे, व हंटरने त्याविषयीं शंका घेतलेली नाहीं. बॅक्ट्रिया देशांतील ग्रीक लोकांना यवन म्हणत असून त्यांनीं पंजाबांत येऊन राज्यें स्थापिली होतीं, आणि इ. स. पूर्वी दुसऱ्या शतकांत मिनंदरच्या आधिपत्याखालीं त्यांनीं अयोध्या व मगध या देशांवर स्वाऱ्या केल्या होत्या. हा सर्व इतिहास हंटरनें सविस्तर वर्णिला आहे. या यवनांपैकीं कांहीं धाडशी लोक गंगामार्गानें समुद्राशीं येऊन तेथून पुढें गलबतांतून यथावकाश ओढ्या प्रदेशांत उतरले असण्याचा संभव आहे. मध्य हिंदुस्थानांत त्यावेळीं यवनांचीं राज्यें होतीं. ही गोष्ट प्राचीन कोरींव लेखांवरून व पुराणांवरूनहि आतां स्पष्ट सिद्ध झाली आहे. यांपैकीं कैलकिल नांवांच्या ज्या यवनांचा उल्लेख पुराणांत केलेला आहे, त्यांविषयीं आम्हीं पुढें यथावकाश विवेचन करणार

आहों. कांहीं धाडशी यवनांनीं इ. स. ३२० च्या सुमारास ओढ्या प्रांतांत राज्य स्थापिलें, व तें इ. स. ४७४ पर्यंत तेथें टिकून राहिलें एवढी गोष्ट येथें सांगितली म्हणजे पुरे. हे यवन दर्यावर्दी असून त्यांच्याच नेतृत्वाखालीं हिंदूंनीं त्यावेळीं जावा बेटांत वसाहत केली असा समज आहे. तो खरा असो वा नसो, एवढें खरें कीं हे यवन मध्यप्रांतांतील कैलकिल यवनांप्रमाणेंच बौद्धमतानुयायी होते. यांत एक गंमत अशी दिसते कीं, पूर्वीं काय व आतां काय परकी देशांतून येथें आलेल्या लोकांचा ओढा येथील जुन्या वैदिक धर्मापेक्षां बौद्धधर्माकडेसच अधिक दिसून येतो; व याचें कारण हिंदुधर्मात प्रवेश करण्यास परकीयांस प्रतिबंध असून बौद्धधर्मात तसा नाहीं हेंच असावें. बौद्ध धर्माच्या उच्च नैतिक ध्येयांचा हा परिणाम होय असें सर विल्यम हंटरने म्हटलें आहे. पण इ. स. च्या पांचव्या शतकांत हिंदुधर्म व बौद्धधर्म याच्यांत उच्च नैतिक ध्येयांच्या बाबतींत फारसा फरक असावा असें आम्हांला वाटत नाहीं, व भोळ्या कल्पनांचा तर तेव्हां बौद्ध धर्मात हिंदु धर्माइतकाच सुळसुळाट होता. म्हणून परकीलोकांच्या बौद्धधर्माविषयींच्या आवडींचें खरें कारण म्हटलें म्हणजे त्यांत परधर्मीयांच्या प्रवेशाला अवसर होता, व हिंदुधर्मांत तसा तो नव्हता हेंच होय असें आमचें मत आहे. याच कारणास्तव यवन, शक आणि इतरहि परकीय लोकांनीं येथें आल्यावर हिंदुधर्माऐवजीं बौद्धधर्माचा त्वरित स्वीकार केला. तथापि येथेंही एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, जरी जातिभेदाविरुद्ध बंड उभारून बौद्ध धर्माचा मूळ अवतार झाला होता. तथापि इ. स. च्या पांचव्या शतकांत त्या धर्मांतहि जातिभेदाचें प्राबल्य हिंदुधर्माइतकेंच दिसून येत होतें. भारतीय लोकांच्या अंतःकरणांत जन्मसिद्ध जातिभेदाचा ठसा इतका उमटलेला आहे कीं, आजमितीस दक्षिणेंतील ख्रिस्ती मतानुयायांत देखील त्याचा अंमल दृग्गोचर होत आहे. जातिभेदाच्या असल्या वर्चस्वामुळें येथें परदेशाहून आलेले लोक जरी बौद्धधर्मी किंवा हिंदुधर्मी बनले, तथापि त्यांची एक स्वतंत्रच जात बनून त्यांचा इतर लोकांशीं बेटीव्यवहार होत नसे, व आधीच येथें असलेल्या शेंकडों जातींत त्यामुळें आणखी भरच पडे. असो.

प्रकृत विषयाकडे वळावयाचें तर ओढ्या देश जिंकणारे यवन हे बौद्ध मतानुयायी असून जगन्नाथ मंदिरांतील भूर्जपत्रलेखांत कथन केल्याप्रमाणें त्यांनीं त्या प्रांतांत इ. स. ४७४ पर्यंत राज्य केलें. या यवनांनीं म्हणजे ग्रीक वंशीय लोकांनीं आपल्या धर्माचे स्मारक म्हणून जीं कोरींव लेणीं करून ठेविलीं आहेत त्यांतील देव व मनुष्यें यांचे चेहरे ग्रीक वळणाचे आहेत असे पुराणवस्तुसंशोधकांचे ठाम मत आहे. एकंदर यवनांच्या हालचालीची व या गोष्टीचा विचार करतां त्याचे कर्ते म्हणजे ओढ्या प्रांतावर राज्य करणारे हे यवन मूळ बक्ट्रिया देशांतून इकडे आलेल्या ग्रीकांपैकींच होते, ह्या म्हणण्याला चांगलेंच पाठबळ मिळतें.इ. स. ४७४ त या यवन राजघराण्याला ययाति केसरी नामक कोणा राजानें हुसकून लाविलें असें उपरोक्त भूर्जपत्र लेखांत म्हटलें आहे. हें नवीन केसरी घराणें मुख्यतः शिवोपासक असून विष्णूचा देखील स्थितिकर्ता म्हणून त्यांच्याकडून योग्य तो आदर होत असे. बौद्धमत व शैवमत यांचा परस्परांवर वर्चस्व संपादण्यासाठीं १५० वर्षेपर्यंत सारखा झगडा सुरू होता. केसरी घराण्याची राजधानी भुवनेश्वर नांवाची होती व त्यांत शैवमताचें वर्चस्व होतें. डोंगरांतील आपल्या लेण्यांत राहून बौद्धयति वर्षानुवर्ष या भुवनेश्वरांतील संहारकर्त्या शिवाच्या मंदिराचा चढता कळस दोन तीन कोसांवर पसरलेल्या फलवृक्षांच्या राईवरून सारखे अवलोकन करीत होते.भुवनेश्वर मंदिराभोवतीं त्या वेळीं असलेल्या ७००० मूर्तींपैकीं आतां फक्त ५००।६००च कायत्या उरल्या आहेत; व त्यांवरून ओढ्या देशांतील शिल्पकलेच्या निरनिराळ्या पायऱ्यांची चांगली कल्पना येते. त्यांत सहाव्या शतकांतील ओबडधोबड मूर्तींपासून तों बाराव्या शतकांतील उत्तोमोत्तम कल्पकतेनें व अविश्रांतश्रमानें बनविलेल्या रम्य आकृतींपर्यंत सर्व प्रकार दिसून येतात. भिंतींतून कोरलेल्या स्तंभांवरील नक्षीचें, कोरींव कामहि तेथें अप्रतिम आहे. ( हंटरकृत ओरिसा. भाग १ पा. २३३–२३४ ).

ओरिसाच्या शिवोपासक केसरी घराण्याची स्थापना इ. स. ४७४ त झाली असें तेथील भूर्जपत्र लेखांवरून दिसतें, व हंटरनें देखील तसेंच

म्हटलें आहे. परंतु भुवनेश्वराच्या विजयाच्या काळ जो ते इ. स. ६२४ त म्हणजे त्यानंतर १५० वर्षे असा ह्मणतात, तो आमच्यामतें त्याहून आणखी कांहीं पुढचा असावा. प्रथम पुस्तकांत सांगितल्याप्रमाणे हर्षवर्धनानें आंध्र देश जिंकून आपल्या साम्राज्यांत सामील केला होता. ह्युएनत्संग जेव्हां त्या देशांत गेला, तेव्हां तेथें बौद्धधर्माचा उत्कर्ष चालू होता. तेथील लोक कायद्याला मान देणारे होते व तेथे सुमारे शंभर विहार आणि पन्नास चैत्य असून त्यांतून हजारों बौद्ध धर्मानुयायी वावरत होते ' असे ह्युएनत्संगाने लिहिलें आहे. तेथील जमिनीच्या सुपीकपणाविषयीं देखील त्यानें उल्लेख केलेला असून इतर ठिकाणांपेक्षां तेथचीं फळें बरींच मोटीं असल्या-बद्दल त्यानें सांगितले आहे. तात्पर्य या गोष्टीचा विचार करतां इ. स. ६२४ च्या सुमारास ओढया देशांत केसरी घराण्याची जरी स्थापना झालेली असली, तरी तें इतकें बलाढ्य नसून हर्षाचें अंकितच होतें. त्यांनीं आपलें स्वातंत्र्य व धर्म जो तेथे प्रस्थापित केला, तो इतर प्रान्ताप्रमाणें हर्षाच्या मृत्यूनंतरच केला असला पाहिजे.

भुवनेश्वरमंदिराच्या स्थापनेचा जो काळ भूर्जपत्रलेखांत दिला आहे, त्यावरून सुद्धां आमचेच अनुमान दृढ होतें. त्या लेखांवरून असे दिसते कीं. " त्याच्या मूळ संस्थापकाने इ. स. ५०० च्या सुमारास त्याच्या भव्य मंदिराला सुरुवात केली, त्याच्या मागून आलेल्या दोन राजांनीं त्यावर मेहनत केली, व शेवटी चवथ्या पुरुषाच्या हातून इ. स. ६५७ त ते सर्व काम पुरे झालें. " यावरून भुवनेश्वराचे मंदिर हर्षवर्धनाच्या मृत्यूनंतर पुरे झाले असें उघड होतें. दुसऱ्या एका तेथील शिलालेखांत आणखी असें म्हटलें आहे की, ' एक धर्मशील राणीनें तेथे दुसरें एक चार सभामंडपाचें गगनचुंबित शिवमंदीर बांधिलें. ' भूर्जपत्रलेखांत दिलेल्या नवव्या शतकां-तील राजांच्या कंटाळवाण्या नामावलीत मनोरंजक असा कांहीं भाग असेल तर तो पुरी येथील शिवमंदिराच्या रचनेचा उल्लेख हाच होय. हें शहर जरी यावेळीं शिवोपासक होतें, तरी पुढें तेच शिवोपासनेची प्रतिस्पर्धी जी विष्णूची उपासना तिचें माहरघर झालें. पुरी येथील मार्कंडेश्वराचें मंदिर इ. स. ८११ ते ८२९ च्या दरम्यान कुंडलकेसरीच्या हातून बांधण्यांत आलें.

( पुरुषोत्तम चंद्रिका पान ३१ यावरून हंटरनें आपल्या ग्रंथांत पान २३७ वर घेतलेला उतारा ).

केसरी राजांनीं शिवाचीं प्रचंड मंदिरें बांधिलीं ( यांतील नक्षी काम ओढ्या देशांत यानंतर बांधिलेल्या विष्णुमंदिरांतील ओंगळ कामाच्या मानानें फारच मनोहर आहे), इतकेंच नव्हे तर त्यांनीं ब्राह्मणधर्माच्या पुनरुज्जीवनास देखील विशेष तऱ्हेनें हातभार लाविला. त्यांनीं उत्तरेकडील कांहीं विद्वान ब्राह्मणांना बोलावून आणून त्यांची ओढ्यादेशांत वसाहत करविली. बंगाल व दुसरे कित्येक देश येथील राजांनीं देखील ब्राम्हण-धर्माच्या पुनरुज्जीवनार्थ हाच मार्ग स्वीकारला होता. " ओढ्यादेशांत प्रचलित असलेल्या दंतकथा आणि जगन्नाथाच्या मंदिरांतील भर्जपत्रलेख या दोहोंवरून असे दिसते कीं, तेथील केसरी घराण्याच्या संस्थापकानें अयोध्या प्रान्तांतून दहाहजार ब्राह्मणांना बोलावून घेतलें आणि त्यांना वैतरिणी नदीवरील जयपुराजवळ जमिनी देऊन तेथें त्यांची वस्ति करविली. हे सर्व ब्राह्मण राजघराण्याच्या पंथाचेच अनुयायी म्हणजे शिवो-पासक होते. तेथें पूर्वीं बौद्धमतानुयायी असलेल्या, पण आतां त्या मताचा त्याग करून पुनः वैदिक धर्मी बनलेल्या मूळच्या ब्राह्मणांशीं जेव्हां त्यांची गांठ पडली, तेव्हां या नवीन आलेल्या ब्राह्मणांनीं जरी त्यांना ब्राह्मण म्हणवूं दिलें, तरी त्यांच्यांशी ते रोटी बेटी व्यवहार करीतना. त्यामुळें जुन्या ब्राह्मणांची एक स्वतंत्र जातच बनून, या शिष्ट ब्राह्मणांशीं त्यांचा कोणत्याहि प्रकारचा संबंध घडून न आल्यामुळें ते हळु हळू शेतकरी वर्गाच्या स्थितीला येऊन पोंचले." ही ब्राह्मण जात ओढ्याप्रान्तांत अद्यापिहि शेतकीचा धंदा चांगल्याप्रकारें करीत असून त्यांना हल्लीं लौकिक ब्राह्मण अशी संज्ञा आहे, "व अर्धवट नागव्या उघड्या असलेल्या त्यांच्या अंगावर अजूनहि ब्राह्मण्याची खूण जें जानवें ते—घाणेरड्या स्थितींत कां होईना, पण—दृष्टीस पडतें." ( हंटरकृत ओरिसाचें वर्णन भाग १ ला पा. २३९. ) ओढ्यादेशांत येऊन वसाहत केलेल्या उत्तरेकडील ब्राह्मणांच्या वृत्तान्तावरून व त्यांच्या येण्यामुळें त्या प्रान्तांत झालेल्या लौकिक आणि वैदिक अशा ब्राह्मणांच्या जातीवरून एकंदर हिंदु-

स्थानांत उच्च जातींचा सामाजिक दर्जा ठरण्याची जी पद्धत बनून गेली तिचें सामान्य स्वरूप लक्षांत येते. एका जातींच्या अनेक पोटजाती कशा बनल्या हा प्रश्न सकृद्दर्शनीं मोठा गूढ दिसतो; परंतु थोडा विचार केल्यास ब्राह्मण ब्राह्मणांपासून, क्षत्रिय क्षत्रियांपासून असेहि भिन्न होण्याचें मुख्य कारण त्यांपैकीं कांहींनीं शेकडों वर्षें बौद्धमताचा अंगिकार केला होता हेच होय, व त्याचमुळें एका जातीच्या किंवा वर्णाच्या पोट जातींमध्यें हल्लीं जो रोटी बेटीव्यवहार अनेक ठिकाणीं होत नाहीं, त्या आपाततःचमत्कारिक भासणाऱ्या प्रकाराची उत्पत्ति झाली असें दिसून येईल.

मोडकळीस आलेल्या बौद्धधर्मीय विहारादिकांच्या सन्निधच केसरी घराण्याच्या भुवनेश्वर या राजधानीची स्थापना झालेली होती; व वर सांगितल्या प्रमाणें जयपुर येथील वसाहत म्हणजे धर्माच्या पुनरुज्जीवनामुळे स्थापन झालेली नवी राजधानी होय. या दोन ठिकाणांमध्यें महानदीचा दुआब आहे. या नव्या जयपुर राजधानीचा हळुहळू उत्कर्ष होत गेला; आणि ह्युएनत्संगाने त्या नगराला भेटहि दिली होती असे कनिंगहॅम म्हणतो; पण त्याविषयीं आम्हांला शंका आहे. तथापि सोळाव्या शतकामध्यें हिंदु व मुसलमान यांमध्ये मोठें युद्ध या नगरांत होऊन ते मुसलमानांच्या हातांत गेले व त्याची दुर्दशा झाली. " त्यांत शिल्लक राहिलेल्या प्राचीन इमारतींच्या अवशेषांवरून त्या नगराच्या तत्कालीन वैभवाची चांगली साक्ष पटते. त्यांतील मोडकीं देवळें व प्रचंड पुतळे आणि मूर्ति पाहून धार्मिक बुद्धीच्या हिंदु प्रेक्षकांच्या मनांत त्याच्या तत्कालीन अनुल्लंघनीय पावित्र्याचे चित्र उभें रहाते. इतिहासकाराला तर त्याचें याहूनहि अधिक महत्व वाटतें; कारण नवीन स्थापन झालेल्या राजघराण्याचा धर्म इतर लोकांवर लादण्यासाठीं आपल्या राजसत्तेचा उपयोग करून उत्तरेकडील ब्राह्मणांची जी येथे वसाहत करण्यात आली, ती फार मोठ्या प्रमाणावर असून तिच्या स्थापनेविषयी पुरावाहि भरपूर आहे. ( हंटरकृत ओरिसा वर्णन सदर पान ३०१ )

हंटरनें या नगरांतील कांहीं इमारतींच्या अवशिष्ट भागांचें व त्यांतील उलथ्या पालथ्या घातलेल्या मूर्तींचें रसभरित वर्णन केले आहे व आपणही

त्यांचा संक्षेपानें परामर्ष घेऊं. "मूर्तिकभंजक अशा महमदीयांच्या क्रोधापासून या मूर्तीचें रक्षण झालेलें असून ब्रिटिश अमदानींतहि पब्लिक वर्क्स खात्याच्या विनाशक कर्तबगारीला केसरी घराण्याच्या कलाकसुरीच्या वैभवाची साक्ष नष्ट करतां आलेली नाहीं." त्यांत जंगलाच्या आंतून डोकावणारे प्रमाशी रचनेच्या एखाद्या स्तंभाचें उच्चशिखर मुसलमान वीरांच्या मूर्तिभंजक क्रोधाची गति कुंठित झाल्याचे सुचवीत आहे. अफगाण लोकांनीं साखळदंड लावून हत्तींकडून ते खालीं पाडविण्याचा जोराचा प्रयत्न केला होता. पण दहाव्या शतकांत हिंदूंनीं उभारलेल्या या रमणीय स्तंभाचें उच्चाटन करण्यांत सोळाव्या शतकांतील रानटी स्वभावाच्या त्या जेत्यांना कांहीं यश आलें नाहीं. त्याच्या माथ्यावर बसविलेल्या गरुडाला मात्र त्यांनी पाडून टाकिले. तथापि ज्यावर तो गरुड बसविलेला होता, तो सुबक दांडा अद्यापिहि झालेला मानभंग विसरुन मनुष्यकृत उत्तमोत्तम वस्तूंचा फडशा पाडण्यांतच आपण देवाची कृपा संपादन करीत आहों असे मानणाऱ्या तत्कालीन महमदीयांच्या विरुद्ध साक्ष देण्यासाठीं आपलें डोकें वर करून उभा आहे. ( सदर पान २६७ ).

ओरिसा देशांतील विशेष महत्वाचे व प्रचंड असे जे पुतळे होते, ते मात्र उपडे पडून राहिल्यामुळे मुसलमानांच्या तडाख्यांतून निसटले. ते आपली मुखें जमीनींत खुपसून दोन शतकें जे निमूटपणें पडून होते, ते १८६६ साली एका बहादूर इंग्लिश मॅजिस्ट्रेटाच्या कृपेनें वर उठले. आणि नदीकांठीं सार्वजनिक इमारतीच्या मध्यभागीं स्थानापन्न झाले. या मूर्तींपैकी तीन निळ्या पाषाणाचे एकसंधी असून बसण्याच्या बैठकींतहि त्यांची उंची कोणत्याहि मनुष्यापेक्षां उंच आहे. त्यांतील एक स्वर्गमहिषी जी इन्द्राणी, तिची, दुसरी वराहरूपी श्रीविष्णूची अर्धांगी होण्यासाठी मर्त्यरूप धारण केलेल्या वसुंधरेची आणि तिसरी प्रलयदेवता जी कालीमाता तिची अशा आहेत. या प्रचंड मूर्तींसाठीं लागलेले एकसंधी नीलवर्ण कठीण पाषाणखंड नदीपलीकडील दुआबाच्या पलीकडे सुमारें शंभर मैलांवर असलेल्या डोंगरांतून ओढून आणलेले असून त्यांवर केलेलें टांकीचें काम हजार वर्षांपूर्वीच्या हिंदुकारागिरांच्या उत्कृष्ट कारागिरीची अद्यापि साक्ष देत आहेत.

इंद्राणीची चतुर्भुज मूर्ति बसलेल्या स्थितींत असून तिची मुद्रा गंभीर व तेजस्वी असून, तिचे पाय मोठ्या सुबकरीतीने कोरलेल्या हत्तीच्या पाठीवर ठेवलेले आहेत. तिच्या अंगावरील उंची वस्त्र तिच्या पायांवर पडलें असून त्याच्या सुरकुत्या फार मनोहर व नाजुक दाखविल्या आहेत, व त्याच्यावर कंबरेभोवतीं कमरपट्टा आहे. तिचे कुरळेकेसांची पुढे पुढें निमूळती होणारी वेणी रत्नांनी गुंफलेली असून तिचा एक पेड डाव्या व दुसरा उजव्या खांद्यावर रुळतो आहे. वसुंधरेची मूर्ति आपल्या तान्हुल्या बालकाला मांडीवर घेऊन बसलेली आहे, व त्या स्थितींत ती दुसऱ्या दोन्ही मूर्तींप्रमाणें आठ फूट उंच आणि चार फूट रुंद आहे. ती सुद्धां चतुर्भुज असून तिच्या डाव्या हाताच्या कनिष्ठिकेत जी मुदी आहे,तिजवरून इतक्या प्राचीन काळीं सुद्धां हिंदु स्त्रिया बोटांत अंगठ्या घालीत असत असें दिसतें. तिचें वाहन महिष असून तोहि सुबक कोरलेला आहे. त्याच्या मस्तकावरील रेषा तर थक्क करून सोडणाऱ्या बारकाईनें दाखविल्या आहेत. नदीच्या एका जीर्ण घाटांच्या माथ्याजवळ या वसुंधरादेवीच्या पतीचें म्हणजे वराहरूपी विष्णूचें मंदिर आहे.

तथापि या तिन्ही प्रचंड एकसंधी मूर्तींत विशेष चमत्कारजनक म्हटली म्हणजे सर्व संहारक रुद्राची अर्धांगी जी काली तिचीच होय. ही मूर्ति केवळ नग्न अस्थिपंजररूप असून त्यावरील त्वचा लोंबत आहे, व आंतील धमन्या आणि स्नायु तींतून उठून आपलें भयंकर रूप प्रकट करीत आहेत. मनुष्यजातीच्या मृत्यूप्रवण देहस्थितीच्या ह्या भयाण मूर्तीचे केश विंचरून व मागें वळवून सर्पाच्या नाडीनें बांधिलेले आहेत. तिच्या मस्तकाच्या मध्यभागीं नरकरोटीचें पिंपळपान लटकविलेलें असून, त्या सर्वांवर सर्पाच्या फणेचें छत्र उभारलेले आहे. तिच्या केशांचे सर्पाकार पेड तिच्या गालांवर पिळून लटकत आहेत. तिच्या गळ्यांत अनेक नररुंडांची माळ असून ती तिच्या स्तनांवरून व मांड्यांवरून पायापर्यंत लोंबत आहे. ती आपल्या पतीच्या अंगावर बसली असून हा सर्व पुतळा एका कलमपत्ररूपी आसनावर स्थिरावला आहे. याशिवाय सप्तमातांच्या मूर्ति आणि शुंभनिशुंभ

दैत्य पायांशीं मरून पडले आहेत. अशा प्रकारची कालिकेची आणखी एक मूर्ति अशाहि या नदीकांठीं दृष्टीस पडतात. (सदर पान २६८–२६९)–हें व इतर शिल्प काम केसरी घराण्याच्या राज्यांतील हिंदुकारागिरांच्या अप्रतिम कौशल्याची साक्ष पटवीत असून त्या शिल्पज्ञांच्या अचाट कल्पना शक्तीचें व तत्कालीन स्थापत्यप्रवीणांच्या यांत्रिक चातुर्याचे करावे तितके कौतुक थोडेंच होणार आहे. आजच्यामारख्या याऱ्या व आगगाडीच्या रस्त्या-सारख्या सोई नसतांना त्या कारागिरांनीं शंभर मैलांवर असलेल्या डोंगरांतून एवढे प्रचंड पाषाण कसे आणले याची कल्पनाच केली पाहिजे.

पण ओढयाप्रांन्तांतील स्थापत्य शास्त्रज्ञांच्या नैपुण्याचें आणखी प्रमाण पाहिजे असेल तर महानदीच्या दक्षिण मुखावर त्यांनीं जो पूल बांधिला आहे त्यांत दिसून येईल. “ केसरी राजांपैकीं पहिले पहिले राजे आपला दरबार शिवमंदिरांनीं खचित अशा भुवनेश्वरपुरांत कधीं भरवीत, तर कधीं महानदीच्या कांठीं नवीन बसविलेल्या ब्राह्मण वस्तीच्या जयपुरांत भरवीत. पण पुढें इ. स. ९५३ ते ९६१ पर्यंत राज्य केलेल्या एका रणधीर राजानें महानदीचीं मुखें फुटण्याच्या स्थळाचे लष्करीदृष्ट्या महत्व ओळ-खून तेथे कटक नांवाची आपली राजधानी स्थापन केली, व तीच अद्यापिहि ओढया प्रांतांची राजधानी आहे. त्याने महानदीच्या प्रवाहाला चुनेगच्चीचा कित्येक मैल लांबीचा भक्कम बांध घालून अडवून टाकिले. हा बांध देखील प्रचंड पाषाणांचाच असून त्यांतून कित्येक तर २५ फूटहि उंच आहेत. त्याच्या मागाहून आलेल्या राजाने नदीच्या दक्षिणतीरावर एक किल्ला बांधून राजधानीची बळकटी वाढविली, व आणखी शंभर वर्षांनीं दुसऱ्या एका राजानें ज्या पुलावरून आजहि यात्रेकरू जगन्नाथपुरींत प्रवेश करतात, तो प्रचंड पूल बांधिला. हा पूल तांबडया रंगाच्या दगडाचा असून ते खाणींतून काढतेवेळीं जरी मऊ असले, तरी त्यावर हवेचा परिणाम झाल्यावर फारच कठीण होतात. या पुलाच्या एकंदर अठरा कमानी असून मधील कमान अठरा फूट उंच व चवदा फूट रुंद आहे, व त्यानें एकंदर २९० फूट रुंदीच्या पायावर आच्छा-दन घातलें आहे. तत्कालीन हिंदु स्थापत्यकोविदांना कमान उभारण्याची

युक्ति माहीत नव्हती. तथापि त्यांची दुसरी एक योजना असून तिचा ते साध्या दरवाज्याच्या कमानीपासून तों देवळाच्या उंच उंच घुमटांपर्यंत सर्वत्र उपयोग करीत. ही योजना कांही कमी चातुर्याची होती असें नाहीं. उलट केलेल्या जिन्यासारखे या योजनेचें स्वरूप असून त्यांतील प्रत्येक वरचा दगड खालच्या दगडाच्यापुढें आलेला असतो. असल्या तऱ्हेच्या कमानींचा हा महानदीवरील पूल ११ व्या शतकांतील चतुर स्थापत्यकोविदांनीं तयार केला आहे.

केसरी घराण्याच्या या भव्यइमारती व पुलासारख्या वैभव चिन्हांव्यतिरिक्त राजकारणविषयक कांहीं गोष्टी आज सांगण्यासारख्या नाहींत. भूर्जपत्रलेखांत म्हटल्याप्रमाणे इ. स. ५०० च्या सुमारास हें घराणे ओढया प्रांतांत राज्यारूढ झाले खरें, पण त्याच्या खऱ्या सामर्थ्याचा व स्वतंत्रतेचा उदय पुढं इ स. ६५० सुमारास झाला, आणि भुवनेश्वराच्या मंदिराचें काम पुरें होऊन त्याच्या सामर्थ्याची परिणति हर्षवर्धनाच्या मृत्यूनंतरच झाली. केसरी राजे जुन्या तऱ्हेचे शैव मतानुयायी असल्यामुळे त्यांनीं अयोध्येहून हजारों शैव ब्राह्मण आणवून व त्यांना जयपुराजवळ जमिनी देऊन तेथील रहिवाशी केले, व त्यांचे वंशज अजूनहि हजार वर्षांपूर्वी धर्मशील राजांपासून संपादन केलेल्या, या जमीनीचा उपयोग घेत आहेत, केसरी घराण्याचा अंमल ओढयाप्रांतांत इ. स. ११३२ पर्यंत होता, व इ. स. १०३० त कटक शहराची स्थापना झाल्यापासून त्याची राजधानी तेथेंच होती, असें भूर्जपत्रलेखांवरून दिसून येतें. इ. स. १०३० च्या सुमारास ओढयाप्रांतांत राजक्रान्ति होऊन केसरी घराणें नामशेष झालें. यावेळीं राज्यापेक्षां बरोबर धर्मक्रान्ति देखील झाली, व एका अर्थी वैष्णवमत रूपाने बौद्ध धर्मानेच आपले डोके पुन्हां वर केले. पण या राजकीय व धार्मिक क्रान्तिचा काळ हा आपल्या तिसऱ्या पुस्तकांत पडत असल्यामुळें ओढयादेशासंबंधाचे विवेचन येथेच पुरे झाले.

वरील विवेचनावरून दिसून येईल की, केसरी घराण्याचा अंमल इ. स. ५०० पासून ११३२ पर्यंत म्हणजे ६०० वर्षांवर चालू होता व हा काळ कांहीं थोडाथोडका नव्हे. पण प्रथम पुस्तकांत सांगितल्याप्रमाणें एका बाजूला असलेल्या प्रदेशांत असा प्रकार दृष्टीस पडतो. पूर्वीं आसामच्या राजघराण्याविषयीं वर्णन करतांना तेंहि असेंच अनेक शतके सारखें चालू

असल्याचें सांगितलेंच आहे. तथापि जगन्नाथपुरीचे भूर्जपत्र लेख तितके विश्वसनीय नाहींत, व हंटरनें दाखविल्याप्रमाणें त्यांतील विधानांशीं विरुद्ध अशीं विधाने दुसऱ्या लेखांत नजरेस येतात. भूर्जलेखांप्रमाणे पहातां केसरी घराण्यांत इ. स. ५०० पासून ११३२ पर्यंत एकंदर ४४ राजे झाले ( ४४ राजांना ६३२ वर्षांचा अवधि म्हणजे अगदीं अशक्य नाहीं ), व त्यांच्या मागून गंग घराणें तेथें स्थापित झाले. पण वर सांगितलेल्या दुसऱ्या लेखांवरून असें दिसतें कीं, केसरी व गंग या घराण्याच्या दरम्यान ओढ्या प्रान्तांत कोणी सूर्योपासक घराणे राज्य करीत होते. हेहि लेख हंटरच्यामते मोठे विश्वसनीय आहेत असें नाहीं. तथापि जगन्नाथपुरीत वैष्णव मत प्रचलित होण्यापूर्वी सूर्योपासना करणारे राजे तेथें राज्य करीत होते, ही गोष्ट नाकबूल करतां येत नाहीं. कारण सर्व हिंदुस्थानांत अतिशय सुंदर असें सूर्य मंदिर ओढ्या प्रान्तांतच आज दिसून येत आहे. या सूर्योपासक राजाचें वर्णनहि आम्हीं तिसऱ्या पुस्तकासाठीं राखून ठेवतो.

केसरी राजांची राजकीय कर्तबगारी विशेष सांगण्यासारखी नसल्यामुळे त्यांची नामावली देण्याच्या भानगडीत आम्ही पडत नाहीं. हंटरने मोठ्या परिश्रमाने ती तयार करून आपल्या पुस्तकाच्या परिशिष्टांत दाखल केलेली आहे. या घराण्याच्या ६०० वर्षांच्या काळांत त्याला उत्तरेकडील राजांकडून एक दोन वेळां उपसर्ग पोंचून तें जिंकलेंहि गेले होते. नेपाळांतील जयदेवाच्या कोरींव लेखांत आसामच्या हर्षदेव राजाने ओड्र देश जिंकल्याचे स्पष्ट सांगितले आहे. तथापि उत्तरेकडील असोत वा दक्षिणेकडील असोत ओढ्यादेशावरील या वावटळी क्षणिकच होत्या व एकंदरींत केसरी घराण्याला फारसा उपसर्ग न पोंचतां ते अस्खलित रीतीनेंच ६०० वर्षें चालू होतें असे म्हणावयास हरकत नाही. स्वतः हे राजे महत्वाकांक्षी नसल्यामुळे त्यांनीहि दुसऱ्यांचीं राज्ये जिंकण्याचा फारसा प्रयत्न केला नाही. तथापि कदाचित् दक्षिणेकडील गंजम प्रांत म्हणजे ज्याला ह्युएनत्संग कोंगुड म्हणतो तो आणि उत्तरेकडील ताम्रलिप्ति उर्फ अलिकडील मिदनापुर जिल्ह्याचा भाग हे केसरी राजांच्या अमदानींत ओढ्या प्रांतांत अनेक वेळां समाविष्ट झालेले असावे असें वाटतें.

# प्रकरण १४ वें.

## पूर्वेकडील राज्यें.

### १ गौड देशांतील गुप्त राजे.

या प्रकरणांत पूर्वेकडील देशांच्या इतिहासाकडे वळूं. भरतखंडाच्या पूर्वभागाचे निसर्गतःच तीन पोटभाग झालेले आहेत, बहार म्हणजे मगध पश्चिम बंगाल आणि पूर्व बंगाल. पूर्वेकडील देशांचीं प्राचीन नांवें अंग, वंग आणि कलिंग अशीं होतीं; पण मगध आणि ओड्र हीं नांवे देखील प्राचीन असून त्यांनीं दर्शित होणारे देश साधारणतः एकाच साम्राज्यांत मोडत होते. बंगाल प्रांताला गौड हें नांव केव्हां प्राप्त झालें, याचा निर्णय करतां येत नाहीं. ते नांव फार प्राचीन नसून मागाहून केव्हां तरी आलेलें आहे यांत शंका नाहीं. महाभारतांत गौड हें नांव आलेलें नाहीं; तसेंच ५ व्या शतकांत होऊन गेलेल्या वराहमिहिरानेंहि त्याचा उल्लेख केलेला नाहीं. ठाणेश्वरच्या आसमंतातूच्या प्रदेशाला गुड अथवा गौड हें नांव यानें दिलेले * आढळतें. तथापि जॅकसननें ही गोष्ट लोकांच्या नजरेंत आणिली तोंपर्यंत तिचा सर्वांनाच अगदींच विसर पडला होता. आजच्या समजुतीप्रमाणें गौड म्हणजे केवळ बंगाल होय. पण प्रथमतःगौड हें नांव दिल्लीच्या वायव्येकडील प्रदेशाला लाविलेले असे ही गोष्ट आतां लक्षांत घेतली पाहिजे. त्या प्रदेशांतील ब्राह्मण अजूनसुद्धां आपल्याला आदि गौड म्हणजे पहिले गौड असें म्हणवितात. इ. सनाच्या ५ व्या किंवा ६ व्या शतकाच्या सुमारास या प्रदेशांतील कित्येक ब्राह्मण हूणांच्या त्रासामुळें कंटाळून पूर्वेकडे गेले असावे, व तेथे पश्चिम बंगाल्यांत त्यांनीं वसाहत केली असावी असें दिसतें. त्यामुळे त्यांनीं वसतीकेलेल्या प्रदेशाला गौड हें नांव

---

* वराहमिहिरानें मध्यदेशांच्या यादींत गुड हे नांव सांगितलें असून पूर्वेकडील देशाच्या नामावलीत पौड्र वगैरे नांवाबरोबर भद्रगौडक नांवाचा उल्लेख केला आहे.

मिळालें. सातव्या व आठव्या शतकांतील कोरीव लेखांत या प्रदेशाला गौड हें नांव दिलेलें आहेच. ७ व्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेलेल्या बाणभट्टाने हर्षचरित्रांत शशांक राजाला गौडाधिप म्हटलें असून ह्युएन त्संगानें त्याला कर्णसुवर्णाचा राजा म्हटलें आहे. म्हणजे ७ व्या शतकाच्या आरंभी कर्ण सुवर्ण देशाला गौड नांव मिळालें होतें हे उघड होते. त्या ठिकाणीं गुप्त सम्राटांच्या एका शाखेंतील राजे राज्य करीत होते. शशांक राज्यवर्धनाचा विश्वासघाताने खून करविल्यानंतर म्हणजे इ. स. ६०६ नंतर हि बरींच वर्षे गादीवर होता, व हर्षाने आपल्या दिग्विजयांत जरी त्याचा पराभव केला तरी त्याला क्षमा करून त्याच्या एका कन्येशीं त्यानें विवाह केला. ही कन्या पूर्वी राज्यवर्धनालाहि देण्याचें घाटत होते. पुढें ह्युएन-त्संग तेथें गेला तेव्हां शशांक हयात नव्हता. या प्रवाशाने कर्णसुवर्णाचे म्हणजे अलीकडील मुर्शिदाबाद प्रांन्ताचे वर्णन करतांता तेथील लोकांना-विद्येची फार अभिरुचि असून तेथें ५० विहार व १०० देवालयें असल्याचे जें सांगितले आहे, त्यावरून त्यावेळींहि पश्चिम बंगाल्यांत बौद्धधर्माची फारशी चलती नव्हती असें दिसून येते.

गौड ह्या नांवांचा उपलब्ध असलेल्या प्राचीन लेखांतील दुसरा उल्लेख म्हटला तर आदित्यसेनाच्या गुप्त घराण्यासंबंधीं होय. हें गुप्तकुल म्हणजे वर सांगितलेल्या शाखेहून निराळीच शाखा होती. या विषयीं आम्ही आमचें मत प्रथम पुस्तकांत नमूद केलेंच आहे कीं, हें गुप्ताचें कुल, कनोजच्या ग्रहवर्म्याचा शत्रु जो मालवाधिप देवगुप्त त्याच्या वधानंतर माळव्यांतून इकडे येऊन राहिले. देवगुप्ताचा सापत्न बंधु माधवगुप्त हर्षवर्धनाचा मित्र व अनुयायी असून हर्षाच्या कारकीर्दींत व त्याच्या मृत्यूनंतरहि माळव्याचें राज्य हर्षाच्या साम्राज्यांत समाविष्ट झालेले असल्यामुळें माधावगुप्तनें मगध देशांत हर्षाच्या साहायानें नवीन राज्य स्थापिलें. अफसडच्या लेखांत आदित्यसेनाला हर्षाचा "प्रियमित्र जो माधवगुप्त" त्याचा पुत्र म्हटलें आहे. हा लेख हर्ष शक ६६ म्हणजे इ. स. ७६२ तील असून तो सूक्ष्मशिव नामक एका गौडाने तयार केलेला होता. ( प्रथम पुस्तकाच्या

परिशिष्टांत हा लेख दिला आहे तो पहा. ). इतक्या प्राचीन काळींहि गौडांचें वाङ्मयांतील प्रावीण्य या लेखावरून दिसून येण्यासारखें आहे. आजहि गौड पंडित या विषयीं प्रसिद्धच आहेत. त्या वेळीं मगध देश आणि गौड म्हणजे पश्चिम बंगाल देश हे एकाच राजाच्या अमलाखालीं होते असें गौडवहो नामक प्राकृत काव्यावरून दिसून येतें. या काव्याविषयीं आतां थोडें विवेचन करूं. कनोजच्या यशोवर्मा नांवांच्या राजानें गौडदेशावर स्वारी करून तेथील गौडराजाचा युद्धांत वध केला, असा त्या काव्याचा विषय आहे. या गौड राजाला त्यांत मगधाधिप असेहि कोठें कोठें म्हटलें आहे. आतां हा राजा कोण असा प्रश्न आहे. श. मा. पंडितांच्या मताला अनुसरून आम्हीं यशोवर्म्याचा काळ इ. स. ६७५ ते ७१५ हाच मानिला आहे. जीवितगुप्ताच्या देव बर्नाक येथील ताम्रलेखांत माधवगुप्तापासून गुप्त राजांची जी नामावली आढळते ती अशी:—१ माधव, २ आदित्यसेन ( इ. स. ६७२ ), ३ देवगुप्त, ४ विष्णुगुप्त आणि ५ वा जीवितगुप्त. जीवित गुप्ताचा काल त्यांत दिलेला नसल्यामुळें तो अनुमानानेंच काढणें भाग आहे. अशोवर्म्यानें ज्याचा वध केला तो गौडराजा जीवितगुप्तच होय असें कित्येक शोधक म्हणतात. पण हे युद्ध काश्मीरच्या ललितादित्यानें इ. स. ७०० या वर्षी यशोवर्म्याला पराजित करण्यापूर्वी झालेलें होतें. म्हणजे पूर्वी सांगितलेले या राजांचे काल लक्षांत घेतां यशोवर्म्यानें वधिलेला राजा जीवितगुप्त नसून देवगुप्त असला पाहिजे. त्यावेळीं दिग्विजयाचा उद्देश राज्यें खालसा करण्याचा नसल्यामुळें गौड राजाचा वध झाल्यावर त्याचा पुत्र पुनः सिंहासनारूढ झाला. त्याचें नांव विष्णुगुप्त असून त्याचाच पुढें ललितादित्यानें पराजय केला असावा. विष्णुगुप्तानें पुढें इ. स. ७०० नंतर केव्हांतरी ललितादित्याचें आधिपत्य झुगारून देण्यासाठीं शस्त्र उचलल्यामुळें पुनः ललितादित्याच्या हातून त्याचा पराजय होऊन तो बंदिवान झाला. काश्मीरच्या इतिहासांत पूर्वी सांगितल्याप्रमाणें विष्णुगुप्ताला जरी जीवदान देण्याचें वचन मिळालें होतें, तरी काश्मीरांत गेल्यावर त्याचा खून झाला. त्याच्या मागून जीवितगुप्त राज्यावर आला. दवबर्नाक येथें जो लेख सांपडला आहे तो याचाच होय. या गुप्तराजांच्या

कुलांचें आम्हीं मालवदेशांतील गुप्त कुलाशीं जे ऐक्य दाखविलें आहे, त्याला कारणें सबळ आहेत. देव गुप्त व जीवित गुप्त हीं नांवें फिरून आलेलीं आहेत. ( प्रथम पुस्तकांतील वंशावळ पहा ). जीवितगुप्ताच्या काळाचें अनुमान करावयाचे तर दरपिढीचे साधारणमान जें २० वर्षें तें धरिलें असतां माधवगुप्तापासून तो १०० वर्षांनी म्हणजे इ. स. ७३२ च्या सुमारास येतो. पूर्वीं काश्मीरचें वर्णन देतांना राजतरंगिणीकारानें मुक्तापीडाचा काळ इ. स. ६९९ ते ७३५ च्या दरम्यानचा म्हणून जो दिला आहे तो बरोबर आहे असें आम्हीं दाखविलेंच आहे. या गोष्टी सर्व एकत्र केल्यास काश्मीरांत वचन-भंग-पूर्वक मारला गेलेला गुप्त राजा जीवितगुप्त नव्हे असेंच म्हणावें लागते. जीवितगुप्ताच्या देवबर्नाक येथील लेखावरून असें दिसून येते कीं, आदित्यसेन हा परमभागवत म्हणजे विष्णुभक्त असून त्याची राणी कोणदेवी नांवाची होती, ( अफसजडच्या लेखांतहि असेंच सांगितलें आहे. ) तसेंच त्यांचा पुत्र देवगुप्त हा परम माहेश्वर म्हणजे शिवभक्त होता, व त्याच्या राणीचें नांव कमलादेवी होतें; देवगुप्ताचा पुत्र विष्णुगुप्त हाहि शैवच असून त्याच्या स्त्रीचें नांव इज्यादेवी होतें; त्याचा पुत्र जीवितगुप्त हा बहुधा सूर्याचा भक्त असावा ( बहुधा म्हणावयाचें कारण लेखांतील परम शब्दापुढचीं अक्षरें दुर्दैवाने वाचतां येण्यासारखीं नाहींत ). कारण त्यानें सूर्योपासकांना दिलेल्या गांवाची सनद त्यानें पुनः कायम करून दिल्याचें वर्णन आहे. या हकीगतीवरून हे गुप्तराजे बौद्धधर्मीय नव्हते एवढें तरी खास ठरतें. कदाचित त्यांचा आदिपुरुष जो माधवगुप्त तो हर्षाचा स्नेही असल्यामुळें बौद्ध बनला असेल. परंतु हर्षाच्या निधनानंतर बौद्ध धर्माला सर्वत्रच उतरती कळा लागली, त्याप्रमाणे गौड देशांतहि लागून त्या ठिकाणीं ब्राह्मण धर्माचे म्हणजे प्राचीन आर्य वैदिकधर्माचें पुनरूज्जीवन होऊन शिव, विष्णु आणि सूर्य यांची उपासना सुरू झाली. गौडराजाचा काश्मीर देशांत विश्वासघात व खून झाल्यावर त्याबद्दल त्याच्या एकनिष्ठ सेवकांनीं वचनभंगाबद्दल परिहासकेशवाच्या मूर्तीचा अपमान करून सूड घेतल्याचें जें राजतरंगिणींत वर्णन आहे, तें मोठें हृदयद्रावक असून त्यावरून हिंदी-प्रजेची आपल्या राजावर केवढी जबर निष्ठा असते हें उत्तम व्यक्त होत आहे.

यापुढील गौडदेशीय गुप्तांचा उल्लेख नेपाळच्या जयदेवराजाच्या लेखांत आलेला आहे. हा लेख हर्ष शक १५३ म्हणजे इ. स. ७६९ तील असून (इंडियन ॲटिक्करी पुस्तक पा. १७८) त्यांत दोन महत्वाच्या गोष्टी आढळून येतात. त्या अशा कीं " जयदेवाचा पिता जो शिवदेव त्यानें मौखरीच्या शूर घराण्यांतील भोगवर्मानामक राजाच्या कन्येशीं विवाह केला होता, व ती कन्या प्रतापशाली मगधाधिपति जो आदित्यसेन त्याची नात होती." शिवदेवाच्या राणीच्या पितामहाचा हा जो विशेष मोठा म्हणून उल्लेख आहे, त्यावरून भोगवर्मा व आ-दित्यसेन यांपैकीं आदित्यसेन अधिक बलाढ्य होता असे दिसून येते. आदित्यसेनाचे हे गुप्त कुल म्हणजे माधवगुप्ताचाच वंश असावा असे आम्हांला वाटतें. इ. स. ६७२ नंतर आदित्यसेन हे नांव इ. स. ७६९ पुनः आले. वरील लेखावरून आणखी असेहि म्हणतां येते कीं, बहार प्रान्तांत मगधानजीक मौखरींचाहि वंश चालू असून, गुप्त राजे आपल्या कन्या त्या वंशांत देत; आणि तसेंच मौखरी राजेहि आपल्या कन्या शेजारच्या नेपाळांतील लच्छिवि नामक क्षत्रिय राजांना देत असत. पूर्वी शार्दूल आदिकरून ज्या मौखरी राजांचा उल्लेख केला आहे, त्यांच्याचपैकीं वर सांगितलेला भोगवर्मा बहुधा असावा; व हें मौखरि कुल कनोजच्या मौखरीचीच एक शाखा असावी.

ताम्रलेख व शिलालेख यांत याहून अधिक गौडदेशीय गुप्तवंशाचा कोठे उल्लेख उपलब्ध नाहीं. हे गुप्त राजे इ. स. ६५० च्या सुमारास होऊन गेलेल्या माधवगुप्ताचे वंशज असून इ. स. ८००च्या सुमारास बहुधा नागशेष झाले असावे. त्यांच्या ऱ्हासाचे कारण पूर्वी सांगितलेला राजकुलांच्या ऱ्हासाचा सामान्य नियम तर खराच; तथापि बौद्धमताच्या प्रचाराचाहि त्याशीं थोडासा संभव असला पाहिजे. बंगालमध्यें इ. स. ८००नंतर बौद्धधर्मीय तत्वांचा पुनः प्रचार सुरू झाला हें पुढें आम्हीं सांगणारच आहों. या बौद्धमताचा परिणाम असा झाला कीं, लोकांतून युद्धविषयक तेज नाहींसें होऊन ते अनेक लोकांकडून चिरडले जाण्यास पात्र झाले.

## ( २ ) वंगदेश.

इसवी सनाच्या सातव्या व आठव्या शतकांत वंगदेश गौडदेशाहून भिन्न होता. वंग हें नांव बरेंच प्राचीन असून अंग आणि वंग हीं नांवे नित्य जोडीने प्राचीन ग्रंथांत सांगितलेलीं आढळतात. वंग हे नांव खरें म्हटले तर गौड धरून सगळ्या देशाला लावीत असत; व त्यावरून निघालेलें बंगाल हें नांव आज जें सर्व प्रान्ताला लावितात तेहि योग्यच आहे. पण ७ व्या व ८ व्या शतकांत वंग म्हणजे केवळ पूर्व बंगाल असा संकुचित अर्थ होता. कनोजच्या यशोवर्म्यानें गौडराजाचा युद्धांत वध केल्यावर पुढे वंगावर चाल करून तोहि प्रांत जिंकिला असें म्हटलें आहे. तसेच राष्ट्रकूटांच्या दोन लेखांत असे म्हटले आहे कीं, कनोजच्या राजाने बंगालवर स्वारी करून तो देश जिंकला व तेथून जीं त्यानें दोन श्वेतछत्रें बळकावून आणिली होतीं ती दक्षिणच्या राजाने त्यापासून जिंकून घेतलीं. या वर्णनावरून गौड आणि वंग हे दोन्ही देश ७००–८००च्या सुमारांस भिन्न म्हणून मानीत असत हे उघड होते. ह्युएनत्संगाने आपल्या प्रवासवर्णनांत बंगालमध्यें त्याचे वेळीं पांच सहा राज्ये होती असें लिहिले आहे. ती राज्ये १ हिरण्यपर्वत (मोंगीर) २ चंपा (भागलपुर), ३ कजुगल (राजमहाल), आणि ४ पौंड्रवर्धन (रंगपुर) गंगेच्या उत्तरेकडे अशी असून, कर्णसुवर्ण (मुर्शिदावाद)हें गंगेच्या पश्चिमेस, समतट ( पूर्व बंगाल डाक्का वगैरे ) गंगेच्या पूर्वेस आणि ताम्रलिप्ति म्हणजे हल्लींचें मिदनापुर हें दक्षिणेकडे किनाऱ्याजवळ अशीं होती. ह्युएनत्संगाच्या प्रवासवर्णनांत त्या राज्यांच्या ज्या दिशा सांगितल्या आहेत त्यांवरून पहातां हिरण्यपर्वत,चंपा आणि कजुगल हीं गंगेच्या दक्षिणेस असून कर्णसुवर्ण राज्यांत मोडत होतीं. पौंड्रवर्धन गंगेच्या उत्तरकांठावर व समतट हे खालीं पूर्वतीरावर होते. मिदनापुर म्हणजे ताम्रलिप्ति हें पश्चिमतीरावर होतें. ह्युएनत्संगानें मुद्दाम असें सांगितलं आहे कीं, हिरण्यपर्वताचा राजा त्यावेळीं नुकताच जिंकला जाऊन गादी रिकामी होती. इतर देशांतील राजांचीं नांवें त्यानें मुळींच सांगितलेलीं नाहींत. वंग किंवा समतट म्हणजे पूर्व बंगाल देश एका ब्राह्मण राजाच्या अमलाखालीं होता असें तो म्हणतो.

ताम्रलिप्तीच्याहि राजाचें नांव त्यानें दिलेलें नाहीं. हें राज्य कधीं बंगालच्या राज्यांत तर कधीं ओड्राज्यांत मोडत असे. म्हणजे एकंदरींत असें झालें कीं ह्युएनत्संगाच्या वेळीं देखील सगळ्या बंगाल प्रांतामिळून मुख्य अशीं गौड ऊर्फ कर्णसुवर्ण आणि वंग ( समतट ) हींच दोन राज्यें होतीं. बंगाल प्रांताचें अलीकडील एक नांव जें गौडबंगाल त्यावरून या जोड राज्यांचाच बोध होत आहे. हीं दोन राज्ये सगळ्या हिंदुस्थानांत गारुडविद्येविषयीं इतकी प्रसिद्ध कशीं झाली हें कांहीं सांगतां येत नाहीं. तथापि तेथील लोकांची या विद्येविषयींची कीर्ति खरी असून, खालच्या वर्गांत त्यावेळीं देखील या इंद्रजाल विद्येवर बराच विश्वास असून तिचा अभ्यासहि जोरानें होत असावा.

इ. स. ६०० पासून ८०० पर्यंत या लहान लहान राज्यांवर केव्हां एका राजाचे तर केव्हां दुसऱ्याचे असे आधिराज्य असे. काश्मीरचा जयापीड राजा कोणीहि बरोबर नसतां एकटाच पौंड्रवर्धनास जयन्त राजाकडे गेल्याची गोष्ट पूर्वीं सांगितलीच आहे. जयन्ताने आपली कन्या जयापीडाला देऊन त्याच्याकडून जवळची पांच राज्ये जिंकविलीं. जयापीडाची कारकीर्द इ. स. ७५१ ते ७८२ पर्यंत होती, हे काश्मीरच्या इतिहासांत सांगितलेच आहे. नेपालच्या जयदेव राजाच्या इ. स. ७६९ तील पूर्वीं सांगितलेल्या लेखांत कामरूप देशाच्या हर्षदेवराजाने गौड, ओड्र, कलिंग आणि कोसल ही राज्ये जिंकिली होती असे म्हटले आहे. (गौडौड्रादिकलिंगकोसलाधिपतिः) यावरून असे दिसते कीं भगदत्तवंशातील आसामच्या एका राजाने बंगाल्यांतील राज्ये जवळ जवळ एकाच वेळीं जिंकिली होती; तसेच त्यावरून आणखीं असेंहि अनुमान निघते कीं, बंगाल्यांतील या राज्यांपैकीं एकहि यावेळीं चांगले बलाढ्य नसल्यामुळें त्यांच्यावर नित्य परकी लोकांच्या स्वाऱ्या होत असत.

वंग ऊर्फ समतट म्हणजे पूर्व बंगाल देशावर त्यावेळीं ज्यांनीं राज्य केलें, त्या राजांची माहिती बहुतांशीं कांहीं मिळतच नाहीं, व जी कांहीं प्राचीन लेखांतून गोळा करतां येण्यासारखी होती ती येथें थोडक्यांत देण्याचा प्रयत्न केला आहे.

## (३) कामरूप देशांतील भगदत्ताचा वंश.

पूर्वी सांगितलेंच आहे कीं, कामरूप ऊर्फ आसाम देशांत भगदत्ताचा वंश राज्य करीत असून ह्युएनत्संग तेथे गेला त्यावेळीं कुमार किंवा भास्कर-वर्मा नांवाचा राजा तेथे राज्य करीत होता. पुढेंहि दोन शतकेंपर्यंत हें ब्राह्मण घराणेंच तेथें चालू होतें. वर वंग देशाच्या वृत्तांतात हर्ष देवाचें नांव सांगितले असून त्याने आपली कन्या ( भगदत्तकुलजा ) नेपाळच्या जयदेवाला दिल्याचेंहि सांगितले आहे. भगदत्ताचें कुल ब्राह्मण असूनहि त्यांतील राजे क्षत्रियांच्या मुली करीत व क्षत्रिय राजांना आपल्या मुली देत. व ही गोष्टही तेव्हांच्या सामान्य वहिवाटीला धरूनच होती. आसामचे राजे कधीं कधी बलवान् होऊन कमजोर अशा गौड वंग ओड् इत्यादि राज्यांवर आपले वर्चस्व स्थापन करीत, व त्याचा स्वतःचा देश पर्वतांनी संरक्षित असल्यामुळे ते स्वतः बहुधा सुरक्षित असत. कदाचित् या देशांत राज्य करीत असलेलें घराणें हजारो वर्षेपर्यंत अविच्छिन्न चाललें होतें ही गोष्ट केवळ दंतकथेनेंच प्रचलित केली असण्याचाहि संभव आहे. हिमालयाच्या थंड हवेंत अशी थोडी दीर्घायुषी कुळें आढळतात यांत संशय नाहीं तथापि जरि कदाचित् १५० । २०० वर्षांनी त्यांची उलथापालथ होऊन त्यांच्या जागी दुसरी कुळे आलीं असली, तरी त्यांच्या नामक्यामुळे तीं सर्व मिळून एकच कुळ होतें अशा प्रकारची समजूत भ्रमानेंहि झाली असण्याचा संभव आहे. पण आसामांत हजारो वर्षे एकच कुळ अविच्छिन्न नांदत होते असे दंतकथा सांगते ही हि गोष्ट खरी आहे. या बाबतींत एवढें तरी निदान मानावयास हरकत नाहीं कीं, हिमालयाच्या दुर्गम प्रदेशांतील राज्यें सपाट प्रदेशांतील महत्वाकांक्षी वीरांच्या कक्षेबाहेरच सामान्यतः असल्यामुळे त्यांना दीर्घ काळ शांतपणे राज्याचा उपभोग घ्यावयास सांपडत असे. महाभारतप्रसिद्ध अशा या भगदत्तकुलाला आसामांत राज्योपभोग कितीकाळापर्यंत मिळाला हे सांगतां येत नाहीं. तथापि इ. स. ८०० च्या सुमारास तें घराणें आसामांत राज्य करीत होतें, एवढी गोष्ट निर्विवाद आहे. आपला प्रस्तुत इतिहासकाळ येथेंच संपत असल्यामुळें त्या विषयीं, अधिक कांहीं येथें सांगावयास नको.

## टीप.

### बंगाल देशांतील राज्यांविषयींचे संस्कृत ग्रंथांतील उल्लेख.

ह्युएनत्संगाने बंगाल देशांतील साहा सात राज्यांचा उल्लेख केला असून त्यांची नांवे हिरण्यपर्वत, चंपा, पौंड्रवर्धन, कर्णसुवर्ण, समतट आणि ताम्रलिप्ति अशी दिलीं आहेत. यांपैकी कांहीं नांवे संस्कृत ग्रंथांतून हि आलेलीं आहेत. इ. स. ५०० सुमारास लिहिलेल्या वराहमिहिराच्या बृहत्संहितेत पूर्वेकडील विविध लोकांचीं नावें आली आहेत ती अशी:--

खस मगध शिथिरगिरि मिथिल समतटौड्राश्ववदन दंतुरकाः ।
प्राग्ज्योतिष लौहित्य क्षीरोदसमुद्र पुरुषादाः ॥
उदयगिरि भद्र गौडक पौंड्रोत्कल काशि मेकलांबष्ठाः ।
एकपद ताम्रलिप्तिक कौशलका वर्धमानश्च ॥

मत्स्यपुराणांत पूर्वेकडील देश पुढे सांगितल्याप्रमाणें दिले आहेत:—

अंगा वंगा मन्दुरका अन्तर्गिरि बहिर्गिरी ।
प्राग्ज्योतिषाश्च पौंड्राश्च विदेहास्ताम्रलिप्तकाः ।
शाल्व मागध गोनर्दाः प्राच्या जनपदाः स्मृताः ॥

हीच नांवे पुनः मार्कंडेय पुराणांतहि आली आहेत. कलियुगांतील भविष्यकालीन राजांच्या नामावली देतांना विष्णुपुराणांत कोशलान्ध्रपुंड्र ताम्रलिप्त समंतत पुरी देवरक्षितो रक्षिता । कलिंग महिष महेन्द्र भौमान् गुहा भोक्ष्यन्ति । नैषध नैमिषक कालकोशला ञ्जनपदान्मणिधान्यकवंशा भोक्ष्यन्ति । त्रैराज्यमुषिकजनपदान् कनकादयो भोक्ष्यंति । सौराष्ट्रावन्त्य शूद्राभीरान्नर्मदा–मरुभू–विषयांश्च व्रात्य द्विजाभीर शूद्राद्या भोक्ष्यन्ति । सिन्धुतटदार्विककोर्वी चन्द्रभागा कश्मीर विषयांश्च व्रात्य म्लेच्छ शूद्रादयो भोक्ष्यन्ति ॥ एते च तुल्यकालाः सर्वे पृथिव्यां भूभुजो भविष्यन्ति ॥
या विष्णुपुराणांतर्गत वर्णनाचे इतिहासदृष्ट्या फार महत्व आहे. पण याचा नीट बोध मात्र होत नाही. त्यापैकी कोणत्याहि राजाचें नांव व त्याचा काळ यां विषयीं यांतून कांहीं माहिती मिळत नाहीं. तथापि सम

नटासारख्या देशांची यांत आलेलीं नांवे महत्वाचीं आहेत. यांतून कांहीं काढावयाचेच तर असे दिसते कीं. बंगाल, छत्तिसगड आणि आन्ध्र हीं राज्यें देवरक्षित नांवाच्या एकाच राजाच्या अमलाखालीं होतीं. वरील उताऱ्यांत आलेले समकालीन म्हटलेले राजे कोण असावेत या विषयीं कोणा प्राचीनविद्याकोविदाने पत्ता लाविल्याचे आमच्या पहाण्यांत नाहीं. ...मार्कंडेय पुराणांत पूर्वेकडील राज्यांचीं नावे दिलीं आहेत; तीं अशीं:– अधारकामुंदकरा अन्तर्गिऱ्या बर्हिगिरा: तथा प्रवंगारं होया मानदा

मानदा मान वर्जिक:। ब्रह्मोत्तरा प्रविजया भार्गवा क्षेय मल्लका: । प्राग्जोतिषाश्च भद्राश्च विदेहास्ताम्रलिप्तका: । मल्ला मगध गोमन्ता: प्राच्या जनपदा: स्मृता: ॥

पुराणांत दिलेल्या राजे व देश यांच्या नामावलींचा खरा उपयोग नाहीं त्या अगदीं कुचकामाच्या आहेत असे पुष्कळदां वाटते. कारण त्या सर्व एकाच मूळ लेखांतून नक्कल करणाऱ्याच्या रुचिभिन्नत्वामुळे व कल्पनाभिन्नत्वामुळेच काय त्या अंशत: रूपांन्तर पावलेल्या असल्यामुळे त्या त्या पुराणलेखनाच्या काळचा पुरावा म्हणून सुद्धां ग्राह्य मानतां येत नाहींत.

## (४) आन्ध्राचे कैंकिल यवन राजे.

मध्यकालीन युगांत हिंदुस्थानामध्यें यवनांचे एक राज्य होते याबद्दल कांहीं एक शंका नाहीं; कारण त्या काळांत रचलेल्या पुराणग्रंथांत यवन राज्याविषयीं उल्लेख आलेले आहेत. डॉ. भाऊ दाजी यांनीं अजिंठ्याच्या लेण्यांतील कोरींव लेख वाचून त्यांवरून त्या लेण्यांच्या आसपास एकादें यवन राज्य असावे असें अनुमान केले होतें ( रायल एशि. सोसा. जर्नल मुंबई पु. ६ ); व मध्यप्रांताच्या गॅझिटीअर मधील ग्रॅटच्या मताला अनुसरून हंटरनें हि ओरिसाच्या वर्णनांत भाऊ दाजी यांच्या म्हणण्याचा अनुवाद केला आहे. अजिंठ्याच्या लेण्यांतील लेखांत राजनामावली आहे ती अशी:–१ विन्ध्यशक्ति, २ प्रवरसेन, ३ रुद्रसेन, ( हा भवनागाची कन्या गौतमी हिचा नातू होता ), ४ पृथ्वीसेन, ५ दुसरा रुद्रसेन ६ दुसरा प्रवरसेन ( हा महाराजाधिराज श्री देवगुप्ताची कन्या प्रभावती गुप्ता हिचा

पुत्र ), आणि ७ देवसेन. हे राजे वाकाटक येथे राज्य करीत होते असें कनिंगहॅम यानें म्हटलें आहे. वाकाटक देशाचा उल्लेख प्राचीन भारतीय वाङमयामध्ये कोठे आलेला नाही. वाकाटक नांवाचा देश किंवा लोक महाभारत, पुराणे, वराहमिहिराची बृहत्संहिता व इतर ग्रंथ यांत सांगितलेले नाहींत. अजिंठ्याच्या लेण्यांतील कोरींव लेखांत हे नांव एका वंशाचें म्हणून आलें आहे; ( परिशिष्ट पहा ) व बहुधा त्या वंशनामावरून वाकाटक राजे ज्या देशावर राज्य करीत होते त्यालाहि पुढें वाकाटक असेंच नांव पडले असावे. मध्यप्रांताच्या मध्य भागाला म्हणजे नागपूर जवळच्या वर्धानदीच्या पूर्वेकडील सपाट प्रदेशाला वाकाटक हे नांव असावे व त्याची भांडक येथें राजधानी असावी, कारण तेथें पुष्कळ प्राचीन इमारतीचे अवशेष राहिलेले आहेत, असे कनिंगहॅमने ठरविले आहे. वाकाटकाला दिलेले हें ठिकाण बहुधा बरोबर असावें कारण अजिंठ्याच्या कोरींव लेखांत वाकाटक राजांनीं जे देश जिंकले म्हणून म्हटले आहे, ते त्याच्या आसपासचेच आहेत. त्यांत १ कुंतल ( महाराष्ट्राचा दक्षिण भाग ), २ अवन्ती ( उज्जनी, माळवा ), ३ कलिंग (उत्तर सरकार ), ४ कोशल (छत्तिसगड,) ५ त्रिकूट ( ठाणे जिल्ह्यांतील प्रदेश ), ६ लाट (गुजराथचा दक्षिण भाग) आणि ७ आन्ध्र ( वारंगळ ) अशी जिंकलेल्या राजांचीं नांवें आहेत. हीं राज्यें त्यावेळीं प्रबळ असून वाकाटकाच्या सभोंवतींच होतीं आणि कोशल आन्ध्र हीं तर त्याच्या अनुक्रमे उत्तरेस व दक्षिणेस अगदी लागून होतीं. अश्मक देशांत म्हणजे उत्तर महाराष्ट्रांत असलेला अजिंठ्याचा भाग हा अर्थात त्या वेळीं वाकाटकच्या राज्यांत मोडत असला पाहिजे. हें वाकाटक घराणें ब्राम्हण असून शीवनी व चमक येथील त्याच्या कोरीव लेखांत सांगितल्याप्रमाणें त्यांतील राजांनी अग्निष्टोम, राजसूय, अश्वमेध इत्यादि श्रौतयज्ञ करून कीर्ती मिळविली व परिव्राजक असें विशिष्ट नांव धारण केलें. ते मूळचे ग्रीक होते अशी जी डॉ. भाऊ दाजींची समजूत झाली, ती चुकीची असून ती केवळ विन्ध्यशक्ति या नांवावरून उत्पन्न झाली असे आम्हीं पुढें दाखविणार आहों.

आतां अजिंठ्याची लेणीं कोणीं खोदिलीं या महत्वाच्या प्रश्नाचें चांगलेसें उत्तर आजवर कोणीं दिलेले नाहीं. व्हिन्सेन्ट स्मिथनें तर आपल्या इतिहासांत हा प्रश्न काढिलेला नाही. आम्हांला असें वाटतें की, पैठण येथील आंध्रांची सत्ता मोडल्यावर म्हणजे सुमारें इ. स. २०० पासून वाकाटकांचें राज्य सुरू झाले. खरे म्हटलें तर उत्तर महाराष्ट्रांत आंध्र-भृत्यांच्या मागून सत्ताधीश झालेले वाकाटकच होत. त्यांनी त्रिकूट जिंकिल्याचा जो उल्लेख आहे, त्यावरून हेंच अनुमान दृढ होते; कारण त्रिकूट हा कोंकण राज्याचा भाग म्हणून सन २०० च्या अलीकडे बहुधा अस्तित्वांत नव्हता; निदान सन ५०० त म्हणजे हल्लीच्या नागपूर प्रान्तांत वाकाटकांचे राज्य पुष्कळ काळ होते. ते जरी ब्राह्मण होते, तरी त्यावेळी बौद्ध-धर्माची चलती असल्यामुळे त्यांनीहि त्याला विरोध कला नाहीं; व त्यांच्या बौद्धधर्मीय प्रधानांनीं व प्रजेपैकी धनवान् लोकांनी आजिंठ्याची आश्चर्य-कारक लेणी खोदिलीं. त्यांतील रंगीत चित्रें फार उत्कृष्ट असून त्यांचे रंग आज बाराशे वर्षे होऊन गेली तरी जणूं काय ताजेच दिसतात. रंगीत चित्रांची कला व रेखाकला यांचे जें वैभव या चित्रांत दिसून येते, तें जरी कदाचित् बौद्धधर्मीय यवनांच्या देखरेखीखाली तयार झाले असले, तरी एकदरीत तत्कालीन हिंदु लोकांची कारागिरी व बुद्धि यांनाच तें यश दिले पाहिजे. पण ती आज हजार वर्षे या देशांत नष्टप्राय झाल्यासारखी आहे.

वाकाटक देशासहित आंध्रदेश मध्यकालीन युगांपैकीं बराच काळ पावेतों एका यवनघराण्याच्या अमलाखाली वर सांगितलेल्या ब्राह्मण घराण्याच्या नंतर होता. ओरिसांतील यवनराजाचा मोड करून केसरी घराण्याने इ. सनाच्या ५ व्या शतकांत जेव्हां ते राज्य बळकाविलें, तेव्हां ते यवन तेथून आंध्रदेशांत आले, व पुढे इ. स. ५७५च्या सुमारास त्यानीं वाकटकचें राज्य हस्तगत केलें असा जो व्हिन्सेन्ट स्मिथनें तर्क केला आहे तो बहुत करून बरोबर आहे. " मद्रास किनाऱ्यावरील ओरिसाला लागून असलेलें राज्य म्हणजेच आंध्रांचें असून त्याची राजधानी वारंगळ येथे होती. मद्रास किनाऱ्यावरील बखरींत असें सांगितलें आहे कीं आंध्रदेशांत त्या वेळीं राज्य करीत असलेल्या घराण्याचा मोड करून तें राज्य यवनांनीं

घेतले, व तेथें इ. स. ९६३पर्यंत म्हणजे ३८८ वर्षपर्यंत नऊ यवनवंशीय राजांनीं राज्य केलें. यवनांच्या वर्चस्वकालीं तेथे मुख्यतः बौद्धधर्मीचेंच प्राबल्य होतें;व आन्ध्रचे यवनराज्य शेवटीं जें मोडलें तें देखील ओरिसाप्रमाणें हिंदुधर्माच्या सार्वत्रिक पुनरुज्जीवनाच्या मोठ्या लाटेंत सांपडूनच मोडलें व तेथे बौद्धधर्माऐवजी हिंदुधर्मीतील शिवोपासना सुरू झाली" (हं.पा. २२०).

सर विल्यम हंटरने यवन म्हणजे आयोनियन ग्रीक यांचा फार प्राचीन काळापासून ( इ. स. पूर्वी ९०० पासून ) हिंदुस्थानाशीं जो संबंध आला त्याची मोठी चटकदार हकीकत दिली असून ती त्याच्या काळीं उपलब्ध असलेल्या साधनांचा विचार करतां फार सूक्ष्म दृष्टीनें दिलेली आहे. ही हकीगत इ. स. पूर्वी ९ व्या शतकांत ते लोक सिन्धुनदीच्या पलीकडे होते तेव्हांपासून, तों इ. सनाच्या ९ व्या शतकाच्या अखेरीस ते मद्रास इलाख्यांतील पश्चिम किनाऱ्यावर शेवटचें आपले राज्य स्थापी पर्यंतची आहे. त्या हकीगतींत हंटर म्हणतो, " दक्षिणेतील या यवनांच्या ( आंध्र देशांतील) सत्तेची परमावधि सन ७८२ च्या सुमारास झाली. त्या वर्षाच्या पश्चिम किनाऱ्यावरील तुलव येथील लेखांत त्यांचा निर्देश आहे. एका ब्राम्हणापाशीं पाहिलेल्या लेखावरून पॉ. बुकाननने असे दाखविले आहे कीं इ. स. ७८२ या वर्षी तुलुव येथें राज्य करणाऱ्या घराण्याला एका यवन राजाने पदच्युत करून तेथें आपल्या घराण्याची स्थापना केली; व तेथें ते ५४ वर्षें राज्य करीत होतें. तें आपला संबंध आंध्र देशांतील घराण्यांशीं जोडी. ते पूर्वेकडून आलेले होते, व बौद्धधर्माच्या फाटाफुटींतून जो जैनधर्म निघाला त्याचा स्वीकार त्यानें केला होता. " ( पान २२० )

ह्मणजे एकंदरीत मध्यप्रान्त व आन्ध्रदेश यांवर राज्य करणाऱ्या यवन घराण्याचा उत्कर्ष सन ५७५ पासून सन ९०० पर्यंत चालू होता, व त्यांच्या सत्तेचा कळस इ. स. ७८२ च्या सुमारास झाला होता असें ठरतें. पूर्वी सांगितलेल्या धर्मपालाच्या खालिमपुर येथील दानपत्रांत देखील तत्कालीन यवन राजाचा उल्लेख आहे. त्यांत " भोजैर्मत्स्यैः समद्रैः कुरुयदु यवनावन्तिगान्धारकीरैः= । भूपै र्व्यालोल मौलि प्रणति परिणतैः= साधु संगृह्यमाणः=" असे जे शब्द आलेले आहेत त्यांवरून पहातां त्यावेळीं

कनोजच्या साम्राज्यांतील मांडलिकांपैकीं यवनराज्य एक होतें असें दिसून येतें. या कोरींव दानलेखांत यवनांचा उल्लेख कसा आला याचें पुष्कळांना मोठे गूढ वाटतें: पण नागपूर प्रान्तांत व आन्ध्र देशांत त्यावेळीं यवनांचे प्रबळ घराणें राज्य करीत होतें, ही गोष्ट लक्षांत घेतल्यास त्या कोडयाचा सहज उलगडा होतो.

या बाबतींत पुराणे काय म्हणतात हेंहि पहाणें अवश्य आहे. या विषयींची पुराणांतील हकीगत म्हणजे ऐतिहासिक दृष्टि मुळींच नसलेल्या कोणी पुरुषाने स्वतः पाहिलेल्या प्रकाराचे मोडकेतोडके वर्णन होय. पण प्रत्यंतर पुरावा म्हणून तें फार महत्वाचे आहे. विष्णुपुराणांत कैलकिल अथवा कैंकिल यवन आणि विन्ध्यशक्ति राजा यांची नांवे सांगितलेली असल्यामुळें त्याकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. त्याच्या चवथ्या अंशाच्या २४ व्या अध्यायांत याविषयीं वाक्ये आहेत ती अशीं:—

“ आन्ध्रभृत्याः सप्ताभीरप्रभृतयो दश गर्दभिनश्च भूभुजो भविष्यन्ति। ततः षोडश भूपतयो भवितारः। ततश्चाष्टौ यवनाश्चतुर्दश तुरुष्कारा मुण्डाश्च त्रयोदश एकादश मौना एते वै पृथिवी दशवर्षशतानि नवत्यधिकानि भोक्ष्यन्ति। तेषूत्सन्नेषु कैंकिला यवना भूपतयो भविष्यन्त्यमूर्धाभिषिक्ताः। तेषामपत्यं विन्ध्यशक्तिस्ततः पुरुजयस्तस्माद्रामचंद्रतस्माद्धर्मवर्मा ततो वङ्गस्ततो भून्नदनस्ततः सुनंदी तद्भ्राता नन्दियशाः शुक्रः प्रवीरः एते वर्षशतं षड्वर्षाणि भूपतयो भविष्यन्ति॥ ” आतां या वाक्यांत यवनांचा निर्देश दोन वेळ झालेला असून दोन्हीमध्ये पुष्कळ काळ गेलेला आहे. आमच्या मते या वाक्यांचा नीट अर्थ करावयाचा तर असें म्हटलें पाहिजे कीं, सदरील वर्णनांत पहिले जे आठ यवन राजे सांगितले ते पंजाबांत ई. सनापूर्वी राज्य करणारे बॅक्ट्रियन ग्रीक असावे; तुरुष्क म्हणजे बहुतकरून युइची लोक असावे. मुण्ड व मौन म्हणजे कोण याचा उलगडा अजून कोणी केलेला नाहीं, पण तो करण्याचा आम्हीं पुढें प्रयत्न करूं. दुसरे यवन राजे जे कैंकिल त्यांतील पहिल्याचे नांव विन्ध्यशक्ति होतें. पण पुढील नांवें अजिंठयाच्या लेण्यांतील नांवांहून अगदीं निराळीं आहेत. पुरुञ्जय, रामचंद्र,

धर्मवर्मा, वंग, नंदन, सुनन्दी, नन्दियशा, आणि शुक्रप्रवीर ( हें शेवटचें नांव एक आहे कीं दोन स्वतंत्र आहेत हा प्रश्नच आहे) असे विंध्यशक्तीनंतरचे राजे असून त्या सर्वांनीं मिळून १०६ वर्षे राज्य केल्याचे वरील वर्णनांत सांगितले आहे. पण इतकीं वर्षे या राजांना फार थोडीं दिसतात. पण हे राजे काल्पनिक होत असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण इतर घराण्यासंबंधाने आठ यवन, दहा आभीर, अकरा मौन इत्यादि मोघमपणें उल्लेख करून त्यांचीं नांवें न सांगतां या कैकिल यवनराजांची मात्र निरनिराळीं नांवें सांगितलीं आहेत. ही गोष्ट आणि अजिंठ्याच्या लेण्यांतील लेख यांचा मेळ घालावयाचा तर आम्ही असे म्हणू कीं, लेण्यांतील लेखांत सांगितलेला विंध्यशक्ति आणि त्याच्यामागून आलेल राजे हे एका निराळ्याच वंशाचे असून, डॉ. भाऊ दाजी यांनीं त्यांचा आंध्र देशांतील उत्तर कालीन यवनांशीं गैरसमजुतीने मेळ घातला आहे. पहिले विन्ध्यशक्ति प्रभृति राजे ब्राह्मण धर्मानें व जातीने होते हे पूर्वी सांगितलेंच आहे. पण दुसरा विन्ध्यशक्ति व त्याच्या मागाहूनचे राजे हे जातीनें यवन, आणि धर्मानें बौद्ध होते व ते नागपुर जवळचा प्रांत आणि आन्ध्र देश येथे ८ व्या व ९ व्या शतकांत राज्य करीत होते. इ. स. ८०० च्या सुमारास यवनराजे राज्य करीत होते ( खालिमपुराचा दान लेख पहा ) यांत तर शंका नाहींच. पण बहुधा सन ९०० पर्यंत हि त्यांचे राज्य चालू होते; व त्या सुमारास विष्णुपुराण सुधारून लिहिणाऱ्या लेखकाने आपल्या ते माहितीतले म्हणून त्यांचीं नांवे मुद्दाम त्यांत नमूद केलीं. एतद्विषय भागवतांतील श्लोक हि महत्वाचा असून विष्णुपुराणांतील विधानाचा प्रत्यंतर पुरावा आहे. भागवतांत म्हटले आहे कीं:—

किलिकिलायां नृपतयो भूतनन्दोऽथ वङ्गिरीः । शिशुनन्दिश्च तद्भ्राता यशोनन्दिः प्रवीरकः ॥ इत्येते वै वर्षशतं भविष्यन्त्यधिकानि षट् ॥ ( स्कं. १२ अ. १ ). येथे हि त्या राजांचा काळ १०६ वर्षांचाच दिला आहे. कैलकिल हें नांव नगरीचे म्हणून दिलें आहे, पण विष्णुपुराणातील ९ नांवा ऐवजीं येथें फक्त पांचच आहेत. भागवत पुराण थोडेसें विष्णु पुराणाच्या मागाहूनचें म्हणजे ९ व्या शतकानंतरचें आहे. इतर पुराणांतहि

यवनांचें नांव येतें, पण त्यांत कैलकिलयवन, विन्ध्यशक्ति इत्यादि नांवे मात्र नाहींत. हीं पुराणे व त्यांतले त्यांत विशेषतः मत्स्य आणि वायु हीं आजच्या स्वरूपाचा विचार करतां सर्वांत जुनीं होत. म्हणून त्यांत जो यवनांचा निर्देश आहे तो पंजांबांतील यवनांसंबंधींच असला पाहिजे. त्यांत मुंड आणि मौन या रानटी लोकांचीं नांवें आहेत व हे लोक गुप्तांच्या बहुतकरून पूर्वींचे असावे.

कैंकिल यवनांना विष्णुपुराणांत अमूर्धाभिषिक्त म्हणजे 'विधिपूर्वक ज्यांना अभिषेक झालेला नाहीं असे' हें विशेषण लाविलेले आहे. पण कदाचित् तो शब्द मूर्धावसिक्त असा असून त्यावरून त्यांच्या मिश्रजातीचा बोध होत असावा. विष्णुपुराणाच्या कर्त्याला ते परिचित असावेत असे दिसते. टीकाकाराने अमूर्धाभिषिक्त म्हणजे क्षत्रिय नव्हेत ते, असा अर्थ दिला आहे. पण ती गोष्ट तर यवन या नांवांवरूनच उघड होत आहे. हा शब्द एकंदरींत गूढ खरा, पण ते बौद्धधर्मानुयायी असल्यामुळे त्यांना विधि-पूर्वक अभिषेकाची पर्वा वाटत नव्हती असे समजल्यास त्याचा बराच उलगडा होण्यासारखा आहे. या यवनांनी नवीन धर्माचा जरी स्वीकार केला तरी आपली मूळ भाषा मात्र कायम टेविली. पंजाबांतील यवन लोक बॅक्ट्रियन ग्रीक होते खरे, पण ते तरी तेथे पुष्कळ काळ राहिल्यावर ग्रीक भाषाच बोलत होते कीं काय हा एक महत्वाचा प्रश्न आहे. त्यांच्या नाण्यां-वरील लेखाचीं अक्षरे ग्रीक असल्यामुळें ते आपली मूळ भाषाच बोलत असले पाहिजेत असें दिसतें. पण त्यांचा बॅक्ट्रिया, सिरिया व खुद्द ग्रीस या देशाशीहि संबंध कायम राहिल्यामुळें ते ग्रीक बोलत असल्यास नवल नाहीं. वाकाटक व आन्ध्र येथील यवनांच्या भोंवतीं संस्कृतोद्भव व द्राविड भाषांचा गराडा असल्यामुळे व त्यांच्या सर्व प्रजा त्याच भाषा बोलत असल्यामुळे, त्यांची मूळ ग्रीक भाषाच कायम राहिली असण्याचा संभव फार थोडा. ८ व्या शतकांतील एका लेखकाच्या लेखांतील उतारा देऊन कोलब्रूकने तत्काली आर्येतर भाषांचें यवन, पारसीक, रोमक आणि बर्बर असें वर्गीकरण केले आहे ( हंटरकृत ओरिसा भाग १ पान २२२ ). पण

हिंदुस्थानांत फार दिवस राहिलेल्या यवनांची मूळ ग्रीक भाषा लुप्तप्राय झाली होती असें हंटरनें आपलें मत दिलें आहे. *

* एकदां केव्हां ग्रीक भाषा या देशांत बोलण्यांत होती यांत कांही संशय नाही. महाभारतांत, ' सुरंग ' म्हणजे ग्रीक ' सिरिंक्स ' हा शब्द आला असून विदुरानें वारणावतांतील ज्वालाग्राही गृहाविषयी ( जतुगृह ) युद्धिष्ठिराला सूचना देतांना जी म्लेच्छ भाषा वापरली म्हणून म्हटलें आहे, ती ग्रीक असावी वगैरे गोष्टीचें विवेचन महाभारताच्या उपसंहारांत आम्हीं केलेंच आहे. इ. स. च्या पहिल्या शतकांत लॅटिन भाषेचेंहि येथील लोकांना थोडे बहुत ज्ञान असावे असें ह्मणावयास हरकत नाही. कारण त्यावेळी रोमन लोकांचा दक्षिण हिंदुस्थानाच्या पश्चिम किनाऱ्याशीं व्यापारसबंध होता व त्यांचे दीनार हे नाणेंहि इकडे चालू होते. त्याचप्रमाणे इराणी लोकांनी सिन्धुनदीपर्यंत सिन्धप्रांताचा भाग अनेक वेळां जिंकिलेला असल्यामुळे त्यांची पारशी भाषाहि येथे ज्ञात असली पाहिजे. आतां वरील भाषांपैकी बर्बर उरली. ती मात्र काय असावी हे कोडेंच आहे. बर्बर शब्द ग्रीक लोक म्लेंच्छाबद्दल योजीत आणि भारतीय आर्यांनीहि बर्बर नांवाने म्लेच्छांचा निर्देश केलेला आहे. आतां बर्बर हे त्या नांवचे इतिहासांत प्रसिद्ध असलेले आफ्रिकेतील लोक. त्यांचा भारतीय आर्यांशी संबंध आलेला कधीं दिसत नाहीं याविषयीं आमचा तर्क असा आहे की, आफ्रिकेतील इथिओपिअन ( नीग्रो वगैरे ) लोकांचें ख्रिस्ती शकापूर्वी हिंदुस्थानाशी व्यापारी दळणवळण होते; तेव्हां बर्बर हे त्याचें नांव येथे माहीत होऊन, तेंच पुढे आरब लोकाना लावूं लागले. आरब लोकाचा कित्येक शतकें या देशाशी व्यापार चालत होता, व ७ व्या शतकांत तर त्यांनी सिंधप्रांत जिंकूनहि घेतला म्हणून आमचें मत असें आहे की, कोलब्रुकने सांगितलेल्या आठव्या शतकांतील लेखकानें बर्बर नांवानें ज्या चवथ्या म्लेच्छ भाषेचा या देशांतील लोकाना समजणारी म्हणून उल्लेख केला आहे ती भाषा असावी. पण आरबांनां ताजिक असे नांव होतें !!

# टिपण्णी.

(१) अजिंठ्याच्या लेण्यांपैकीं १६ व्या लेण्यांतील कोरींव लेख, (पश्चिम हिंदुस्थानांतील प्राचीन वस्तुविषयक पहाणी बौद्धलेणीं, या पुस्तकावरून ).

१ उदीर्ण लोकत्रय दोष वन्हि निर्वापणा (१ )... ति प्रणम्य पूर्वं प्रवक्ष्ये क्षितिपानुपूर्वी [ म् ] ॥ १ ॥

२ महाविमर्देष्वभिवृद्धशक्तिः क्रुद्धः सुरैरप्यनिवार्य्य [ वीर्यः । ]... णदानशक्तिः द्विज प्रकाशो भुवि विन्ध्यश [ क्तिः ॥ २ ॥ ]

३ पुरंन्दरोपेन्द्रसमप्रभावः स्वबाहुवीर्या [ जि ] त सर्व लोकः ।... कांनां बभूव वाकटकवशके [ तुः ॥ ३ ॥ ]

४ रणे स्व हर्युत्थित रेणु जाल सञ्छादितार्क... ( । ) नरातीन् कृत्वा-भिवाद प्रवणा [ म् ]श्चिकार [ ॥ ४ ॥ ].

५ [ विनि ] जितारी ( : सुर ) राजकार्यश्चकार पुण्येषु परं प्रय [ त्नम्] [ ॥ ५ ॥ ] [ अरि ] नरेद्रमौलि विन्यस्त मणि किरणालीढ क्रमाम्बुजः [ ।]

६ प्रवरसेनस्तस्य पुत्रोऽभूद् विकसन्नवेन्दीवरेक्षण [: ॥ ६ ॥ ] रवि मयूखद...( ॥ ) [ द्र ] सेनः प्रवरसेनस्य जितसर्वसेनः सुतोऽभवत् [ ॥ ७ ॥ ]

७...... पार्थिवेन्द्रस्य प्रश [ शा ] स धर्मेण मेदिनी [ म् ] कुन्तलेन्द्र [ म् ] वि [ जित्य ] [ पृ ] थिवी [ षेणः ]... [ ८ ] प्रवरसे [ नस्त ] स्य पुत्रोऽभूत् प्रवरोर्जितो दारशासनः [ । ] प्रवर.. ...

८...... [ ॥ ९ ॥ ]... यात्मज... म...... [ । ]...... [ म ]... वाप्य राज्यं अष्टाब्दको यः प्रशशास सम्य [ क् ॥ १० ॥ ]

९ तस्या [ त्मजो ] भून् नरदेव...... भुवि देवसेनः [ । ] यस्योपभोगैर्ल लितै विं..... देवराजस्य......भूः [ ॥ ११ ॥ ] + पुण्यानुभावात् क्षितिपस्य [ तस्य ]

१०...... [ । ]......य गुणाधिवासो...कोशो भुवि हस्तिभोजः... ( १२ ) प्र.. .:पृथुपीनवक्षाः सरोरुहाक्षः क्षपि...

११ ...... ( । )......दिग्गन्धहस्तिप्रतिमो बभूव । ( १३ ) हि तो विनीतः प्रणय...मनोनुकूलोनुविधान वर्ती ( । ) निरपत्य......

१२ ... कश्च [ ॥ १४ ॥ ] त [ यै ] व लोकसुहिताशयत्वात् सुखेन सम्य [ क् प ] रिपालनेन [ । ] मातेव सखेव नित्यं प्रियोभिगम्यश्च बभूव

१३ .... [ ॥ १५ ॥ ] ...... [ । ] स्वस्थः समावेश्य स तत्र राजा [ सस ] ज्ज भोगेषु यथेष्टचेष्टः; [ ॥ १६ ॥ ] अथ तस्य सुतो बभू

१४ [ व राजा ] ...... [ । ] हरि [ राम ] हर स्मरे [ व ] कान्ति र्हरिषेणो हरिविक्रमप्रतापः [ ॥ १७ ॥ ] स कुन्तलावन्ति कलिङ्ग कोसल त्रिकूट लाटान्ध्र.

१५ ...... [ । ] ...... पि स्वनिर्देश .... [ ॥ १८ ॥ ] प्रथितो भुवि हस्तिभोजसूनुः सचिवस्तस्य महीपतेर्बभूव [ । ] सकलक्षिति.

१६ ...... [ ॥ १९ ॥ ] ... जेष्ठः स्थिरधीरचेतास्त्यागक्ष्मौदार्य गुणैरुपेत [ :। ] धर्मेण धर्मप्रवणः शशास देशंः पुण्यगुणाशु

१७...[ ॥ २०] ..प्रतिपुण्योपचय परं चकार [ । ] यत ऊर्ध्वम् अदः महायधर्मा परितो लोकगुरौ चकार कारा [॥ २१ ॥] आयुर्वयोवित्त सखाणि

१८...लानि [ । ] उ [द्दिश्य] मातापितरा वुदारं न्यवीविषद्वेश्म यतीन्द्र [सेव्यं ॥२२॥] सजलाम्बुद .....द्धिताग्रे भुजगेन्द्राद्ध्युषिते महीधरेन्द्रे [ । ]

१९...श्रीपतिना शरा निकुञ्जे [॥२३॥] गवाक्ष निर्व्यूह सुवीथि वेदिका [सु] रेन्द्रकन्याप्रतिमाद्यलंकृतम् [।] मनोहरस्तम्भविभंग...

२० [भेदुरम्]...[उद्ध] रचैत्यमन्दिर [म् ॥२४॥] य...तलसन्निविष्टवि ...मनो [भि] रामम् [।]...चाम्बुमहानिधान [ म् ] नागेन्द्र वेश्यादिभिर.

२१...[ ॥२५॥] . समरणा...[ । ] ग्रीष्मार्कस्यच किरणोपता [ प ] त [ सं ] सर्वतुप्रथितसुखोपभोगयोग [ म् ॥२६॥ ]

२२...[सु] रेन्द्र मन्दिराणा [ म् ] रुचिमन [म]न्दर कन्द...[।] . ह [म]

२३...यथे प्सित .. [॥२७] असम [प्रति] रोचने गिरेर्बक

२३...श्रमा...का [ । ]...लय...[ ॥ २८ ॥ ]...यस्य जनेन नाम प्रीतिप्रसादविकचप्रणयेन चक्रे [ । ] [ ए ] त

२४...लयनं सुरेन्द्रमौलि [ प्रभो ] पचित...हाय [ ॥२९ ॥ ] निवेद्य संघाय...ज्य सबन्धुवर्गः स वराहदेवः [ । ] नृदेवसौख्यान्यनुभूय.

२५...शास्ता सुगत मशस्त [ ॥ ३० ॥ ] सान्द्राभोद भुजंग भोग...स... नमनः शिलाल कपिलै र्यावत्करैर्भास्वरः [ । ] तावच्छे.

२६...सेव्यतां अन्त मंडपरत्न [ म् ए ] तद् अमलम् रत्नत्रयोद्भावित [ म् ॥ ३१ ॥ ] विविध लयन सानुः सेव्यमानो महद्भिर्गिरिय.

२७...द्धय [ । ] यदापिच समस्त व्यस्त दोष प्रहाणा [ द् ] [ वि ] शतु पदमशोकं निर्ज्वरं शान्तमार्य [ म् ॥ ३२ ॥ ].

## ( २ ) अजिंठ्याचीं लेणीं.

' हिंदुस्थानांतील कोरीवलेण्याचें वर्णन ' या नांवाच्या फर्ग्यूसन व बर्जेस कृत पुस्तकावरून पुढील महत्वाची माहिती घेतली आहे. [पान२८५]

" ही लेणीं इ. सनापूर्वी पहिल्या शतकापासून इ. सनाच्या ७ व्या शतकापर्यंतच्या काळांत खोदण्यांत आलीं. . त्यांत जी फार प्राचीन आहेत तीं पैठणच्या शातकर्णींच्या वेळचीं आहेत, हीं सर्व लेणीं बौद्धांचीं होत. त्यांतील प्राचीन हीनयान बौद्धपंथाचीं असून मागाहूनची महायानपंथाचीं आहेत. पहिल्यांत चैत्य व डागोबा असून दुसऱ्यांत बुद्धाच्या मूर्ति आहेत.या दोन्हीं प्रकारच्या लेण्यांत रंगीत चित्रे आहेत. खरखरीत असलेल्या भिंतीवर भाताचा कुंडा व तागाचे वगैरे तंतु मिसळून चिकट केलेल्या गिलाव्याचा थर देऊन त्यावर हीं चित्रे काढिली आहेत. गिलाव्यावर प्रथम भूमिकेसाठीं एका प्रकारचा रंग देऊन नंतर त्यावरतीं चित्रें आंखून रंगविलेली आहेत.

हीनयान आणि महायान पंथाच्या लेण्यांतील फरक अगदी स्पष्ट आहे. हीनयान पथांतील भिक्षु एक दोन सोबती घेऊन ओबडधोबड लेण्यांत एकीकडे रहात असत. म्हणजे त्यांनी या बाबतींत प्राचीन हिंदुधर्मांतील संन्याशाची वहिवाट चालू ठेविली होती. पण महायान पंथाचे भिक्षु भव्य सुदर लेण्यांत राहून सर्व सुखसोईचा उपभोग घेत. शिवाय पहिल्यांतील लोक बुद्धाच्या शरीराच्या अवशेषावर उभारलेल्या डागोबाची मात्र पूजा करीत, तर दुसरे बुद्ध, बोद्धिसत्व आणि तारा आदि करून त्यांतील स्त्रीस्वरूप शक्ति यांचे प्रचंड पुतळे करून त्यांची पूजा करीत. त्यांनी मूर्तिपूजेचें फारच अवडंबर माजविल.

सामान्यपणें या लेण्यांतील चित्रें बुद्धाच्या चरित्रांतील किंवा जातक कथांतील विषयांवर आहेत. अगदी अलीकडच्या एका लेण्यांत मात्र इराणच्या खुसरू नामक राजांकडून आलेल्या शिष्ट मंडळाची पुलकेशी आपल्या दरबारांत भेट घेत आहे असा देखावा दाखविला आहे.

# प्रकरण १५ वें.

## कनोजचें वर्म घराणें.

मध्य हिंदुस्थानांतील राज्यांचा विचार करतां सर्वांत महत्वाचें जें कनोजचें राज्य तें प्रथम पुढें येतें. त्या वेळीं उत्तर हिंदुस्थानाचा बहुतेक भाग किंवा अधिक निश्चितपणें बोलावयाचें तर हल्लींच्या संयुक्त प्रांताचा सर्व भाग कनोजच्या प्रत्यक्ष अमलाखालीं होता, आणि हिंदुस्थानचा राहिलेला भाग त्याच्या नांवाच्या कां होईना पण आधिराज्याखालीं होता. इ. स ६४७ च्या सुमारास हर्षराजा मरण पावला, त्यावेळीं त्याच्या राज्याला कोणी योग्य वारस नव्हता. त्याला पुत्रसंतति नव्हती, व त्याची बहीण राज्यश्री त्यावेळीं जीवंत होती कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं. पण जरी ती असती तरी ती राज्याची वारस नव्हती व तिला हि पुत्र नव्हता. या परिस्थितीमुळें हर्षाचें साम्राज्य त्याच्या निधनानंतर एकदम अराजक स्थितीला पोचलें, आणि जिकडे तिकडे अव्यवस्था माजून महत्वाकांक्षी पुरुषांना आपल्या आकांक्षा पुरवून घ्यावयाला चांगलाच अवसर मिळाला. पण व्हिन्सेन्ट स्मिथ व इतर इतिहासकार यांनीं, हें साम्राज्य हर्षाच्या अर्जुन किंवा अर्जुनाश्व नांवांच्या प्रधानानें बळकावले व त्याचें परिपत्य चिनी दरबारांतील एका चिनी वकिलानें केलें असा जो कथाभाग यासंबंधांत वर्णिला आहे त्यांत कांहींच अर्थ नसून त्यांना झालेला खरा खरा प्रकार कळलाच नाहीं असें म्हणावें लागतें. ही हकीगत त्यांनीं चिनीलेखांच्या आधारानें लिहिली. पण चिनी लेखकांची स्वाभाविक इच्छा आपलें स्वतःचें महत्व वर्णन करण्याची असल्यामुळें त्यांनीं लिहिलेल्या मजकुराला

काडी इतकी देखील किंमत देतां येत नाहीं. "हर्षाच्या दरबारांत येणारा चिनी वकील आपला अपमान झाल्यामुळें तिबेटांत निघून गेला आणि मग तेथून १२०० निवडक तिबेटी सैनिकासह परत येऊन ७००० नेपाळी घोडेस्वारांच्या साहाय्यानें ( यावेळीं नेपाळ प्रांत तिबेटच्या अंकित होता ) त्यानें तिरहुत शहराला तीन दिवस वेढा देऊन तें हस्तगत करून घेतलें. या वकीलाचें नांव वंग ह्युएन त्से असें होतें. तिरहुत हस्तगत झालें तेव्हां तेथील ३०००लढाऊ लोकांना त्यानें कैद केलें व १०००० लोकांना बागमती नदींत बुडवून टाकिलें. तेव्हां अर्जुन तेथून पळाला आणि सैन्याची जमवा जमव करून त्यानें पुनः युद्ध मांडिलें; पण पुनः त्याच्या पराजय होऊन तो कैद झाला. तेव्हां त्या विजयी वकीलानें लगेच हजार कैदी शिपायांचीं डोकीं उडविलीं आणि घोडे आणि गुरें मिळून ३०००० जनावरें काबीज केली. मग त्याच्या पुढें पांचशें ऐशीं तटबंदीच्या नगरांनीं मान वांकविला आणि पूर्वेकडील प्रदेशाचा जो कुमार नामक राजा हर्षाच्या धर्मसभांच्या वेळीं हजर असे त्यानें तर त्याला किती तरी गुरें ढोरें व वस्त्रें अर्पण केलीं. नंतर बंग ह्युएनत्से यानें कैद केलेल्या अर्जुनाला चीनदेशांत नेलें व त्यानंतर तिरहूत प्रांत कांहीं काळ पर्यंत तिबेटच्या आधिराज्यांखालीं होता." अशी हर्षाच्या मृत्यूनंतरचा हकीगत स्मिथनें दिली आहे. ( स्मिथकृत प्राचीन हिंदुस्थानचा इतिहास पान. ३९३ ).

आतां या वरील अतिशयोक्तिपूर्ण वर्णनाचा फोलपणा इतका उघड आहे कीं तो स्मिथसारख्या इतिहासकारांच्या लक्षांत येऊं नये याचें मोठें नवल वाटतें. त्यावेळीं हिंदूंची व चिनी किंवा तिबेटी लोकांचीं शस्त्रास्त्रें व सुधारणा यांमध्यें अंतर फारसें नव्हतें किंबहुना मुळींच नव्हतें म्हटलें तरी चालेल. असें असल्यामुळें

कांहीं शेंकड्यांनीं मोजण्या इतक्या अल्पसंख्याक तिबेटी सैन्यानें कित्येक हजार हिंदी सैनिकांचा पराभव करून, इंग्लिशांनीं जसा प्लासीच्या लढाईंत मुसलमानी सैन्याचा किंवा आसईच्या लढाईंत हिंदूंचा नायनाट केला असेल, तसा केला असेल हें शक्य नाहीं. शिवाय, अर्जुनानें हर्षाची गादी बळकाविली म्हणावें तर हर्षानें जें एवढें सैन्य तयार करून त्याच्या जोरावर संपूर्ण उत्तरहिंदुस्थान पादाक्रान्त करून आपल्या स्वामित्वाखालीं आणिलें होतें, तें सैन्य त्यावेळीं कोठें गेलें होतें? तसें एक तिरहूत पडल्याबरोबर अर्जुनाला नामोहरम होण्याचें तरी काय कारण होतें? तिरहूत काबीज केल्यावर तिबेटी सैन्यानें कनोजवर कां नाहीं हल्ला केला? वंग ह्युएनत्सेंगने तिरहूतपर्यंतच चाल केली व कनोजकडे तो वळला नाहीं असें जें ह्मटलें आहे,त्यावरून एकंदर या सर्व प्रकाराचें मर्म लक्षांत येतें. खरा प्रकार काय झाला असावा, याविषयीं आमचें मत असें आहे. हर्षाच्या निधनानंतर कनोजचें काय झालें तें कांहीं सांगतां येत नाहीं. पण त्याचा मृत्यु म्हणजे राजकीय व धार्मिक क्रान्तीचें निशाणच झालें म्हणावयास हरकत नाहीं. हर्षाच्या साम्राज्याच्या आधारावर बौद्ध धर्माच्या उत्कर्षाचा कळस झाला होता. शेवटचा श्वास टाकण्यापूर्वी जी रोग्याला तरतरी येते तशा स्थितींत बौद्धधर्म त्यावेळीं होता; व शेंकडों वर्षें योग्य संधीची वाट पहात बसलेली वैदिक धर्माची शक्ति हर्षाच्या मरणामुळें मुख्य अडथळा नाहींसा होऊन एकदम प्रकट झाली. हर्ष आणि राज्यश्री या दोघांच्या अभावीं जुन्या वर्मघराण्यांतील कोणी प्राचीन वैदिकधर्माभिमानी पुरुष कनोज येथें अधिकारारूढ झाला. साम्राज्यान्तर्गत इतर मांडलिक राज्यें व खुद्द कनोजच्या प्रत्यक्ष अमलाखालीं जे प्रांत होते त्यांतील राजे व अधिकारी सुद्धां प्राचीन धर्माकडे कल असल्यामुळें बौद्ध धर्माचा पाडाव करण्याकरितां ठिकठिकाणीं

स्वतंत्र झाले. अशा प्रान्तिक अधिकाऱ्यांपैकीं अर्जुन हा तिरहूत ऊर्फ बहार प्रान्तावरील एक अधिकारी होता. चिनांतून जें बौद्ध-धर्मीय लोकांचें शिष्टमंडळ इ. स. ६४७ त हिंदुस्थानांत आलें, त्याला नेपाळ उलटल्यानंतर या तिरहूत प्रांतांतून जावें लागलें व तें तसें जात असतां तेथील अर्जुन नांवाच्या प्राचीन धर्माभिमानी अधिकाऱ्यानें त्याच्यावर हल्ला केला. कारण, त्याच्या हृदयामध्यें या चिनी बौद्धधर्मीय शिष्टमंडळाविषयीं द्वेषाग्नि पेटला होता, आणि हर्ष मरण पावलेला असल्यामुळें, त्याला प्रतिकार करणाराहि कोणी उरला नव्हता. या हल्ल्यांतून वंग ह्युएनत्सेंग नामक एक शिष्ट निसटून पळाला, आणि तिबेटांत परत जाऊन तेथून कांहीं सैन्य मदतीस घेऊन तिरहूतच्या या लहानशा राजाशीं लढावयास आला. नेपाळचें तिबेटाशीं सख्य असल्यामुळें तेथूनहि त्याला थोडीशी मदत मिळाली. या युद्धांत अर्जुनाला अपयश येऊन तो कैद झाला. कुमार राजा ह्युएनत्संगाचा, तसाच हर्षाचा व एकंदरींत बौद्धधर्माचाच मित्र असल्यामुळें, त्यानेंहि सामग्री पुरवून त्या चिनीं वकीलाला साह्य केलें. तात्पर्य, चिनी वकील व अर्जुन यांचें युद्ध म्हणजे एक किरकोळ स्थानिक बाब असून हर्षाची गादी व सत्ता अर्जुनाने बळकाविली होती, असें म्हणतां येत नाहीं.

तर मग हर्षाच्या मागून त्याचें राज्य कोणाला मिळालें? आमच्या मतें वर सांगितल्याप्रमाणें मौखरी घराण्यापैकीं कोणी वर्मोपपदधारी पुरुषाला तें राज्यपद मिळालें असावें. ७ व्या शतकाच्या अखेरीस कनोज येथें यशोवर्मा नांवाचा वर्मकुलांतील राजा राज्य करीत होता, ही गोष्ट निर्विवाद आहे; तसेंच कनोजचें राज्य त्यावेळीं बरेंच विस्तीर्ण असून त्याची सत्ता मोठी होती, यांतहि संशय नाहीं. हा यशोवर्मा विद्वानांचा मोठा चहाता असून भवभूति, वाक्पतिराज इत्यादि सुप्रसिद्ध कवि त्याच्या पदरीं होते.

हें पूर्वी काश्मीरच्या इतिहासांत सांगितलेंच आहे. वाक्पतिराजानें गौडवहोनामक जें प्राकृत काव्य केलेलें आहे त्यांत यशोवर्म्याचेंच पराक्रमवर्णन आलेलें आहे. हा यशोवर्मा सोमवंशी क्षत्रिय होता असें वाक्पति म्हणतो. मौखरी घराण्यांतील वर्मराजे सोमवंशी असावे हें पूर्वी सांगितलेंच आहे.यशोवर्म्यानें सम्राट् पदवीची हर्षाप्रमाणें आकांक्षा धरिली व प्रथम गौडाचा देश जिंकून आपल्या दिग्विजयास प्रारंभ केला. गौड व मौखरी यांच्यांत असलेल्या कुलपरंपरागत वैराचाहि मागें उल्लेख आलाच आहे. हा गौड राजा गुप्तकुलांतील होता कीं काय, त्याची राजधानी कोणतें नगर होती, तसेंच त्याचा पराभव कसा झाला इत्यादि गोष्टी गौडवहोंत सांगितलेल्या नाहींत. कदाचित् आज उपलब्ध असलेलें गौडवहो काव्य अपुरें असून त्यांत एकंदर कथेची केवळ प्रस्तावनाच दिसते. यशोवर्म्यावर पुढें जीं संकटें आलीं त्यामुळें पुढील भाग कवीच्या मूळ उद्देशाप्रमाणें लिहिण्याचा योगच आला नसावा. याच वेळीं काश्मीरच्या मुक्तापीड ललितादित्याला सम्राट्पदाची इच्छा होऊन त्यानें देखील दिग्विजयाचें प्रस्थान ठेविलें, व त्यांत त्यानें यशोवर्म्याचा मोड केला, ही गोष्ट अगदीं निश्चितपणें आपल्याला माहीत आहे. त्याचप्रमाणें दक्षिणेंतील चालुक्य साम्राज्याच्या अधिपतीकडून हि यशोवर्म्याचा पराजय बहुधा झाला असावा. ललितादित्याच्या दिग्विजयाची हकीगत काश्मीरचा इतिहास सांगतांना दिलेली असल्यामुळें, तिचा येथें पुनरुच्चार करण्याचें कारण नाहीं. येथें इतकेंच सांगावयाचें कीं, ललितादित्य सिंहासनावर आल्यावर म्हणजे इ. स. ६९७ नंतर थोड्याच काळानें म्हणजे इ. स. ७०० च्या सुमारास त्याची यशोवर्म्याशीं गांठ पडली असली पाहिजे. या विषयीं चिनी लेखांत जो मजकूर आहे त्यावरून हा काळ

मानण्यांत कांहीं अडचणी उत्पन्न होतात, तथापि त्यांत फारसा अर्थ नसून त्यांचें विवेचन स्वतंत्र टीपेंत केलें आहे. चालुक्य सम्राटानें केलेला यशोवर्म्याचा पराभव मात्र या पूर्वीच होऊन गेलेला असला पाहिजे. त्याविषयीं आतां विचार करूं. येथपर्यंतचा इतिहास संपविण्यासाठीं येथें प्रथम एवढें सांगितलें पाहिजे कीं, यशोवर्म्यानें गौड राज्य इ. स. ६८० पासून ६९० पर्यंत केव्हांतरी जिंकिलेलें होतें, म्हणजे तो सन ६७१ च्या सुमारास गादीवर आला असला पाहिजे. आतां हर्षाचा निधन काल म्हणजे सन ६४७ आणि यशोवर्म्याचें राज्यारोहण म्हणजे सन ६७५ यांच्या दरम्यान वर्मकुलांतील दोन राजांनीं कनोजवर राज्य केलें असलें पाहिजे. हें दोन राजे कोण होते याचा इतिहासांत दाखला नाहीं; व कोणत्याहि प्राचीन उपलब्ध लेखांत त्यांचा संबंध आलेला नाहीं. मग यशोवर्म्याला तिसरा राजा म्हणण्याचें कारण असें कीं त्याचें सामर्थ्य व तदनुसार त्याची सम्राट्पदवीची आकांक्षा हीं इतिहासांत नित्य आढळून येणाऱ्या नियमाला अनुसरूनच दिसतात. इतिहासांत सामान्यपणें असें दिसून येतें कीं, नवीन राजघराणें स्थापन झाल्यावर पहिल्या दोन राजांना राज्य स्थिरस्थावर करण्याचीच आवश्यकता असल्यामुळें त्यांची आकांक्षा फार दूरवर जात नाहीं, पण त्यांनीं मजबूत केलेल्या राज्याच्या आधारावर तिसरा राजा मात्र मोठया वैभवास चढण्याची आकांक्षा धरितो. चालुक्य घराण्यांतील दुसरा पुलकेशी, मोंगल बादशहांपैकीं अकबर, पेशव्यांपैकीं नानासाहेब हीं व अशीं आणखीं शेंकडों उदाहरणें याविषयीं देतां येतील.

असो. यशोवर्म्याचा दक्षिणेंतील लोकांकडून जो पराजय झाला असावा असें आम्हीं म्हणतों त्याला आधार काय? पूर्वी बादा-

मीच्या चालुक्यांचा इतिहास सांगतांना हर्षाचा पराजय करणाऱ्या सुप्रसिद्ध दुसऱ्या पुलकेशीचा नातू व विक्रमादित्याचा पुत्र जो विनयादित्य चालुक्य त्यानें उत्तरेकडील एका राजाचा मोड केला असा अनेक ताम्रलेखांत उल्लेख आहे. हा राजा कोण असावा हें अजून गूढच असून त्याचा कोणी उलगडा केलेला नाहीं. विनयादित्यानें इ. स. ६८० पासून ६९६ पर्यंत राज्य केलें हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्याचे दानलेख शके ६१६ म्हणजे सन ६९४ पर्यंतचे सांपडले असून त्यांत त्यानें कोणा उत्तरेकडील राजाचा पराभव केल्याचें सांगितलेलें नाहीं. तेव्हां दोन्हींचा मेळ घालावयाचा तर ही गोष्ट सन ६९४ पासून ६९६ पर्यंत केव्हां तरी घडली असली पाहिजे असें म्हणावें लागतें. हा काळ आमच्या या पुढील कल्पनेशीं देखील मिळता आहे; तो असा कीं, यशोवर्म्यानें हर्षाप्रमाणें प्रथम पूर्वेकडील देश जिंकून मग तो दक्षिणेकडे वळला आणि पुढें हर्षाप्रमाणेंच त्यालाहि तिकडे दुसऱ्या पुलकेशी चालुक्याचा नातू जो विनयादित्य त्याच्याकडून चांगली ठोकर मिळून उलट खावी लागली. ही गोष्ट पूर्व चालुक्यांच्या अनेक लेखांत सांगितली असून मागाहूनच्या उत्तर चालुक्यांच्याहि लेखांत आलेली आहे. हा यशोवर्म्यावर चालुक्यांनीं मिळविलेला विजय मोठा संस्मरणीय असून पुलकेशीनें हर्षावर मिळविलेल्या विजयाच्या तोडीचाच असावा; कारण त्यांच्या लेखांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, विनयादित्यानें यावेळीं त्या उत्तरदेशाधिपतीपासून पालिध्वज, मकरतोरण, चंद्रसूर्य, गंगायमुना इत्यादि राजचिन्हेंहि बळकावून घेतलीं. या गोष्टीचा अगदीं पहिला उल्लेख विजयादित्यचालुक्यांच्या शके ६२२ (सन ७००) मधील लेखांत सांपडतो. (इंडियन अँटिक्वरी पुस्तक २०, पा. १२७). त्यांत हें युद्ध त्याचा पिता विनयादित्य

आणि कोणी एक उत्तरदेशाधिपति यांत झालें असें म्हटलें आहे. तथापि, त्यावेळीं विजयादित्य देखील तेथें हजर असून त्यानें मोठ्या पराक्रमानें वर सांगितलेलीं राजचिन्हें हस्तगत केलीं असें सदर लेखांत लिहिलें आहे.[1] हा लेख इ. स. ७०० मधील असल्यामुळें अर्थात् हें युद्ध त्यापूर्वी कांहीं वर्षें झालेलें असलें पाहिजे. तसेंच विनयादित्य इ. स. ६९५ त मरण पावला असल्यामुळें त्याहि पूर्वी तें घडून आलेलें होतें हे उघड आहे. या युद्धांत जीं राजचिन्हें चालुक्यांनीं मिळविल्याचें सांगितलें आहे त्यांचें विशेष महत्व आहे. त्यांत गंगा यमुना नामक चिन्हें होतीं. या चिन्हांचा अर्थ कांय हे अद्यापि कोणाला समजलें आहेसें दिसत नाहीं, हें पूर्वी सांगितलेंच आहे. या चिन्हांचा अर्थ आमच्या मतें असा असावा कीं, गंगा व यमुना या नद्यांमधील हिंदुस्थानाच्या भागावर ज्याचें आधिपत्य असेल तो सर्व हिंदुस्थानाचा सम्राट् समजला जाई. हा समज बरोबर असेल तर गंगा यमुनांच्या या उल्लेखावरून पराजित झालेला उत्तराधिप कनोजचा यशोवर्माच असला पाहिजे असें ठरतें. सदर लेखांत विनयादित्याला 'सकलोत्तरापथ नाथ-मथनोपार्जितोर्जित पालिध्वजादि-समस्त-पारमेश्वर्य-चिन्हस्य ' असें जें विशेषण लाविलेलें आहे त्याचा विचार करतां कनोजच्या यशोवर्म्याची सर्व उत्तर हिंदुस्थानावर आधिराज्य मिळविण्याची इच्छा होती किंवा तसा अधिराज तो होताच, व सन ६९५ त चालुक्यांनीं त्याचा पराजय केल्यामुळें त्याला या अधिराज पदवीला मुकावें लागलें

---

१ उत्तरापथविजिगीषोर्गुरोरग्रतः गंगायमुनापालिध्वजपटढक्कामहाशब्द-चिन्हमाणिक्यमतङ्गजादीन् पितृसात्कुर्वन्

असें निःसंशय * ठरतें. याच लेखांत आणखीं विजयादित्याला दुर्दैवानें कैद होण्याचा प्रसंग आला म्हणून जें म्हटलें आहे, तेंहि कदाचित् याच युद्धासंबंधानें असेल; किंवा आम्हीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें दक्षिणेंतील पल्लवांशीं झालेल्या युद्धासंबंधानें असेल. कोणत्याही युद्धांत ती गोष्ट घडली असली, तथापि ज्या नेरूरच्या ताम्रलेखांत त्या प्रसंगाचा उल्लेख आहे, तो लेख इ. स. ७०० मधील असल्यामुळे त्यापूर्वीचा तो प्रसंग आहे एवढी गोष्ट खरी. तो प्रसंग इ. स. ६९६ ते ७०० च्या दरम्यान केंव्हांतरी घडला, व त्यामुळें काश्मीरच्या ललितादित्यानें जेंव्हां दिग्विजयासाठीं दक्षिणेवर स्वारी केली तेंव्हां तो कैदेंत असल्यामुळें त्याला ललितादित्यापासून आणखीं उपद्रव पोंचला नसावा. ललितादित्याची दक्षिणेवरील स्वारी इ. स. ७०३ च्या सुमारास झाली हें वेंगीराजांच्या इतिहासांत सांगितलेंच आहे.

यशोवर्म्याचा दिग्विजयाचा बेत प्रथम दक्षिणेंत थोडा फसला आणि उत्तरेकडे त्याची ललितादित्याशीं गांठ पडल्यावर तर तो समूळच ढांसळला. या दुसऱ्या अपयशाचें सविस्तर वर्णन पूर्वी केलेंच आहे. या युद्धांत यशोवर्मा कांहीं मारला गेला नाहीं. राजतरंगिणींतील कांहीं शब्दांवरून तसें वाटण्याचा संभव आहे, पण

* वर सांगितलेल्या राजचिन्हांचा सविस्तर उल्लेख पुढील पुष्कळ लेखांत आलेला आहे. त्यांपैकी पालिध्वज म्हणजे काय हें सांगतां येत नाहीं. चंद्र, सूर्य आणि मकरतोरण हीं अद्यापिहि राजचिन्हें म्हणून मिरविण्यांत येतात. मोंगल बादशहांनी त्यांचा स्वीकार केलेला होता व शिंदे सरकार आज देखील ती वापरीत आहेत. रूढी किंवा चाली कशा चिकट असतात याचा विचार केल्यास मोठें आश्चर्य वाटतें. इ. स. ७०० च्या सुमारास बादामीच्या चालुक्यांनी चंद्र, सूर्य व मकर तोरणें यांचा सम्राट्चिन्हें म्हणून इतक्या प्राचीन काळींहि उपयोग केलेला होता ही गोष्ट मौजेची नाहीं असें कोण ह्मणेल ?

वस्तुतः तो केवळ ललितादित्याचा नांवाचा मांडलिक होऊन राहिला. मुसलमानी अमदानीपूर्वी साम्राज्यासाठीं ज्या धडपडी भरतखंडांत झाल्या, त्या सर्वांत हाच प्रकार सामान्यतः आढळून येतो. आम्हीं पूर्वी अनेकवार सांगितलेंच आहे कीं भरतखंडां-तील साम्राज्यें इतर राज्यें खालसा करून स्थापिलेलीं नसत. पराभूत झालेल्या राजांना थोडा बहुत वार्षिक करभार देण्याचें कबूल केल्यानें, आपल्या राज्याचा बहुतेक पूर्ण स्वतंत्रपणें उप-भोग घ्यावयास सांपडे. या वहिवाटीला अनुसरून यशोवर्मा पुनः आपल्या राज्याचा उपभोग घेऊं लागला व तो इ. स. ७१० पर्यंत किंबहुना ७१५ पर्यंत हयात होता असें जें शंकर पांडुरंग पंडित यांनीं गौडवहो काव्याच्या आपल्या प्रस्तावनेंत दाखविलें आहे, तें आमच्या मतें अगदीं बरोबर आहे.

यशोवर्म्यासंबंधीं विशेष महत्वाची गोष्ट म्हटली म्हणजे त्याची कारकीर्द वैदिक धर्माच्या पुनरुज्जीवनाशीं समकालीन असून त्याच्या हयातींतच त्या धर्माचें वर्चस्व पुनः पूर्ण प्रस्थापित झालें. खरें म्हटलें तर हर्षाच्याच वेळीं या वैदिक धर्माच्या पुनरुज्जीव-नाला प्रारंभ झाला होता. त्या धर्माच्या अभिमान्यांनीं वेदप्रामाण्य आणि वैदिक यज्ञयागांचें सफलत्व यांचा म्हणजे बौद्धधर्माचा वैदिक धर्मांतील ज्या मुख्य दोन गोष्टींवर मोठा डोळा असे, त्याच दोन गोष्टींचा आश्रय करून पूर्व मीमांसेचा म्हणजे वैदिक कर्मकांड शास्त्राचा अभ्यास हर्षकाळींच मोठ्या आस्थेनें सुरू केला होता. बाणभट्टानें आपले पितृव्य मीमांसापारंगत आणि वाजपेय-अग्नि-ष्टोमादि श्रौतयज्ञ करणारे होते असें लिहिलें आहे. पूर्व मीमांसेचा प्रबळ वाली जो कुमारिलभट्ट तो शंकरपंडितांच्या मतें भवभूतीचा गुरु आणि वाक्पतिराजाचा परात्पर गुरु होता; व ही गोष्ट भव-भूतीच्या मालतीमाधव नाटकाच्या शेवटीं दिलेल्या उल्लेखा-

वरून दिसून येते. पंडितांनीं या पुरुषांचे जे काल ठरविले ते आपण मान्य करण्यास कांहीं हरकत नाहीं. ते काळ असेः—

कुमारिल भट्ट जन्म इ. स. ५९० मृत्यु सन ६५०

त्याचा शिष्य भवभूति जन्म स. इ. ६२० „ „ ६८०

त्याचा शिष्य व अभिमानी वाक्पति जन्म सन ६६० „ ७२०

यांचा आश्रय दाता यशोवर्मा यानें सन ६७५ पासून सन ७१० पर्यंत राज्य केलें. (गौडवहो काव्याची पंडितांची प्रस्तावना पा. २१९).

हे काळ अर्थातच आनुमानिक आहेत, तथापि त्यांना ऐतिहासिक प्रमाणांचा भरपूर आधार असल्यामुळें कुमारिल भट्टाची मीमांसक म्हणून हर्षकाळींच ख्याति झालेली असून त्याच्या अनुयायांनीं हर्षाच्या शेवटच्या धर्मसभांत बौद्ध धर्माच्या मतांना जोराचा प्रतिकार केला असें खात्रीनें म्हणावयास हरकत नाहीं. या पुढील शतकांत वैदिकधर्माच्या पुनरुज्जीवनाच्या इतिहासांत प्रचंड कर्तबगारी करणारे जे शंकराचार्य त्यांच्या पूर्वी कुमारिल भट्ट नुकताच होऊन गेला, असा जो लौकिक समज आहे तो अर्थात् आम्हांला बाजूस ठेविला पाहिजे. शंकराचार्यांनीं कुमारिल भट्टाला वादांत पराभव केल्याची गोष्ट, शालिवाहनानें केलेल्या विक्रमाच्या पराभवासारखीच आहे—दोन्ही उघड उघड सारख्याच असमंजस व कालक्रमविरोधी आहेत. हर्षाच्या मृत्यूनंतर उत्तर वर्मकुलांतील राजांच्या अमदानींत, पूर्वमीमांसादर्शनाचें वर्चस्व होऊन गंगायमुनांमधील प्रदेशांतून म्हणजे हिंदुसाम्राज्याच्या मुख्य ठिकाणांतून बौद्धधर्माची शेवटची उचलबांगडी झाली. त्यामुळें स्वाभाविकपणेंच यशोवर्म्याच्या कारकीर्दीत हिंदुसाम्राज्याची राजधानी असलेलें कनोज शहर वैदिक धर्माचें केन्द्रस्थान बनून त्याला जें एक धार्मिक विशेष महत्व आलें तें पुढें कित्येक

शतकें म्हणजे मुसलमान लोक तो प्रदेश जिंकीपर्यंत तसेंच राहिलें. कनोजे ब्राह्मण त्या काळांत सर्व हिंदुस्थानांतील ब्राह्मणांमध्यें अग्रस्थान पावून उत्तरेकडील ब्राह्मणांच्या सर्व पोटजातींत श्रेष्ठ म्हणून मानण्यांत येऊं लागले. या काळापर्यंत पंच गौड व पंच-द्राविड अशा प्रकारचा ब्राह्मणजातीचा पोटविभाग झालेला नव्हता, हें आम्हीं पुढें दाखविणार आहों. येथें एवढें सांगावयाचें आहे कीं, कनोजे ब्राह्मणांचें वर्चस्व या काळापासून म्हणजे यशोवर्म्याच्या कारकीर्दीपासून सुरू झालें. आजवर गौड अथवा कुरु-क्षेत्र व ठाणेश्वर या प्रदेशांतून ब्राह्मण आणि क्षत्रिय यांचा भरणा बंगाल देशाला होत होता. पण तेथील दंतकथेवरून असें समजतें कीं, या उत्तर वर्मकुलांतील राजांच्या वेळीं कनोज येथील पांच ब्राह्मण व पांच कायस्थ यांना बंगालमध्यें बोलावून नेऊन तेथील आदिसुर नांवाच्या पहिल्या प्राचीन धर्माभिमानी राजानें त्यांची बंगाल्यांत वसाहत करविली. आदिसुर राजासंबंधाने पुढें वर्णन येणारच आहे. हें जें वैदिकधर्माचें व बरोबर वाक्यार्थ मीमांसात्मक वैदिक कर्मकांडशास्त्राचे पुनरुज्जीवन झालें, ते उत्तर हिंदुस्थानांत काय तें झाले असे नाहीं; दक्षिणेंत चालुक्यांच्या आश्रयानेंहि त्याची जोराची वाढ झाली हें पूर्वी सांगितलेच आहे. याप्रमाणे दोहोंकडे जोराचा प्रयत्न झाल्यामुळे बौद्धधर्माची हिंदु-स्थानांतून बहुतेक उचलबांगडी होऊन तो आपल्या जन्मभूमींत म्हणजे मगध देशांत मात्र आणखीं कांहीं शतकें टिकून राहिला.

यशोवर्म्याच्या कारकीर्दीच्या अखेरीस वर्मकुलाला उतरती कळा लागून त्याच्यामागें तर तें अधिकच खालावलें. त्याच्या मागून आलेल्या राजांपैकीं वज्रायुध नांवाचा जो राजा होता त्याचाहि पुनः काश्मीरच्या जयापीड राजानें पराजय केला. या जयापीडानें

दिग्विजय करण्यांत ललितादित्याचें अनुकरण केलें तरी तो जोरानें त्या भानगडींत पडला नाहीं;तें काम त्यानें तात्पुरतेंच चालविलें. जयापीडाचा काळ राजतरंगिणीप्रमाणें पहातां इ. स. ७५१ ते ७८२ असा आहे व तो आमच्या मतें बरोबर आहे; २५ वर्षांची त्यांत भर घालण्याचें कांहीं कारण नाहीं हे आम्हीं काश्मीरच्या इतिहासांत दाखविलेंच आहे. जयापीड हा ललितादित्याचा नातू तर इकडे वज्रायुधहि यशोवर्म्याचा नातू होतासें दिसतें. यशोवर्म्याचा राज्यकाल इ. स. ७१० च्या सुमारास संपून सन ७५१ च्या सुमारास त्याचा नातू वज्रायुध बहुधा कनोजच्या गादीवर असावा. जयापीडाचा ब्राह्मण प्रधान देवशर्मा हा देखील ललितादित्याच्या अग्निशर्मा नामक सुप्रसिद्ध परराष्ट्रीय प्रधानाचा नातूच होता. राजशेखराच्या कर्पूरमंजरीमध्यें वज्रायुधाचा उल्लेख असून त्याला कनोज येथें राज्य करणारा पांचालांचा राजा असें तेथें म्हटलें आहे.

या कुलांतील कनोजच्या राजाचा या पुढील उल्लेख चक्रायुधाविषयींचा असून तो बंगाल्यांतील पाल राजाच्या भागलपुर येथें सांपडलेल्या ताम्रपटावरील दानलेखांत आहे-( इंडियन अँटिक्करी. पु. १५ पा. ३०४ ). त्यांतील श्लोक असा:—जितेन्द्रराजप्रभृती नरातीन् उपार्जिता येन महोदयश्रीः । दत्ता पुनःसा बलिनार्थयित्रे चक्रायुधायानतिवामनाय ॥ हें विधान धर्मपालराजाविषयीं असून त्यांत त्यानें कनोजच्या राजाची लक्ष्मी इंद्रराजादि शत्रूंचा मोड करून हस्तगत करून घेतली व पुनः ती शरण आलेल्या

* या कुलांतील राजांचें वर्म हें अंत्योपपद जाऊन आयुध हें त्याच्या जागीं आलें असलें, तरी त्यावरून ते कुलच कोठून नवीन आलें असें मानण्याचें कारण नाहीं.

चक्रायुधाला म्हणजे बहुधा इन्द्रायुधाच्या म्हणजे इन्द्र राजाच्या पुत्राला परत दिली.* याशिवाय धर्मपालाच्या स्वतःच्या खलिम्पुरच्या दानलेखांत असें म्हटलें आहे कीं, " भोज, मत्स्य, मद्र, कुरु, यदु, यवन, अवन्ति, गांधार आणि कीर या देशांच्या राजांच्या विनंतीवरून पांचाल राजाचें राज्य त्याला पुनः परत देण्यांत आलें व त्या विनंति करणाऱ्या राजांना आनंद वाटला " ( भोजैर्मत्स्यैः समद्रैः कुरुयदुयवनावन्तिगांधारकीरैः ॥ भूपैर्व्यालोलमौलिप्रणतिपरिणतैः साधु सङ्गृह्यमाणः । ). ह्या ओळी फार महत्वाच्या आहेत. त्यांवरून असें निःसंशय सिद्ध होतें कीं, कनोजच्या अवनतीच्या काळीं देखील त्याची साम्राज्यसत्ता बऱ्याच विस्तृत प्रदेशांत मान्य करण्यांत येत होती. वरील राज्यांपैकीं भोज म्हणजे आमच्यामतें महाभारतांतील कुंतिभोज अथवा अलीकडील ग्वाल्हेर असावें. मत्स्य म्हणजे जयपुर, मद्र म्हणजे पंजाबचा पूर्वभाग, कुरु म्हणजे ठाणेश्वर उर्फ वर्धनघराण्याचें श्रीकंठ, यदु म्हणजे मथुरा; यवन म्हणजे काय तें संशयास्पदच आहे, तरी तें बहुधा मध्यदेशांतील कैलकिल यवनांच्या राज्याचा अवशेष असावें; ( हंटर कृत ओढया प्रांताचा इतिहास पहा. त्या विषयीं पुढें विवेचन करूं.) गांधार म्हणजे पेशावर, अवन्ति म्हणजे माळवा किंवा उज्जनी, आणि कीर म्हणजे विन्ध्याद्री किंवा हिमालय जवळचा डोंगराळ मुलूख. तात्पर्य, प्रयागाच्या पश्चिमेकडील उत्तर हिंदुस्थानचा बहुतेक भाग कनोजच्या वर्म राजांच्या अधिराज्याखालीं होता, व प्रयागाच्या पूर्वेकडील भाग

---

* मुसलमानी अमलापर्यंत हिंदुस्थानांत अशीच वहिवाट दिसून येते. पांडवांनी जरासंधाचा वध केल्यावर मगध देशाचें राज्य पुनः त्याच्या सहदेव नामक पुत्राला परत दिलें.

नवीन स्थापन झालेल्या बंगाल्यांतील पालराजांकडे होता. ज्या लेखांत वरील मजकूर आहे तो इ. स. ८०० तील आहे. पालराजांकडून कनोजच्या वर्मकुलाला हा धक्का मिळाल्यावर फार दिवस काढवले नाहींत. त्यांच्या मांडलिकांची महत्वाकांक्षा फार दिवस दबून रहाणें शक्य नव्हतें, तसेंच दुसरे स्वतंत्र शेजारचे राजेहि त्यांचे लचके तोडण्यासाठीं तयार असावे. शेवटीं हें वर्म घराणें इ. स. ८१६ त नागभट्ट नांवाच्या प्रतिहार राजानें लयास नेलें. हा नागभट्ट राजपुतान्यांत एका संस्थानाचा मांडलिक किंवा कनोजच्या शेजारचा स्वतंत्र राजा होता. कनोजच्या सम्राटांच्या या नवीन कुलाचा इतिहास आम्हीं पुढील पुस्तकांत सांगूं.

वर सांगितल्याप्रमाणें कनोजच्या वर्मकुलाचें साम्राज्य इ. स. ५.० पासून तों सन ८०० पर्यंत टिकलें. हर्षाच्या वेळीं वर्माच्या घराण्यांत थोडा खंड पडला खरा. परंतु हर्षानें राज्यश्रीच्या नांवानें म्हणजे पर्यायानें तिच्या पतीच्याच नांवानें राज्य चालविल्यामुळें एके प्रकारें वर्मघराणें तेव्हां नष्ट झालें नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. मौखरीच्या घराण्याचे पूर्व मौखरी व उत्तर मौखरी असे भाग केल्यास पहिल्याचा काल सन ५०० ते ६०६ पर्यंत व दुसऱ्याचा ६४७ पासून ८१६ पर्यंत होईल. इतिहासांत साधारण मानानें राजघराणीं चालण्याचा अवधि १५० पासून २०० वर्षांचा असून क्वचित तो ३०० वर्षांचा व अपवादानें मात्र ४०० वर्षांचा असा आढळून येतो. त्या मानानें उत्तर मौखरींचा जवळ जवळ १७५ वर्षांचा अवधि योग्यच दिसतो. असो, या वर्मराजांच्या अमदानींत अहिंसात्मक बौद्धधर्माचें हिंदुस्थानांतून कायमचें उच्चाटन झालें, व आजमितीस कनोजे ब्राह्मण इतर ठिकाणच्या ब्राह्मणांप्रमाणें निवृत्तमांस नसून मांसाहारि आहेत.

# टीप.

## गौडवहो, त्यांत सांगितलेला यशोवर्म्याचा दिग्विजय व या वर्णनांत आलेले पारसिक.

गौडवहो नामक काव्य वाक्पतिराजानें प्राकृतांत लिहिलें असून त्यांत कनोजच्या यशोवर्म्याच्या दिग्विजयाचें सविस्तर वर्णन दिलेलें आहे हें पूर्वीच सांगितलें आहे. वाक्पतिराजाचा यशोवर्मा हा आश्रयदाता होता. पण या काव्यांत वर्णिलेला दिग्विजय खरा खुरा होता कीं काय याविषयीं मात्र संशय आहे. त्यांतील मुख्य विषय म्हणजे यशोवर्म्यानें केलेला गौड राजाचा वध हा असून तेवढी गोष्ट ऐतिहासिक असेल. परंतु, सूर्यवंशांतील अति प्राचीन काळच्या रघुराजापासून त्यामागून अगदीं अलीकडील अशा समुद्रगुप्त किंवा ललितादित्य इत्यादिक प्रसिद्ध राजांनीं जसा पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर अशा क्रमानें दिग्विजय केला आणि सम्राट् पदवी प्राप्त करून घेतली, त्याप्रमाणें यशोवर्म्याच्या हातून खरोखर घडलें कीं काय हा प्रश्न आहे. त्याच्या विषयीं इतर ऐतिहासिक लेखांत कोठें प्रत्यंतर मिळत नाहीं. पण उलट दृष्टीने पहातां वाक्पतिराज यशोवर्म्याचा समकालीन असल्यामुळें त्याच्या काव्याचा विषय सर्वथा अविश्वसनीयहि म्हणतां येत नाही. कदाचित् असें असण्याचा संभव आहे कीं, गौडवहो काव्य ज्या अर्थी संपूर्ण झालेलें नाहीं त्या अर्थी कवीने तो दिग्विजय केवळ संभवनीय गोष्ट म्हणून आपल्या काव्याचा विषय कल्पिला असेल; पण पुढें प्रत्यक्ष गोष्टी घडतांना यशोवर्मा दक्षिणेंत गेल्यावर तेथें चालुक्य राजानें व आणखी पुनः उत्तरेकडे काश्मीरच्या राजानें त्याचा पराभव केल्यामुळें काव्यविषय तसा कल्पनेंतच राहिला. तथापि वाक्पतीच्या या काव्यांतील दिग्विजय वर्णनांत कांहीं महत्वाच्या गोष्टींचा उल्लेख असल्यामुळें तो क्रमशः सांगणें अवश्य आहे.

वाक्पति म्हणतो, प्रथम यशोवर्मा शोणनदीच्या तीरावर आला ( ही नदी गौडराजाची पश्चिम सीमा असावी. गौडवहो श्लो. २४०-२४६ ). वाटेंत त्यानें अद्यापिहि मनुष्यांचे बळी घेणाऱ्या विन्ध्यवासिनी देवीचें

दर्शन घेतले व कांही दिवस त्या पर्वतावर हिंडण्यांत घालविले. (श्लो. २८५.) तो आपल्यावर चाल करून येतो आहे असे पाहून गौडराजा पळून गेला. गौडराजा मगध देशाचाही राजा होता असें येथें म्हटलें आहे. (श्लो. ३४६–४५४) यशोवर्म्यानें गौडराज्यांत प्रवेश केला, पण त्यावेळी वर्षाकाळ सुरू झाल्यामुळें तो तेथें छावणी ठोकून राहिला. तेव्हां पळून गेलेला गौडराजा साहाय्यसंपादन करून परत आला आणि मग दोघांचे युद्ध होऊन गौड मगधांचा राजा त्यांत वध पावला (श्लो. ४१४–४१७).

वस्तुत: येथे गौडवहो काव्य संपावयास पाहिजे होते. पण त्यात यशोवर्मा पुढें दिग्विजयाला निघाल्याचे सांगितलें आहे. गौडदेशाहून निघून पुढें तो समुद्रापर्यंत गेला, आणि तेथे वंगराज्य त्याने जिंकिले. तेथून समुद्रतीराने मार्गक्रमण करीत तो खाली मलयपर्वतापर्यंत आला आणि तेथें त्यानें पारसीकांना जिंकिलें. पारसीक लोक हे इकडे दक्षिणेत कसे आले याचें पुष्कळांना कोडें पडले आहे. पण ते तेथें होते ही गोष्ट खरी आहे. याच काळच्या एका चालुक्य राजाच्या लेखांत, त्याने चोल व पांड्य या राज्यांबरोबर सिंहलद्वीप आणि पारसीक यांनाहि जिंकिल्याचा उल्लेख आहे. हे पारसीक म्हणजे पह्लव मात्र नव्हेत, हें लक्षांत ठेविले पाहिजे. कारण, ही नांवें अगदीं स्पष्टपणें भिन्न असून पारशी लोक अरबांच्या भीतीने इराणांतून जे पळून आले, ते गुजराथच्या किनाऱ्यावर उतरून कायमची वसाहत तेथें करण्यापूर्वी इ. स. ७०० च्या सुमारास प्रथम खालीं दक्षिणेकडे गेले होते, असें दिसतें.

गौडवहो काव्यांत सांगितल्याप्रमाणें यशोवर्मा अगदीं दक्षिण टोंकाजवळ म्हणजे जेथें पूर्व व पश्चिम समुद्र एकत्र मिळतात तेथपर्यंत गेला, व तेथून नर्मदा नदी जेथें समुद्रास मिळते तेथें आला. याच ठिकाणीं पूर्वी देवदैत्य समुद्रमंथन करीत असतां, त्यांना अमृतकलशाचा लाभ झाला. तेथून पुढे तो मरुदेश म्हणजे रजपुतान्यांतील जो वाळवंटाचा प्रदेश तेथे गेला, आणि तेथून ठाणेश्वराकडे म्हणजे तेव्हांच्या श्रीकंठाकडे वळला. या पश्चिम दिशेवर विजय मिळवून त्यानें उत्तरेकडे मोर्चा वळविला आणि अयोध्या प्रांत जिंकिला. या हरिश्चंद्र व रामचंद्र यांच्या नगरींत त्यानें एका दिवसांत

एक मंदिर बांधिलें आणि तेथून मग तो मन्दरपर्वताकडे गेला. हा मंदर म्हणजे हिमालयाचाच एक भाग होय. ( पण गौडवहोच्या टीकाकाराने त्याला चुकीने महेन्द्रच मानिले आहे. वस्तुतः महेन्द्रपर्वत पूर्व किनाऱ्या-जवळ असून कनोजच्या दक्षिणेस आहे ). मंदराहून यशोवर्मा पुढे हिमालयाकडे गेला, व तेथें त्याचा दिग्विजय पुरा झाला. नंतर तो कनोजला परत आला आणि आपल्या विजयाचा उपभोग घेऊं लागला.

गौडवहोंतील या दिग्विजयवर्णनांत कोणत्याहि राज्यांतील राजाचें नांव सांगितलेले नाहीं. फार काय, पण प्रत्यक्ष ज्या गौडराजाचा वध, हा त्या काव्याचा मुख्य विषय त्याचेंहि नांव त्यांत आलेले नाहीं त्याचप्रमाणे दक्षिण, पश्चिम आणि उत्तर या दिशांतील राज्यांची देखील नांवें त्यांत दिलेली नाहींत. त्यामुळे, या वर्णनाचें ऐतिहासिक दृष्ट्या महत्व बेताचेंच आहे. त्यांत जर पारसीक लोकांचा संबंध आलेला नसता, व त्याचें तत्कालीन चालुक्याच्या दुसऱ्या लेखांतून जें प्रत्यन्तर मिळते तें मिळालें नसते, तर त्याचा निर्देशहि या ठिकाणीं केला नसता. तथापि एकंदरींत गौडवहो काव्याचा मुख्य विषय ऐतिहासिक सत्य असून तसेच मत शंकरपंडितादि विद्वानांनीं प्रतिपादिले आहे.



# प्रकरण १६ वें.



## मध्य हिंदुस्थानांतलि इतर राज्यें.

### १ कोशल देशांतील हैहय राजे.

( ओड्र उर्फ ओरिसानंतर कृष्णानदीपर्यंतचीं ह्युएनत्संगानें निर्दिष्ट केलेलीं राज्यें कोंगुड–आजचा गंजम जिल्हा–कलिंग, कोसल, आंध्र आणि धनकट हीं होत. धनकटाची राजधानी कृष्णाकाठीं अमरावतीनामक नगरी असून वेंगी प्रान्ताशीं त्या देशाचे ऐक्य पूर्वी दाखविलेंच आहे. बाकीच्यापैकी कोंगड उर्फ गंजम हें बरेच वेळां ओढयाच्या राज्यांत मोडत असे. कलिंगदेशांतील राजाचे नांव ह्युएनत्संगानें सांगितलेलें नाहीं. तेथील लोक हट्टी, वर्णानें गौर व वाणीचे स्पष्ट आहेत असें मात्र त्यानें लिहिलें आहे. तसेंच मध्यदेशांतील लोकांपेक्षां त्यांची भाषा व चालीरीति थोडया भिन्न होत्या, असेंहि त्यानें म्हटलें आहे. त्यांत बौद्धधर्मीयांचा फारसा भरणा नव्हता. इतर धर्मांचेच लोक त्यांत पुष्कळ होते. या ह्युएनत्संगाच्या वर्णनावरून कलिंगदेशांतील उच्च जातीचे लोक आर्य किंवा मिश्र आर्यजातीचे असून तो त्यावेळीं ओढया किंवा वेंगी या राज्यांच्या वर्चस्वाखालीं होता असें दिसते. ह्युएनत्संगाने म्हटल्याप्रमाणें कलिंग, कोंगड आणि आंध्र मिळून त्रिकलिंग बनला होता, व हा त्रिकलिंग म्हणजे तैलगदेश बराच काळ वेंगीच्या चालुक्यांच्या अमलाखालीं होता, हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्यामुळें, कलिंगदेशाचा स्वतंत्र इतिहास देणें शक्य नाहीं. परंतु, पूर्व घाटावरच्या बाजूला असलेल्या कोसल व आंध्र या देशांची मात्र स्थिति तशी नाहीं. त्यांचा स्वतंत्र इतिहास असून दोन प्रकरणांत आम्ही तो देणार आहों. त्या इतिहासाचीं साधनें म्हणजे कांहीं प्राचीन कोरीव लेख व हंटरने ओरिसा प्रांताच्या इतिहासांत दिलेली कांहीं महत्त्वाची माहिती हीं होत. मध्यप्रांताच्या गॅझिटिअर मधूनहि तत्संबंधीं कांहीं माहिती मिळते. )

नर्मदेच्या खोऱ्यांत फार प्राचीन काळापासून हैहय नांवाचें एक क्षत्रियकुळ वास करीत होतें. तें सोमवंशी क्षत्रिय जातीचें असून प्राचीनकाळीं

सहस्रार्जुन नांवाचा एक महापराक्रमी राजा त्याच्यामध्यें होऊन गेला, व त्याचा परशुराम नांवाच्या ब्राह्मण वीरानें वध केला, हें सुप्रसिद्धच आहे.– हैहयांची राजधानी नर्मदातीरीं माहिष्मती म्हणजे हल्लींचें महेश्वर येथें असून त्यांचा मध्यप्रान्तांतील अरण्यमय प्रदेशांत बराच विस्तार झाला. त्यांनीं तेथें अनेक राज्ये स्थापिलीं, त्यांपैकीं कोसलचें राज्य हें एक असून तें महाभारता- इतकें प्राचीन आहे. या हैहयांचे आणि अयोध्येच्या सूर्यवंशी सगर राजाचें मोठें युद्ध झालें असे महाभारतांत वर्णन आहे, व त्याचा अर्थ आम्हांस असा दिसतो कीं, प्रथम अयोध्येच्या सूर्यवंशी क्षत्रियांचा त्यांच्या दक्षिण बाजूला असलेल्या या नर्मदा खोऱ्यांतील प्रदेशावर अमल होता; व तेथेंच या सूर्यवंशी व सोमवंशी क्षत्रियांचें मोठें युद्ध झालें–आणखीं या विषयीं अशी एक दंतकथाहि आहे कीं, रामानें कोसल देश आपल्या दोघां मुलांत वांटून दिला; व त्यांत गंगेच्या उत्तरेकडील उत्तर कोसलचा भाग वडील मुलाच्या वांट्यास येऊन, धाकट्याला दक्षिणेकडील जंगली मुलूख मिळाला होता. या दक्षिणेकडील मुलखाला कोसल हें नांव मिळालें, आणि काला- न्तरानें तो हैहयांच्या ताब्यांत गेला. कांहीं प्राचीनविद्याकोविदांना हैह- यांच्या आर्यत्वाविषयीं शंका वाटते, व ते आपल्या नित्य वहिवाटीप्रमाणें त्यांना हय नांवाचे सिथियन समजतात. पण केवळ शब्दसाम्यावरून रचलेल्या असल्या असमंजस कल्पनाचें खंडन करण्याचीही गरज नाहीं– तेव्हां ते निरर्थक काम न करतां कोसल देशांतील म्हणजे हल्लींच्या मध्य- प्रान्ताच्या पूर्वभागांतील हैहयांविषयीं जी कांही माहिती मिळण्यासारखी आहे, तीच देण्याचा प्रयत्न करूं.

कोसल देश कलिंगाच्या वायव्येस असून याच्या सरहद्दीवर सभोंवार पर्वत होते, असें ह्युएनत्संगाने सांगितलें आहे. या खुणवरून कोसल म्हणजे सध्यांच्या मध्य प्रान्ताचा पूर्वभाग असे निःसंशय ठरतें. तेथील राजा क्षत्रिय होता असेंहि त्यानें म्हटलें आहे, व त्यावरून हैहय हे तेथें राज्य करीत असून ते आपल्या क्षत्रियत्वाचा मोठा अभिमान बाळगीत असें दिसतें. हे लोक शरीरानें उंच पण कृष्णवर्णाचे होते, असें ह्युएनत्संग म्हणतो. सोमवंशांतील सर्वच लोक श्रीकृष्णाप्रमाणें कृष्णवर्ण होते, व त्यांच्या मानानें पहिल्याने

आलेले सूर्यवंशीय क्षत्रिय ब‍ेच गौरवर्ण होते-त्यांतले त्यांत पुन: हैहयांचा वर्ण इतर सोमवंशी क्षत्रियांच्या मानानेंहि अधिक काळा असावा. कारण, नर्मदेच्या खोऱ्यांतील त्यांच्या प्रदेशांत उन्हाळा विशेष असतो, व त्याचा परिणाम त्यांच्या वर्णावर होणे स्वाभाविक होते. हैहयांचे आजचे मध्यप्रांतांतील वंशज देखील असेच कृष्णवर्ण आहेत.त्यांच्या विषयी क्रुकने म्हटले आहे कीं, " बाली जिल्ह्यांत रहाणारे हैहयवंशी राजपूत हे सोमवंशी असून त्या प्रान्तांतील क्षत्रियांत त्यांचा सर्वांत उच्च दर्जा लागतो. ते आपल्याला मध्यप्रांतांतील रतनपुरच्या चन्द्रकोट नामक कोणा पुरुषाचे वंशज म्हणवितात, व त्यानें गंगानदी ओलांडून या प्रदेशांतील मूळ रहिवाशी जे चेरो लोक त्यांना जिंकिले होते, असे सांगतात. त्यांची पहिल‍ी वसाहत गंगेच्या दक्षिणेस बिहिया येथे असून त्या शहरी अजूनहि ते यात्रेला म्हणून जातात. त्यांचा वर्ण फार काळा आहे. " ( Castcs in the by Crooke )या हैहयवंशी रजपतांची राजधानी रतनपुरासच बरींच शतकें असावी, आणि ह्युएनत्संगानें पाहिलेली कोसल देशाचीहि राजधानी येथेच असावी, असें दिसतें.

मध्यप्रांताच्या गॅझिटिअरमध्ये ग्रॅण्टनेहि हीच हकीगत दिली आहे. तो म्हणतो ' रतनपुरच्या हैहयवंशी क्षत्रियांनीं छत्तिसगडच्या प्रदेशावर अनेक शतकें म्हणजे मराठयांच्या स्वाऱ्या त्यावर होईपर्यंत राज्य केले. मंडला येथे सांपडलेल्या ताम्रपटलेखावरून त्यांचें राज्य छत्तिसगडावर इ. स. १४४ इतक्या प्राचीन कालीहि होते, असे सिद्ध होतें. यानंतरच्या जबलपुर येथे प्रोफेसर हाल याला सांपडलेल्या ताम्रपटलेखांत देखील या वंशांतील कित्येक राजांचीं नांवें आढळून येतात. त्यांतील पहिला कोक्कलदेव म्हणून कोणी होता. कोक्कल देवापूर्वीचे छत्तिसगडचे हैहय राजे बौद्ध धर्माचे होते असें दुसऱ्या प्रमाणांवरून दिसून येतें. कोसलदेशच्या ज्या राजाच्या वेळीं ह्युएनत्संग तेथें गेला, तो जरी क्षत्रियजातीचा होता तरी धर्माने बौद्धच होता. सुप्रसिद्ध बौद्धधर्माचार्य जो नागार्जुन तो कोसल देशचाच होता. म्हणजे हर्षाच्या पूर्वी व त्याच्या मरणानंतर देखील कोसलदेश बौद्धधर्माचा आधारस्तंभ होता, असे ठरतें. तेथे कोणकोणत्या राजांनीं राज्य केले हे सांगतां येत नाहीं. पण असें अनुमान करावयास हरकत नाहीं कीं, इतर

देशांप्रमाणें कोशल देशांतहि ८ व्या शतकाच्या अखेरीस धर्मक्रांति होऊन प्राचीन हिंदुधर्मानें आपले डोके पुनः वर उचललें. यावेळीं सुरू झालेलें कोक्कलापासूनचें हैहय कुल पूर्णपणे प्राचीनधर्माभिमानी होतें. पण त्याचा जो इतिहास समजण्यासारखा आहे तो आपल्या पुढील इतिहासकालांत पडत असल्यामुळें येथें त्याचे विवेचन आह्मी करीत नाहीं.

तरी पण जातां जातां इतके सांगणे अवश्य आहे कीं, हैहयांचें हें उत्तर कुल ह्युएनत्संगानें भेट दिलेल्या महाकोसलच्या कुलाहून भिन्न होते. पुराण वस्तुसंशोधन खात्याच्या मध्य प्रांताच्या वृत्तांतांत कनिंगहॅमने यासंबंधीं असें म्हटले आहे कीं 'पुढील काळांत आपल्याला मध्यहिंदुस्थानांत हैहयांचीं दोन मोठीं राज्ये आढळून येतात, एक मणिपुर राजधानी असलेलें महाकोसलचें राज्य, आणि त्रिपुर राजधानी असलेले चेदीचे दुसरे–येथे हे सांगितले पाहिजे की, त्रिपुरीला चेदि हे नांव चुकीने दिलेलें आहे. वस्तुतः त्रिपुर हे प्राचीन शहर जबलपुराजवळ असून तेथें कुलचुरी किंवा कलचुरी हैहय राज्य करीत होते. महाभारतांत चेदि राज्य यमुनानदीच्या दक्षिणतीराला लागून होतें, व ते उपरिचर वसूनें स्थापन केले होते असे म्हटलें आहे. * त्याच्याच वंशांत शिशुपाल हा जन्मास आला. हे कुल हैहयांचे नव्हतें. त्रिपुरच्या हद्दीला लागून उत्तरेकडे असलेलें हे चेदिराज्य पुढें त्रिपुरीच्या हैहयांनीं जिंकिले आणि त्यामुळे पुढे सगळ्या कलचुरी हैहयांच्या राज्यालाच चेदि हें नांव मिळालें. पुढे मूळ चेदि देशांतील कलिंजरचा प्राचीन मोठा किल्लाहि त्यांच्या ताब्यांत आला, आणि त्यामुळें त्यांनीं आपल्याला ' कलिंजरपुरव राधीश्वर ' असे नांव धारण केले. हे हैहयकुल महाकोसलांतील मणिपुरच्या हैहयांपासून भिन्न होतें; व ज्या अर्थीं त्यांच्या राज्याचा ह्युएनत्संगानें निर्देश केलेला नाहीं, त्या अर्थीं तेव्हां ते फारसे प्रसिद्ध नसावें. कदाचित् तें महाकोसलच्या राजाचें मांडलिक संस्थान असेल, व आठव्या शतकाच्या अखेरीस प्राचीन धर्माभिमानी राजांनीं जी सर्वसाधारण उचल केली तिचा फायदा घेऊन त्यावेळीं त्या दोनी हैहय राज्यांनी प्रबळ होऊन कोसलच्या राज्यावर वरचढ केली.

* स चेदिविषयं रम्यं इ० । महाभारत आदिपर्व.

कनिंगहॅमनें ह्युएनत्संगानें चिचिटो नांवानें उल्लेखिलेल्या देशाला चेदि म्हणून ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. पण गोष्ट तशी नसून चेदि देशाच्या पश्चिमेस जो जेजाकभुक्ति नांवाचा प्रांत होता, तो होय, असे जे इतरांनीं दाखविले आहे ते बरोबर दिसतें. जेजाकभुक्ति याचें प्राकृत अपभ्रष्ट रूप जझोटि झालें व त्यालाच ह्युएनत्संग चिचोटि म्हणतो. या देशाचा आम्ही पूर्वी उल्लेख केलाच आहे. त्याची राजधानी एरण येथे असून तेथे ह्युएनत्संग गेलेला असावा.

त्रिपुरचे कलचुरी हैहय आपला स्वतःचा एक शक उपयोगांत आणीत असून त्याचा आरंभ इ. स. २४८ पासून झाला होता. त्याला चेदिशक हें नांव असून तो सन २४८ त सप्टेंबरच्या पांचव्या तारखेला सुरू झाला असें डॉ. कील्हार्ननें सिद्ध केले आहे (एपिग्रफिका इंडिका पु. ९ पा. २१) या शकाचे वर्ष अश्विनादि आणि महिने पौर्णिमान्त असत. या शकस्थापनेवरून सन २४८ त चेदि राजांचा फार उत्कर्ष झाला असला पाहिजे असें दिसते त्रिपुरच्या हैहयांचा कांही काळपर्यंत हिंदुस्थानच्या पश्चिम भागावर कोकण व गुजरात या प्रांतांवर अंमल असल्यामुळे दक्षिण गुजराथेतील त्रैकूटक देशांत त्यांचा शक चालू होता. इतक्या प्राचीनकाळच्या इतिहासाची फारशी माहिती उपलब्ध नाही चेदि शकाला कलचुरी हें जें नांव आहे ते मात्र इ. सनाच्या ८ व्या शतकापूर्वी आढळत नसल्यामुळें ते त्याला मागाहून मिळालें असले पाहिजे, आरंभीं नव्हतें असे दिसते. आपल्या इतिहासाच्या पुढील भागांत या कलचुरींचाच वृत्तांत आम्ही देणार आहों.

हैहयांचे कोशल देशांतील राज्य बहुधा विशेष कांहीं घडामोडींशिवाय बरींच शतकें म्हणजे पूर्वी म्हटल्याप्रमाणे ७ व्या शतकापासून तों १७ व्या शतकापर्यंत म्हणजे मराठ्यांच्या काळापर्यंत चालत होते. पर्वतांनी वेष्टिलेल्या मुलखांत एकीकडे हे राज्य असल्यामुळे, त्याला फारसा कोणाचा उपद्रव झाला नाहीं. ते प्रारंभीं बौद्धमतानुयायी असून ८ व्या शतकांत जी सार्वत्रिक धर्मक्रान्ति या देशांत घडून आली त्या लाटेंत त्यांनी पुनः जुन्या हिंदुधर्माचा स्वीकार केला. त्यांचे स्वतःचे लेख कांहीं उपलब्ध नाहींत, त्यांच्याविषयीचे बखरवजा जे कांहीं लेख आहेत, त्यांत अगदीं प्राचीन काळापासून मराठ्यांच्या काळापर्यंत होऊन गेलेल्या त्यांच्या राजांचीं नांवें दिलीं आहेत त्यांचे दिग्दर्शन पढे टीपेत येईल. पण त्यांत विशेष पराक्रमी असा राजा न झाल्यामुळें सामान्य इतिहासवाचकांना त्यांचें फारसें महत्व वाटण्यासारखें नाहीं.

# टिप्पणी.

## छत्तिसगड ऊर्फ प्राचीन कोशल देश.

मध्यप्रांतांतील छत्तिसगड म्हणजे ह्युएनत्संग ज्याला कोसलचें राज्य म्हणतो, किंवा ताम्रपटादि लेखांत ज्याला महाकोशल म्हटलें आहे तोच होय, असें आम्हीं ठरविले आहे. यासंबंधांत मध्यप्रांताच्या गॅझिटीअरमध्यें दिलेली हकीगत वाचनीय आहे.

छत्तिसगड म्हणजे मध्यप्रान्तांतील रायपुर आणि संबळपुर या अलीकडील जिल्ह्यांच्या मुलूख होय. त्याच्या वायव्य कोणावर सातपुडापर्वताचे मेकल नांवाचें टोक असून तेथून पश्चिमवाहिनी नर्मदा आणि उत्तरवाहिनी शोण या नद्या उगम पावतात. त्या ठिकाणाला अमरकंठक हें नांव असून महानदीचा उगम तेथूनच होतो. या सर्व मुलखाच्या भोंवतीं डोंगर असून हा प्रान्त महानदीच्या खोऱ्यांत वसलेला आहे. त्यांतील जमीन सपाट असून बहुतेक ठिकाणीं कृषियोग्य आहे, व तिचे कांहीं भाग तर फारच सुपीक आहेत. त्याचे प्रत्येकीं एक एक गड असलेले छत्तीस भाग असल्यामुळें त्याला छत्तीसगड हे नांव मिळाले. त्यांतील मुख्य भाग म्हणजेः–१ ला, शिवनाथ नदीचें खोरे आणि ही नदी व लकडी पर्वताच्या मधला मुलूख; २ रा शिवनाथ आणि हसदा नद्यांच्या मधला प्रदेश; ३ रा शिवनाथ आणि महानदी यांच्यामधील भाग; आणि ४ था रायपूरपासून दक्षिणेकडे महानदीपर्यंतचा मुलूख. येथील मुख्य उत्पन्न तांदूळ, गहूं, डाळी व गळिताचीं धान्यें हीं होत. याच्या सरहद्दीवरील जंगलांत वाघ, डुकर व रेडे हे विपुल असून बंगालच्या बाजूला उत्तरेकडे हत्तीहि पुष्कळ असत. जंगली मुलखांतील वस्ती गोंड, भूम्ये, आबीग या लोकांची आहे. हे लोक शुद्ध जंगली असून सपाटीच्या मुलखांतील लोकांशीं मुळींच मिसळत नाहींत, व युरोपियन लोकांचा संसर्ग होऊं लागल्यास ते पलीकडे जंगलांत पळून जातात सपाटीच्या प्रदेशांतील मुख्य वस्ती चांभारांची असून ते शेतकी करणारे आहेत. तसेंच त्यांची स्थिति जरा बरी असल्यामुळें अलीकडे त्यांनीं ब्राह्मणी धर्माचा याग करून हिंदुधर्मासारखाच पण आपला स्वतःचा एक नवीन धर्म स्थापिला

आहे–त्यांना सत्नामी म्हणतात. उरलेल्या लोकांत ब्राह्मण, रजपूत, कूर्मी, राऊत ह्या जाती प्रमुख आहेत. या प्रदेशांत अलीकडे आगगाडीचे रस्ते होऊं लागले आहेत. या प्रदेशांत पूर्वी इतके धान्य होत असे कीं, ते बाहेर जावयाला वाव नसल्यामुळे तसेच तेथे पडून राही, वाहातुकीचा धंदा पूर्वी वंजारी नांवाच्या जातीचे लोक करीत असत. त्यांच्यापाशीं शेकडों हजारों बैलांचे तांडे असून त्यांच्यावर गोण्या भरून ते तेथील धान्य पश्चिमेकडे जबलपुरास, उत्तरेकडे काशीस, दक्षिणेकडे नागपुरास आणि पूर्वेकडे ओढ्याप्रान्तांत पोंचवीत असत.

येथील हिंदुलोकांच्या दंतकथेप्रमाणें पहातां ह्या छत्तिसगडच्या मुलुखावर प्राचीन काळापासून हैहयांचे राज्य होते. सत्यांगनामक राजाच्या मागून सुद्युम्न नांवाचा राजा पूर्व देशावर राज्य करीत होता. त्याच्या एका पुत्राला माहिष्मती, म्हणजे मांडला किंवा महेश्वर येथील राज्य मिळालें, दुसऱ्याला चंद्रपुरचे म्हणजे चांदाचे राज्य मिळालें व तिसऱ्याला रतनपुर किंवा मणिपुर म्हणजे छत्तिसगड हा मुलूख मिळाला. या तिसऱ्याच्या वंशांतील १० वा राजा कर्णपाल नांवाचा असून त्यानें संवत् १७२ ते २५१ म्हणजे सन ११५ ते १९४ पर्यंत राज्य केले. त्याने अमरकंटक येथें एक नगर वसविलें व तेथे देवालये बांधिलीं. संवत् ३६७ ते ४६७ च्या दरम्यान कर्णपालाच्या मदनपाल नांवाच्या एक वंशजानें पेन्द्र आणि अमरकंटक यांच्या मध्यें एका सपाट डोंगरावर धनपुर नांवाचें शहर स्थापिलें व अजमीर नांवाचा एक दुर्भेद्य किल्ला बांधिला. या किल्याचे अवशेष अजून दृष्टीस पडतात. ८ व्या शतकांत येथील राजाच्या सुरदेव व ब्रह्मदेव नामक दोघां पुत्रांनीं तें राज्य आपसांत वांटून घेतले; त्यांतील मोठी पाती रतनपुरला जाऊन धाकटी पाती रायपुरला गेली. तथापि धाकटी पाती मोठीच्या मांडलिक संस्थानाच्या नात्यानेच चालविली जात होती. रतनपुरचे राजे विलासपुर, सरगुजा व संबळपुर यांवर राज्य करीत असून, रायपुरचा अंमल रायपुर, बस्तर व करोंद यांवर चालत असे. मराठ्यांच्या काळापर्यंत हैहयवंशी राजांच्या राज्याच्या याच हद्दी होत्या.

मणिपुर ही जुनी राजधानी रतनपुरच्या उत्तरेस १५ मैलांवरील लफा नामक पर्वताच्या माथ्यावर बसलेली होती. हें स्थळ समुद्रसपाटीपासून ३४०० फुटांच्या उंचीवर एका विस्तीर्ण पाठारावर आहे. तेथें किल्ला, टांकीं, देवालयें, व वाडे यांचे अवशेष अजून दृष्टीस पडतात. हें स्थळ उंचवटयावर असल्यामुळें मोठे सुरक्षित होते. संवत ८९५ पासून १६२० पर्यंतच्या तेथील ब्राह्मणी * कथांत त्या राज्यांत बांधिलेलीं देवळें व वसविलेलीं पण आतां नष्टप्राय झालेली नगरें यांच्या नामावलींखेरीज निरनिराळ्या राजांच्या कल्पित गुणाचें वर्णन केलेलें आहे. संवत् १६२० त म्हणजे सन १५६३ त महंमद नांवाच्या दिल्लीच्या बादशहाने या राज्यावर आपलें वर्चस्व स्थापिले, तेव्हां कल्याणसिंग नांवाचा तेथील राजा दिल्लीस गेला आणि करभार देण्याचे कबूल करून त्याने बादशहापासून रतनपुरचा राजा म्हणून मान्यता संपादन केली. तेव्हांपासून मराठयांच्या वेळेपर्यंत त्याच्या वंशजानीं तेथें राज्य केलें.

पुढे मराठयांच्या स्वाऱ्या तिकडे सुरू झाल्या, तेव्हां रतनपुरचें राज्य मोडलें, व रायपुरचीहि तीच स्थिति झाली. आणि आजमितीस या इंग्रजी राज्यांत हैहयवंशाचा एक गरीबसा तंतु कांही इनाम गांवांचा मात्र उपभोग घेत आहे.

हैहय कुलांत फारसे पराक्रमी राजे कोणी झाले नाहींत, किंवा त्यांच्यावेळच्या इमारतीहि आज शिल्लक नाहींत. तसेच छत्तिसगडच्या मुलखांत हैहय रजपूत क्षत्रियांचीं घराणी देखील फारशी उरलेलीं नाहींत.

छत्तिसगड प्रांताविषयीं कनिंगहॅमच्या मध्यहिंदुस्थानांतील प्राचीन नाण्यांविषयींच्या लेखांतून आणखीं कांहीं माहिती मिळते, ती अशी:— ' महानदीच्या खोऱ्यांत राजिम, सुपुर, व स्कोरी नारायण हीं मुख्य शहरें होत. या तिन्ही ठिकाणीं पुष्कळ मोठीं मोठीं देवालये व कोरींव लेख आहेत व त्यांवरून त्या राज्याच्या पूर्वकालीन वैभवाची व सामर्थ्याची साक्ष पटते. ( पान ७३ ).

---

* या कथा कोठें प्रसिद्ध झालेल्या नसल्यामुळे त्या मिळवून प्रसिद्ध करणें अवश्य आहे.

" तेथील राजाच्या भेटीला ह्युएनत्संग गेला होता. तो क्षत्रिय जातीचा असून त्याचें नांव सातवाहन होतें. पण रतनपुर किंवा रायपुर येथील हैहयवंशी राजांच्या नावांत असलें नांव कोठे आढळत नाहीं. ज्याला इतिहास म्हणून म्हणतां येईल अशी या राज्याची माहिती सुरदेव नांवाच्या राजापासून पुढें मिळूं लागते. या राजाने तैलंगण देश जिंकला असे तेथील प्राचीन बखरीवरून समजतें. त्याचा काल ७४९ असा दिला आहे. हा चेदिशक धरिल्यास सुरदेवाचा काळ सन ९९८ हा ठरतो. सन ११६५ तील पहिल्या कोरीव लेखांत श्रीकल्ल चेदीश्वर, रत्नराज, पृथ्वीदेव, जजल्लदेव अशीं राजांचीं नावें आढळतात. या प्रांतांतील फार जुनीं नाणीं म्हणजे पृथ्वीदेवाची असून त्यांतील बहुतेक सोन्याचीं व कांहीं थोडीं मात्र तांब्याची आहेत. तांब्याच्या नाण्याच्या एका बाजूला चतुर्भुज हनुमानाची मूर्ति आहे; व सोन्याच्या नाण्यांवरील आकृति अस्पष्ट आहे. जज्जलदेव व रत्नदेव यांचींहि नाणी कांहीं मिळालीं आहेत, त्यांवरून जज्जल देवाच्या काळांत सन ११२० आणि रत्नदेवाच्या सन ११४० अशीं वर्षे होतीं असे दिसून येतें. " यापेक्षां हैहय राजांचा इतिहास फारसा महत्वाचा नसल्यामुळें तो येथेंच संपवितो.

# प्रकरण १७ वें.

---

## पश्चिमेकडील राज्यें.

### १ भिनमालचे गुर्जर चाप राजे.

या प्रकरणांत कनोजच्या पश्चिमेकडील ज्या राज्यांची नांवनिशी ह्युएन-त्संगानें दिली आहे त्यांची हकीकत द्यावयाची आहे. त्यांतील पहिलें ठळक राज्य म्हणजे भिनमालचें म्हणजे रजपुतान्याचें राज्य होय. गुर्जर लोक कोणत्या जातीचे होते या प्रश्नाचा साग्र विचार आम्हीं पूर्वी एका टीपेंत केला आहे. त्यांत असे दाखविले आहे कीं, गुर्जर हे मूळचे आर्यवंशीयच होत. त्याची लांबट डोकीं, रेखलेलीं नाकें ( ही प्यारिसच्या लोकांच्या नाकांपेक्षांहि अधिक रेखींव आहेत; १९०१ च्या खानेसुमारीचा अहवाल), त्यांचा उंच बांधा इत्यादि प्रमाणांवरून मानुष्यककोविदांना त्यांना आर्य-वंशीय ठरविण्याशिवाय गत्यंतरच नाहीं; मग त्याविषयीं व्हिन्सेन्टस्मिथ किंवा रा. देवदत्तपंत भांडारकर यांचे मतें कांहींही असो. स्मिथ व भांडारकर यांच्या मते गुर्जर लोक हे मूळ परकीय जातीचे आर्येतर असून त्यांचा वंश सिथियन होय. देवदत्त भांडारकर यांनीं त्यांना सिथियन वंशापैकीं खजर जातीचे ठरविले आहे. स्मिथ साहेबांनीं गुर्जर लोक अमुक एका वेळी हिंदु-स्थानांत आले असें दाखवितां येण्यासारखें ऐतिहासिक प्रमाण मिळत नाहीं ही गोष्ट स्वतः कबूल केली आहे. ते म्हणतात, "श्वेतवर्ण हूणांबरोबरच किंवा फार तर त्यांच्या पाठीमागून लगेच गुर्जर लोक हिंदुस्थानांत आले असा समज आहे. पण ते आशियांतील अमुक ठिकाणाहून आले किंवा ते अमुक जातीचे होते, असें दाखविण्याला कांहींच प्रमाण मिळत नाहीं." ( स्मिथचा प्राचीन हिंदुस्थानचा इतिहास पा. ४१२). दुसऱ्या एका ठिकाणींहि ( रायल एशियाटिक सोसायटीचें जर्नल सन १९०८–१९०९ ) त्यांनीं याच मताचा अनुवाद केला आहे. ते परकीय जातीचे होते या तर्काला आधार काय तो एवढाच आहे कीं, गुर्जर हे नांव ६ व्या शतकापूर्वीच्या लेखांत कोठें आढ-

ळत नाहीं; व त्यांचा प्रथम बाणभट्टानें हूणांबरोबर उल्लेख करून दोघांचाहि ठाणेश्वरच्या प्रतापवर्धनानें मोड केला असें म्हटलें आहे. पण एवढ्या गोष्टीवरून वरील तर्क करणे हे केवळ असमंजसपणाचे आहे. साहाव्या शतकापूर्वीच्या कोणत्याहि उपलब्ध लेखांत गुर्जर हे नांव अद्यापपावेतों आढळलेले नाहीं, ही गोष्ट खरी. पण तेवढ्यावरून ते पूर्वी नव्हतेंच किंवा त्याचा कधीं कोणी उपयोग केलाच नाहीं असे कसे सिद्ध होणार ? एखाद्या गोष्टीचा ग्रंथांतरींच्या उल्लेखाचा अभाव त्या गोष्टीचा आत्यंतिक अभाव सिद्ध करण्यास मुळीच पुरेसा नाहीं ही गोष्ट अनेक विद्वान् डोळ्याआड करतात, व वाटेल तीं अनुमाने काढीत सुटतात. पण आम्हीं त्यांना असें विचारतों कीं, साहाव्या शतकापूर्वींचे झाडून सारे ताम्रलेख, शिलालेख, ग्रंथ, नाणी वगैरे आज उपलब्ध असून त्यांत कोठेंहि गुर्जर हें नांव आढळत नाहीं असे झालें आहे काय ? या सर्व वस्तु उपलब्ध आहेत असें म्हणणे किंवा मानणें केवळ हास्यास्पद होय. आणखी असें कीं, बाणभट्टानें हूणाबरोबर गुर्जरांशिवाय आणखी मालव, सिन्धु इत्यादि दुसऱ्याहि लोकांचा उल्लेख करून त्यांचाहि पराजय प्रतापवर्धनानें केला होता असें म्हटलें आहे. मग यावरून हेहि सर्व लोक परकीयच होते, व ते हूणांबरोबर किंवा थोडेबहुत त्यांच्या मागून पुढून हिंदुस्थानांत आले असे मानावयाचें कीं काय ? पूर्वग्रहांमुळे पुष्कळ यूरोपीय पंडित व त्यांच्या बरोबर कित्येक एतद्देशीय विद्वानहि कशीं एकदम चुकीचीं अनुमाने बांधू लागतात हें पाहिले म्हणजे मनुष्य अगदी थक्क होऊन जातो. भरतखंडाच्या इतिहासांत जे जे म्हणून कोणी कर्तबगारी करणारे लोक आढळतात ते ते सर्व सिथियन आदिकरून परकीय जातींचे होत, असे अनुमान बाधतांना या पाश्चात्य पंडितांच्या मनामध्यें एक निराळीच भावना जागृत असते. या विद्वानांनीं जाट आणि रजपूत या लोकांना देखील सिथियन वंशाचे परकीय लोक म्हणून ठरविलें आहे. या विद्वानांना आमचा असा प्रश्न आहे कीं, जाट, गुर्जर, रजपूत हे सर्वच जर मानुष्यकशास्त्रदृष्ट्या आर्यलक्षणान्वित असतांहि परकी सिथियन वंशाचे समजावयाचे; तर मग संस्कृत किंवा वैदिक भाषा बोलणारे फार प्राचीन काळीं पंजाबांत व रजपुतान्यांत येऊन

वसाहत केलेले आर्य वंशीय लोक तरी कोणते ? हे आर्य लोक या ठिकाणी येऊन राहिल्याचें वेद, रामायण महाभारतादि ग्रंथ आणि अवेस्तादि इतर ग्रंथ यांवरून उघड सिद्ध होतें. मग ते हिंदुस्थानांतून आतां काय नष्ट झाले म्हणावयाचे ? या ठिकाणच्या खालच्या वर्गांतील लोक शारीर लक्षणांवरून पहातां द्राविड वंशांतील आहेत हें उघड आहे; आणि तुमच्या मताप्रमाणे जाट, गुर्जर, रजपूत व ब्राह्मणहि जर ग्रीक, शक किंवा हूण या जातीचे होते तर, वेद, महाभारत व मनुस्मृति यांत प्रसिद्ध असलेले ते भारतीय आर्य नष्ट झाले कीं काय ? शकवंशविषयक कल्पनांचें याहून अधिक खंडन करण्याचें प्रयोजन नाहीं. थोडक्यांत एवढें सांगणें पुरे कीं, जाट, गुर्जर आणि रजपूत या जातीच्या लोकांचीं शारीर लक्षणे म्हणजे त्यांची लांबट डोकीं त्यांचीं रेखींव नाकें, त्यांचे उंच बांधे इत्यादि निःसंशय आर्यवंशाचीं असून इतिहासांत अशी एकहि गोष्ट आढळत नाहीं कीं, जिच्यामुळे हे लोक ऐतिहासिक काळांत बाहेरून या देशांत आले, अशी शंका उत्पन्न होईल ! मग तसें सिद्ध होण्याचें लांबच राहिले.

आमच्या मते वैदिक काळच्या आर्यांपैकी क्षत्रियांचे प्रतिनिधि हे रजपूत होत, आणि जाट व गुर्जर हे वैश्यांचे प्रतिनिधि होत. किंबहुना, जाटांना आर्यांच्या पहिल्या टोळीपैकी म्हणजे आम्हीं महाभारताच्या उपसंहारांत म्हटल्याप्रमाणे सूर्यवंशी आर्य मानण्यास हरकत नाहीं. वेदामध्ये पंजाबांत येऊन राहिलेल्या व तेथे शेतीभातीचे किंवा गाई बाळगण्याचे काम करणाऱ्या विशांचा उल्लेख आहे. भगवद्गीतेतहि कृषि व गोरक्ष्य म्हणजे शेती व गुरें बाळगण्याचा धंदा हीं वैश्यांची विशिष्ट कामे म्हणून सांगितली आहेत, आणि जाट व गुर्जर हे पंजाबांत येऊन राहिलेल्या व कृषिगोरक्ष्य करणाऱ्या वैदिक वैश्यांपैकीच दोन कुळांतील लोक होत पुढे त्यांचा शूद्रांशी निकट संबंध येऊन अनार्यांच्या विधवापुनर्विवाहासारख्या कांहीं सामाजिक चाली त्याच्यांत शिरल्या. आजच्या स्थितीचा विचार करताहि जाट किंवा गुर्जर आणि रजपूत याच्यांतील महत्वाचा भेद म्हणजे पहिल्या जातींत पुनर्विवाह चालतो, आणि दुसरीत चालत नाही, हाच होय. शिवाय कालान्तराने हिंदुलोकांत शेतीचा धंदा निकृष्ट मानिला जाऊं लागल्यामुळे जाट गुर्जरादि

मूळ आर्यरक्ताच्या लोकांना आज शूद्र मानण्यांत येऊं लागलें आहे. तथापि दीर्घकालीन रूढी व जातिसंबंध हे आजहि इतके बलवत्तर आहेत कीं, मनुकालाप्रमाणें आजचेहि रजपूत पंजाबांतील वैदिक वैश्यांचे वंशज जे जाट व गुर्जर त्यांच्या कन्या वरण्याला कचरत नाहींत.

एकंदरींत जाटांप्रमाणे गुर्जर हेहि आर्यवंशीय वैदिक वैश्यांचे वंशज होत, आणि म्हणूनच पांचव्या शतकापूर्वींच्या ऐतिहासिक लेखांत त्यांचा स्वतंत्रपणें उल्लेख नाहीं. जो कांहीं प्राचीन इतिहास किंवा जे ऐतिहासिक लेख म्हणून आज उपलब्ध आहेत, त्यांत विशेषेकरून राजे व राजघराणीं यांचाच उल्लेख असून इतर सामान्य लोकांविषयीं कांहीं सांगितलेलें नसतें. वैश्य लोक जे विशेष नजरेंत येऊं लागले, ते इ. सनाच्या तिसऱ्या शतकांत. त्यावेळीं बरींच क्षत्रिय घराणीं उद्ध्वस्त झालीं, व कांहीं खालीं दक्षिणेंत उतरलीं व त्यामळें वैश्यांपैकीं अनेकांना आत्मसंरक्षणासाठीं शस्त्र धरावें लागलें. सिथिअन लोकांच्या हिंदुस्थानावर होणाऱ्या स्वाऱ्यांना तोंड देण्यासाठीं वैश्यांना तसें करणे जरूर होतें. गुप्त घराणे वैश्य असून प्रथम युच्ची लोकांचा आणि नंतर हूण लोकांचा प्रतिकार करूनच तें पदवीला चढले. जेव्हां हूण लोकांनीं प्रथम पंजाबावर चाल केली, आणि सियालकोट येथें आपलें राज्य स्थापिलें, तेव्हां तेथील कित्येक गुर्जरांनीं तेथून पाय काढला, व खालीं रजपुतान्यांत उतरून तेथे वसती केली. परकीय लोकांच्या उपद्रवाला कंटाळलेल्या पंजाबांतील आर्यांना रजपुतान्यांतील वाळवंटाच्या प्रदेशांनीं याप्रमाणें अनेक वार आश्रय दिलेला आहे. हूणांच्या वेळीं गुर्जरांची ख्याति होण्याचे तरी हेच कारण असलें पाहिजे. हूणांनीं त्यांची पंजाबांतून हकालपट्टी केल्यावर त्यांनीं खालीं रजपुतान्यांत उतरून भिनमाल येथे सहाव्या शतकाच्या आरंभीं राज्य स्थापिलें. त्यांच्यांतील कांहीं मंडळी आणखीहि दक्षिणेकडे गेली व तिकडे त्यांनीं दुसरीं राज्ये स्थापिलीं. दद्दाने स्थापिलेलें भडोच येथील गुर्जर राज्य याच सुमारास स्थापिलेलें होतें. ह्युएनत्संग या देशांत आला तेव्हां हीं दोन्हीं राज्य भरभराटींत असलेलीं त्याला आढळून आलीं. प्रतापवर्धनानें गुर्जरांशीं युद्ध करून त्यांचा मोड केला, तो ते हूणाबरोबर आलेले परकीय लोक म्हणून नव्हे. त्याला इतर साम्राज्यपदाकांक्षी राजाप्रमाणें दिग्विजय कराव-

याचा होता व त्यांत जे कोणी त्याच्या तडाख्यांत सांपडले, मग परकीय असोत वा स्वकीय असोत, त्यांचा त्यानें समाचार घेतला. भिनमालचें गुर्जर राज्य त्याच्या राज्याच्या नैर्ऋत्येसच होतें. अर्थात् त्यावरहि त्यानें आपलें आधिराज्य स्थापन केलें. प्रतापवर्धनानें त्याचा एकदां मोड केला तरी तें राज्य कणखर असल्यामुळें पुढें हर्षाच्या हातूनहि तें नष्ट होऊं शकलें नाहीं. त्यांच्यावर हर्षानें देखील नांवाचें मात्र स्वामित्व स्थापिलें होतें हें पूर्वी सांगितलेंच आहे. पुढें तर गुर्जर इतके बलाढ्य झाले कीं, त्यानीं ८ व्या शतकांत स्वतः कनोजवरच स्वारी केली.

हर्षाच्या वेळीं भिनमालचा राजा कोण व कोणत्या जातीचा होता तें आतां पहावयाचें. पूर्वी सांगितलेंच आहे कीं, इ. स. ६२८ त भिनमाल येथें ब्रह्मसिद्धान्तनामक आपला ज्योतिषावरील सिद्धांतग्रंथ लिहिणाऱ्या ब्रह्मगुप्तानें ज्याचा उल्लेख केलेला आहे, त्या व्याघ्रमुख राजाचा तो पुत्र असावा. व्याघ्रमुख हा चाप घराण्यांतील होता असें ब्रह्मगुप्त म्हणतो. हे चाप (चापोत्कट) जातीचे क्षत्रिय प्रसिद्ध असून ७ व्या व आठव्या शतकांतील ताम्रपटादि लेखांत त्यांचा उल्लेख येतो ( पूर्वी सांगितलेला नवसारी येथील लेख पहा ). त्यांनीं पुढें गुजराथेंत अनहिल्ल पट्टण येथें राज्य स्थापन केले; व त्याविषयीं आम्हीं पुढें सांगणारच आहों. तात्पर्य, हर्षाच्या वेळीं भिनमालचा राजा क्षत्रिय जातीचा होता असे ब्रह्मगुप्त व ह्युएनत्संग या दोघांच्याहि मतानें ठरतें. त्याच्या संबंधानें ह्युएनत्संग म्हणतो, " तो क्षत्रियजातीचा असून तरुण, सुज्ञपणाविषयीं प्रख्यात व बौद्धधर्मावर दृढ श्रद्धा ठेवणारा होता. " हें म्हणणें यूरोपियन पंडितांना मोठें गूढ वाटतें. व आपल्या कल्पनांशीं तें जुळविण्यासाठीं त्याची ते वाटेल त्याप्रमाणें ओढाताण करतात. त्यांचें म्हणणें असें कीं, गुर्जर लोक परदेशी सिथियन वंशाचे असून त्यांना येथें आल्यावर मागाहून हिंदुसमाजांत समाविष्ट करून घेतले, इतकेंच नव्हे, तर शंभर वर्षांच्या अवधींत त्यांचे राजे पूर्ण क्षत्रिय आहेत असेंहि ठरविण्यांत आलें. आतां, हें म्हणणें किती असमंजसपणाचें आहे याचा विचार वाचकांनींच करावा. जातिभेदासारख्या विशिष्ट संस्था असलेला हिंदुधर्म परधर्मी व्यक्ति किंवा समाज यांना आपल्याला उत्सर्गे न

होऊं देतां आंत समाविष्ट करून घेईल, व तसे पुष्कळ लोक या धर्मात आलेहि असतील. परंतु, जेव्हां हूणादि परकी लोकांना हांकून देण्याचा जिकडे तिकडे सारखा प्रयत्न होत होता, व जेव्हां, ताम्रपटादि लेखांत नमूद केल्याप्रमाणे, प्राचीन हिंदुधर्माभिमानी आर्य राजे वर्णसंकर होऊं न देण्याविषयीं आटोकाट प्रयत्न करीत होते ( वर्णव्यवस्थापनपर ) अशा वेळी परकी धर्माच्या राजांना शुद्ध क्षत्रिय म्हणून त्यांनी हिंदुधर्मात घेतलें असेल हे शक्यच नाहीं. तात्पर्य गुर्जर लोक हे प्राचीन आर्यांपैकीं वैश्यांचे वंशज असून त्यांचे राजे चाप अस्सल क्षत्रिय होते, हेच म्हणणें उचित ठरते. ह्युएनत्संगाच्या वेळेपासून म्हणजे इ. स. ६४१ पासून तो सुमारें सन ७५० पर्यंत भिनमालच्या चाप राजांचा इतिहास फारसा उपलब्ध नाहीं. ६४१ च्या सुमारास तेथील राजा बौद्धमतानुयायी होता; परंतु त्याच्या नंतर हिंदुस्थांनात जी सार्वत्रिक धर्मक्रान्ति झाली तिजबरोबर गुर्जर लोकांमध्यें हि प्राचीन धर्माचें पुनरुज्जीवन झाले असले पाहिजे. गुर्जर राजे चांगले बलाढ्य असून, सिन्धप्रांत काबीज केल्यावर आरब लोकांनी जेव्हां त्यांच्या राज्यावर स्वारी केली तेव्हां त्यांना त्यांनीं जोराने मागे फिरविलें. अरब लोकांनीं सिन्ध प्रांतांत पाऊल रोवल्यावर आपले राज्य आणि धर्म सिंधच्या जवळच्या प्रान्तांत वाढविण्याचा उपक्रम सहजच केला तेव्हां गुर्जरांनीं त्यांचा चांगला मोड केला असे दिसतें. अरबांच्या या पराजयानंतर भिनमालचे राजघराणे बदलून इ स. ७५० च्या सुमारास प्रतिहार घराणें राज्यारूढ झालें. चापांचे घराणें सामान्य नियमाप्रमाणे सुमारें २०० वर्षें चालून अस्तंगत झालें, व त्यांची जागा प्रतिहारीनीं घेतली. या गुर्जर प्रतिहारीचा इतिहास पुढील काळांत येत असल्यामुळे, तो पुढील पुस्तकांत सांगण्यांत येईल.

## ( २ ) मोलापो ऊर्फ पश्चिम मालवा येथील वर्धन राजे.

दक्षिणेकडील भडोचच्या गुर्जर राजाचा इतिहास आम्हीं पूर्वीं दिलाच आहे आतां ह्युएनत्संग ज्याला मोलापो म्हणतो त्या पश्चिम मालव्याच्या इतिहासाकडे आपण वळूं. मन्दसोरच्या लेखांत सांगितलेला यशोधर्मा विष्णुवर्धन नांवाचा राजा येथे राज्य करीत हता, हें पूर्वीं सांगितलें आहे. हें जें वर्धन उपपद त्यावरून तो राजा गुप्तराजांप्रमाणेच वैश्य जातीचा

असावा, असा आमचा तर्क आहे. त्यानें मिहिरकुल नामक हूण राजाचा पराजय करून मोठा पराक्रम गाजविला. चंद्राच्या व्याकरणांतील ' अजय ज्जर्टो हूमान् ' म्हणजे जर्टाने हूणांचा पराजय केला हें वाक्य पूर्वी आम्ह दिलेंच आहे. ते यशोधर्म्याला जर लागू केले (व दुसऱ्या कोणाला तें लागू नसल्यामुळें त्यालाच तें लागू करणें भाग आहे ) तर तो जर्ट ऊर्फ पंजाबांतील जाट असला पाहिजे, असे दिसते. खरें पाहिल्यास भिनमालच्या गुर्जरांप्रमाणेंच जाटहि पंजाबांतून माळव्यांत रहावयास आले असावे. पंजाबांत हूणादि परकीयांच्या त्रासामुळें वैतागलेल्या लोकांना जसा राजपुतान्यांत आश्रय मिळे, तसा माळव्यांतहि मिळत असे. माळव्यांत आल्यावर जाट लोकांनीं यशोधर्म्याच्या अमदानींत आपले सामर्थ्य वाढवून इ. स. ५२८ त आपली मातृभूमि जो पंजाब त्याला उध्वस्त करणाऱ्या हूणांचा चांगला समाचार घेतला, व त्यांचा अगदीं मोड केला.

यशोधर्म्याचा नातू किंवा पणतू गादीवर असतांना, ह्युएनत्संग पश्चिम माळव्यात गेला. तो कट्टा बौद्धमतानुयायी असून त्याच्या राजधानीजवळ एका बुद्धमंदिराचें काम कित्येक पिढ्या चालू होते. राजतरंगिणीवरून असें दिसते कीं, यशोधर्म्याचा पुत्र शिलादित्य ( हे नांव ह्युएनत्संगानेंहि सांगितले आहे, ) हा बौद्धधर्मीय असल्यामुळें, त्याच्या शेजारच्या हिंदुधर्मीय राजांनी त्यावर स्वारी करून त्याला पदच्युत केलें; व पुढें काश्मीरच्या प्रवरसेन राजानें इ स. ५४० त त्याला पुनः माळव्याच्या गादीवर बसविले, आणि त्याच्या बापाने म्हणजे यशोधर्म्यानें पूर्वी काश्मीरचें सिंहासन बळकावून नेलें होतें, तें त्यापासून परत घेतलें. म्हणजे यशोधर्म्याचें घराणें माळव्यांत इ. स. ५०० पासून ६४१ पर्यंत म्हणजे ह्युएनत्संग ज्यावर्षी तेथे गेला त्यावर्षापर्यंत चालू होतें. पण हर्षाच्या निधनानंतर त्याचें काय झाले ते सांगतां येत नाही. परमार घराण्याच्या पूर्वीचा माळव्याचा इतिहास बहुतेक गूढच आहे. इतकेच त्याविषयीं सांगतां येतें कीं, पश्चिम माळव्याचें राज्य गुजराथ व मध्यहिंदुस्थान यांच्या सरहद्दीला लागून असल्याने त्यांतील राजघराण्यांत अनेकवार उलटापालट होत होती. वलभीच्या राजांच्या दानलेखावरून पहातां, तें कांहीं काळ पूर्णपणें त्यांच्या

अमलाखालीं होतें असें दिसतें. वलभीराजांनीं मन्दसोर जवळ जमिनी दान केल्याचे त्यांच्या लेखांत जे दाखले आहेत त्यावरून हें उघड होतें. म्हणजे हर्षाच्या मृत्यूनंतर त्याचें साम्राज्य जेव्हां मोडलें तेव्हां मोलापोचें राज्य बलभीच्या बलाढ्य राजांच्या अमलाखालीं गेलें,असें म्हणावयास हरकत नाहीं.

## ( ३ ) मध्य माळव्यांतील उज्जनीचे राजे.

उज्जनी ही मध्य माळव्याची राजधानी होती, व ह्युएनत्संग तेथें इ. स. ६४१ त जेव्हां गेला, तेव्हां तेथें ब्राह्मण राजा राज्य करीत होता. तो कोण होता व हर्षाच्या मृत्यूनंतर त्याचें काय झालें, हे सांगतां येत नाहीं. पूर्वी सांगितल्याप्रमाणे परमार घराण्यापूर्वीचा माळव्याचा सविस्तर इतिहास अज्ञात आहे, असेंच एकंदरीत म्हणावे लागते. तथापि, त्यांत एवढें सांगतां येतें की, मालवा हा त्या काळांत बहुतेक इतर राजांच्या अमलाखालींच होता. माळव्याची हवा उत्तेजक नसून एकंदरींत आरोग्यकारक अशी नाहीं. त्यामुळे, बाहेरच्या लोकांना तेथील लोकावर नेहमींच स्वामित्व गाजवितां येतें. मौर्य राजांनी त्यावर आपली सत्ता स्थापिली असून आपल्या युवराजांकडून राजप्रतिनिधि म्हणून ते त्याचा कारभार चालवीत. अशोक हा एकाकाळीं असा युवराज म्हणून तेथे कारभारी होता. मौर्यांच्या मागून सुंगाचा अंमल माळव्यावर बसला, आणि अग्निमित्र हा त्यांचा तेथील प्रतिनिधि एकदां होता; तो विदिशा नगरींत रहात असे. सुंगवंशानंतर विक्रमाचें घराणे माळव्यावर राज्य करूं लागलें, व तेंहि पांडवांचे वंशज असून माळव्याला परकीच होतें असें दंतकथेवरून दिसतें. विक्रम घराण्यानंतर माळव्याचें राज्य पाश्चात्य शकांच्या भक्ष्यस्थानीं पडलें; व तेथें सन ७८ पासून सन ४००पर्यंत शक राज्य करीत होत.या सुमारास तें गुप्तांनीं जिंकिलें, व तेव्हांपासून त्यांचे प्रतिनिधि सुमारें १०० वर्षें कारभार करीत होते. गुप्तसाम्राज्य सन ५०० च्या सुमारास लयास गेलें व तेव्हां मध्य माळव्याची उज्जनी येथील गादी गुप्तघराण्याच्या एका शाखेकडे आली. याच शाखेंतील देवगुप्त नांवाचा मालवाधिप कनोजचा ग्रहवर्मा व ठाणेश्वरचा राज्यवर्धन यांचा शत्रु होता. देवगुप्ताच्या वधानंतर माळव्याचें राज्य हर्षाच्या अमलाखालीं पूर्णपणें आलें, व तेथें ब्राह्मण राजा होता, असें ज्याविषयीं ह्युएनत्संगानें

म्हटलें आहे तो हर्षाचा सुभेदार असला पाहिजे असें आम्हांला वाटतें. हर्षाच्या पाठीमागे उज्जनी कनोजच्या राजांच्या अमलाखालीं राहिली. सुमारें सन ७०० च्या सुमारास कनोजचा राजा यशोवर्मा नांवाचा होता, हें पूर्वी सांगितलेच आहे. तसेंच पुढें सन ८०० च्या सुमारास धर्मपालानें इतर मांडलिक राजांच्या अनुमतीनें जेव्हां चक्रायुधाला कनोजच्या गादीवर बसविले तेव्हांहि माळव्याचें राज्य कनोजचे मांडलिक होतें हेंहि आपल्याला आतां ठाऊक झालें आहे. यशोवर्मा आणि चक्रायुध यांच्या दरम्यान १०० वर्षें माळवा प्रांत मालखेडच्या राष्ट्रकूटांच्या स्वामित्वाखालीं ही होता, असें दिसतें. या काळांतील माळव्याच्या राजांचे नांव ऐकूं येतें हें खरें; तरी ते उत्तरेकडील कनोजच्या किंवा दक्षिणेकडील माळखेडच्या सम्राटाच्या अधिराज्याखालींच होते. शक ७२८ तील गोविन्द नामक एका राष्ट्रकूट राजाच्या दानलेखांत त्याचा पिता जो ध्रुव त्यानें माळव्याच्या राजाला जिंकलें, व तो मालवराज त्याला शरण गेला, असा मजकूर आहे ( इंडियन ॲंटिक्करी पु. ११ ). तसेंच राष्ट्रकूटांच्या गुजराथ शाखेंतील कर्क नांवाच्या राजाच्या दानलेखांत असें म्हटलेले आढळते की, त्याने आपल्या स्वामीबद्दल माळव्याचे रक्षण करण्यासाठीं उत्तरेकडील गुर्जरांच्या स्वाऱ्यांना अटकाव करण्याचा प्रयत्न केला ( इंडि. ॲंटि. पु. १३ पान १६० ). पण यावरून माळवा कोणा मांडलिकाचे ताब्यांत होता कीं, प्रत्यक्षच राष्ट्रकूट त्यावर अंमल करीत होते, हें निश्चित समजत नाहीं. तथापि, इतिहासाची पुनरावृत्ति कशी होते याची मौज या प्रकरणांत चांगली दृष्टीस पडते. सन ८०० तील मराठे माळव्याचे स्वामी असून त्यांनीं उत्तरेकडील कनोजच्या सम्राटाचा प्रतिकार केला. तोच प्रकार पुनः हजार वर्षांनीं घडून येऊन सन १८०० सालांत त्यांनीं दिल्लीच्या सम्राटापासून माळव्याचें रक्षण करण्याचा प्रयत्न केला. असो, सन ८०० नंतर कांहीं काळानें राष्ट्रकूट मराठ्यांचें साम्राज्य मोडलें, तेव्हां परमारांनीं माळवा देश जिंकून तेथें स्वतंत्र राज्याची स्थापना केली. हे परमारहि मूळ माळव्यांतील नसून बाहेरून आलेले होते. पण ही गोष्ट पुढील काळांतील असल्यामुळें, ती पुढल्या भागावर टाकणें जरूर आहे.

## ( ४ ) जेजाकभुक्ति आणि महेश्वरपूर येथील राजे.

ज्याची राजधानी विदिशा ऊर्फ भेलसा ही होती. त्या पूर्व माळव्याचा उल्लेख ह्युएनत्संगानें केलेला नाहीं. या भागाचे प्राचीन नांव दशार्ण, असे होते. * व तें धसाण या रूपानें हल्लींच्या भाषेंतहि रूढ असून मध्यहिंदुस्थानच्या मोठ्या नकाशांत दाखविलेलें असतें. कदाचित् हा भाग त्यावेळी मध्य माळव्यांतील अवन्ती किंवा उज्जनीच्या राज्यांत मोडत असावा. हल्लींच्या मध्यहिंदुस्थानापैकीं आणखी दोन राज्यांचा निर्देश ह्युएनत्संगाने केला आहे. तीं राज्ये म्हणजे जेजाकभुक्ति व महेश्वरपुर ही असून त्याच्या वेळीं दोहोंवरहि ब्राह्मण राजांचाच अंमल होता. जेजाकभुक्ति या नांवावरूनच त्या प्रांताचें खरे नांव जेजाक होते हें दिसून येतें, भुक्ति हा केवळ राज्यभागवाचक शब्द आहे. तिरभुक्ति म्हणजे जसा तिरहूत प्रांत तसा जेजाकभुक्ति म्हणजे जेजाक प्रांत होय. हा जेजाक प्रांत मूळ गुप्तसाम्राज्याचा भाग होता, व इ. स. ५०० च्या सुमारास बुधगुप्त तेथें राज्य करीत होता, असा आमचा तर्क आहे. या गुप्तकुलाचा लय झाल्यावर तेथें कोणी ब्राह्मण अधिकाऱ्याने कांहीं अंशीं स्वतंत्र असें राज्य स्थापिलें असावें. कांही अशीं म्हणण्याचे कारण असें कीं, हर्षानें त्यावेळीं बलाढ्य साम्राज्याची स्थापना केलेली असल्यामुळें, इतक्याजवळचें राज्य त्याच्यापासून पूर्ण स्वतंत्र राहिले असेल, असें दिसत नाहीं. हा ब्राम्हण राजा एरण येथे ज्या ध्यानविष्णुनामक राजाचा लेख सांपडला आहे, त्याचा कोणी वंशज असावा ( गुप्तांचे लेख. पुस्तक ३ ). हर्षाच्या निधनानंतर मात्र हें राज्य पूर्ण स्वतंत्र झालें. पण पुनः कनोजच्या यशोवर्म्यानें व त्याच्या मागून आलेल्या राजांनीं त्याचे स्वातंत्र्य पुनः हिरावून घेतले. तथापि एकंदरींत ९ व्या शतकांत चंदेलाचा उदय होईपर्यंत या देशाचा चांगलासा इतिहास समजत नाहीं; पण तो भाग पुढील पुस्तकांत यावयाचा असल्यामुळें, येथें त्याचे विवेचन करतां येत नाहीं. या प्रान्ताच्या नांवापुढें लावलेला भुक्ति शब्द मात्र त्याला जो एकदां चिकटला तो तेथें चंदेलांनीं स्वतंत्र राज्यस्थापना

* कालिदासकृत मेघदूत व महाभारत यांत हें नांव येतें.

केली तरी गेला नाहीं. त्याचें हल्लींचें नांव जझोटी असें असून बुंदेलखंडांतील ब्राह्मण आजहि जझोटिया ब्राह्मण म्हणूनच प्रसिद्ध आहेत.

महेश्वरपुरासंबंधीं आपल्याला फारसें कांहीं समजण्याला मार्ग नाहीं. ग्वाल्हेर किंवा नरवरचा मुलूख म्हणजे महेश्वरपुर, असें मात्र विद्वानांनीं ठरविलें आहे. तेथें भोजकुलांतील राजे राज्य करीत होते. ( वर सांगितलेला धर्मपालाच्या लेखांतील उतारा पहा. ). पण तो देश कनोजला इतका निकट होता कीं, हर्ष व त्याच्या मागाहून कनोज येथे राज्य करणाऱ्या राजांच्या अमदानींत तेथें स्वतंत्र राजे असण्यापेक्षां सुभेदारच असावेत व कनोजचे साम्राज्य मोडल्यावर ते स्वतंत्र झाले असावेत, असें अनुमान होतें.

# प्रकरण १८ वें.

## हिमालयीन प्रदेशांतील राज्यें.

हिमालयाच्या खोऱ्यांतून व त्याच्या दक्षिण बाजूला लागून असणाऱ्या आसपासच्या डोंगराळ प्रदेशांतून जी लहान मोठीं बरींच राज्ये अस्तित्वांत होती, त्यांचाहि थोडासा इतिहास सांगणे अवश्य असल्यामुळे, तो या प्रकरणांत द्यावयाचा आहे. त्यांपैकीं काश्मीरप्रांताचा सविस्तर इतिहास पूर्वी दिलाच आहे. तो प्रांत भरतखंडाचा भाग म्हणूनच केव्हां झाले तरी होता. इतिहासपूर्वकालीच, म्हणजे पंजाबांत वसाहती करण्यावेळीच, भारतीय आर्यांनीं त्यांत प्रवेश केला होता. त्याची सामान्य जनता जरी आर्यवंशीय नव्हती, तरी ब्राह्मण व क्षत्रिय या उच्च वर्गांचे तेथे प्राबल्य होऊन त्या प्रान्तावर आर्यत्वाची छाप पडावयास अडचण पडली नाहीं. पुढे तर काश्मीरी ब्राह्मणांनी हिंदुस्थानांतील आर्य सुधारणेच्या उत्कर्षाला प्रमुखपणे हातभार लाविला आणि त्यावेळी त्यांनी विद्वत्तेविषयीं जो लौकिक संपादन केला तो आजही कायम आहे. काश्मीरी ब्राह्मणांची त्यांच्या प्रांतांत व तशीच उत्तरहिंदुस्थानांत विद्वान् व राजकार्यधुरंधर म्हणून ख्याति आहे. त्यामुळे, काश्मीर प्रांत हिंदुस्थानाचा भाग म्हणून नेहमीच प्रसिद्ध आहे. महाभारतांतील भारती राज्यांच्या नामावलीत त्याप्रमाणे वराहमिहिराने दिलेल्या प्रांताच्या नांवांतहि त्याचा निर्देश केलेला आहे, व त्यामुळे त्याच्या इतिहासाचा एकंदर भरतखडाच्या इतिहासांत समावेश करणे क्रमप्राप्त आहे.

पण काश्मीरविषयीची ही गोष्ट नेपाळादि इतर प्रान्तांना लागू होत नाही. एक तर त्या प्रांतांतील मूळ वस्ति आर्य लोकांची नाहीं. त्यांतील मूळचे लोकही द्रवीड वंशाचे नसून मंगोलियन वंशाचे आहेत, व भरतखंडाच्या उत्तरेकडील तिबेटी वगैरे लोकांशीं त्यांचे अधिक साम्य आहे. ( काश्मीरांतील डामरजातीचे लोक आर्य किंवा मंगोलियन यांपैकीं कोणत्याही वंशाचे दिसत नाहीत; त्यांना द्राविड असेंहि खात्रीने म्हणवत नाहीं. एकंदरींत त्यांच्या वंशाचा सूक्ष्म विचार करणें बाकी आहे. )खस, नेवार व भोतिये हे लोक अगदीं खात्रीने मंगोलियन वंशाचे आहेत. दुसरें असें कीं,

भारतीय आर्योचा त्या प्रांतांत अगदीं अलीकडच्या काळीं प्रवेश झालेला आहे. त्यांत तरी ब्राह्मण व क्षत्रिय हेच कायते धार्मिक व राजकीय उद्देशानें तेथें गेले असून त्यांनी आपला धर्म व राजकीय मते तेथें चालू केली. तिसरी गोष्ट अशी की, नेपाळचें राज्य मोठें महत्वाकांक्षी असून, कधी तिबेटाचें, अथवा चीनचे, तर कधीं भारतीय साम्राटांचे तें अंकित असें. आजहि नेपाळ संस्थान अशाच दुहेरी स्थितीत आहे. ह्मणजे इकडे ब्रिटिश रेसिडेंटाला त्या राज्यांत जागा आहे; तर चीनचें स्वामित्व सुचविणाऱ्या वार्षिक देणग्याहि तेथून चीनांत जात असतात. असो. भूतान संस्थानांतील लोक सर्वथा मंगोलियन आहेत; भारतीय आर्यांचा तेथें कधीं प्रवेशहि झालेला नाहीं, व ते केव्हांहि भरतखंडस्थ कोणा राजाचें अंकित नव्हतें. हिंदुस्थानाशी त्याचा जो संबध येतो, तो केवळ तें एक सरहद्दीवरचे संस्थान इतक्या पुरताच येतो. प्राचीन संस्कृतग्रंथांत नेपाळचा उल्लेख येतो, पण महाभारतांतील भारतीय राज्यांच्या यादींत किंवा वराहमिहिराने दिलेल्या भारतीय लोकांच्या नामावळीत त्याचा भारतीय राज्य ह्मणून निर्देश केलेला नाहीं. तथापि, ज्या काळाचा इतिहास आह्मीं लिहीत आहों, त्या काळी नेपाळांत हिंदी राज्य असल्यामुळे त्याचा, तसाच काश्मीर व नेपाळ यांच्या दरम्यान असलेल्या इतर आर्यप्राय राज्यांचा इतिहास देणे अगत्याचे आहे. प्राचीन कोरींव लेख व नाणीं यांच्या साह्यानें हा इतिहास बराच कळतो व त्यांच्या जोडीला त्या त्या प्रांतांत परंपरागत चालत असलेल्या कथांचाहि उपयोग होण्यासारखा आहे.

## ( १ ) नेपाळ.

सांप्रतचे नेपाळचे राज्य सुमारें ५०० मैल लांबीचे व १०० मैल रुंदीचे असून हिंदुस्थानच्या उत्तर सरहद्दीवर आहे. पश्चिमेकडील कुमाऊनपासून तों पूर्वेकडील सिकिमपर्यंत तें पसरले असून त्याच्या दक्षिणेस वालुकामय खडकांची ओळ ही आहे. ही ओळ म्हणजे पंजाबांतील शिवालिक पहाडांचे हिमालयाच्या दक्षिण पायथ्यापर्यंत पसरलेले हातपायच होत. नेपाळच्या उत्तरेस हिमालयाचा मुख्य हिमाच्छादित भाग असून त्यांतच त्याचीं बहुतेक उंच उंच शिखरे म्हणजे गौरीशंकर, धवलगिरी, कांचनगंगा इत्यादि आहेत.

त्यांच्या पलीकडे गेल्यास तिबेटाचा मुलूख लागतो. या पर्वतांतून राप्ती, गंडक आणि कोशी किंवा कौशिकी अशा तीन नद्या उगम पावून त्या अनुक्रमें नेपाळच्या पश्चिम, मध्य व पूर्व भागांतून वहात जातात. यांपैकीं गंडक व कोशी यांना सप्तगंडक व सप्तकौशिकी अशीं नांवें प्राप्त झालीं आहेत; कारण गाऱ्हवाल जिल्ह्यांत जशा सात नद्या मिळून सप्तगंगा बनली आहे, त्याप्रमाणें नेपाळच्या सरहद्दींतच सात सात प्रवाह एकत्र होऊन या नद्या बनल्या आहेत. हा प्रांत बहुतेक खडकाळ असून कोठें कोठें मात्र लहान लहान सुपीक दऱ्या त्यांत आहेत व त्यांतून लागवड केली जाते.

या खोऱ्यांपैकीं विशेष प्रसिद्ध व विस्तीर्ण खोरें म्हटलें म्हणजे खुद्द नेपाळचें खोरें ज्याला म्हणतात तें होय. काश्मीरच्या खोऱ्याप्रमाणें तेंहि डोंगरांनीं वेष्टिलेलें असून वीस मैल लांब व दहा मैल रुंद आहे. त्यांतून काश्मीरांतील वितस्तानदीहूनहि लहान अशी एक बारीकशी नदी वहात असून ती त्याच्या मध्यभागीं आल्यावर दुसऱ्या नदीला मिळते. या नद्यांचीं नांवें वाग्मती व विष्णुमती अशीं असून त्या एकत्र मिळाल्यावर दक्षिणेकडील एका खिंडीच्या द्वारा त्या खोऱ्यांतून बाहेर पडतात,आणि खालीं हिंदुस्थानच्या मैदानांत उतरतात. समुद्रसपाटीपासून हें खोरें सुमारें ४७०० फूट उंचीवर आहे, त्यामुळें त्यांतील हवा अतिशय थंड नसून आरोग्यकारक आहे. त्यांतील जमीन सुपीक असून तेथें काश्मीराप्रमाणें मुख्यत: तांदूळ व भाजी-पाला पिकतो व तेथील सगळ्या खोऱ्यांमध्यें साधारणत: नानाप्रकारच्या फळांची उत्पत्ति होते. या कारणास्तव तेथील वस्ती फार दाट आहे. त्यांत कित्येक शहरें वसलेलीं असून त्यांतील मुख्य जे काटमांडु ऊर्फ कान्तिपुर तें वाग्मती व विष्णुमती नद्यांच्या संगमावर वसलेलें आहे. त्याच्या खालो-खाल ललितपट्टण व भातगांव ऊर्फ भक्तग्राम हीं शहरें प्रसिद्ध आहेत.

नेपाळांतील मूळ रहिवासी नेवार नांवाचे असून पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ते मंगोलियन वंशाचे आहेत. ते ठेंगणे, पण सुदृढ व मांसल असून, त्यांचीं नाकें किंचित् चपटीं व वर्ण पिंगट असतो. त्यांचे मुख्य धंदे म्हणजे शेती व व्यापार हे असल्यामुळें, भगवद्गीतेंतील 'कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्' हें वैश्यलक्षण त्यांना उत्तम लागू पडतें. मंगोलियन वंशांतील

अनेक जातींप्रमाणे नेवारी लोकांत विवाहबंधनें अगदीं शिथिल आहेत. नेवारी मुलगी बालवयांत असतांच तिचें बेलफळाशीं लग्न लावून तें बेल फळ नदींत फेंकून देतात, व मग तिला केव्हांहि वैधव्यदशा नाहीं, असें ते मानितात. पुढें ती वयांत आल्यावर कोणा पुरुषाशीं लग्न लाविते; पण तो नापसंत झाल्यास तिला केव्हांही त्याचा त्याग करून जातां येतें; जातांना त्याच्या बिछान्याखालीं दोन सुपाऱ्या मात्र तिनें ठेवाव्या म्हणजे झालें. ' पूर्वकालीं स्त्रिया अनियंत्रित होत्या' असे जें पांडुराजानें आपल्या हिमालयप्रदेशांतील वासांत आपल्या कुंतीराणीला म्हटल्याचे महाभारतांत सांगितलें आहे तें एकंदरींत खरें असाव, असें या नेवारी लोकांच्या चालीवरून दिसून येतें. विवाह-बंधनाची शिथिलता एकंदरींत हिमालयप्रदेशांतील बहुतेक मंगोलियन जातींत आढळत असून गंधर्व आणि अप्सरा यांच्याविषयींच्या आमच्या पुराणांतील कल्पना त्यावरूनच उत्पन्न झालेल्या आहेत.

पण भारतीय आर्य या बाबतींत अगदीं दुसऱ्या टोंकाला गेलेले आहेत निदान नेपाळांत तरी तसा प्रकार दृष्टीस पडतो. नेपाळांतील उच्च वर्णाच्या आर्य व मिश्र आर्य लोकांमध्ये व्यभिचाराला फार कडक शासन करतात. असला अपराध करणाऱ्या स्त्रीला ते जन्मभर कैदेंत ठेवितात व तिच्या जाराला भर वस्तीत कापून काढण्याचा तिच्या नवऱ्याला हक्क आहे; मात्र जाराला शक्य असेल तर पळून जाऊन आपला जीव वांचविण्याची मुभा ठेवलेली आहे. त्यांच्यांत विधवांना पुनर्विवाहाचा निषेध असून, एकदां मृत पतीबरोबर सहगमनाचा विचार केलेल्या स्त्रियांना मन घाबरल्यास तो विचार रद्द करूं न देतां सती जाणें भाग पाडतात. पत्नीच्या कर्तव्याविषयीं एकीकडे असले कडक निर्बंध, तर लगेच शेजारच्या जातींत त्याविषयीं अत्यंत शिथिलता हा प्रकार एकंदरीत मोठ्या गमतीचा असून मनुष्याच्या चालीरीतीवर कल्पनांचें दडपण किती जोराचें असतें हें त्यावरून दिसून येतें.

भारतीय आर्यांनीं अलीकडे इतिहासकाळींच नेपाळांत प्रवेश केलेला आहे. त्यांतील अगदीं अलीकडची त्यांची स्वारी म्हणजे चितोडच्या शिशोद्यांचे वंशज म्हणविणाऱ्या गुरख्यांची होय. अल्लाउद्दीन खिलजीनें चितोडचा पाडाव केल्यावर कांहीं रजपूत लोक तेथून निघून नेपाळच्या पश्चिमे-

कडील एका खोऱ्यांत जाऊन राहिले. तेथे मंगोलियन जातीच्या डोंगरी लोकांशी त्यांचें मिश्रण होऊन त्यांच्या पासून हल्लीचे गुरखे लोक झालेले आहेत असें दिसतें. गुरख्यांचे आर्यत्व आजहि उघड दिसण्यासारखें आहे. नेपाळांतील बखरीवरून त्या प्रान्ताचा सविस्तर इतिहास डॉ. राईट याने लिहिला असून गुरख्यांच्या वर्णनांत तो म्हणतो "काटमांडूच्या पश्चिमेस ४० मैलांवर असलेल्या गोरखपुराभोंवतींच्या प्रदेशांत प्रथमतः गुरख्यांची वस्ती झाली. ते रजपूत लोकांचे वंशज होत व मुसलमानी स्वाऱ्यांच्या वेळी राजपुतान्यांतून त्यांना हांकून लावण्यांत आले असे म्हणतात. प्रथमतः त्यांनी कुमाऊन डोंगरांतून पलीकडे जाऊन पालप येथे वसाहत केली, व तेथून क्रमशः गोरखपुर पर्यंत हातपाय पसरले. गुरखे लोक सामान्यत, दिसण्यांत नीटस असतात. हिंदी सैन्यात आढळून येणारे त्यांच्यांतील कांही उच्च जातीचे लोक उंच व सडपातळ असून काटक व मजबूत असतात; व हिंदुस्थानी लोकांप्रमाणे त्याचा तोंडवळा उठावदार असतो. तथापि सांप्रत अन्तर्जातीय विवाहामुळे त्यांच्यात पुष्कळ मिसळामिसळ झालेली आहे. त्यांचा मुख्य पेशा लष्करी असून ते मिताहारपानी व काटक असल्यामुळे सैनिकांचे काम ते उत्तम करतात. पण त्यांच्यांत उद्योगशीलता फारशी नाहीं; शेतीच्या किंवा देशांतील इतर कोणत्याच धंद्यात ते फारसे पडत नाहींत. या गुरख्यांपेक्षां नेवार लोक सामान्यतः ठेंगणे असतात, व त्यांचा तोंडवळाहि मंगोलियन वंशाकडे गुरख्यांपेक्षां अधिक झुकतो" (पान २६). इंपीरियल गॅझीटीअरमध्ये नेपाळ या सदराखाली जी माहिती दिली आहे तींत वरच्या विरुद्ध मजकूर आहे; पण डॉ. राईटचे म्हणणे नीट न समजल्यामुळे त्या लेखकाकडून ती तशी लिहिली गेली हे उघड दिसते. वर्णसंबंधानेहि गुरखे व नेवार यांच्यांत अंतर आहे. गुरखे नेवारांपेक्षां अधिक गौरवर्ण आहेत, व नेवारांच्या वर्णात पिंवळ्या रंगाची झांक अधिक आहे. एकंदरींत तोंडवळा, वर्ण, पिढीजात लष्करी पेशा व हिंदुधर्माचा कडक अभिमान या गोष्टी जमेस धरतां, गुरखे आपल्यास शिसोदे रजपुतांचे वंशज म्हणवितात त्यांत बरेच तथ्य आहे, असें स्पष्ट दिसते.

नेवार व नेपाळांतील इतर जुने लोक धर्माने बहुधा बौद्ध आहेत; तथापि नेवारांमध्यें हिंदूंचाहि बराच भरणा आहे. नेपाळांतील

ब्राह्मण, खत्री, व गुरखे या उच्च जातीचे लोक प्राचीन हिंदुधर्माचे अभिमानी असून त्यांचा शिवोपासनेवर विशेष भर आहे. तेथील पशुपतीचे भव्य मंदिर हें प्राचीन काळापासून मुख्य देवस्थान असून सर्व हिंदुस्थानांत त्याची ख्याति आहे. शिवाबरोबर त्याची पत्नी दुर्गा व पुत्र गणपति या देवताहि त्या लोकांना प्रिय असून धर्मनिष्ठ राजांनीं त्यांचीं अनेक देवळें तेथें बांधून ठेविलेलीं आहेत. त्यांत आश्चर्याची गोष्ट अशी आहे कीं, तेथील बौद्ध लोक देखील दुर्गेचे उपासक आहेत तिबेटांत चालू असलेल्या बौद्ध धर्माच्या महायान पंथाचेच नेपाळांत प्राबल्य असून त्यांत मूर्तिपूजेचें व धार्मिक खुळांचें इतकें बंड आहे व हिंदुधर्मातून त्या लोकांनीं इतक्या कांही गोष्टी घेतल्या आहेत कीं, नेपाळांतील बौद्ध लोकांना कोंबडीं, बकरी व रेडे यांचे दुर्गेपुढें बळी द्यावयास कांहींच दिक्कत वाटत नाहीं—इतकेंच नव्हे तर या बौद्धपंथांतहि तारा नांवाच्या पांच देवी असून त्यांना पांच बुद्धांच्या पत्न्या मानितात !!! त्यांचे पांच पुत्रहि मानिलेले आहेत. नेपाळांतील बौद्ध लोकांप्रमाणे हिंदुलोकहि मांसभक्षक आहेत. तथापि दोघेहि गाईला पवित्र मानीत असून गोवधाचे पातक मनुष्यवधाइतकेंच मोठे आहे असे समजतात

येणेंप्रमाणें भूपृष्ठरचना व लोकस्वभाव या बाबतीत नेपाळची स्थिति बहुतांशीं काश्मीरसारखी आहे असे दिसून येईल. फरक इतकाच कीं, काश्मीरी पंडितांची प्राचीन काळापासून आजपावेतो जशी सर्व हिंदुस्थानभर विद्वत्तेविषयीं ख्याति आहे, तशी नेपाळी ब्राह्मणांची नाहीं. फार काय, पण नेपाळांत विद्वान ब्राह्मणांची नित्य टंचाईच असून तसे ब्राह्मण इतर ठिकाणांहून तिकडे मागविण्याचीच वहिवाट पूर्वापार दिसून येते. तेथील पशुपतीच्या मंदिरांतील पुजारी बहुधा दक्षिणेतून ह्मणजे महाराष्ट्रांतून किंवा मद्रासकडून नेलेले असतात, ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. कधीं कधी कनोज आणि तिरहूत ह्मणजे मिथिलादेश या जवळच्या देशांतूनहि ब्राह्मण नेपाळांत जात असतात. या बाहेरून नेपाळांत गेलेल्या ब्राह्मणांनी अगदी अलीकडच्या काळांत प्राचीन वंशावळीच्या आधाराने नेपाळचा बखरीवजा इतिहास लिहिलेला आहे. त्यांत काश्मीरांतील वंशावळीप्रमाणे इ.स. १७६८ सालीं पृथिवीनारायणाच्या नेतृत्वाखालीं गुरखे लोक नेपाळ जिंकीपर्यंतच्या

राजांचा इतिहास सांगण्याचा आव घातलेला आहे. हा दंतकथात्मक नेपाळचा इतिहास संक्षिप्तरीतीनें डॉ.राइटने लिहिला आहे, व त्यांत ऐतिहासिक गोष्टींची एकच खिचडी केलेली आहे. त्यांत काल्पनिक गोष्टी घुसडल्या-असल्यामुळें त्यांतील कालक्रम तर फारच दूषित झालेला आहे.तथापि प्राचीन कोरींव लेखांच्या साह्यानें त्या दंतकथात्मक इतिहासांतून इ.स. ६०० पासून ८०० पर्यंतच्या म्हणजे प्रस्तुत आपण घेतलेल्या काळाच्या नेपाळच्या इतिहासांतील कांहीं मनोरंजक गोष्टी सविस्तरपणें सांगतां येण्यासारख्या आहेत. त्यांचा विचार करण्यापूर्वी तत्पूर्वीची हकीगत प्रथम थोडक्यांत पाहूं.

नेपाळांत शैवमत व बौद्धमत यांत अधिक प्राचीन कोणतें हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. तथापि फार काळापासून हीं दोन्ही धर्ममतें तेथें प्रचलित आहेत एवढी गोष्ट खरी. एका काळीं अशोकाचें साम्राज्य या प्रांतावर असून तो तेथे गेलाहि होता. त्याने आपली कन्या देखील नेपाळांतील एका राजाला दिल्याचे वर्णन आहे. तेथील शैव व बौद्ध अशा दोन्ही मतांच्या लोकांना नाग, यक्ष, राक्षस व दुर्गा हीं समाईकपणें मान्य आहेत. इतकें असूनहि नेपाळांत स्वयंभू चैत्य, गुजेश्वरी पीठ, शिवलिंग पशुपति व मरुश्मशान अशी चार महा पवित्रस्थानें असल्यामुळे त्याला महापीठ असें अभिधान मिळालेले आहे. ( राईटकृत नेपाळचा इतिहास पान ९१ ). नेपाळांत अशी एक कथा पूर्वापार प्रचलित आहे की, विक्रमाजित नामक राजाहि तेथे गेला व त्यानें तेथें राज्य करून धर्मनियम घालून दिले. शिवाचे भैरव नांवांचे दूत त्याने तिकडे नेले असावे व मग इतर गणांबरोबर त्यांचा हि शिवाच्या परिवारांत समावेश झाला असावा. या प्राचीन इतिहासांत काळाचा घोटाळा आहे, पण प्रस्तुत त्याकडे दुर्लक्ष करावयास हरकत नाहीं. या हकीकतींत पुढेहि एका विक्रमजिताचा संबंध आला आहे. पण तो कोणीहि असला तरी एका विक्रमानें विक्रम संवत् नेपाळांत सुरू केला एवढें खरें. त्यानें हा संवत् सुरू करण्यापूर्वी तेथील लोकांची सर्व कर्जे फेडलीं असेंहि वर्णन आहे. शककर्त्या पुरुषानें सर्व लोकांचीं कर्जे फेडून त्यांना सुखी केलें पाहिजे अशी एक मौजेची कल्पना हिंदुस्थानांत सर्वत्र आढळून येते; व तिला अनुसरूनच विक्रमाची ही गोष्ट असली पाहिजे.विक्र-

मसंवत् नेपाळांत फार काळापासून चालू आहे यांत मात्र कांही संशय नाही; व याच बाबतींत प्राचीन शिलालेखांचा संबंध येतो. भगवानलाल इंद्राजी व डॉ. बुल्हर यांनीं त्या लेखांचे वाचन व इंग्रजी भाषांतर करून तें इंडियन अँटिक्करीमध्ये प्रसिद्ध केलेलें आह. त्यांच्या लेखांतून जरूर तें अवतरण खालीं दिलें आहे.

'या लेखांपैकीं चारांतील अक्षरें स्पष्टपणें गुप्तपद्धतींचीं असून त्यांचीं वर्षे ३८६, ४१३, ४३५ व ५३५ अशीं आहेत. हा संवत् कोणता हें आपण पुढें पाहूं. या नंतरच्या महत्वाचा लेख लिच्छवि घराण्यांतील शिवदेवाचा असून त्यावर वर्ष घातलेलें नाही; पण त्यांत महासामन्त अंशुवर्मा असे नांव आलेलें आहे. साहवा लेख संवत् ३४ मधील असून अंशुवर्म्याचाच आहे. त्यांत अंशुवर्म्यानें आपल्याला महादेव आणि बप्प यांचा सेवक व महासामन्त असे म्हटलेलें आहे. हे पांचवा व साहवा असे दोन लेख निराळ्या तऱ्हेच्या गुप्त अक्षरांत आहेत. आणखीं एक सातवा लेख संवत् ३९ तील असून तो अंशुवर्म्याचा आहे, व त्यांत त्याला "बप्पपादानुध्यात" असें म्हटलें आहे. आणखी कांहीं लेख सोडून दिले. तर संवत् ४९ मधील एक लेख जिष्णुगुप्ताच्या नांवाचा आहे व त्यांत विष्णुगुप्त हा त्याचा युवराज होता असें म्हटलें आहे, व महाराजाधिराज अंशुवर्मा असेंहि नांव आलें आहे. यापुढें शिवदेवाचा एक दानलेख असून तो त्यानें स्थापिलेल्या शिवेश्वर नांवाच्या शिवमंदिरासाठीं दिलेल्या गांवाबद्दल आहे. त्यांचा संवत् ११९ असून त्याचेच आणखीं दोन लेख संवत् १४३ आणि १४५ या वर्षांतील आहेत, व त्यांत युवराज विजयदेवाचें नांव आले आहे. यांतील शेवटचा महत्वाचा लेख म्हणजे संवत् १५३ मधील जयदेवाचा असून त्यांत लिच्छवि घराण्याची वंशावळ दिलेली आहे, व त्याला सूर्यवंशी म्हणून लिच्छवि हा दशरथानतर आठवा पुरुष होय असें सांगितलें आहे. या घराण्यांत पुढें शंकरदेव, मानदेव, महीदेव आणि बसंतदेव असे राजे होऊन त्यांच्यानंतर तेरा राजे झाले, व त्यांच्या मागून उदयन आला. सुप्रसिद्ध राजा शिवदेव हा या उदयनाचा मुलगा असून त्याच्या भोगबर्मा नामक मौखरी राजाची कन्या व मगध देशाच्या आदित्य

सेनाची नात जी वत्सदेवी, तिच्याशीं विवाह झाला होता. त्यांचा पुत्र जयदेव. त्यानें गौड, ओड्र, कलिंग इत्यादि देश जिंकणारा आसामचा राजा जो हर्षदेव त्याच्या राजदेवी नांवाच्या कन्येशी विवाह केला. वर सांगितलेला शेवटचा लेख या जयदेवाचा असून त्यांत पशुपतीच्या मंदिरावर चांदीचे कमळ बसविल्याची हकीगत दिली आहे व त्यांतील कांहीं श्लोक स्वत: जयदेवाचे आहेत. ''

हे कोरींव लेख व त्यांतील संवत् वर्षे यांचा सुप्रसिद्ध पुराणविद्याविशारद पंडित भगवानलाल इन्द्राजी यांनीं इंडियन ॲंटिक्वरीमध्ये ( पुस्तक १३ पान ४११ ) ऊहापोह केला आहे, व त्यांबरोबर नेपाळांतील राजवंशांच्या नामावळींचाहि त्यांनीं विचार केला आहे. अशी एक वंशावळ डॉ. राईटला एका बौद्ध भिक्षूपासून मिळाली असून ती त्यानें आपल्या नेपाळच्या इतिहासांत संक्षिप्तपणें दिली आहे. या सर्व वंशावळी अर्थातच दंतकथात्मक आहेत. तथापि त्यांत कल्पित गोष्टीबरोबर खऱ्या ऐतिहासिक अनेक गोष्टीहि आल्या आहेत. असो. वर सांगितलेल्या लेखांत आलेला अंशुवर्मा म्हणजे ह्युएनत्संगाचे वेळीं नेपाळांत राज्य करीत असलेला जो अंशुवर्मा त्यानें सांगितला तोच होय, असें भगवानलाल म्हणतात. तो ठाकुर म्हणजे रजपूत जातीचा असून प्रथम नेपाळांतील लिच्छवि घराण्यांतील शिवदेवाचा एक सामन्त होता. पण त्यानें पुढे स्वतःच साम्राज्यसत्ता बळकाविली. त्याचा पहिला लेख संवत् ३४ मधील आहे. अर्थात् हें वर्ष हर्षशकाचे असलें पाहिजे. डॉ. राईटच्या वंशावळीच्या इतिहासांत ( पा. १३३ ) त्या नव्या वंशांतील पहिला राजा अंशुवर्मा होता असेंच म्हटले आहे. या मजकुराच्या जरा पूर्वी त्या इतिहासांत ( पान १३१ ) अशी हकीगत आली आहे कीं, हिंदुस्थानांतील विक्रमाजित् नांवाच्या कोणी बलाढ्य राजाने नवीन शक स्थापन केला, व नेपाळांत जाऊन तेथेंहि तो शक त्याने चालू केला. विक्रमाजित नेपाळांत गेल्याचा हा दुसरा उल्लेख होय, व त्याचा संबंध पंडित भगवानलालांनीं श्रीहर्षानें नेपाळ जिंकल्याच्या प्रसंगाशीं जोडिला आहे. या प्रसंगीं हर्षानें आपला शक नेपाळांत चालू केला, पण दंतकथेनें घोटाळा करून इ. स. पूर्वी ५७ व्या वर्षातील विक्रम

संवताशींच त्याची सांगड घालून दिली. वर उल्लेखिलेल्या लेखांत संवताचा जो फरक झालेला दिसून येतो त्यावरून हीच गोष्ट सिद्ध होते. हे लेख, वंशावळींची मोडकी तोडकी हकीगत, व ह्युएनत्संगाचे वर्णन या सर्व गोष्टी एकत्र करतां असे एकंदरीत निष्पन्न होते कीं, हर्षानें आपल्या दिग्विजयांत नेपाळ प्रांत जिंकून शिवदेव लिच्छवीचे कारकीर्दीत आपला शक तेथें चालू केला. या विजयाचा उल्लेख बाणभट्टानेहि केला आहे असें म्हणतां येते; कारण हिमालयांतील एका दुर्गम प्रांतापासून हर्षानें करभार घेतला असें हर्षचरितांत हर्षाविषयीं त्याने लिहिले आहे.(गृहीतो दुर्गाया हिमभुवः करः).

प्रस्तुत पुस्तकांत यावयाच्या इतिहासाचा संबंध हर्षाचा दिग्विजय झाल्यापासूनच्या गोष्टींशीच आहे खरा; पण पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्या दिग्विजयापूर्वीच्या ज्या कांही ऐतिहासिक गोष्टी कोरींव लेखांतून संगृहीत करतां येण्यासारख्या आहेत त्या देणेंहि उपयुक्त आहे. वंशावलींत सांगितलेले कांहीं राजे हर्षाच्या दिग्विजयापूर्वीच्या कोरींव लेखांत आले आहेत. ते असेः—१ वृषदेव, २ शंकरदेव, ३ धर्मदेव, ४ मानदेव, ५ महीदेव, आणि ६ वसंतदेव. हर्षशक १५३ म्हणजे इ. स. ७५९ तील जयदेवाच्या लेखांतच ( नंबर १५ चा लेख ) त्यांचीं नांवें सांगितली आहेत असे नाहीं, तर त्यांचे स्वतःचे देखील ३८६, ४३५ आणि ५३५ या वर्षांकालांतील लेख उपलब्ध आहेत. आतां प्रश्न असा आहे कीं, हे वर्षांक कोणत्या शकाचे आहेत ? हे राजे जयदेवापूर्वी कितीतरी पिढ्या होऊन गेलेले होते. अर्थात् इ. स. ७५९ पूर्वी अनेक वर्षे असा त्यांचा काळ होता. यास्तव तो शक म्हणजे गुप्त शक असावा असें म्हणतां येत नाहीं. गुप्त शक इ. स. ३२० त सुरू झालेला असल्यामुळे वरील वर्षें गुप्त शकाचीं मानिल्यास इसवी सनाचीं तीं ७०६, ७५५ व ८५५ अशीं अनुक्रमें होतात. अर्थात् त्यावेळीं चालू प्राचीन कोरींव लेखांचे वर्षांक विक्रमसंवताचेच होत असे जें पंडित भगवानलालांनीं ठरविलें आहे तें बरोबर आहे असें दिसून येईल. पंडितजीनीं स्वतः म्हटल्याप्रमाणें, जे अनेक पुराणविद्याविशारद विद्वान विक्रमसंवत् हा इ. सनाच्या पांचव्या शतकाआरंभीं उत्पन्न होऊन त्याचा आरंभ मात्र

इ. स. पूर्वी ५७ वर्षे असा कल्पनेने बसविला असे म्हणतात, त्यांच्या म्हणण्याशीं वरील विधानाचा विरोध येतो खरा; पण त्यास उपाय नाही. असो. तात्पर्य नेपाळांतील या कोरीव लेखांत पांचव्या शतकापूर्वीचा विक्रमसंवताचा ३८६ हा वर्षांक येत असल्यामुळें त्यांचे महत्व विशेष आहे.

आतां आपण आपल्या काळाच्या इतिहासाकडे वळूं. यांत प्रथम सांगावयासारखी गोष्ट अशी आहे कीं, हर्षानें नेपाळ प्रांत जिंकून तेथें आपला शक चालू केला ही गोष्ट अगदीं निश्चित दिसते. हर्षाचा हा विजय लिच्छवि घराण्यांतील शिवदेवाच्या कारकीर्दीत झालेला असून हर्षाच्या राज्यारोहणानंतर लवकरच म्हणजे इ. स. ६१० च्या सुमारास घडलेला असला पाहिजे. या विजयामुळे शिवदेवाचे सामर्थ्य नष्ट होऊन त्याचा सामन्त अंशुवर्मा प्रबळ झाला. पण जरी तो शिवदेवाच्या मानाने प्रबळ झाला, तरी हर्षाने तेथे स्थापिलेला शक अथवा आपली स्वतःची सामन्त ही पदवी झुगारून देण्याची त्याची शक्ति नव्हती. म्हणून त्याच्या दोन्ही लेखांत हर्ष शक व स्वतःचे सामन्त असे अभिधान हीं त्यानें कायम ठेविलेली दिसतात. पण मुख्य प्रधान किंवा सेनापति या नांवाखालीं वस्तुतः तो नेपाळचा राजाच बनला. अशा तऱ्हेचे हे दुहेरी साम्राज्य कित्येक पिढ्या चालू असून पंडित भगवानलालांनीं नेपाळच्याच इतिहासांतील अगदीं अलीकडचे याच नमुन्याचे म्हणून जंग बहादुराच्या अमात्य घराण्याचे दुसरें उदाहरण दिलें आहे. पण भरतखंडाच्या इतिहासांत अशीं आणखी किती तरी उदाहणे देतां येतील. आपल्या इकडे पेशव्यांचेंच उदाहरण घ्या. तेहि चार पिढ्यांपर्यंत नांवाचे प्रधान ऊर्फ पेशवे असून वस्तुतः राज्याचे मालक होते; व सातारचे राजे नांवाचे धनी असून अनेक पिढ्या वस्तुतः अंकितांसारखे रहात होते. असो. नेपाळसंबंधानें लिहितांना ह्युएनत्संग म्हणतो ' नेपाळांतील राजे क्षत्रिय जातीचे लिच्छवि म्हणून होते. ते चांगले विद्वान असून त्यांची बुद्धावर श्रद्धा असे. नुकताच होऊन गेलेला त्यांच्यापैकीं अंशुवर्मा राजा मोठा विद्वान् असून त्यानें निरुक्त प्रकरणावर एक ग्रंथ लिहिला आहे. ' या वर्णनावरून ह्युएनत्संगानें तें लिहिलें तेव्हां अंशुवर्मा मृत होता असें उघड होतें. परंतु ह्युएनत्संग श्रावस्तीस असतांना तो मेलेला होता

असे मात्र ठरत नाहीं. कदाचित ह्युएनत्संग नेपाळांत प्रत्यक्ष कधी गेला नसल; तत्संबंधीं माहिती मात्र त्यानें जमवून मागाहून ती लिहून काढिली, व त्यावेळी अंशुवर्मा जीवंत नव्हता. संवत् ३९ हा वर्षांक असलेला नेपाळी कोरींव लेख अंशुवर्म्याचा स्वतःचा आहे व तो संवत् म्हणजे हर्षशक असल्यामुळें इ सनाचें तें ६४५ वें वर्ष येते. अर्थात् त्यावर्षी तो जीवंत होता. मग व्हिन्सेन्ट स्मिथने त्याच्या मृत्यूचे वर्ष इ स. ६४१ म्हणून जे दिलें आहे ते कसें याचा उलगडा होत नाहीं. ( प्राचीन भारत-वर्षाचा इतिहास पान ३६६ ). तथापि अंशुवर्मा हर्षाच्या पूर्वी मात्र मरण पावला असावा असें दिसतें; व कनोजच्या इतिहासांत सांगितल्याप्रमाणें तिरहूतच्या राजाकडून त्रास पावलेल्या चिनी वकीलाला ज्यानें साहाय्य केलें, तो नेपाळचा राजा अंशुवर्मा नव्हे असेंही स्पष्ट होते. कारण अंशवर्मा आपल्या कारकीर्दीच्या अखेर अखेर कट्टा हिंदुधर्माभिमानी बनला असून शिवोपासक झाला होता. त्याच्या उपरोक्त लखांत " निशि निशि चानेक शास्त्रार्थविमर्शावसादितासद्दर्शनतया धर्माधिकारस्थितिकारणमेवोत्सवमनति-शयं मन्यमानः" असे जे शब्द आहेत त्यांवरून हे स्पष्ट होते. या शब्दांवरून त्याच्या विद्वत्तेविषयीं ह्युएनत्संगाच्या लिहिण्याला प्रत्यंतर मिळतें. इतकेंच नव्हे, तर बौद्ध धर्मातील तत्वज्ञानाचा असत्पणा अंशुवर्म्याला कळला होता, असेंहि त्यांवरून निष्पन्न होते. तात्पर्य बौद्ध धर्माच्या बाबतींत इतर प्रांतांत जो प्रकार दृष्टीस पडतो तोच नेपाळांतही घडून आलेला होता. अंशुवर्म्यापर्य-तचे राजे केव्हां बौद्धमतानुयायी तर केव्हां वैष्णवमतानुयायी होते. लेखांक १ मध्ये ज्या पहिल्या वृषदेवाचें नांव आलेलें आहे त्याचे क्रमांक १५ च्या जयदेवाच्या लेखांत ' सुगतशासनपक्षपाती ' म्हणजे बौद्ध मताचा कैवारी असें वर्णन आहे. बौद्धमते व तदनुसार आचार यामुळें नेपाळांतील हें लिच्छवि घराणें कमकुवत होऊन जोमदार अशा शैव मताचा अनुयायी अंशुवर्मा बलाढ्य झाला. अंशुवर्मा व त्याचे वंशज राजे आप-ल्याला आपल्या लेखांच्या आरंभीं ' पशुपतिभट्टारकपादानुगृहीत ' म्हणजे पशुपतीच्या चरणांचा अनुग्रह प्राप्त झालेले असें म्हणवितात, पण नेपाळी लेखांपैकीं पहिल्या चारांमध्यें हें विशषण राजांना लाविलेलें नाहीं

ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. अंशुवर्म्याच्या पूर्वींही पशुपतीचें वास्तव्य नेपाळांत होतेंच. कारण नेपाळवर्णनांत ह्युएनत्संगानें म्हटलें आहे कीं, " तेथील लोक उर्मट, कपटी व क्रूर आहेत; ते निरनिराळ्या धंद्यांत वाकबगार आहेत ( हें विधान मंगोलियन वंशांतील लोकांचें यथायोग्य वर्णन आहे ); त्यांच्यांत खरा व खोटा ( बौद्ध व हिंदु ) असे दोन्ही धर्म चालू असून बौद्धविहार व देवांचीं मंदिरें अशीं शेजारीं शेजारीं दृष्टीस पडतात. " यावरूनहि पशुपतीचे वास्तव्य नेपाळांत पूर्वींपासून होतें असेच दिसतें; पण तेथील राजे मात्र कधीं बौद्ध तर कधीं वैष्णव असत. या कारणास्तव त्यांचा ऱ्हास होऊन पशुपतीचा भक्त अंशुवर्मा बलाढ्य झाला व सामन्त पदवी ठेऊनहि त्याने आपली खरी सत्ता तेथे स्थापित केली. नेपाळी राजांचे " बप्पपादानुध्यात " असे जे दुसरे विशेषण आहे ते मात्र विक्रमसंवतांकित व अंशुवर्म्याच्या स्वतःच्या अशा सर्व लेखांत आढळतें. बप्प हे पद लिच्छवि घराण्याच्या मूळ उत्पादकांचे असल्यामुळे त्याचें नांव सर्वांनीं बहुमानाने सांगितले असावे. आपल्या इकडेहि शिवाजीच्या नांवाचा असाच प्रकार आहे. पुण्याचे पेशवे व साताराचे राजे असे दोघेहि त्याच्या नांवाला बहुमान देतात. या मराठे पेशव्यांच्या उदाहरणाशीं नेपाळी राजांचे आणखी एक साम्य असे आहे कीं, लिच्छवि राजे आपल्या आज्ञा मानगृहाहून पाठवीत तर अंशुवर्मा व त्याच्या नतरचे राजे त्या कैलासकूटाहून पाठवीत असत. हीं दोन्हीं स्थळें पुणे-साताऱ्याप्रमाणें भिन्न भिन्न असून हक्काचे राजे एका ठिकाणी रहात, व खरे सत्ताधारी आपलीं कामें दुसऱ्या ठिकाणी राहून चालवीत.

अंशुवर्मा इ. स. ६४६ त मृत्यु पावला. त्याचा पुत्र विष्णुवर्मा ( हर्षशक सवत् ४५ म्हणजे इ. स. ६५१ ) यानेंहि बापाच्या धर्तीवरच कारभार चालविला. यावेळीं लिच्छवि राजा शिवदेव यानेंच तिरहूतच्या राजाविरुद्ध चिनी वकीलाला साह्य केलें असावे. क्रमांक ८ च्या नेपाळी लेखांत ( इंडियन अँटिक्वरी पु. ९ पहा ) जिष्णुगप्त व त्याचा युवराज विष्णुगप्त अशीं नांवें सांगितलीं आहेत. हा लेख संवत् ४९ म्हणजे इ. स. ६५५ तील आहे. यांत वर्मा या उपपदाबद्दल जें गप्त असें पद आलें आहे त्यावरून हे राजे अंशुवर्म्याचे वंशज नसावेत असें दिसतें. तथापि त्या लेखांत

अंशुवर्म्याला बहुमानपुरःसर महाराधिराज अशी पदवी दिलेली आहे, त्यावरून ते अंशुवर्म्याच्या मागून गादीवर आलेले कोणी इतर नात्याचे संबंधीं असावेत. तेही कैलासकूटाहूनच आपलीं आज्ञापत्रें देत. या लेखांत आणखी ध्रुवदेव नांवाचा कोणी राजा सांगितला आहे; तो बहुधा शिवदेवाच्या मागून गादीवर आला असावा.

आतां जयदेवाचा पिता जो सुप्रसिद्ध राजा दुसरा शिवदेव त्याच्याकडे वळूं. त्याचे तीन लेख सांपडले आहेत. त्यांतील पहिला हर्ष संवत् ११९ म्हणजे इ. स. ७२५ तील असून त्यांत त्यानें स्वतः स्थापन केलेल्या शिवेश्वराच्या मंदिराच्या पूजेअर्चेसाठीं पातुपताचार्याला भूमिदान केल्याबद्दल लिहिले आहे. दुसरा, ह. श. १४३ म्हणजे इ. स. ७४९ तील असून त्यांत त्याने शिवदेवविहाराच्या खर्चासाठी बौद्धांना भूमिदान केलेलो आहे. हा प्रकार नेपाळी राजांना विशिष्ट दिसतो. ते आपल्या प्रजेप्रमाणें हिंदुदेवतांचे भक्त असूनही बौद्धमत मान्य करणारे होते. पूर्वी सांगितल्याप्रमाणें, ह्युएनत्संगानेंही या प्रकाराचा उल्लेख करून हिंदुदेवाची मंदिरें व बौद्धांचे विहार एकमेकांसन्निध नांदत असलेले नेपाळांत आढळतात, असे लिहून ठेविलें आहे. शिवदेवाचा तिसरा लेख हर्ष शक १४५ म्हणजे इ. स. ७५१ तील असून त्यांत दूतकाचे म्हणजे राजाज्ञा प्रसिद्ध करण्याचे काम युवराज विजयदेव याने केलेलें आहे. हा विजयदेव पुढील राजाच किंवा त्याचा वडील बंधु असावा, असे पंडित भगवान् लालाचें म्हणणें आहे. या दानलेखांत प्राचीन लेखांत अन्यत्र कोठें न आडळणारा असा एक श्लोक नवीनच आला आहे. त्यांत पुढील राजांनीं हे दिलेलें दान कोणत्याही कारणास्तव परत घेऊं नये, असें बजाविलें आहे. तो श्लोक असा:–यथा चाह। ( कोण ते सांगितलें नाहीं.)ये प्राक्तनावनिभुजां जगतीहितानां धर्म्यां स्थितिं स्थितिकृतामनुपालयेयुः। लक्ष्म्या समेत्य सुचिरं निजभार्ययेव प्रेत्यापि वासवसमा दिवि ते वसेयुः॥ ( जगाचें कल्याण करणाऱ्या व समाजाला नियम लावून देणाऱ्या पूर्व राजांनीं घालून दिलेल्या धर्ममर्यादेचें जे नीट पालन करतील ते चिरकालपर्यंत लक्ष्मीचा स्वभार्येप्रमाणें उपभोग घेऊन स्वर्गलोकीं त्यांना इन्द्रासारखें पद प्राप्त होईल. हा ह्मणणारा कोण तें मात्र सदर लेखांत सांगितलेलें नाहीं. तो व्यास मात्र नव्हे.

या शिवदेवानें मौखरी राजाच्या कन्येशीं ह्मणजे मगधांतील आदित्यसेन गुप्ताच्या नातीशीं लग्न केलें होतें. यावरून नेपाळांतील लिच्छवि घराण्याचा खास हिंदुस्थानांतील क्षत्रिय राजघराण्याशीं नात्याचा संबंध होता, हें उघड होते. शिवदेवाचा पुत्र जयदेव हर्षशक १४५ पासून १५३ पर्यंत केव्हांतरी राज्यावर आलेला असावा; कारण १५३ वर्षींतील त्याचा एक लांबलचक व महत्वाचा शिलालेख सांपडलेला आहे. या लेखाच्या आरंभीं लिच्छवि घराण्याला सूर्यवंशी ह्मटलें असून त्याची वंशावळ दिलेली आहे. लिच्छवि घराण्याच्या सूर्यवंशित्वासंबंधाने आह्मीं स्वतंत्र टीपेत विवेचन करणार आहों. पण एवढी गोष्ट खरी की, ख्रिस्ति सनाच्या आठव्या शतकांत लिच्छवि राजांना सूर्यवंशी समजत होते. या जयदेवाला आसामच्या हर्षदेव नामक राजाची कन्या दिलेली होती. जयदेवानंतर नेपाळच्या गादीवर कोण आला हें सांगतां येत नाही. नेपाळी वंशावळींत प्राचीन नेपाळी राजांचा कालक्रम अशा चमत्कारिक तऱ्हेने दिला आहे कीं, कोरींव लेखांतील विधानांच्या अत्यंतराशिवाय त्या राजांचा क्रम निश्चित करणें शक्य नाहीं. याचमुळे लिच्छवि घराण्याची समाप्ति केव्हां झाली, हेंही खात्रीनें सांगतां येत नाही. ९ व्या शतकांत नेपाळामध्यें एका नवीन रजपूत राजघराण्याची स्थापना होऊन त्याच्याकडून कीर्तिपुर आणि भक्तपुर अथवा भातगांव हीं नवीं नगरें वसविण्यांत आलीं, व इ. स. ८७९च्या अक्टोबरपासून आरंभ होत असलेला नेपाळी नांवाचा नवीन शकही त्या घराण्याकडून सुरू करण्यांत आला, एवढे मात्र निश्चित आहे. पण हे घराणे नक्की केव्हां राज्यारूढ झालें तें सांगतां येत नाहीं. तरी पण त्याच्या पहिल्याच राजानें नवीन शक चालू केला नाहीं, एवढें खरें. डाक्तर राईटनें आपल्या इतिहासांत असें लिहिलें आहे कीं, या घराण्याच्या अखेरीस शंकराचार्यांचा अवतार ह्मणून समजला जाणारा एक ब्राह्मण शंकराचार्यांनीं घालून दिलेले विधिनियम लोक कसे काय पाळीत आहेत, हें पाहण्यासाठीं नेपाळांत गेला होता. पण या गोष्टीचा संबंध पुढील काळाशीं असल्यामुळें, तिची चर्चा आपण पुढल्या पुस्तकांतच करूं. येथें इतकें सांगितलें म्हणजे पुरे कीं, लिच्छवि घराणें इ. स. ७५९ म्हणजे जयदेवाच्या शिलालेखाचें वर्ष व नेपाळी शकाचें आरंभवर्ष इ. स. ८७९ त्याच्या दरम्यान केव्हांतरी लयास गेलें असावें.

# टीपपणी.

## १ लिच्छ लोक.

लिच्छवि घराण्यांतील राजे आपल्याला सूर्यवंशी ह्मणवीत, व रामाचा पिता जो दशरथ त्यापासून आठवा पुरुष लिच्छवि नांवाचा होता असें ते प्रतिपादन करीत, हें हर्षशक १५३ म्हणजे इ. स. ७५९ तील जयदेवाच्या शिलालेखाच्या वर्णनांत पूर्वी सांगितलेंच आहे. त्यांची ही समजूत ८ व्या शतकांतील प्रचलित कल्पनांना अनुसरूनच होती. सातव्या शतकापासून नवव्या शतकापर्यंत हिंदुस्थानांतील सर्व क्षत्रियांना कोणीकडून तरी आपला संबंध सूर्यवंश किंवा चंद्रवंश यांशी लावून देण्याची मोठी उत्सुकता असे. पूर्वेकडील चालुक्य घराण्याचा इतिहास देतांना दक्षिणेतील चोल राजेही आपल्याला सूर्यवंशी म्हणवीत असल्याचें त्यांच्या ताम्रलेखांवरून पूर्वी दाखविलेंच आहे. वस्तुत: महाभारतकालापासून चोल व पांड्य हे दक्षिणेकडील लोक द्रविड वंशाचे होते, असेंच प्रसिद्ध आहे. ह्या संबंधानें आम्हाला असें वाटतें कीं, खुद्द आर्यावर्ताच्या आसमंतात्च्या प्रदेशांतील ज्या राजघराण्यांनीं आर्यधर्माचा स्वीकार केला त्यांना मनुस्मृतीच्या काळापासून म्हणजे (इ. सनापूर्वी १०० च्या सुमारापासून) प्राचीन धर्माभिमानी आर्यलोकांनीं क्षत्रिय जातींत सामील करून घेतले, पण एवढा फरक ठेविला की, त्यांना व्रात्य क्षत्रिय म्हणजे ज्यांनीं विधियुक्त संस्कार केलेले नाहींत किंवा ब्राह्मणांचा संसर्ग सुटल्यामुळें, जे धर्मभ्रष्ट झाले, असे क्षत्रिय असे नांव त्यांनीं दिलें. मनूनें या व्रात्यक्षत्रियांचीं नांवें सांगितलीं आहेत तीं अशीं:- झल्लो मल्लश्च राजन्याद्व्रात्यान्निच्छविरेव च। नटश्च करणश्चैव खसो द्रविड एव च ॥ (मनुस्मृति $\frac{१०}{२२}$). या श्लोकांत ज्या लोकांचीं नांवे दिलीं आहेत ते आमच्या मतें भरतवर्षाच्या आसमंतात्चे परकी लोक असून त्यांतील राजघराण्यांना व्रात्यक्षत्रिय म्हणून क्षत्रिय जातींत सामील करून घेतलेलें होतें. वरील नांवांपैकीं द्रविड म्हणजे दक्षिणेंतील चोल, पांड्य, व केरल होत, हें प्रसिद्धच आहे. तसेच निच्छवि कीं लिच्छवि व खस हे उत्तरेकडील लोक म्हणून प्रसिद्ध आहेत. उरल्यापैकीं नट, करण, व झल्ल हे इतिहासांत नामशेष

झालेले दिसतात; मल्ल राच्याचा उल्लेख महाभारतांत आहे, तथापि त्यांचीही एकंदरींत तीच अवस्था आहे. पण लिच्छवि व खस हे मात्र इतिहासप्रसिद्ध लोक असून आमच्या मतें ते मंगोलियन वंशाचे होत. लिच्छवींचा अंमल भरतखंडांतील कांहीं प्रदेशावरही असून ज्या घराण्यांत गौतम बुद्ध जन्मास आला म्हणून म्हणतात, त्या शाक्य घराण्याशीं त्याचा संबंध होता. बऱ्याच प्राचीन काळापासून आर्यलोकांत त्यांचा अंतर्भाव होऊं लागला असून हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध गुप्त सम्राटांच्या घराण्यांतील मूळ स्त्री एका लिच्छवि घराण्यांतील राजाची कन्या होती. हा लिच्छवि राजा बहुधा नेपाळांतीलच असावा. अशा तऱ्हेने लिच्छवि राजांचा हिंदुस्थानांतील राजघराण्यांशीं शरीरसंबंध जडल्यामुळें पुढील इतिहासांत त्यांना क्षत्रियच मानिलेले असून त्यांचे अस्सल आर्यक्षत्रिय घराण्यांशीं विवाहसंबंध होत. खस लोकांचा विचार पुढे करूं.

## २ इ. स. ५३९ तील अंशुवर्म्याचा शिलालेख.

( इंडियनॲंटिक्वरी पुस्तक ९ पान १७० वरून )

ऊं स्वस्ति । कैलासकूटभवनाद् निशि निशि चानेकशास्त्रार्थविमर्शाव. सादितासद्दर्शनतया धर्माधिकारस्थितिमेवोत्सवमनतिशयं मन्यमानो भगवत्पशुपतिभट्टारकपादानुगृहीतो बप्पपादानुध्यातः अंशुवर्मा कुशली पश्चिमाधिकरणवृत्तिभुजो वर्तमानान् भविष्यतश्च यथार्हं कुशलमाभाष्य समाज्ञापयति विदितं भवतु भवतां पशुपतौ भगवाँच्छूरभोगेश्वरोऽस्मद्भगिन्या श्री भोगवर्मजनन्या भोगदेव्या स्वभर्तृ राजपुत्रस्य शूरसेनस्य पुण्योपचयाय प्रतिष्ठापितो यश्च तद्दुहित्राऽस्मद्भागिनेय्या भोग्यदेव्या प्रतिष्ठापितो लडितमहेश्वरो यश्चैतत्पूर्वजैः प्रतिष्ठापितो दक्षिणेश्वरस्तेषामधः शालापाञ्चालिकेभ्यः प्रतिपालनायातिसृष्टानामस्माभिः पश्चिमाधिककरणस्याप्रवेशेन प्रसादः कृतो यदा च पाञ्चालिकानां यत्किंचन कार्यमेतद्गतमुत्पत्स्यते यथाकालं वा नियमितं वस्तु परिहात्पयिष्यन्ति तदा स्वयमेव राजभिरन्तरासनेन विचारः करणीयो यस्त्वेतामाज्ञामतिक्रम्यान्यथा प्रवर्तिष्यते तं वयं न मर्षयिष्यामो भाविभिरपि भूपतिमिर्धर्मगुरुतया पूर्वराजकृतप्रसादानुवर्तिभिरेव भवित-

व्यमिति स्वयमाज्ञादूतकश्चात्र युवराजो विजयदेवः संवत् ३९ वैशाखशुक्ल दिवा दशम्याम् ।

## हिमालयीन प्रदेशांतील किरकोळ संस्थानें.

नेपाळपासून काश्मीरपर्यंतच्या हिमालयीन प्रदेशांत जशीं सध्या बरींच लहान लहान डोंगरी राज्यें आहेत, त्याप्रमाणे ती सातव्या शतकाच्या सुमारासही होतीं या प्रदेशांतील मुख्य रहिवाशी खस नांवाचे लोक असून त्यांना मनुस्मृतींत व्रात्य क्षत्रिय म्हणून गणलेलें आहे, हें पूर्वीं सांगितलेच आहे ( नटश्च करणश्चैव खसो द्रविड एवच). हे खस निःसंशय मंगोलियन वंशाचे असून या प्रदेशांत त्यांची पूर्वीं राज्येंही असलीं पाहिजेत. पण पुढें ग्रीक, शक किंवा कुशन लोकांच्या स्वाऱ्या पंजाबावर जेव्हां सुरू झाल्या, तेव्हां तेथील ब्राह्मण व क्षत्रिय या वर्गातील आर्यलोक स्वसंरक्षणार्थ या डोंगरी प्रदेशांत घुसले, व त्यांपैकीं क्षत्रियांनीं जीं त्यावेळी आर्यांचीं राज्ये तेथें स्थापिलीं, तीं आद्यापपावेतोंही तगून राहिलीं आहेत. या डोंगरी प्रदेशांतील थड हवेंतील लोकांचें आयुर्मान जसें इतरांहून अधिक असतें तशी येथील राजघराण्यांची परंपराही इतर ठिकाणांपेक्षां पुष्कळ आधिक काळ टिकते. बर्फांत घालून ठेविलेल्या फळांप्रमाणे या हिमालयीन थंड प्रदेशांतील राजघराणीं कित्येक शतकेपर्यंत अगदीं अविच्छिन्न व अस्खलित चाललीं व त्यांपैकी कांहीं आजमितीसही दृष्टीस पडतात. त्यांनी पूर्वींच्या वहिवाटी व सांप्रदाय इतक्या काळजीनें जतन करून ठेवण्याचा यत्न केलेला आहे कीं, हिंदुस्थानांतील प्राचीन सांप्रदाय कसे होते, यांचा तपास करावयाचा झाल्यास आजमितीस या प्रदेशांत गेल्यानें तो चांगला लावितां येईल. या राज्यांची थोडीबहुत माहिती कनिंगहॅमच्या पुराणवस्तुविषयक लेखांच्या ( पुस्तक ५ व ९ ) आधाराने खालीं दिली आहे,

**चंबा**—या संस्थानापैकीं चंबा नांवाचें संस्थान राजतरंगिणींत सांगितले असून त्याचें नांव तेथें चंपा असें दिलें आहे. रावी व तिला मिळणाऱ्या इतर नद्या यांचा डोंगरांतील वरचा भाग या राज्यांत मोडतो. येथील राजा सूर्यवंशी असून त्याच्या पुरोहितानें राजघराण्याची जी वंशावळ जतन

करून ठेविलेली आहे. ती नित्य वहीवाटीप्रमाणें ब्रह्मदेवापासून सुरू झालेली आहे. रावीच्या कांठीं वर्मावर किंवा वर्मापुर येथे जे कांहीं कोरींव लेख उपलब्ध झाले आहेत, त्यांत कांहीं राजांचीं नांवें सांगितलीं असून राजतरंगिणीतही कांहीं आलेली आहेत. या कोरींव लेखांत चंपाच्या राजवंशाला ' मोषनाश्वगोत्रादित्यवंश ' असे लांबलचक नांव दिलेलें असून तें अलीकडील गोत्रांच्या नामावळींत कोठें सांपडत नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. हे राजे शिव, पार्वती, गणेश आणि लक्ष्मीनारायण किंवा विष्णु यांचे उपासक असून त्यांनीं आपापल्या इष्ट देवतांसाठीं मंदिरें बांधिलेलीं आहेत. वर्मावर व चंपा या ठिकाणीं हीं देवालयें बांधिलेलीं आहेत. या सर्व राजांच्या नांवापुढें वर्मा असें उपपद घातलेलें असते. या घराण्यांतील राजांची नामावली तेथील हल्लींच्या संस्थानिकांकडून मिळालेल्या माहितीच्या आधारानें कनिंगहॅमने तयार केली आहे व तीवरून प्रस्तुत इतिहासकालाला लागणारीं नांवे दिसतात ती अशीं:--

१ आदिवर्मा, २ देववर्मा, ३ मंद्रवर्मा, ४ कांतारवर्मा, ५ पारकलपवर्मा, ६ अजवर्मा, ७ मेरुवर्मा, ८ सुवर्णवर्मा, आणि ९ लक्ष्मीवर्मा. यांतील शेवटचा राजा लक्ष्मीवर्मा म्लेच्छांच्या स्वारीचे प्रसंगीं मारला गेला, असें तेथील वंशावळींत म्हटले आहे. ही स्वारी म्हणजे इ. स. ८९० त काश्मीरच्या शंकरवर्म्यानें केलेली स्वारी होय, असें कनिंगहॅमचे मत आहे. हिमालय प्रदेशांतील दीर्घ आयुर्मर्यादेच्या मानानें प्रत्येक पिढीला सरासरीनें तीस वर्षें धरिल्यास वरील नऊ राजांच्या कारकीर्दीचीं वर्षें एकंदर २७० होतात, व त्या मानानें आदिवर्म्याचा आरंभकाळ इ. स. ६२० च्या सुमारास येतो. यांच्या पुढच्या राजाचें नांव मोषनवर्मा म्हणून सांगितलें आहे; तो कदाचित् कोरींव लेखांत सांगितलेला मोशनाश्व असेल.

या पुढील राजांचीं नांवे सांगण्याचें येथें कारण नाहीं. पण राजतरंगिणींत जीं नांवे आलेलीं आहेत तीं अशीं:–१ शाल ( याचा काश्मीरच्या अनन्तवर्म्याच्या हातून इ. स. १०३० त वध झाला. ), २ अशत ( याची बहीण काश्मीरच्या कलशाला दिली होती; सन १०६० ), आणि ३ उदय ( याचा इ. स. ११२१ च्या सुमारास म्हणून राजतरंगिणींत उल्लेख आलेला आहे ).

**नुरपुर**—या संस्थानाचें प्राचीन नांव उदुम्बर असें होतें, त्याच्या राजधानीचें प्रस्तुतचें नांव पठाणकोट असून ती बियास व रावी यांचीं खोरीं विभक्त करणाऱ्या सोळा मैल रुंदीच्या एका पठारावर वसलेली आहे चंबा व कांग्रा संस्थानांतील डोंगरी गांव आणि खालीं मैदानांतील लाहोर व जालंदर, यांमधील व्यापाराचें मुख्य ठिकाण पठाणकोट येथेंच आहे. पठाण नांवाचे पैठण असेंहि रूप असून तें दक्षिणेतील गोदातीरच्या पैठणा प्रमाणे प्रतिष्ठान शब्दाचाच संक्षेप आहे.

या संस्थानाचें उदुम्बर हें प्राचीन नांव वराहमिहिराने आपल्या लोक नामावलीत कपिश्थला बरोबर सांगितलें आहे. कपिश्थल नांव अएयनच्या 'इंडिया' नामक पुस्तकांतही कंबिस्थोळी या रूपानें आलेलें आहे. विष्णु पुराणांत त्रिगर्त आणि कुलिंद यांबरोबर उदुंबर हे नांव येते. त्रिगर्त आणि कुलिन्द म्हणजे अलीकडील कांग्रा व कुलू हीं संस्थानें होत. नुरपुरचे हल्लींचे राजे पैठणिय नांवाचे असून ते आपल्या घराण्याची पूर्वपीठिका वीस पिढ्यांपर्यंत मागें पोंचवितात. त्या काळापूर्वी नें संस्थान कदाचित् जालंदरच्या राज्यांत बहुधा मोडत असावें. तेथील देविशाह नांवाच्या ब्राह्मणानें कनिंगहॅमला दिलेल्या राजवंशावलींत पहिला राजा जयपाळ नांवाचा असून त्याला पुंडीर ह्मणजे पांडूचा वंशज अर्थात् अर्जुनापासून झालेल्या तोमार नांवाच्या रजपूत कुलांतील, असें त्यांत ह्मटलें आहे. या वंशावळींत इ. स. १०९५ सालांतील जयपाळापासून इ. स. १८४६ पर्यंतच्या जसवंतसिंगापर्यंतचीं नांवें आलेलीं आहेत. नुरपुरचे हे राजे मुसलमानी अमदानींत विशेष प्रख्यात होते. त्यांच्यापैकीं राजा भक्तमल्लानें अकबराविरुद्ध शिकंदर सूराला साहाय्य केल्यामुळें बैरामखानानें त्याचा वध करून त्याच्या भावाला ह्मणजे तख्तमल्लाला त्याच्या गादीवर बसविलें.

**मंडी**-बियास नदीचा डोंगरांतून वहाणारा भाग कुलू, मंडी आणि कांग्रा या तीन संस्थानांत वांटून गेलेला आहे; सर्वांत वरचा भाग कुलूंत, मधला मंडी व खालचा कांग्रां मंडीचें राजघराणें सुकेत घराण्याचीच धाकटी शाखा असून त्याच्या कुळकथेवरून पहतां इ. स. १२०० च्या सुमारास तें मुळापासून विभक्त झालें असें दिसतें. पण निर्मंड येथील मंदिरांतल्या

कोरीवलेखांत जीं चार राजांची नांवे सांगितलीं आहेत त्या सर्वांना सुकेत व मंडी येथील घराण्यांना विशिष्ट असलेलें सेन हें उपपद लाविलेलें आहे, व मंडीच्या राजवंशावळीतल्या कांहीं नांवाशीं ती चारीही जुळतात. त्यांतील शेवटचा जो समुद्रसेन त्याचा काळ संवत् १२२७ म्हणजे सन ११७० असावा, व तो इ. स, १८५७ त होऊन गेलेल्या बलबीरसेनापर्यंतच्या पुढच्या सत्तावीस काळाशी राजांच्या चांगला जुळतो.

निर्मंड येथील कोरींव लेखाची लिपी गुप्तपद्धतीची असल्यामुळे तो लेख इ. सनाच्या ४ थ्या किंवा ५ व्या शतकांतील असावा, असा कित्येकांचा गैरसमज झालेला आहे. परंतु, गंगायमुनांमधील डोंगराळ प्रदेशांत गुप्तलिपीचा नेहमींच प्रचार असून जहांगीर बादशहाचा समकालीन जो कांग्राचा त्रैलोक्यचंद्र नांवाचा राजा त्याच्या वेळेपर्यंतही कांग्रा राजांच्या नाण्यांवर त्याच लिपीचीं अक्षरें आढळतात. तसेंच काश्मीर, कांग्रा व मंडी येथील सर्व कोरींव लेख गुप्तलिपींतच असून मंडीच्या जालमसेन नामक इ. स. १८३८ त मृत्यु पावलेल्या राजाच्या सतीस्तंभांवर ' महाराज' हा शब्द याच लिपींत खोदलेला आढळतो. मंडीचे वाणी लोक अजूनहि गुप्त लिपींतच आपला जमाखर्च लिहीत असतात, व त्यांतील एका वाण्याला अलाहाबाद येथील समुद्रगुप्ताचा स्तंभलेख दाखविला असतां तो त्यानें सहज वाचून टाकिला(कनिंगहॅम). हिमालयाच्या थंड हवेंत वस्तु फार काळ टिकून रहातात असें जें वर आम्हीं म्हटलें आहे त्याचें प्रत्यंतर या गोष्टीवरून चांगलेंच मिळतें.

मंडीच्या राजघराण्याची कनिंगहॅमने स्थानिक राजनामावलीवरून तयार केलेली वंशावळ वीरसेनापासून इ. स. ७६५ च्या सुमारास सुरू झालेली आहे. निर्मंडचा कोरींव लेख लिहिणारा समुद्रसेन वीरसेनापासून १७ वा पुरुष असून त्याचा काळ इ. स. ११६६ असा आहे. ही वंशावळ इ. स. १८५१ सालापर्यंत म्हणजे विजयसेनाच्या कारकीर्दीपर्यंत आणून पोंचविली आहे. या राज्यांत सतीस्तंभांची संख्या बरीच असून १८३८ त मृत्यु पावलेल्या जालमसेनाच्या नांवावरही त्यांतील कांहीं स्तंभ आहेत.

**कुलू व सिमला संस्थानें**:--या सर्व राज्यांत व विशेषें करून नेपाळ व कांग्रा यांच्या दरम्यानच्या मुलखांत कुनेट नांवाच्या लोकांची मुख्य वस्ती आहे. खस लोकांपैकींच एका शाखेचे ते लोक असून त्यांचीच संख्या या प्रदेशांत विशेष आहे. वराहमिरानेही ज्यांना कुनिंद म्हणून व विष्णुपुराणांत कुलिंद म्हणून म्हटलेलें आहे तेच हे कुनेट असावेत असें कनिंगहॅम म्हणतो. कुलिंद हें नांव महाभारतांतील लोकांच्या नामावळींतही आलेले आहे, पण त्यांत त्याचे स्थान किंवा दिशा कांहींच सांगितलेलें नसल्यामुळें हिमालयीन प्रदेशांतील कुनेट म्हणजेच कुलिंद असे ठाम सांगतां येत नाहीं. या लोकांमध्यें आर्यांचा प्रवेश केव्हां झाला ते निश्चित सांगतां येत नाही. पण त्याविषयीं कनिंगहॅमचे असे मत आहे कीं,"आर्य लोकांचा या प्रदेशांत प्रवेश होण्यापूर्वी कुनेट व खस हेच त्याचे धनी होते. मुसलमानांच्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर सुरू झाल्यापासून मैदानांतील आर्यलोक वर या डोंगराळ प्रदेशांत प्रवेश करूं लागले. कुनेटांच्या आजच्या हद्दीत जीं प्राचीन कामें दिसून येतात, तीं सर्व मोवा किंवा मोन नांवाच्या लोकांची होत असें म्हणतात, व हे मोवा जातीचे लोक म्हणजेच कुनेट असेही सर्वांचें मत आहे. त्यांतील खरा प्रकार असा आहे कीं, मोन हे त्या लोकांचें तिबेटी नांव असून कुनेट किंवा कुनिंद अथवा कुलिंद हे त्यांचे हिंदी नांव होय." ( कनिंगहॅमकृत पुराणवस्तुसंशोधन वृत्त पु. ९ पा. १२७ ). कनिंगहॅम पुढें आणखी म्हणतो,"गऱ्हवाल प्रांतांत द्वारहाट येथें थडग्याच्या आकाराचीं मोठ्या विटांनीं बांधिलेलीं जीं कामें आहेत तीं मोवी किंवा मोन या लोकांचीं होत असें तेथील लोक म्हणतात. द्वारहाटाहून जोशिमठाकडे निघून जाण्यापूर्वीं कुनेट लोकांनींच तीं बांधिलीं असावींत असें वाटतें."

वरील विवेचनावरून पुराणांतील मोन लोकांविषयींच्या कोड्याचा उलगडा होण्यासारखा आहे. पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, शक किंवा तुरवरांनंतर मोन लोकांचा म्लेच्छ अंमल सुरू झाला असें पुराणांत म्हटलें आहे. आम्हाला असे वाटतें कीं, पुराणांतील हे मोन म्हणजे कुलिंदांचे पूर्वज असून मूळचे मंगोलियन वंशाचे तिबेटी लोक होत, व कुशनांनंतर पंजाबावर व सतलज नदीच्या अलीकडील प्रदेशावर त्यांचें कांहीं काळपर्यंत राज्य

होतें. आजच्या कुनेट लोकांचे पूर्वज असें जें त्यांना म्हटलें आहे तें योग्यच आहे. कारण ते शुद्ध म्लेच्छ वंशाचे होते, व आजचे कुनेटही अनार्य, फार तर मिश्र आर्य आहेत. कदाचित ते खसही असतील, कारण आजचे खसही मिश्र जातीचेच आहेत. कुनेट लोक स्वत: पाहिलें तर मोन हें नांव या डोंगराळ प्रदेशांतील मूळच्या लोकांना देतात. कनिंगहॅमच्या मतें हिमालयाच्या अलीकडील ह्या मोनलोकांचा संबंध पूर्वेकडील मुंड लोकांशींही जोडतां येण्यासारखा आहे; आणि आश्चर्याची गोष्ट अशी आहे कीं, कलियुगांतील भविष्य कालीन म्लेच्छ राजांच्या यादींत त्यांचें नांव पुराणकारांनीं दिले आहे. विष्णुपुराणांत त्याविषयीं उल्लेख आहे तो असा:—
ततश्चाष्टौ यवनाश्चतुर्दश तुरुष्कारामुण्डाश्च त्रयोदय एकादश मौना एते वै पृथिवीपतय: पृथिवी दशवर्षशतानि नवत्यधिकानि भोक्ष्यंन्ति ॥ ( अंश ४ ) यांतील १०९० वर्षांचा जो या राजांचा काळ सांगितला आहे त्यांत मात्र कांहीं विशेष अर्थ नाहीं. त्यांतील कांहीं घराणीं समकालीन असण्याचाही संभव आहे; व १०९० ही संख्या अशा समकालीन राजांच्या अमदानीच्या वर्षांची बेरीज असूं शकेल. तथापि त्यांतील मुंड व मौन म्हणजे कनिंगहॅमच्या मतें तुरुष्क ऊर्फ तुक्करांच्या म्हणजे कुशनांच्या ऱ्हासानंतर जे लोक पूर्वेकडे व हिमालयीन प्रान्तांत उत्कर्षास चढले तेच होत, असे म्हणावयास हरकत नाही.

कसेंही असले तरी एकंदरींत कुनिंद लोक वराहमिहिराच्या काळीं म्हणजे इ. स. ५०० च्या सुमारास सुप्रसिद्ध होते यांत शंका नाहीं. वराहमिहिराने वायव्य दिशेकडील लोकांच्या यादींत त्यांचे नांव दिलें असून पुन: पापग्रहांचे राशीवर होणारे दुष्परिणाम सांगतांना त्यांचा स्वतंत्रही उल्लेख त्यानें केला आहे. तो ह्मणतो " पांचाल, मगध, कलिंग, अवन्ति, आनर्त, सिंधुसौवीर, हारहूण, मद्र आणि शेवटीं कुनिंदाचा राजा यांचा क्रमानें नाश होईल. " एकंदरींत ह्युएनत्संगाच्या वेळीं देखील कुनिंदांचें स्वतंत्र बलाढ्य राज्य असलें पाहिजे असें यावरून दिसून येतें. हें राज्य ह्मणजे स्रुघ्नाचें राज्य होय असे कनिंगहॅमनें ठरविलें आहे व त्याची राजधानी यमुनानदीच्या पश्चिमेस बारिया जवळ सुघ नांवाच्या प्रस्तुतच्या

ठिकाणीं होती असे तो म्हणतो. त्या राज्यांत कुनेटांच्या देशाचा बहुतेक अन्तर्भाव होत होता, व उरलेला भाग कुलूत ऊर्फ कुलू आणि शतद्रु ऊर्फ पंजोर यांत मोडत असे. कुनिंदांचा राजा जो अमोघभूति त्याचीं बरींच नाणीं याच प्रांतांत सांपडलीं आहेत. अमोघभूतीचा काळ इ. सनापूर्वी १५० च्या सुमारास असला पाहिजे असे आम्हांला वाटतें; कारण ज्वालामुखी जवळच्या शेतजमिनींत ग्रीक लोकांच्या अपोलोडोटस नामक राजाच्या तीस नाण्यांबरोबरच त्याचींही तीन नाणी सांपडली * आहेत.

या सर्व राज्यांतील लोक बौद्धधर्मीय होते. त्यावेळी मंगोलियन वंशाचे बहुतेक लोक त्याच धर्माचे असत. आर्यांच्या सुधारणेचाहि तेथे बऱ्याच प्राचीनकाळीं प्रवेश झालेला असावा. सातव्यापासून बाराव्या शतकापर्यंत येथे कोणकोणते राजे होऊन गेले हे सांगतां येणे कठीण आहे. एवढे खरें कीं, या प्रदेशांतील हल्लींचे लोक जे कुनेट ते जातीनें मिश्र आर्य म्हणजे मातृवंशाकडून तार्तर व पितृवंशाकडून आर्य असे आहेत. ते बहुधा ब्राह्मण व क्षत्रिय पुरुष आणि कुनेट अथवा खस जातीच्या स्त्रिया यांची संतति होत. नेपाळच्या इतिहासांत सांगितल्याप्रमाणे खस जातीच्या स्त्रिया असे संबंध करण्यास नाखुष नसत. त्यांच्या संततीला क्षत्रियांत गणीत व अजूनही गणतात व या गोष्टीचें पुष्कळ यूरोपियन पंडितांना मोठे आश्चर्य वाटतें. कुनेट स्त्रियांचा हा स्वैर आचार व ब्राह्मणांची विषयासक्ति या विषयीं त्या पंडितांनीं चमत्कारिक विचार प्रदर्शित केले आहेत. पण या गोष्टीचा साधा उलगडा असा आहे कीं मनुस्मृतिकालापासूनच खस लोकांना व्रात्य क्षत्रियांत समाविष्ट

---

* सुघ्नाच्या दुसऱ्या एका प्राचीन राजाचे नांव बऱ्हूत येथील कोरींव लेखांत आढळतें. हा लेख एका दरवाजाच्या तोरणावर कोरलेला कनिगहॅम यास मिळाला. त्यांत धनभूति नांवाच्या सुघ्न राजाचें नांव आहे. मथुरा येथेंही धनभूतीचा कोरींव लेख मिळाला असून कनिगहॅमच्या मतें हा धनभूति ग्रीकराजा अपोलोडोटस व शुंगराजा अग्निमित्र यांचा समकालीन असावा. एकंदरींत कुनिंदाचें राज्य एका काळी मध्यहिंदुस्थानांत बऱ्हूतपर्यंत पसरलेलें असावें असें दिसतें. ते बहुतकरून आर्य किंवा मिश्र आर्य असावे असे म्हणावयास सबळ कारणें आहेत. (कनिगहॅमकृत बऱ्हूतवर्णन पान १२७-१३० पहा.)

केल्यामुळें त्यांच्या स्त्रियांचे आर्य क्षत्रियांशीं विवाह होण्याला अडचण नव्हतीच, व फार प्राचीन काळापासून बहुतेक मध्ययुगापर्यंत म्हणजे प्रस्तुत आपल्या इतिहासाच्या आरंभकाळापर्यंत ब्राह्मणांचे क्षत्रियस्त्रियांशीं होणारे विवाहही धर्म विरुद्ध म्हणून मानीत नसत. अशा विवाहाच्या संततीला मात्र क्षत्रिय हेंच नांव मिळे. खस हे व्रात्य क्षत्रिय असल्यामुळें हे विवाह जरी विधिपुरःसर नसले तरी आजन्म बंधनकारक असत. त्यामुळें त्यांत शास्त्रविरुद्ध असे कांहींच नव्हतें. हिमालयाच्या डोंगराळ प्रदेशांत वसाहत करावयास जाणाऱ्या ब्राह्मण व क्षत्रियांना आपल्या जातीच्या स्त्रिया थोड्याच नेतां येत असत, त्याच्यांत वरील वहिवाट चालू झाली.

**राजपुरी** ऊर्फ **राजोरी** प्राचीनवस्तुसंशोधनवृत्ताच्या बाराव्या पुस्तकांत दिलेली पुढील माहिती महत्वाची आहे. राजतरंगणींत कलश राजाच्या ( इ. स. १०८० ते १०८८ ) वर्णनांत राजपुरीचा उल्लेख आला आहे. राजपुरीच्या सिंहासनावर सहजपालाच्या मागून त्याचा पुत्र संग्रामपाल हा आला असतां सहजपालाचा भाऊ मदनपाल याने आपल्या पुतण्यापाशीं गादीबद्दल वाद सुरू केला. पण काश्मीरराजाच्या साह्यामुळे संग्रामपाल त्यांत यशस्वी झाला. इ. स. १०८७ त कलशानें भरविलेल्या दरबारांत जे आठ माडलिक हजर होते म्हणून सांगितले त्यांत संग्रामपाल होता. त्या आठांची नांवें अशीं:—

| | |
|---|---|
| १ अर्वपुरचा कीर्तनी; | ५ लोहरचा उत्कर्ष |
| २ चंपाचा अशत. | ६ औवेंश |
| ३ वल्लपुर ऊर्फ बिसनलीचा कलश | ७ ...... |
| ४ राजपुरीचा संग्रामपाल | ८ कष्टावत. |

याखेरीज पुढील आणखी चार राजांची नावें राजतरंगिणींत आलीं आहेतः

| | |
|---|---|
| १ सहजपाल इ. स. १०५० | ३ सोमपाल इ. स. ११०० |
| २ संग्रामपाल, सन १०८५ | ४ भूपाल सन ११३५. |

# प्रकरण १९ वें.

## पंजाबांतील राज्यें.

( मध्ययुगीन कालाच्या आरंभीं भारतीय आर्यांची खास म्हणून गणलेली भूमि जी पंजाब त्याच्या इतिहासाकडे आतां वळावयाचें. हा इतिहास फारच त्रोटक असल्यामुळें तो शेवटीं राखून ठेवला होता. आपल्या इतिहासाच्या काळांत पंजाब प्रांतांत बलाढ्य अशीं राष्ट्रें नव्हतींच व जीं कांहीं होतीं त्यांच्या विषयींची माहिती देखील जवळच्या राज्यांच्या इतिहासांतून तुरळक जी मिळते तेवढीच. तथापि जी कांहीं माहिती मिळण्यासारखी आहे तीवरून या महत्वाच्या प्रान्तांचा इतिहास देण्याचा प्रयत्न करूं ).

ह्युएनत्संगानें पंजाबांतील जीं राज्यें किंवा पूर्वीं "एकदां स्वतंत्र राज्यें असलेले प्रांत सांगितले आहेत, ते त्याच्या वेळीं काश्मीरच्या अधिराज्यांत मोडत होते. सिंधुनदीच्या तीरापासून आरंभ करून त्यानें तक्षशिला, (रावळपिंडी ), २ सिंहपुर ( सिंधुनदी ज्याची पश्चिम सरहद्द आहे असा लवणगिरीचा मुलूख ), आणि ३ उरशा ( हरिपुर ऊर्फ हजारा ) हीं राज्यें प्रथम दिलीं आहेत. हीं सर्व पूर्वीं एकदां गांधारच्या साम्राज्यांत मोडत असून ह्युएनत्संगाचे वेळी त्यांवर काश्मीरचे राजे राज्य करीत होते. त्यांतील खरा प्रकार असा दिसतो कीं, हूणाचें साम्राज्य पंजाबांतून नष्ट झाल्यावर त्यांत जी जीं हिंदी संस्थाने मोडत होती, त्यांपैकीं बहुतेक काश्मीरच्या अधिराज्याखालीं आलीं. हूणाचे मुख्य ठाणे गांधार येथे असून त्यांनीं काश्मीर प्रांतालाही बहुतेक ग्रासून टाकिलें होतें. पण प्रवरसेनाच्या कारकीर्दीत काश्मीर देशाने आपलें स्वातंत्र्य पुनः प्रस्थापित केले. याच वेळी म्हणजे इ. स. ५०० च्या सुमारास मन्दसोरच्या यशोधर्मा राजानें मिहिरकुल हूणराजाचा पराभव केला, व त्यामुळें काश्मीरदेशाला स्वतंत्र होण्याला आणखी संधि मिळाली. पुढे कर्कोटक घराण्याच्या अमदानींत इ. स. ६०० च्या सुमारास म्हणजे ह्युएनत्संग इकडे येण्यापूर्वीं कांहीं काळ काश्मीरचें राज्य बरेंच बलाढ्य झालें; व त्यानें तक्षशिला, सिंहपुर, आणि

उरशा या प्रांतांवर आपला अंमल बसविला. ह्युएनत्संगाच्या यादींतील पुढचीं राज्यें म्हणजे ४ पुनाच व ५ राजपुर अथवा राजोरी हीं होत. हीं सुद्धां त्याच्यावेळीं काश्मीरच्या अमलाखालीं होतीं, किंबहुना ती नेहमीच तशीं असत. याच्यापुढें त्याने ६ टेक्क, ७ चीन, भुक्ति, ८ जालंधर, ९ कुलूत आणि १० शतद्रु अशीं राज्यें सांगितलीं आहेत. यां पैकीं चीनभुक्ती विषयीं फारशी माहिती मिळत नाहीं. तो स्वतंत्र देश नसून एका राज्याचा केवळ भाग ( भुक्ति ) होता, व कांहीं काळ त्यांत चीनी राजपुत्र रहात असल्यामुळे ह्युएनत्संगानें त्याचा स्वतंत्र उल्लेख केला आहे. कुलूत आणि शतद्रु या राज्यांविषयीं सुद्धां जवळ जवळ कांहीं कळत नाही त्यांत राजे वगैरे कोण होते हें त्याने सांगितलें नाहीं. पण सतलज नदी शतद्रुराज्याच्या पश्चिमेस होती असे ह्युएनत्संगाने म्हटलें आहे. त्यावरून पाहतां हीं दोन्ही राज्यें बहुधा कनोजच्या अमलाखालीं असावीं. टेक्क व जालंदर या राज्यांविषयीं मात्र तत्कालीन लेखांवरून थोडीशी माहिती उपलब्ध होते. ती अशी.

जालंधरच्या राज्याची खूण आजच्या जालंदर शहरावरून आजही पटत आहे. त्या विषयी कनिंगहॅमने ' मध्ययुगीन नाणीं ' या पुस्तकांत असें लिहिले आहे कीं, ' जालंधरच्या सुपीक प्रांतांत रावी आणि सतलज या नद्यांमधील दोन्हीं दुआबांचा समावेश होत होता. त्याची राजधानी जालंधर नांवाचेंच शहर असून कांग्राकोट हे त्यांतील मजबूत ठाणे होते. या राज्याचे नांव जालंदर दैत्यावरून पडलेलें आहे. अशी * कथा आहे

* जालंधर दैत्याची कथा पद्मपुराणांत आली आहे. तो सागरापासून झालेला गंगेचा पुत्र असून त्याला ब्रह्मदेवापासून वर मिळाला होता. ब्रह्मदेवानें त्याला जागा देण्यासाठीं समुद्राला मागे हटावयास सांगितलें, व त्याप्रमाणे तो हिमालयापासून मागे हटला. कोंकणाच्या उत्पत्तीसंबंधीं कथेप्रमाणें या कथेचा पंजाबच्या भूस्तरविषयक इतिहासाशीं कांहीं संबंध असावा. हिमालयाच्या पायथ्याशीं अद्यापिही समुद्रांतील शंख वगैरे आढळून येतात. जालंधराचें शरीर पंजाबभर पसरलें होतें या कथेचा अर्थ कनिंगहॅमनें असा केला आहे की, सतलज व बियास या दोन नद्या मुलतानपर्यंत प्राचीन काळीं एकमेकींस समान्तर अशा वाहत होत्या.

कीं, शिवानें जालंधराचा वध केल्यावर त्याचें प्रेत पंजाबभर पसरून पडलें. ज्वालामुखी हें त्या दैत्याचे मुख आणि मुलतान हे त्याचे पाय होत; जालंधर जवळचा प्रदेश ही त्याची पाठ असल्यामुळे तो जालंधर पीठ नांवाने प्रसिद्ध झाला; व पुढे अकबराने त्यांत थोडा फरक करून त्याला जालंधर बिट असे म्हटले. या प्रदेशालाच त्रिगर्त असे दुसरे नांव असून त्याचा अर्थ रावी, बियास व सतलज या तीन नद्या ज्यांतून वहातात तो मुलूख असा आहे. हेमचंद्राने आपल्या कोशांत " जालंधरास्त्रिगर्ताःस्युः" असे म्हटले असून महाभारतकालापासून ते नांव अजून चालू राहिलें आहे. त्रिगर्तांतील हल्लीचे राजघराणें आपल्याला महाभारतप्रसिद्ध* सुशर्म्याचें वंशज समजते. ते आपल्याला सोमवंशी म्हणवीत असून, त्यांतील पुरुष आपल्या नांवापुढे चंद्र हे पद नित्य लावतात. कीरग्राम येथील वैजनाथाच्या मंदिरांत इ. स. ८०४ तील एका कोरींव लेखांत जयचंद्र म्हणून एका जालंधरच्या राजाचें नांव आलेले आहे. काश्मीरच्या शंकरवर्म्याचे स्वारीचे वेळीं पृथ्वीचंद्र नांवाचा त्रिगर्ताचा राजा पळून गेला असे राजतरंगिणींत वर्णन आहे. इ. स. १०४० च्या सुमारास इन्द्रचंद्र नांवाच्या जालंधरच्या राजाचा उल्लेख राजतरंगिणींत आला आहे. पंजाब व काबूल येथील नाण्यांवर जसे घोडेस्वाराचे चित्र असते, तसेच जालंधर राजांच्या नाण्यांवरही असतें. पृथ्वीराज चव्हाण व महंमद घोरी सारखे मुसलमान राजे यांनींही पुढे हेच चिन्ह आपल्या नाण्यांसाठीं घेतलें.

मुसलमानी अमदानींत जालंधरचे राजे कधीं स्वतंत्र असत, तर कधीं मुसलमानी बादशहांचे अंकित म्हणून असत. कांग्राच्या डोंगरी किल्यासाठीं जो महमुदाच्या स्वारीच्या प्रसंगीं भयंकर झगडा झाला त्याचें वर्णन पुढील काळांतील असल्यामुळे ते दुसऱ्या पुस्तकांत येईल-इतर अनेक डोंगरी संस्थानाप्रमाणें जालंधरचें राजघराणेही एकच असें फार प्राचीन काळापासून अगदीं अलीकडील काळापर्यंत अविच्छिन्न चालू आहे, व असें

---

* याने मत्स्यपुरांतील बिराटाच्या गायवाड्यावर हल्ला करण्यांत दुर्योधनाला साह्य केले. भारतीय युद्धांतही तो त्याच्या बतीनें पांडवांबरोबर लढत होता.

होण्याचें कारणही पूर्वी अनेकवार आह्मीं सांगितलें आहे. मोंगल बादशाहींत जालंधरचें स्वतंत्र राज्य ह्मणून अस्तित्व नष्ट झालें. हल्लीं कांग्रांच्या किल्यांत मात्र एक घराणें स्थानिक राजा ह्मणून नांदत आहे.

आतां टेक्कच्या राज्याचें वर्णन करूं. या राजाची जुनी राजधानी शाकल ऊर्फ सियालकोट येथे असून त्यावर मिहिरकुलाचा अंमल होता असें ह्युएनत्संगानें लिहिलें आहे. सियालकोटच्या हूण राजाचा यशोधर्म्यानें उच्छेद केल्यावर पुढें तें एका नवीन क्षत्रिय घराण्याकडे आलें असें दिसतें. या घराण्याचें टाक ऊर्फ तक्षक असे नांव होतें. चचनाम्यांतही हें नांव आलेलें आहे. हें राज्य रावी व चिनाब या नद्यांच्या दरम्यान ह्मणजे जालंधराच्या उत्तरेस होते. या स्थितीशीं ह्युएनत्संगाचे बरेच वर्णन जुळतें, पण सिंधुनदी त्याच्या हद्दीवर होती असें जें त्यानें ह्मटलें आहे तें मात्र चमत्कारिक दिसतें, व तें राज्य हिमालयाच्या पायथ्यापासून सिंधूनदीपर्यंत सर्व पंजाबभर पसरलें होते असें मानिल्याशिवाय त्याचा उलगडा होत नाहीं. या राज्यांतील लोक बौद्धधर्मीय नव्हते असें त्याने ह्मटलें आहे; व ही गोष्ट देखील मिहिरकुलानें केलेल्या बौद्धांच्या छळाच्या कथेशीं जुळतीच आहे. मिहिरकुल जरी परकी जातीचा होता तरी त्याचा ओढा बौद्धधर्माकडे मुळींच नसून तो कट्टा शैव होता. टाक लोक हिंदु असून त्यांचे राज्य चालू असे तों पावतों ते नेहमी हिंदुच राहिले होते.रजपुतांचा इतिहासकार कर्नल टॉड याने क्षत्रियांच्या मूळ छत्तीस राजघराण्यांत टाक घराण्याची गणना केली असून मुसलमानी काळांत ते सर्व मुसलमान बनून गल्यामुळें त्यांच्या क्षत्रियत्वाची कांहीच खूण आज शिल्लक राहिलेली नाहीं असे ह्मटलें आहे.

काश्मीरच्या शंकरवर्म्याचे कारकीर्दीत थक्किय म्हणून जें राज्य कल्हणानें राजतरंगिणींत सांगितलें आहे तें टाकचेच राज्य कीं काय हें खात्रीने सांगतां येत नाहीं, तथापि त्याचाच कल्हणानें उल्लेख केला असावा असें वाटतें. त्यांत अडचण एवढीच आहे कीं, थक्किय हा कल्हणाचा शब्द टाक शब्दाशीं तितका जुळत नाहीं. कनोजच्या भोज राजानें थक्कियवर हल्ला चढविला त्यावेळीं काश्मीरच्या शंकरवर्म्यानें त्याला साह्य केलें, एव-

ह्याच काय तो एक उल्लेख टाकराज्याविषयीं दोन शतकांच्या अवधींत सांपडतो. याशिवाय या संस्थानचे राजे व त्यांचा इतिहास कांहीं कळत नाहीं. ह्युएनत्संग सिन्धप्रांतांत जाऊन परत फिरल्यावर मुलतानला आला, त्यावेळचें मुलतानचें त्याने जे वर्णन केले आहे त्यावरून टाकचें राज्य एकाकाळीं सिंधु नदीपर्यंत पसरलेलें असून मोठें बलाढ्य होतें एवढें मात्र स्पष्ट होतें. ह्युएनत्संग म्हणतो त्यावेळीं मुलतान व त्याप्रमाणे पोफातो नांवाचें दुसरें ही एक राज्य टाक राज्याचीं अंकित होती. ह्युएनत्संगानंतर म्हणजे हर्षाच्या मृत्यूनंतर जेव्हां चच सिंधप्रांताचा राजा झाला, तेव्हां त्यानें मुलतान जिंकून आपल्या राज्याला जोडिलें. तात्पर्य असे कीं, सातव्या शतकाच्या अखेरीस पंजाबचा ( पश्चिमेकडील ) बहुतेक भाग काश्मीर किंवा सिंध या राज्यांपैकीं कोणाचा ना कोणाचा तरी अंकित होता व टाक ऊर्फ टेक्क आणि जालंधर त्याच्या पूर्व भागांतील राज्यें स्वतंत्र होतीं.

कनिंगहॅमच्या पुराणवस्तुसंशोधन वृत्तांत ( पुस्तक ५ पानें ११५-१२० ) मुलतानसंबंधीं कांहीं मनोरंजक माहिती दिली आहे; तिचा सारांश येथें देण्यासारखा आहे.

" मुलतानचा प्राचीन किल्ला चिनाब नदीच्या डाव्या तीरावर सुमारें चार मैलांवर बांधलेला आहे. प्रथम तो रावी नदींतील एका बेटावर बांधिलेला असून, प्राचीनकाळीं चिनाब नदीला रावी मुलतानच्या खालच्या बाजूस मिळत असे. पण त्यांचा संगम आतां मुलतानच्या वर बत्तीस मैलांवर आहे. प्राचीनकाळीं बियास नदीचा प्रवाह देखील मुलतानच्या दक्षिणेकडून स्वतंत्रपणें वहात असे; पण आतां ती नदी बरीच वर सतलज नदीला मिळून जाते. या कारणास्तव पूर्वी चच राजा सिन्धप्रांतांतून जेव्हां मुलतानवर स्वारी करावयास आला, तेव्हां त्याला प्रथम सतलज नदी व नंतर बियास ओलांडून रावीच्या डाव्या तीरावर सिक्का येथें उतरतां आलें. त्यावेळीं सिक्का हा रावीच्या दक्षिण तीरावर मुलतानच्या अगदीं समोर असा एक किल्ला होता. रावीच्या उभय तीरांवर असलेल्या या सिक्का-मुलतानांचा चचनाम्यांत नेहमीं जोडीनें उल्लेख केलेला असतो. चचाच्या कारकीर्दींत टाक घराण्यांपैकीं एक राजा मुलतानवर राज्य करीत होता, व

ह्युएनत्संगाचे वेळींही हीच स्थिति होती. चचाने मुलतानावर स्वारी केल्या-नंतर तो टाक राजा त्याचा अंकित म्हणून तेथे राहिला असला पाहिजे. कारण पुढे महंमद कासिमाचे स्वारीचे वेळी म्हणजे इ.स. ७१२ त सिक्का येथें कोणी बजरताकी म्हणून राजा होता,त्यानें कासिमाचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला, पण तो निष्फळ झाल्यामुळे तो रावीनदीपलीकडे मुलतानास पळून गेला असें वर्णन आहे. पुढे मुलतानाचाही कासिमाने पाडाव केला, आणि तेव्हांपासून ते राज्य मध्ययुगीन कालाच्या अंतापर्यंत मुसलमानांच्या अमलाखालीच राहिले."

मुलतानचा इतिहास म्हणून जरी एवढाच असला, तरी तेथील सुप्रसिद्ध सूर्यमंदिराचे थोडे अधिक वर्णन देण्यासारखे आहे. मुलतानाचे सांबपुर असें दुसरे नांव असून तेथील सूर्यमंदिर कृष्णाचा पुत्र सांब याने आपला कांही त्वग्रोग बरा व्हावा म्हणून बांधिले होते अशी कथा आहे. सूर्यदेवता महारोगासह सर्व त्वग्रोग हरण करणारी आहे अशी समजूत असल्यामुळे, मुलतानच्या या सूर्यमंदिराच्या दर्शनासाठी सिंधप्रांत व पंजांब येथूनच नव्हे, तर हिंदुस्थानाच्या सर्व भागांतून यात्रेकरू येत असत. हे मंदिर फार श्रीमंत झाले होते. चचनामाकार व ह्युएनत्संग या दोघांनीही त्यांचे वर्णन केले आहे. इ. स. ८१५ च्या सुमाराचा एक आरब लेखक बिलादरी त्या विषयी असें लिहितो कीं, "लोक या देवालयाला प्रदक्षिणा घालून त्याच्या पुढे क्षौर करितात." इ. स. ९७५ तील इस्ताखेरी नामक दुसरा एक लेखक म्हणतो कीं, मुलतानचें सूर्यमंदिर 'शहरच्या भरवस्तीच्या जागीं म्हणजे हस्तिदंताचा बाजार आणि तांबटगल्ली यांच्या मध्ये बांधिलेलें आहे. त्यांतील मूर्ती मनुष्याकार असून चुनेगच्चीच्या सिंहासनावर ती आसनमांडी घालून बसलेली आहे. तांबड्या लाल कमावलेल्या चर्मानें तिचे सर्वांग वेष्टिलेलें असून डोळ्यांशिवाय तिचे कोणतेही अवयव दिसण्यासारखे नाहींत ही मूर्ती काष्ठमय आहे असें कित्येकजण म्हणतात. तिच्या डोळ्याच्या जागीं मूल्यवान रत्नें बसविलीं असून मस्तकावर सोनेरी मुकुट आहे.' इ. स. ९७६ नंतर केव्हांतरी, झेलमच्या सैबन नांवाच्या कर्माटी राजाच्या मुलानें

मुलतान जिंकिलें, मंदिरांतील पुजाऱ्यांची कत्तल केली, मूर्तीचा भंग केला, आणि त्या जागीं मशिदीची स्थापना केली.

पण हिंदूंच्या धर्मभक्तीमुळे व मसलमान जेत्यांच्या धनलोभामुळें या सूर्यमूर्तीचे पुनरुज्जीवन होउन जुन्या मदिराजवळच एक नवीन मदिर बांधण्यांत आलें *म्हणूनच अबूर्लारिहन मुल ानला आला त्यावेळीं जरी तेथे सूर्य मंदिर नव्हतें, तरीं इ. स. ११३० तील इद्रिसी नामक लेखकाचे वेळीं सूर्योपासनेचा तेथें भर आढळून येत होता. यावळीं रावीच्या पात्राची दिशा बदलून तेथे ती केवळ एक पावसाळी प्रवाह होऊन गेला होता असे दिसतें. इ. स. १२६३ त काझविनी या लेखकान मुलतानाचें असंच वर्णन केलें असून वर म्हटले आहे की, तेथील मोठी मशीद सूर्यमंदिराजवळच म्हणजे किल्ल्याच्या अगदीं मध्यभागींच आहे. इ. स. १६६६ त मुलतानास गेलेल्या थेवेनो नामक फ्रेंच प्रवाशानेही त्या मंदिराचे वर्णन केले आहे त्यांतील सूर्याची मूर्ती रक्तचर्मवेष्टित असून तिचे मुख कृष्णवर्ण व डोळ्यांच्या जागीं दोन मोतीं होतीं असें त्यानें लिहिलें आहे. औरंगजेबानें आपला धर्मच्छळ सुरू करण्यापूर्वीचें हें वर्णन आहे. त्या मंदिराचा व मर्तीचा शेवटीं औरंगजेबाकडूनच विध्वंस झाला असें जे म्हणतात तें खरेंच आहे, आणि तेव्हांपासून मात्र त्यांचें अस्तित्व नाहींसें झाले.

पंजाबांतील ही सूर्योपासना कित्येक जण समजतात तशी पारशी लोकांकडून उचललेली नसून ती भारतीय आर्यांमध्यें प्रथम पासूनच होती हें येथें सांगितलें पाहिजे. एक तर पारशी लोकांत मूर्तिपूजा नाहीं व त्यामुळे मुलतानची सूर्याची मूर्ति मूळ हिंदूच असली पाहिजे. तिचें रक्तचर्माचे वेष्टण, नेत्रांच्या जागीं बसविलेले लाल, मस्तकावरील किरणयुक्त किरीट आणि त्वग्रोग बरे करण्याची शक्ति या सर्व कल्पना हिंदूच्याच होत.

* भक्तांनीं दिलेल्या द्रव्यामुळें मुसलमानांनीं पुनः ते मंदिर बांधूं दिलें. जुन्या मंदिराजवळ अशा रीतीनें नवीन मंदिर बांधिल्याचीं अनेक उदाहरणें आहेत; काशीच्या विश्वेश्वराचें मंदिर, उज्जनीच्या महाकालाचें देवालय, तसेंच अयोध्येचें मंदिर हीं अशाच प्रकारचीं आहेत.

नाण्यांवर देखील सूर्याची अशाच प्रकारची प्रतिमा उमटविलेली असते. त्यांपैकीं एका नाण्याच्या वर्णनांत कनिंगहॅम ह्मणतो, "त्याच्या एका बाजूला देवाचा मुखवटा असून तो प्रिन्सेपच्या मते पारशांच्या मिथ्र देवतेचा असावा; पण मला वाटते तो मुलतानच्या आदित्य नामक सूर्य देवतेचा असला पाहिजे; कारण हिंदु रिवाजाप्रमाणे त्याच्या किरीटाभोंवतीं किरणाचें जाल असून तें पारशांच्या मिथ्र देवतेच्या शिरोभूषणाहून अगदीं वेगळ्या प्रकारचें आहे. *"

दुसऱ्या एका नाण्यावर तसाच मुखवटा आहे. त्यावर पण इराणच्या खुशरूपिरोज राजाचे नांव आहे;त्यावरून चचनाम्यांत वर्णिल्याप्रमाणे खुशरूने सिन्धप्रांताचा कांहीं भाग जिंकिलेला असावा असे ह्मणावे लागतें. तिसऱ्या एका नाण्यावरही असाच सूर्याचा मुखवटा आहे. त्याच्या एका बाजूला मायन्याच्या पुढें मुलतानचा राजा असे शब्द आणि उलट बाजूवर किरण वलयांकित सूर्याच्या मुखवटयासह 'श्रीवासुदेव' व 'पंचान जाबुलिस्तान' अशीं नांवें नागरी अक्षरांत घातलेलीं आहेत.* यावरून चचाच्या वेळी वासुदेव नांवाचा कोणी राजा मुलतानास राज्य करीत असावा असे कनिंगहॅमनें अनुमान केलें आहे. कदाचित् चचनाम्यांत सांगितलेला टाक घराण्यांतील राजा तोच हा वासुदेव असेल.

---

*हे नाणें कनिंगहॅमच्या मतें सिंधप्रांतात चचापूर्वी जें घराणें राज्य करीत होतें त्याच्या टेवराज नामक मूळ पुरुषाचें म्हणजे इ. स. ५०० च्या सुमाराचें असावें.

* कनिगहॅमने मुलतानच्या किल्यानें बारकाईचें वर्णन दिलें आहे. त्या ठिकाणीं प्राचीन इमारतींचे अवशेष सांपडत नाहीत, कारण तेथें दगड फारच कमी असून इमारती बहुतेक विटांच्या असतात. मुलतानच्या किल्ल्याचा कांही इतिहास कळावा म्हणून कनिगहॅमनें तेथील जागेवर खड्डा खणण्यास सुरुवात केली. जमिनाच्या पृष्टभागापासून ४० फुटांपर्यंत शेंकडो वर्षांचे जमलेले कचऱ्याचे थर होते, व ते संपल्यावर पुढें मात्र सरळ मातीची जमीन लागली. त्या जमलेल्या थरांचे वर्णनही मनोरंजक आहे. कनिगहॅम म्हणतो " या थरांपैकीं दीड दीड फुटाचा थर एक एका शतकांत जमलेला असावा. दहा बारा

मुलतानास प्रल्हादपरी नांवाचें आणखीही एक प्रसिद्ध देवालय होतें. त्या शहरालाच पूर्वी कश्यपपुर असें नांव होतें व तें ग्रीक इतिहासांत कॅसपीरा रूपाने आलेलें आहे. कश्यप हा हिरण्यकशिपूचा बाप होता व या ठिकाणीं त्या दैत्यानें आपला पुत्र जो प्रल्हाद त्याला श्री विष्णूची भक्ति करण्याबद्दल ठार मारण्याचा यत्न केला. येथील प्रल्हादाचें मंदिर फार काळ प्रसिद्ध होते, व तेथें दरसाल नृसिंहजयंतीच्या प्रसंगानें यात्राही भरत असे. हे मंदिर सन १८५९ सालीं जवळच्या एका दारूच्या कोठाराला आग लागून त्या भडाक्यांत उडून गेले

---

फुटांच्या खोलीवर त्यांत दोन नाणीं सापडली; त्यांतील वरचें इ. स. १२८६ तील कैकोबादाचें असून खालचे इ स ९०० किंवा ९५० च्या सुमाराचें काबूलच्या सामन्त देवाचें आहे. जसे जसे खाल खणात जावें तशा तशा त्यांत सांपडणाऱ्या विटा मोठमोठ्या दिसतात.यावरून प्राचीन लोक बऱ्याच मोठ्या आकाराच्या विटा वापरीत असत असे दिसते पण या खड्ड्यांत पुराणवस्तुविशारदांस विशेष महत्त्वाचे जे दोन शोध लागले ते दोन निराळ्या खोल्यांवर लागलेले राखेचे दोन थर होत. त्यांतील वरचा ३ फूट जाडीचा असून १५ फुटांवर सांपडला. ही जागा शतकास दीड फुटांच्या मानाने इ. स. ७१२ तील मुलतानावरील महमद कासिमाच्या स्वारीच्या काळाशी जुळते. त्यावेळी मुलतानच्या किल्ल्यावर हल्ला होऊन तो जाळून टाकण्यात आला होता. दुसरा थर ३२ फुटांवर लागला व त स्थान अलेक्झँडरच्या स्वारीच्या काळाशीं मिळतें. त्याने या प्रान्तावर स्वारी करून त्याची राजधानी सल्लोई ( मुलतान ) काबीज केली होती. त्यावेळी त्याला झालेल्या जखमेचा सूड म्हणन त्याच्या सैनिकांनी तेथील लोकांची कत्तल करून पुष्कळ जाळपोळ केली व त्या आगीचा हा थर अवशेष असावा. या दुसऱ्या थराच्या खालीं चांभाराची एक आरी व सुमारें २०० नाणीं असलेला एक तांब्याचा हंडा सांपडला. हीं नाणीं चौरसाकृति आहेत. ती इतकी गंजून गेलेली आहेत कीं, तीं कोणाचीं आहेत वगैरे काहीच सांगतां येणें शक्य नाही.'' पण त्यांवरून एक गोष्ट सिद्ध होते कीं, अलेक्झंडरच्या स्वारीच्या पूर्वी हिंदुस्थानांत नाणीं प्रचारांत होतीं. ( पान १२९ )

# टीप्पणी.

## पंजाबांतील लोक आर्य कसे राहिले ?

येणेप्रमाणें टक्क, जालंधर व मुलतान या पंजाबांतील राज्यांची जी कांहीं तुटपुंजी माहिती मिळाली ती येथें दिली आहे. आतां पंजाबाविषयीं दुसऱ्या एका प्रश्नाचा थोडासा ऊहापोह करावयाचा आहे. तो प्रश्न असा कीं, पंजाबप्रांत म्हणजे अस्सल भारतीय आर्यांची खास भूमि आणि लढाऊ लोकांचें माहेरघर असतांना त्यांत मध्ययुगीन काळांत एकही बलाढ्य व वैभवशाली हिंदूंचें राज्य आढळून येत नाहीं हें कसें ? वस्तुस्थिति अशी आहे कीं, शिकंदरच्या स्वारीपासून पंजाबप्रांत एकसारखा परकी लोकांच्या अंमलाखालीच आहे. पंजाबाची स्थिति या काळांत सरहद्दीवरच्या ठोकर खाणाऱ्या प्रांतासारखी झालेली होती. वायव्येकडून हिंदुस्थानावर स्वारी करणाऱ्या प्रत्येक झुंडीचे पहिले आघात त्यावर पडावयाचे. शिकंदरने भरतखंडावर स्वारी केली तेव्हां त्याला या प्रांतांत पुष्कळ राज्ये असलेली आढळलीं व त्यांतील लोकही त्याला त्यापूर्वी भेटलेल्या आशियांतील इतर लोकांपेक्षाअधिक कणखर होते. त्यावेळी शिकंदरला विरोध करणारे एकंदर ७० देशांचे लोक पंजाब व सिंधप्रांत मिळून होते असें अरायननें शिकंदरच्या स्वारीचे वर्णनांत लिहिलें आहे. प्राचीन पुराणादि ग्रंथ व महाभारत यांतही पंजाबांतील बऱ्याच राज्यांचीं नांवें आलीं आहेत; व त्यांपैकीं प्रस्तुत इतिहासविषयक काळांत कांहीं चालूही होती. गांधार, तक्षशिला, केकय, मद्र, त्रिगर्त, मालव, क्षुद्रक, शिबि, अंबष्ट, इत्यादि अनेक क्षत्रिय लढाऊ लोकांचीं राज्य शिकंदरचे वेळीं पंजाबांत होतीं. त्यांपैकीं बहुतेक शिकंदरनें जिंकिलीं, व त्यांत पुष्कळ क्षत्रियांचा संहार झाला. शिकंदरच्या स्वारीनंतर सुद्धां पंजाबावर परकी लोकांचे हल्ल्यावर हल्ले चालूच होते. कांहीं थोडासा काळ मात्र चंद्रगुप्त व अशोक यांचा अंमल पंजाबावर होता; पण इ. सनापूर्वी २०० पासून पुन: तेथें परकी अंमलाला सुरुवात होऊन बक्ट्रियांतील ग्रीक ( इ. सनापूर्वी २०० ते १०० ), शक ऊर्फ सिथियन लोक ( इ. सनापूर्वी १०० ते इ. स १०० ) कुशान ( इ. स. १०० ते ३०० ) आणि शेवटीं हूण ( इ. स. ४०० ते

५०० ) या लोकांनीं त्या प्रांतावर स्वाऱ्या करून तेथें राज्यें स्थापिलीं. म्हणजे शिकंदरच्या स्वारीचे वेळीं पंजाबांतील बहुतेक क्षत्रिय घराणीं नष्ट होऊन इ.सना-पूर्वी २०० पासून ते इ.स.५०० पर्यंत तेथें हिंदूंचे राज्य नामशेष झालें पुढें हूणांचा उच्छेद झाल्यावर पुनः पंजाबांत हिंदूंचा अंमल स्थापन झाला पण एकदां तेथील मूळ क्षत्रिय घराणी नष्ट झालेली असल्यामुळे हा मुलूख काश्मीर व सिंध येथील राज्यांच्या अमलाखाली वांटून गेला. सिंधूच्या पश्चिमेकडील हूणांच्या राज्याचे मुख्य ठाणे जो गांधार प्रांत तो काबूलच्या शाहीनामक क्षत्रिय घराण्याच्या ताब्यांत गेला. तक्षशिला व सिंहपुर ही काश्मीरकडे गेली, आणि मुलतान व पोफातो ही सिन्धुदेशच्या राज्यांत सामील झाली. आणि अशा रीतीने काश्मीर व सिन्धुदेश या राज्यांच्या सरहद्दी एकमेकींस येऊन भिडल्या. पंजाबाच्या पूर्वभागांत मात्र पूर्वी सांगितल्या प्रमाणें शाकलचें हूणराज्य बळकावून बसलेल्या टाक घराण्याचे आणि जालंधराचे अशी दोन राज्ये होतीं.

अशा रीतीनें एकसारखा परकी लोकांशीं संबंध येऊनही पंजाबप्रांत मानुष्यकशास्त्रदृष्ट्या व परंपरेनेही अस्सल आर्यांचा मुलूख ह्मणून आजवर कसा राहिला ! हा प्रश्न कठीण तर खराच पण मोठा महत्वाचा व मनोरंजकही आहे. मुसलमानांच्या पूर्वी १२०० वर्षेपर्यंत आणि मुसलमानी अमदानीत इ. स. १००० पासून तो १७०० पर्यंत पुनः ७०० वर्षे परकी अमलाखालीं राहिलेला पंजाब आजही अस्सल आर्यवस्तीचा मुलूख आहे ही गोष्ट सर हरबर्ट रिस्ले यांनी (१९०१) खनेसुमारीच्या इतिवृत्तांत स्पष्ट सिद्ध केली आहे. उच्च व नीच अशा दोन्ही प्रकारचे लोक ज्यांत आर्यवंशी आहेत असे प्रांत म्हटले म्हणजे पंजाब व राजपताना हेच होत, हें रिस्ले साहेबांनीं स्पष्टपणें दाखविलें आहे. सबब प्रस्तुत बिकट प्रश्नाचा उलगडा करण्याचा यत्न येथे जरूर केला पाहिजे. पंजाबांतील परिस्थितीची स्पष्ट कल्पना होण्यासाठीं वैदिक कालापासून तों चालू काळापर्यंत भारतीय लोकांच्या इतिहासाचें निरीक्षण केलें पाहिजे.

उत्तरध्रुवप्रदेशांतून आर्यलोक दक्षिणेकडे यावयास निघाल्यावर वैदिक किंवा अवैस्तिक ( पारशी लोकांच्या वेदतुल्य ग्रंथाच्या ) काळीं भारती

आर्यांना पंजाबचा मुलूख अगदीं मनाजोगा असा आढळला. तो सपाट मैदानांचा प्रदेश असून त्यांतील जमीन सुपीक व डोंगर दऱ्या यांनीं विरहित असल्यामुळें जात्या कृषिकर्मशील अशा आर्यांना तो मनापासून आवडला. मध्य आशियाच्या मैदानांतून ते खालीं उतरलेले असल्यामुळें डोंगराळ जमिनीची त्यांना अर्थातच आवड नव्हती. त्यामुळें मनूनें जांगल म्हणून म्हटलेला व फार सुपीक, सपाट आणि मध्य आशियांतील त्यांच्या पहिल्या मैदानी मुलखाप्रमाणेंच कोरडया हवेचा म्हणून वर्णिलेला असा हा पंजाबचा मुलूख त्यांच्या मनांत भरला. त्यांना हवा तसा हा प्रदेश मिळाला खरा; पण अवेस्त्यांत सांगितल्याप्रमाणें तो फार ऊष्ण व सर्पांनीं गजबजलेला होता. पण त्यांत मूळचे द्रविड वंशाचे लोक तुरळक होते. आर्यांनीं तेथे वस्ती करून जमिनीची लागवड सुरू केल्यावर मूळचे लोक खालीं दक्षिणेकडे उतरले. या कारणास्तव पंजाबांतील उच्च नीच अशा सर्वच जातींचे लोक आर्यवंशीय झाले. एखाद्या प्रदेशांत अमुक लोकांची वस्ती आहे असे म्हणतांना त्यांतील शेतकी करणारा वर्ग व राज्य करणारा वर्ग हे दोन्ही त्याच लोकांपैकीं असले पाहिजेत हें लक्षांत ठेविलें पाहिजे, पंजाबांतील शेतकरी वर्ग म्हणजे वैश्य वर्ग आर्यवंशीय आहे हे अनेकवार पूर्वीं सांगितलेंच आहे; आणि म्हणूनच पंजाब ही अस्सल आर्यांची भूमि होय असें म्हणावयाचें. त्यांतील अगदीं निकृष्ट वर्गाचे लोक म्हणजे मजूर वर्ग दास किंवा द्रविड वंशाचे होते, तथापि एकंदरींत तो प्रांत शिकंदराचे स्वारीपर्यंत प्रायः आर्यमयच होता, व अमेरिकेंत जशी दोन चार शतकांत यूरोपियन लोकांची झपाटयाने वाढ झाली, तशी या सुपीक पंजाबांत आर्यांचीही थोडया शतकांत वाढ होऊन तो प्रांत आर्यांनींच भरून गेला.

आतां हे जे पंजाबांत आर्य लोक येऊन प्रथम राहिले ते पहिल्या टोळींतील म्हणजे सूर्यवंशाचे होते असें आमचें मत आहे. दुसऱ्या टोळीचे म्हणजे सोमवंशी आर्य गिलगिटच्या मार्गानें गंगेच्या खोऱ्यांत मागाहून उतरले, आणि हिमालयाच्या पायथ्याला लागून गांधारापासून तों अयोध्येपर्यंत पसरलेल्या सौम्य हवेच्या सूर्यवंशाच्या आर्यभूमींत त्यांनीं पाचर

वजा प्रवेश केला. पण त्यांचा अयोध्येकडे काय किंवा पंजाबाकडे काय अधिक शिरकाव न झाल्यामुळें त्यांनीं ते मार्ग सोडून सरळ दक्षिण दिशा धरिली, व यमुनेच्या तीरातीरानें पसरत ते हळूहळू विंध्याद्रीपर्यंत आले; म्हणजे त्यांनीं दक्षिणेकडे जबलपूरपासून उज्जनीपर्यंत व उत्तरेकडे अलाहाबादपासून अंबाल्यापर्यंत सपाट प्रदेश व्यापिला. पण या भूमींत मूळची द्राविड जातीची वस्ती पंजाबापेक्षां बरीच दाट असल्यामुळें तिचें सामर्थ्यही अधिक होते. म्हणून कुरुक्षेत्र म्हणजे सोमवंशी क्षत्रियांच्या पहिल्या वसाहती.शिवाय इतर सर्व भागांत शेतकीचें काम या मूळ द्राविड लोकांकडेच राहिले. या बाबतीत पंजाबाहून या सोमवंशी क्षत्रियांच्या भूमीची स्थिति फार निराळी झाली. म्हणजे येथे एकंदर लोकवस्तीच्या दोन भिन्न शाखा झाल्या, व कनिष्ठ शाखेत द्राविड लोकांचा समावेश होऊन वरिष्ठ शाखेत आर्यलोकांचा भरणा झाला. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य म्हणजे धर्मरक्षक, लढाऊ व **व्यापारी**. या वर्गांतील येथील लोक आर्यवंशाचे तर शेतकी व बारीकसारीक धंदेवाले लोक आणि मजूर इतके द्राविड वंशाचे असा भेद उत्पन्न झाला. आणि या प्रदेशांतील आर्यलोकांनीं कनिष्ठ वर्गाच्या द्राविड लोकांशीं बेटीव्यवहार बऱ्याच प्रमाणांत चालू केल्यामुळें संयुक्तप्रांत व मध्यप्रांत यांत आज आढळून येत असलेले आर्यानार्यांचें मिश्रण उत्पन्न झाले.

बंगालमध्ये आर्यांचा प्रवेश यानंतर झाला. तेथे प्रथम केवळ कांहीं ब्राह्मण लोक पुरोहित किंवा उपाध्याय ह्मणून आपण होऊन किंवा तिकडील राजांच्या निमंत्रणांवरून तिकडे गेले, पण खालीं महाराष्ट्राकडे मात्र त्यांच्या मोठमोठ्या टोळ्या गेल्या. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें आर्यांना एकंदरींत कोरड्या हवेच्या मोकळ्या सुपीक व सपाट प्रदेशाची स्वभावतः आवड असल्यामुळें महाराष्ट्राचा प्रदेश पुनः त्यांना मनाजोगाच वाटला. त्यांत कित्येक ठिकाणीं जंगलें होतीं हें खरें, पण तो फारसा डोंगराळ नसल्यामुळें आर्यांनी त्यांत मोठ्या उत्साहानें वसाहती केल्या. वर सांगितलेल्या दुसऱ्या टोळींतील ह्मणजे सोमवंशाचे हे लोक होते हें सांगा-

बयास नकोच त्यांच्या द्राविड लोकांशीं बेटी व्यवहार करण्याच्या विशिष्ट प्रवृत्तीमुळे येथेही एकंदर वस्तींत मिश्रपणा येत चालला. तथापि महाराष्ट्रांत द्रविड लोकांची वस्ती विशेष दाट नसल्यामुळें जरी असे मिश्रण झालें, तथापि एकंदरीत भाषा व धर्म या बाबतीत समाजांवर आर्यांचेंच वर्चस्व बसले. यामुळेंच वऱ्हाड धरून झालेला महाराष्ट्र देशही भारतीय आर्यांची पूर्ण नव्हे तरी बहुंवशीं भूमि बनून राहिली. शतकरी वर्ग ज्या जातीचा त्या जातीचा मूळचा कोणताही देश समजावा हे वर सांगितलेंच आहे. त्या नियमाप्रमाणे पंजाबच्या खालोखाल आर्यजातीय किंवा मिश्र आर्य शेतकऱ्यांचा भरणा महाराष्ट्रातच आढळतो, व ह्मणूनच हिंदुस्थानच्या इतिहासात महाराष्ट्रीय वीरांनी लढाय्ये ह्मणून धुरंधर कीर्ति संपादिलेली आहे.

आतां महाराष्ट्राच्या दक्षिणेकडील प्रांताच्या म्हणजे मद्रास इलाख्याचा विचार केल्यास त्यांत समुद्रतीराजवळच्या प्रदेशांत द्रविड जातीच्या लोकांची वस्ति दाट होती व त्यांची संस्कृतिही उत्तर द्राविडांपेक्षां उच्च दर्जाची होती. त्यामुळे ब्राह्मणाशिवाय आर्यवर्गाचा फार प्रवेश झाला नाहीं. ब्राम्हण मात्र धर्मोपाध्याय म्हणून स्वतः किंवा तिकडील लोकांनीं बोलावल्यामुळें तिकडे गेले. या ब्राह्मणांनीं द्राविड लोकांना जरी आर्यधर्माची दीक्षा दिली, तथापि आपली भाषा कांहीं त्यांना तिकडे स्थापित करतां आली नाहीं उलट त्यांनाच द्राविड भाषांचा अवलंब करावा लागला पश्चिमसमुद्रतीरीं कोंकणांमध्ये आणि पूर्वसमुद्रतीरावर आंध्र देशांतही उत्तरेकडून येऊन भारतीय आर्यांनी वसाहती केल्या. या दोन्ही ठिकाणी शेतकरी वर्ग द्रविडजातीचाच होता. पण कोंकणांत त्यांची वस्ति कमी असल्यामुळें आर्यभाषेची तेथें छाप बसली, परंतु आंध्रदेशांत ती दाट असल्यामुळें त्यांच्यांवर आयभाषेचा फारसा परिणाम न होतां उलट तेथे आलेल्या अव्वल किंवा मिश्रित आर्यांनाच मूळ लोकांची भाषा स्वीकारावी लागली.

महाभारताच्या अंतिम संस्करणाच्या काळापर्यंत भरतखंडांत भारतीय आर्यांनीं केलेल्या वसाहतीचा हा असा संक्षिप्त इतिहास आहे. महाभारताच्या उपसंहारांत सांगितल्याप्रमाणें सौतिकृत महाभारताचें तृतीय म्हणजे अंतिम संस्करण शिकंदरच्या स्वारीच्या नंतर लवकरच झालें. त्यावेळीं सर्व

हिंदुस्थानभर लोकवस्ति झालेली असून महाभारतांत वर्णिल्याप्रमाणें ( भीष्म-पर्व, अध्याय ९ ) त्यांत अस्सल आर्य, मिश्र आर्य व म्लेच्छ अशा तिन्ही प्रकारच्या लोकांची राज्यें होतीं. त्यांपैकीं पंजाब व अयोध्या या प्रांतांत अस्सल आर्य होते; संयुक्तप्रांत मध्यप्रांत, मध्य हिंदुस्थान व कोंकणासह महाराष्ट्र येथें मिश्र आर्य होते; व तसेच ते आंध्रांतही होते महाभारतांतील भरतखंडांतर्गत लोकांच्या यादीत आंध्रांचाही समावेश केलेला आहे. या प्रांतांच्या पलीकडे पांड्य, चोल, केरल इत्यादि द्राविड म्लेच्छ असून भरतखंडाच्या बाहेर उत्तरेकडे शक, बर्बर, कांबोज इत्यादि इतर म्लेच्छ जाती रहात होत्या. महाभारतांतील भरतखंडांतर्गत लोकांच्या यादींत अंग, वंग, कलिंग मिळून झालेल्या बंगाल प्रांताचाही अन्तर्भाव केलेला असल्यामुळे तेथेंहि याकाळीं निदान मिश्र आर्यांचीच वस्ती असली पाहिजे हे लक्षांत येण्यासारखे आहे.

आतां शिकंदरच्या स्वारीचें अनुकरण करून परकीय म्लेच्छ लोकांनीं पंजाबावर हल्ल्यांमागून हल्ले चढवून तेथील आर्य क्षत्रिय घराण्यांचा बहुतांशीं उच्छेद केल्यावर त्या प्रांताची स्थिति काय झाली याचा थोडा विचार करूं. ऐतिहासिकरीत्या सिद्ध झालेल्या गोष्टींवरून इतके दिसून येतें कीं, जरी शिकंदरच्या स्वारी नंतर कांही काळपर्यंत पंजाब प्रांत पाटलिपुत्राच्या मौर्य साम्राज्याच्या अमलाखालीं होता, तथापि इ. स. पूर्वी २०० पासून परकीय म्लेच्छांच्या एकामागून एक अनेक टोळ्या पंजाबवर येऊन त्यांनीं तेथें बलाढ्य राज्यें स्थापन केलीं. त्यांतील पहिली टोळी बॅक्ट्रियांतील ग्रीक लोकांची, त्यांच्या मागून शक आले, व त्यांच्या नंतर यूची म्लेच्छांनी कनिष्काच्या नेतृत्वाखालीं पंजाबच्या पलीकडे उत्तरेपासून तो दक्षिणेकडे सांप्रतच्या संयुक्त प्रांतापर्यंतच्या विस्तृत प्रदेशावर साम्राज्य स्थापन केलें. या हल्ल्यांत पंजाबांतील सर्व आर्य क्षत्रिय घराण्यांचा एकतर नाश झाला किंवा खालीं दक्षिणेंत त्यांना निसटून जावें लागलें. अशा तऱ्हेनें खालच्या मध्यहिंदुस्थांतील मैदानी मुलखांत उतरलेल्या स्वातंत्र्यप्रिय आर्य क्षत्रिय लोकांपैकीं मालव वगैरे लोक होते. तथापि एकंदरींत पंजाबची आर्य वस्ती त्यांमुळें कमी न होतां बहुतेक

पूर्वी सारखीच राहिली. एकदां पाण्यानें कांठोंकांठ भरलेल्या भांड्यांत जसें आणखी कितीही पाणी ओतलें तरी तें आंतल्या पाण्याच्या प्रमाणावर कांहीं परिणाम करीत नाहीं, त्याप्रमाणें एका मागून एक अशा परकी लोकांच्या स्वाऱ्या पंजाबावर झाल्या, तरी त्या वरचेवर निघून जाऊन खालीं आर्यांची वस्ति तशीच स्थिर राहिली. त्यांतील लढाऊ राजघराणीं अर्थात् नष्ट झालीं पण स्थिरावलेली एकंदर आर्य वैश्यांची तेथील वस्ति त्यामुळें मुळींच विछिन्न झाली नाहीं.

या पंजाबांतील प्रकाराचें रहस्य नीट लक्षांत यावयाला पाहिजे तर पुढील काळांत जेत्या राष्ट्रांनीं कशा काय हालचाली केल्या व त्यांची व्यवस्था कशी लागली याचा विचार मनांत आणावयास हवा. मानव समाजाच्या उत्क्रान्तीच्या आरंभीं आरंभीं जेव्हां एखादी टोळी दुसरीकडे वसाहत करण्यासाठीं म्हणून निघे तेव्हां तीत पुरुषांबरोबर बायका व मुलें यां सुद्धां सर्व संसार असे; व त्यांची वसाहत अर्थात् रिकाम्या किंवा जवळ जवळ रिकाम्या अशाच प्रदेशांत होई. पण पुढें पुढें मानवसमाज विस्तार पावल्यावर जेव्हां एकादी टोळी प्रदेश काबीज करण्यासाठीं निघे, तेव्हां बहुधा अगोदर वसाहत पूर्ण झालेल्या ठिकाणींच तिला उतरावें लागे, व त्यामुळे तेथे तिला आपल्या मनगटाच्या जोरावर शेतकरी म्हणून नव्हे तर राज्यकर्ते या नात्याने बाहेरून आलेले बलिष्ठ लोक म्हणून तुटकपणेंच रहाण्याचा प्रसंग येई. अशा स्थितींत शेतकीचे व इतर बारीक सारीक कलेचें किंवा धंद्याचे काम तेथ मूळ स्थिरावलेल्या लोकांकडेच राही. राज्यकर्ते लोक बहुधा मोठमोठ्या शहरांतून मात्र रहात; त्यांचा प्रवेश खेड्या पाड्यांतून सहसा होत नसे. अमीर उमराव, सरदार मानकरी अशा नात्याने मोठमोठ्या ठिकाणीं बहुधा वस्ती करीत. नार्मंडीच्या विल्यमानें इंग्लंड देश जिंकल्यावर तेथें हाच प्रकार घडून आला. सांप्रत ब्रिटिश अमदानींत हाच प्रकार घडत असलेला आपण पहातों. जित व जेते एका धर्माचे असूनही जर त्यांचे वंश भिन्न असले, तर त पूर्वी स्थिरावलेल्या जितांशी एक जिव न होतां त्यांच्या पासून अगदीं विलगच रहातात. याचींहि जीवंत उदाहरणें सांप्रत हिंदु-

स्थानांत पहावयास मिळतात. शियाच्या राज्यांतील मराठे किंवा दक्षिणेंत मोंगलाईतील मोंगल हे तेथील लोकांशीं न मिसळतां बाहेरून आलेले वरिष्ठ दर्जाचे लोक म्हणून मोठमोठ्या शहरांत व राजधान्यांत बडे कामदार किंवा जमीनदार या नात्यानें लोकांवर हुकमत चालवीत. त्यांच्या पासून अलगच राहिले आहेत. सामान्य जनतेपासून अगदीं विलग्नपणे रहाणाऱ्या अशा लोकांचा संख्येने विस्तार सहसा होत नाहीं ही गोष्ट कोणालाही दिसून येईल;व असे होणे स्वाभाविकही आहे.सर्व प्रदेश जेव्हां मनुष्यविहीन असतो तेव्हां त्यांत प्रथम वसाहत करणाऱ्या लोकांची संख्या इतक्या झपाट्यानें वाढते कीं शें दोनशें वर्षांतच तो सर्व प्रदेश त्यांना पुरा पडे-नासा होतो. पण या लोकांवर वरिष्ठ म्हणून हुकमत चालविणारे लोक राज्यकर्त्यांच्या स्वाभाविक चैनबाजीला बळी पडल्यामुळे संख्येच्या दृष्टीने त्यांचा कधी उत्कर्ष होत नाहीं. उदाहरणार्थ बडोदे संस्थानांतील मराठे व हैदराबाद संस्थानांतील मोंगल यांची संख्या आज इतकीं वर्षं झाली तरी बहुतेक आहे तेवढीच आहे. त्या त्या प्रान्तांत त्यांचीं राज्यें स्थापन होऊन गेल्यास दोनशे वर्षे होऊन गेलीं तरी त्यांच्या संख्येंत दृष्टो-त्पत्तीस येण्यासारखी वाढ झालेली नाहीं.

आतां या लोकांची राज्ये त्या प्रान्तांतून नाहीशीं झाल्यां अशी कल्पना करून काय परिणाम होईल तो पाहूं. आज केवळ राज्यकर्ते म्हणून अलग-पणे मिरविणारे हे लोक तेथून निघून गल्यास एकंदर जनतेवर त्या गोष्टीचा यत्किंचितहि परिणाम होणार नाही. इंग्लिशांचा अंमल जर कोणत्याहि कारणाने हिंदुस्थानातून नाहीसा झाला तर त्यांची देखील अशीच स्थिति होईल; म्हणजे ज्या अर्थी त्यांची तेथे वाढ होत नाहीं इतकेंच नव्हे तर ते येथे घरें दारें करून खील रहात नाहींत, त्या अर्थी ते तेथून पूर्णपणेंद नामशेष होतील. ग्वाल्हेरचे मराठे किंवा हैदराबादचे मोंगल यांचीं तेथून राज्यें नाहींशीं झाल्यास ते परत आपापल्या मूलस्थानीं येतील; व ज्यांनीं तेथे घरें दारें केलीं आहेत ते जरी नंतर तिकडे राहिले, तरी त्या बिकट परिस्थि-तींत त्यांची संख्या हळुहळू कमी होऊन शेवटीं ते नामशेष झाल्यावांचून रहाणार नाहींत अशी इतिहासांची कल्पना आहे.ही जी उदाहरणासाठीं काल्पनिक स्थिति

आपण घेतली तीच वस्तुतः पंजाबाच्या इतिहासांत निरनिराळ्या परकी लोकांच्या स्वाऱ्यांच्या प्रसंगाने घडून आलेली आहे. तेथील बॅक्ट्रियन ग्रीक-लोकांचा अंमल शक लोकांनी पंजाबांतून नष्ट केल्यावर ग्रीक लोकांचे तेथे कांहींच राहिले नाहीं त्याचप्रमाणे पुढे इ. सनापूर्वी ५७ या वर्षी विक्रमादित्याने शकांना हांकून लाविल्यावर शकांचेही उत्तर हिंदुस्थान व पंजाब येथे नांवाशिवाय कांहीं शिल्लक उरले नाहीं. कुशन लोकांचा अंमल पंजाब व त्याच्या आसमंतातच्या प्रदेशावर इ. स. १५० पासून ३०० पर्यंत म्हणजे दीडशे वर्षे असूनही तो नष्ट झाल्याबरोबर त्याचा मागमूसही तेथून नाहींसा झाला. कारण ते झाले तरी बड अंमलदार म्हणून केवळ शहरांतूनच राहिल्यामुळे त्यांची संख्या न बाढतां त्याचे राज्य गेल्याबरोबर त्यांना ती भूमिच सोडून जावे लागले, व जे तेथेच वस्ती करून राहिले तेही क्रमाक्रमाने नामशेष होऊन गेले. त्यांच्या नंतर इ. स. ४०० च्या सुमारास हूणांचा प्रवेश पंजाबांत झाला, व त्यांनी सुमारे १०० वर्षे तेथे राज्य केल्यावर इ. स. ५०० च्या सुमारास त्यांचा पाडाव झाला. तेव्हां गांधार प्रांतांतील त्यांचे राज्य ह्युएनत्संग म्हणतो त्याप्रमाणे काबूलच्या क्षत्रिय घराण्याकडे गेले व शाकल ऊर्फ सियालकोट जवळचे पंजाबातील राज्य टाक घराण्याने काबीज केले. या नंतरही हिंदुस्थानांत हूणांचे लहानसे राज्य कोठे तरी राहिलेलें होते असें दिसतें. कारण पुढील इतिहासांत कोणा हूण घराण्याचा उल्लेख दृष्टीस पडतो. पण त्यानें एकदर जनतेच्या स्थितीवर कांहीं आघात न होतां ती तशीच अबाधित राहिली. इतक्याही उपर जे कांहीं हूण येथे शिल्लक राहिले त्यांची भारतीय समाजनियमांच्या अनुरोधानें एक स्वतंत्र जात बनून तिचा इतरांशीं रोटी बेटी व्यवहार न झाल्यामुळें एकंदर लोकांत संकर झाला नाहीं. अलीकडील इतिहास काळांत परकी लोकांच्या अमलाचा एकदां पूर्णपणें स्थिरावून गेलेल्या लोकसंख्येदर काय परिणाम झाला याचा जर नीट विचार केला, तर आम्हाला वाटतें, पंजाबांत आर्यलोक एकदां स्थिरस्थावर झाल्यावर त्यांना ज्या ग्रीक, शक, कुशन, हूण इत्यादि लोकांनीं वेळोवेळीं जिंकिलें ते स्वतःच एकामागून एक तेथून नाहीसे झाले, प्रथम स्थिरावलेल्या आर्य लोकांचा तसा कांहीं प्रकार झाला नाहीं हेंच म्हणणें

युक्त दिसतें. याच्या उलट आर्य लोकांचेंच तेथून उच्चाटन होऊन शकांचा तेथें प्रसार झाला, असें जें कित्येक हिंदी प्राच्यविद्याविशारदांचें मत आहे तें आमच्या दृष्टीनें वेडेपणाचें आहे. पंजाबांतील लोकसमूह प्राधान्येंकरून प्रथमार्यवंशीय आहे, ही जी गोष्ट मानुष्यकशास्त्राधारें आतां निःसंशय सिद्ध झाली आहे, तिची उपपत्ति खरें म्हटल्यास वरील विवेचनांतच आहे असें आम्हाला वाटतें. ग्रीक लोकांपासून तों अलीकडील मोगलांपर्यंत अनेक लोकांच्या वावटळी पंजाबावरून गेल्या तरी एकंदर तेथील लोकसंख्या अबाधितपणें अस्सल आर्य राहिली, याचें बीज वरील उपपत्तीच होय.

तथापि इतक्या वावटळींतून पंजाबचा लोकसमाज जरी मुख्यतः अस्सल आर्य राहिला, तरी या परकी स्वाऱ्यांचे व त्यांच्या अंमलाचे दोन तऱ्हेचे परिणाम त्या प्रांतावर कायमचे घडून आले. पहिला परिणाम असा झाला कीं, सामान्यपणे आर्य लोकांत जी स्वातंत्र्यप्रियता दिसून येते ती पंजाबांतून नष्ट झाली. पंजाबी लोक उंच व मजबूत बांध्याचे आणि शूर वृत्तीचे असूनहि पुढील इतिहासांत त्यांनीं स्वातंत्र्य मिळविण्याचा प्रयत्न केलेला कव्हांही दिसत नाहीं. या पुस्तकाच्या पहिल्या भागांत राज्यप्राप्तीविषयीच्या व राजधर्माच्या ज्या कल्पना हिंदी लोकांत त्यावेळीं दृढ झाल्या म्हणून सांगितले आहे, त्यामुळेही पंजाबी लोकांच्या स्वातंत्र्येच्छेला आळा पडला पूर्वजन्मींच्या सुकृतामुळे राज्यप्राप्ति होते, व त्यामुळें राजा कोण असावा व राज्यकारभाराचे स्वरूप कसें असावें या गोष्टींत मन घालण्याचें प्रजेला कांहीं कारण नाहीं, परमेश्वरी इच्छेनें ज्याला राजपद प्राप्त झालें त्याच्या आज्ञा शिरसामान्य करून तदनुसार वागणें एवढेच प्रजेचें कर्तव्य होय, अशा कल्पनांचें प्राबल्य झाल्यावर मुलतानहून अरबांनीं अंमल चालविला काय किंवा श्रीनगराहून काश्मीरी राजांनी चालविला काय, पंजाबी लोकांना त्याचा विषाद वाटला नाहीं. तेथें कित्येक क्षत्रिय घराणीं बारीकसारीक जहागीरदार म्हणून राहिलीं होती हें खरें; इतकेंच नव्हे तर, इ. स. ५०० पासून १००० पर्यंत कित्येक रजपूत घराणीं राजपुतान्यांतून परत पंजाबांतही गेलीं, असें आपल्याला पुढील इतिहासावरून दिसून येणार आहे. तरी पण त्यांपैकीं कोणीही तेथें नवीन हिंदुराज्य स्थापन करण्याचा प्रयत्न केलेला आढळत नाहीं; तीं सर्व आपापल्या जहागिरीवर संतुष्ट

राहिली. हे क्षत्रिय किंवा रजपूत–पुढील काळांत क्षत्रिय ( खत्री ) शब्दाचा अर्थ हीन होऊन तो बहुतेक व्यापार उदीम करणाऱ्या लोकांचा वाचक झाला–एखाद्या खेड्याचे इनामदार असून त्यांना तेथें राजा पदवी असे व तेथील त्याचीं कुळें व न्हावी धोबी वगैरे बलुतेवाले लोक त्यांना मुजराही करीत ही गोष्ट खरी. गीतेंत सांगितल्याप्रमाणें ईश्वरभाव म्हणजे हुकमत चालविण्याचा अधिकार हा क्षत्रियांचा स्वाभाविक धर्म होय. पण या पंजाबांतील रजपुतांमध्यें या स्वाभाविक प्रवृत्तीचा स्वराज्य–स्थापनेंत पर्यवसान होण्याइतका परिपोष केव्हांहि झाला नाहीं. दीर्घकालपर्यंत परकीय अमलाच्या जोखडाखालीं मान असल्यामुळें त्यांना तीच संवय लागून आपापल्या जहागिरींत जोंपर्यंत आपल्या पूर्वापार चालीरीतींना अनुसरून आपल्या जिंनगीचा उपभोग घेतां येतो आहे, तोंपर्यंत वरतीं राज्य कोणाचें आहे या गोष्टीकडे लक्ष देण्याची त्यांना कधींच बुद्धि झाली नाहीं.

पंजाबांतील परकीय अमलाच्या काळांतील दुसरी महत्वाची लक्षांत घेण्यासारखी गोष्ट ही कीं, राजे व प्रजा यांच्यांत धर्माचा भेद नव्हता. एक अपवाद खेरीज करून बाकी हे सर्व परकीय लोक बौद्धधर्मीय होते व पंजाबांतील लोकहीं तेव्हां अर्धवट हिंदु व अर्धवट बौद्धच होते. त्यामुळें धार्मिक दृष्ट्या त्यांच्यांत तेढ उत्पन्न होण्याचें विशेष कारण नव्हतें. परकीय अमलाच्या कडूपणांत धार्मिक तेढीची भर या काळांत मुळींच पडली नाहीं. मिहिरकुलाच्या अमदानींतील हूण लोक बौद्ध नसून शैव होते, पण तेहि एकंदर जनतेंत धर्मदृष्ट्या जी विचारक्रांति होत होती तिला अनुसरूनच तसे झाले होते. त्याच्या वेळीं बौद्धधर्माविरुद्ध लोकमत बनत चाललें असल्यामुळें, बौद्धधर्मीयांचा त्यानें जो छळ केला म्हणून ह्युएनत्संगानें म्हटलें आहे, त्यानें लोकांत कांहीं क्षोभ उत्पन्न झाला नाहीं असें आम्हाला वाटतें. म्हणजे मिहिरकुलाच्या कारकीर्दींतही राजा व प्रजा याच्यांत धर्मभेद नव्हता. या कारणास्तव देखील पंजाबी लढवय्या रजपुतांना परकीय अमलाविरुद्ध तक्रार करण्याचें कारण न वाटून त्याची त्यांना संवय होऊन गेली. ही जी एकदां संवय झाली तिच्यामुळें पंजाबी लोकांची वृत्ति इतकी बोथट झाली कीं, पुढें मुसलमानी स्वाऱ्यांच्या वेळीं जेव्हां धार्मिक विरोध उत्पन्न झाला तेव्हांही पंजाबी लोकांना त्यांच्याविरुद्ध उचल करण्याची इच्छा झाली नाहीं.

## २. पंजाबांतील प्राचीन नाण्यांचें वर्णन.

कनिंगहॅम कृत पुराणवस्तुसंशोधनवृत्त, पुस्तक १४, पानें १३६ ते १५१.

१ औदुम्बर–मुख्य शहर पठाणकोट व प्रान्ताचें नांव नुरपुर. नाणें तांब्याचें चौकोनी असून हिंदी काकिणीवजा आहे. वजन २५ ग्रेन. मुखावर उजव्या बाजूला झाडाकडे जाणारा हत्ती व त्याच्या भोंवती बौद्धपद्धतीचा कठडा; त्याच्या खालीं सर्प व दोन्हीं बाजूंला आरियन पाली लिपींत एक अर्धवट मायना (हा वाचतां येत नाहीं) व त्याच्या पुढें 'औदुम्बर' हा शब्द. पाठीवर तीन मजली व सहा खांबाचें मनोऱ्याचें देऊळ असून त्याच्या डावीकडे स्वस्तिक आणि उजवीकडे धर्मचक्र.

२ कुनिंद देश–याला ह्युएत्संग स्रुघ्न म्हणतो. यांत रावीपासून टॉन्स नदीपर्यंतचा मुलूख येतो. नाणीं रुप्याचीं अर्ध्या द्रम्माच्या आकाराचीं व कांहीं तांब्याचींही आहेत. मुखावर हिंदी पालीलिपींत मायना असून कांहींवरच्या पाठीवर देखील आरियन पालीलिपींत तसाच आहे. पण बहुतेकांत मुखावरचा एकच मायना व तोही हिंदी पालींत आहे. त्यांत " राज्ञः कुनन्दस अमोघभूतिस महाराजस " ( कुनन्दाचे राजे महाराज अमोघभूति यांचा ) असे शब्द आहेत. मुखावर मध्यभागीं हरिण व त्याजबळ ऽऽ या आकाराचें बौद्ध चिन्ह, व उजव्या बाजूला हरिणापुढें उजवा हात उभारून त्यांत कमळ धारण केलेली स्त्री असें चित्र असून बाजूला वर सांगितलेला मायना आहे. पाठीवर अर्धचक्राच्या आंत एक चैत्य, बौद्धपद्धतीच्या कठड्यांत बोधिवृक्ष आणि स्वस्तिक अशीं चिन्हें आहेत.

तांब्याचीं नाणीं रुप्याच्या नाण्यांच्या सारखीच असून ७६ ग्रेन वजनाचें अर्धपण आहेत.

३ यौधेय–हे पंजाबांतील मोठे लढवय्ये लोक असून पाणिनीनेंहि त्यांचा उल्लेख केला आहे. त्यांचें अलीकडील नांव जोहिये असें आहे. भावलपुच्या सरहद्दीवर, सतलज नदीच्या दोन्ही तीरांवर त्यांचा मुलूख असून

त्याला त्यानीं जोहियाबार असें नांव दिलेलें आहे. त्यांचीं नाणीं दिल्ली व लुधि यानापर्यंत सांपडतात. त्यांतील फार जुनीं अशीं यमुनेच्या पूर्वेस बिहाट शहराच्या पडक्या भागांत सांपडलीं. समुद्रगुप्तानें मालव आणि अर्जुनायन यांच्या मागून व मद्र आणि आभीर यांच्या पूर्वी यौधेयांचा निर्देश केला आहे. वराहमिहिरानें देखील गांधार आणि हिंताल यांच्या बरोबर त्यांचें नांव सांगितलें आहे. ब्रम्हपुराण आणि हरिवंश यांत उशीनराचा पुत्र व शिबीचा कनिष्ठ बंधु जो नृग तो यौधेयांचा पूर्वज म्हणून वर्णिला आहे. म्हणजे ते आनव ऊर्फ अनूचे वंशीय होत. त्यांच्या नाण्यांपैकीं लहान नाणीं ख्रिस्ती शकापूर्वीचीं असून मोठीं सिथियन लोकांच्या ऱ्हासानंतरचीं व गुप्त-साम्राज्याच्या आरंभीचीं आहेत.

लहान नाणीं—यांच्या मुखावर उजवीकडे चालणारा हत्ती व त्याच्या वरतीं धर्मचक्र आहे. पाठीवर उजवीकडे जाणारा वशिंडाचा नंदी असून भोंवतीं बौद्धपद्धतीचा कठडा आहे. मायना ‘ यौधेयन ’ हा आहे.

मोठीं नाणीं-मुखावर उभारलेल्या उजव्या हातांत भाला घेतलेला समोर उभा असलेला पुरुष, व त्याच्या डावीकडे उभा कोंबडा. मायना “ जय यौधेयगणस्स ” असा असून वाटोळा कडेनें लिहिलेला आहे. पाठीवर किंचित् डाव्या बाजूला तोंडासमोर हात उभारलेल्या पुरुषाची आकृति असून तिची बैठक सिथियन लोकांच्या नाण्यावरील मिथ्राच्या सारखी आहे. इतर नाण्यांचें वर्णन अशाच प्रकारचें आहे.

हीं नाणीं बौद्धपद्धतीचीं दिसत नाहींत त्यांवरील मायन्यांतल्या ‘ जय ’ शब्दांवरून पहातां कुशनांच्या पाडाव झाल्यानंतरचीं तीं असावींत. असें म्हणा-वयास हरकत नाहीं. त्यांतील ‘ गण ’ शब्दही लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

हे यौधेय लोक प्राचीन असून शिकंदरच्या स्वारीच्या वर्णनांत त्यांचा उल्लेख नाहीं हें चमत्कारिक दिसतें. त्यांविषयीं कनिंगहॅम म्हणतो “यौधेय हे हैड्रॉसिस्टिस ऊर्फ रावी नदीच्या कांठीं रहाणाऱ्या एरियाटिक नांवाच्या ज्या लोकांचा आरियननें उल्लेख केला आहे तेच होत असें म्हणावयास मला आतां चांगलें कारण मिळालें आहे. याच लोकांना महाभारतांत अराष्ट्र किंवा अरट्ट असें म्हटलें आहे असें लासन म्हणतो. अराष्ट्र म्हणजे अरा

जक असा अर्थ असल्यामुळें तें नांव यौधेयांच्या तिन्ही टोळ्यांना लागण्याबारखें आहे. अरट्टांच्याही महाभारतांत तीन जाती टक्क, बाहीक, आणि जर्टिक या नांवानीं सांगितल्या आहेत." या उताऱ्यांतील शेवटचें वाक्य महत्वाचें आहे, व तें मूळ कोठें आहे तें अवश्य पाहिलें पाहिजे. त्यावरून जर्टिक म्हणजे हल्लीं ज्यांना जाट म्हणतात ते लोक फार प्राचीन असून टक्कही तसेंच होत व ते हिंदुस्थानांत शिकंदरच्या पूर्वीच आलेले असले पाहिजेत मागाहून नव्हेत हें स्पष्ट दिसून येतें.

" या नाण्यांवरील कोंबडयाचें चित्र लढवय्येपणाचें लक्षण आहे. पाणिनीच्या सूत्राप्रमाणें यौधेय शब्दाचा अर्थ योद्धा असा होतो, व पंजाबांतील लवणाचलाजवळ ( मिठाच्या डोंगरांच्या ओळींजवळ ) रहाणारे जोध किंवा जुध लोक हे सुद्धां यौधेयांपैकींच एक जात असली पाहिजे."

"यांच्या रुप्याच्या नाण्यांपैकीं एक चमत्कारिक प्रकारचें असून तें यौधेय राजा भागवतभक्त ब्राह्मणदेव याचें आहे. त्याचा आकार वाटोळा असून मुखावर उजव्या हातांत भाला धरलेल्या षण्मुखी पुरुषाची समोर उभी आकृति आहे. त्याजवर प्राचीन लिपींत 'भगवतो स्वामिनो ब्राह्मण्य यौधेय' असा मायना आहे. पाठीवर समोर उभी असलेल्या स्त्रीची आकृति असून तिचा एक हात वर केलेला, पायाशीं कलश, उजव्याबाजूला बौद्धपद्धतीच्या कठडयाच्या आंत बोधिवृक्ष आणि डाव्याबाजूला धर्मचक्राच्या आंत चैत्य असें आहे. त्यांतील कांहीं नाण्यांवरील मायन्यांत ' ब्रह्मण्य देवस्य' असे शब्द आहेत. इतर एका प्रकारच्या नाण्यांवरील मायन्यांत ' भगवतो स्वामिनो' हे शब्द गाळलेले आहेत. एका नाण्यावर ' भानुवर्मा' असें नांव आहे. हें नाणें ब्राह्मणदेवाच्या दुसऱ्या ३०० नाण्यांबरोबर ज्या देशांत सांपडलें त्या देशाचाच हा भानुवर्मा राजा असला पाहिजे."

४ शिबि—सिबि किंवा शिबि अनूच्या वंशांतील उशीनराच्या सहा पुत्रांपैकीं एक होय असें पुराणांत म्हटलें आहे. यौधेयांचा मूळ पुरुष जो नृग त्याचा सिबि हा वडील बंधु होता. याचा आणखी एक धाकटा बंधु जो दार्व त्यापासून दार्वाभिसार लोक झाले. ते पंजाब व सिंध येथील सुप्रसिद्ध लोकांपैकीं असून वृषदर्भ, संवीर, केकय व मद्र यांचे पूर्वज असून ते

सुप्रसिद्धच आहेत. स्ट्रॅबोनें सिबि लोकांचा प्रदेश मालोई (मालव) लोकांच्या उत्तरेस होता असें म्हटलें आहे. सिंधप्रांतांतील सिन्धु नदीच्या पश्चिमेकडील सिबिस्तान म्हणजेच शिबींचा देश होय हें आम्हीं पूर्वी दाखविलेंच आहे.

यांचीं जीं नाणीं सांपडलीं आहेत तीं वर्तुळाकृति असून त्यांत कांहीं अर्धपण व कांहीं काकिणी आहेत. त्यांच्या मुखावर मधोमध फुली असून तिच्या प्रत्येक कोनांत कांहीं लहानसें चिन्ह आहे. त्याच्या उजवीकडे वर्तुळांतून निघालेला एक सरळ वृक्ष आहे. मायना प्राचीन लिपींत असून "मझिमिकय सिबि जनपदस" असे त्याचे शब्द आहेत (शिबीचा मझिमिक देशांतील ). पाठीवर धमचक्रान्तर्गत चैत्य असून खाली सर्पाची आकृति आहे.

हीं नाणीं ख्रिस्ती शतकापूर्वींचीं आहेत. ती मध्य राजपुतान्यांतील चितोडच्या मुलुखांत सांपडलेलीं असल्यामुळें शिबीचा मझिमिक देश म्हणजे लाहोर व अमृतसर यांच्या सभोंवतीचा प्रदेश असल्यामुळें, मालोइ ऊर्फ मालव लोक जसे माळव्यांत गेले, त्याप्रमाणे हे मझिमिक सिबिही शिकंदरच्या स्वारीनंतरच राजपुतान्यांत गेले असले पाहिजेत.

६ उज्जनी–ही माळवाप्रांताची सुप्रसिद्ध राजधानी होय. येथील नाणीं वाटोळीं असून त्यांच्या मुखावर मनुष्याच्या हाताची आकृति तिच्या डावीकडे बौद्ध चक्र आहे. तिच्या खालीं अशोक लिपींत 'ऊजनेय' असा मायन्याचा शब्द आहे. पाठीवर वशिंडाचा नंदी व त्यावर उज्जनीचें सुप्रसिद्ध चिन्ह म्हणजे फुली व त्यांत नंदींची आकृति असें आहे ( या चिन्हांचा अर्थ काय तें मात्र समजत नाहीं. कदाचित् नंदी म्हणजे महाकालाचें वाहन असून त्यावरून उज्जनीचा महाकाल अशोका इतकातरी प्राचीन आहे, असें म्हणतां येण्यासारखें आहे )

८ **मालव**––राजपुतान्यांत उमयारच्या नैऋत्येस १५ मैलांवर नगर नामक प्राचीन ठिकाणांत निरनिराळ्या काळचीं लहान लहान हजारों नाणीं सांपडलीं आहेत. कार्लाईलनें त्याचें वर्णन दिले असून त्यांतील कांहीं भाग खालीं दिला आहे.

नाणें नंबर १९––मुखावर बसलेला नंदी व त्याच्या वाटोळें दि॰ ई॰ चें मोबदल

वर्तुळ असून पाठीवर तालवृक्ष व ' जय मालवाणं ' असा दोन ओळींत लिहिलेला मायना.

नाणें नंबर २०—मुखावर डावीकडे तोंड केलेला राजाचा मुखवटा व त्याच्या भोंवतीं टिंबाचें वर्तुळ. पाठीवर वरीलप्रमाणेंच वृक्ष व मायना.

नाणें नंबर २१—मुखावर टिंबांच्या चौरसाच्या आंत कलश. पाठीवर वरीलप्रमाणेंच वृक्ष व मायना.

इतर नाण्यांवर मुखाच्या बाजूला वशिंडाचा नंदी किंवा तक्षशिला येथील नाण्यांवरील चिन्हाप्रमाणें सिंह व पाठीवर वरीलप्रमाणें मायना आहे. शेवटच्या नाण्यावर मात्र ' मालव ' एवढाच मायना आहे. आतां हे मालव कोण असा प्रश्न आहे. आज ज्याला माळवा म्हणतात, त्यांतील उज्जनी किंवा बेसनगर येथील कांहीं ते नव्हत; कारण तीं नाणीं या ठिकाणीं सांपडलेलीं नाहींत. वराहमिहिराने उत्तर भागांत मद्रांबरोबर मालवांचा नामनिर्देश केला आहे. ज्या नगराजवळ हीं नाणीं सांपडलीं त्या जवळच्या डोंगरांना पाठारचे डोंगर असें नांव आहे. उत्तरेकडील हा मालवप्रांत दक्षिणेस चितोडपर्यंत पसरलेला असला पाहिजे. किंवा कदाचित् हरियानापासून नर्मदेपर्यंतच्या सगळ्याच प्रदेशाला मालवप्रांत असें सामान्यपणे नांव असेल. मालव लोक मूळ पंजाबांतून हल्लींच्या माळव्यांत आले असावे असा आमचा तर्क आम्हीं पूर्वींच सांगितला आहे. नगर जवळ सांपडलेल्या या नाण्यांवरून मालवांच्या प्रवासांतील हें मधलें ठिकाणच सांपडलें, असें म्हणावयास हरकत नाहीं.

९ राज्ञो जनपदस–हीं नाणीं दोन प्रकारचीं आहेत. एकांत ' राज्ञो जनपदस ' हा मायना आरियन पालि लीपींत असून दुसऱ्यांत तो हिंदी पालींत आहे; मुखावर उभा असलेला मनुष्य आणि पाठीवर किरणवाल्याच्यामध्यें वशिंडाचा नंदी आहे. कनिंगहॅमच्यामतें हीं नाणीं राजस्थानांतील असावींत व राज्ञःजनपद ( राजांचा देश ) म्हणजे राजस्थानाचें नांव असावें. हीं नाणीं नक्की कोणत्या ठिकाणीं सांपडलीं हें सांगितलेलें नाहीं. पण ९ व्या शतकापर्यंत किंवा त्यानंतरहि कांहीं काळापर्यंत राजपुतान्याला राजस्थान हें नांव पडलेलें नसल्यामुळें कनिंगहॅमचें मत चिंत्य आहे.

## ३. पंजाबांतील लवणाचलाच्या जवळील प्रांतांतील प्राचीन अवशेष ( कनिंगहॅमकृत पुराणवस्तुसंशोधन वृत्त पु. ५ )

ह्युएनत्संगानें ज्याला सिंहपुर असें नांव दिलें आहे तो पंजाबांतील लवणाचलाचा मुलुख होय असें कनिंगहॅमने ठरविलें आहे व तें बरोबर दिसतें. त्याच्यामतें त्या देशाची राजधानी मालोट येथें होती; कारण त्या ठिकाणीं तशा प्रकारचे प्राचीन अवशेष दृष्टीस पडतात. तेथील किल्ला डोंगरांच्या ओळीच्या पुढें आलेल्या एका कड्यावर असून तेथून खालीं मैदानावरील दूरवरचा प्रदेश पहातां येतो. त्याची उंची समुद्रसपाटीपासून ३००० फूट आहे. त्यांतील बांधकामापैकीं एक देऊळ व मुख्य दरवाजा एवढींच काय तीं आज शिल्लक असून त्यांची रचना काश्मिरी पद्धतीची आहे. म्हणजे ह्युएनत्संगाने म्हटल्या माणें हा प्रांत काश्मीर राज्याच्या अमलाखालीं होता असें उघड दिसतें. या देवळाच्या व दरवाजाच्या तिपानी कमानीच्या शिखराचा दगड विशिष्ट आकाराचा दोन थरांच्या जाडीचा असन काश्मिरी देवळांतहि असाच प्रकार असतो त्याच्या तिपानी कमानीची उंची व कोनांच्या चौरस खांबाचा अजस्रपणा यामुळें एकंदर इमारतीला मोठी भव्यता आलेली असून त्याच्या अर्धनलिकाकृति खांबावरील नक्षीच्या पन्हळांमुळें तर ती फार शोभिवत दिसते. मुख्य दरवाजाचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे. तो देवळाच्या पूर्वेस असून २५ फूट लांब व २४ फूट रुंद इतका प्रचंड आहे. त्याच्या आंतल्या भींतींत मूर्ति ठेवण्यासाठी उत्तम नक्षीकामाचे कोनाडे केलेले आहेत, व त्यांनाही तिपानी कमानी असून त्या भिंतींतील खांबांवर उभारलेल्या आहेत. यांतील प्रत्येक कोनाड्यावर एक एक सिंह बसविला असून त्याच्या डोक्यावर तिपानी छताची आकृति आहे. त्याच्या भिंतींतील अर्धनलिकाकृति मोठ्या खांबाच्या अंतर्भागांत बारा बारा पन्हळ आहेत. ते खांब वीस फूट उंच असून त्यांचीं शिखरें प्राचीन ग्रीक नमुन्याच्या काश्मीरी पद्धतीचीं आहेत व त्यांवर नेहमींच्या नक्षीदार आकृति कोरिलेल्या आहेत. पण या खांबाचा हिंदी शिल्पकलेचा अभ्यास करणारांना विशेष महत्वाचा भाग म्हणजे पाया होय.

---

# सूचि--विषयवार.

——oo——

# शुद्धिपत्र.



[काना, मात्रा, वेलांटी चुकलेल्या दिल्या नाहींत.]

| अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ | ओळ |
|---|---|---|---|
| देवगुप्ताच्या | शंशाकगुप्ताच्या | ८ | १५ |
| त्याज्य | तें त्याज्य | २३ | ३ |
| समारुरुक्षगति | समारुरुक्षति | २८ | १६ |
| सिन्धुराजे | सिन्धुराजं | ३९ | ८ |
| चन्द्राबर | चन्द्र वर | ४६ | ७ |
| वाटून | वाढून | ५६ | १७ |
| वाटेल मनोरंजक आहे | वाचकांस मनोरंजक वाटेल | ५८ | १९ |
| प्रणैत्रो | प्रपौत्रो | ६१ | २७ |
| विलें | ठेविलें | ६९ | ८ |
| सं. ६६० | सन ६०६ | ६९ | १५ |
| त्यांचाच असे | त्यांचा नसें | ७७ | ८ |
| त्यांना दुर्दैवानें | दुर्दैवाने | ८१ | १७ |
| रांभवो...तांभवो | संभवो–संभवो | ९४ | ४ |
| जनैएडत्मानं | जनैरात्मानं | १४३ | ३ |
| अपोपयाच्य | विप्रोपयाच्य | १५२ | २१ |
| हिंदुत्व | हिंदु व | १५४ | ३ |
| इर्वाचीही | इर्वाची ही | १६५ | ९ |
| द्यावया | द्यावयाचा | १८६ | २ |
| अधिकारी | अधिकार त्यांस | १९० | १० |
| सभात्र | सभासत्र | १९७ | १६ |
| दुण्डयाशिक | दण्डपाशिक | २०१ | २ |

## दुसरें पुस्तक.

| अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ | ओळ. |
|---|---|---|---|
| शिबिस्तांनी | शिबिस्थान ही | २३ | २ |
| सौम्य | सौम्य होऊन | २४ | १० |
| देकरन बाधिया | नेरून व बुधिया | २५ | २२ |
| सुद्धानुकूल | युद्धानुकूळ | ,, | १४ |
| कोणत्या देशांत | कोणत्याही देशांत | २९ | १८ |
| स्वभूशीं | स्वभूमि | ,, | ,, |
| सुवर्णाची | लाकडाची | ४४ | १५ |
| लाकडांची | सुवर्णाची | ४४ | १६ |
| रजपुतान्यांतील | पंजाबांतील | ५३ | २० |
| संप्रत्यभ्यधिकं | सम्प्रत्यभ्यधिकं | ७३ | २६ |
| पश्चब्दाह | पश्चाब्दाहु | ८८ | २६ |
| पुच्छे वाससी | पुच्छंवाससि ,, | २७, | २८ |
| मान देणारे...तत्वाला | ...तत्वाला मान देणारे | १५० | २० |
| जात | प्रजा | १५६ | २२ |
| ६५३ | ७५३ | १८५ | ७ |
| ७१० | ६१९ | १९० | २६ |
| विजयादित्य | विनयादित्य | १८२, १८३ | २१,२३,२५ |
| ७६२ | ६६२ | २५३ | २७ |
| व्हिन्सेंट स्मिथनें | हंटरनें | २६३ | २५ |
| युद्धि | युधि | २६८ | ७ |
| थंग ह्युएनत्सेग | थंग ह्युएनत्से | २७५ | १० |
| तिनी | च्चिनी | २७६ | २७ |
| मह्याला | मह्याचा | २८२ | २७ |
| पुढें...करूं | पूर्वी...केलें आहे | २८५ | १९ |
| धनकट | धनकक्ट | २९०,२९२ | ६,७,११ |

| अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ | ओळ. |
|---|---|---|---|
| स्कोरी | शिवरी | २९७ | २५ |
| वर्षें | वर्षात | ३०७ | ९ |
| असून | नसून | ३११ | ५ |
| तिरडून | तिरडून | ३१५ | २५ |
| लिच्छ | लिच्छवि | ३२५ | २ |
| हिमालहीन | हिमालयीन | ३२७ | ४ |
| ५३९ | ६३९ | ३२६ | १४ |